# भूकम्प




या वर्षी १९ सप्टेम्बरला गणेशचतुर्थी होती. दहा दिवसांनी मूर्तींचे विसर्जन झाले. फारच आनन्द आणि अुत्साहाने संपूर्ण देशात गणेश विसर्जनाचा हा कार्यक्रम साजरा झाला. महाराष्ट्रात तर हा गणपती अुत्सव व विसर्जनाचा सोहळा फारच धाम-धुमीत साजरा होतो.

लातूर जिल्हा हा मराठवाड्याचा एक भाग. २१ सप्टेंबरला खिलारी गावच्या जनतेने गणेश मूर्तींच्या विसर्जनासाठी मोठी मिरवणूक काढली. 'गणपतीबाप्पा मोरया' असे ओरडत आणि मुक्तंकठाने गाणी गात, आपल्या प्रिय भगवान गणेशाचे आशिर्वाद मागत ते विसर्जनासाठी गेले. 'पुढल्या वर्षी लवकर या' असे आव्हानही त्यांनी गणपतीबाप्पाला केले.

रात्री अुशीरानेच ते सारे आपापल्या घरी गेले. दिवसभराच्या नाचानाचीने दमलेले सारेजण लवकरच निद्रादेवीच्या अधीन झाले. त्यांच्यातले काही अुत्साही वीर मात्र नंतरही आपले मनोरंजन करून घेत, पत्ते खेळत अुरलेली रात्र जागवत राहिले. भाग्याने यांच्यातलेच काही जण आज जिवन्त आहेत. हे लोक जेंव्हा त्या दुःखद घटनेचे वर्णन करतात, तेंव्हा त्यांच्या डोळ्यातून अश्रु ओघळतात! रडतात ते! त्या दिवशी पहाटे मराठवाड्यातील पन्नास गावे आणि दोन शहरांना भूकम्पाचा जोरदार धक्का बसला! काही क्षणातच सारे काही नष्ट झाले, साऱ्याचा विध्वंस झाला! हा नैसर्गिक कोप पहाटे चार वाजायला दहा मिनिटे कमी असताना झाला.

विन्ध्य पर्वताच्या दक्षिणेकडील अनेक राज्यात भूकम्पाचा धक्का जाणवला. या भूकम्पाचा रिश्टर स्तर ६.५ होता. या बाबत काही विशेषज्ञांचा असा अभिप्राय आहे की, हा भूकंप तसा विशेष भयानक स्वरूपाचा नव्हे. परंतु तितकासा जास्त शक्तीचा नसलेल्या या भूकंपामुळे हानि मात्र प्रचंड प्रमाणावर झाली. सुरुवातीला असे अनुमान केले गेले की मनुष्यहानी वीस ते तीस हजारपर्यन्त झाली असावी. भूकम्पग्रस्त क्षेत्रात

एकही घर असे नसेल की जिथे मनुष्य हानि झाली नाही किंवा अन्य स्वरूपाचे नुकसान झाले नाही! येथील घरांच्या भिंती दगडमातीच्या व छपरे कौलारू होती. एका अहवालानुसार असे कळते की तेथील एक गणेशमंदिर पूर्णपणे जमीनदोस्त झाले, पण विघ्नहर्त्या गणेशाची मूर्ती मात्र अगदी जशीच्या तशी शाबुत आहे!

१९६७ च्या डिसेंबरमधे महाराष्ट्रात कोयना धरणाच्या आसपास मोठा भूकम्प झाला होता. पण दोनशेपेक्षाही कमीच माणसे त्यावेळी मृत्युमुखी पडली होती. ऑक्टोबर १९९१ मधे अुत्तर प्रदेशातील अुत्तरकाशी येथे भूकम्प झाला होता (६.१). त्यात ८०,००० लोकांचे खूपसे नुकसान झाले. त्यातील दोन हजार मृत्युमुखी पडले होते. असे कळते की गेल्या वर्षीही खिलारी गावात भूकम्पाचा धक्का बसला होता. या प्रकारचे कमीत कमी १२५ तरी भूकम्प जाणवले होते. तरीही ते क्षेत्र धोक्याचे क्षेत्र म्हणून जाहिर झाले नव्हते. परंतु सप्टेंबर ३० च्या या भूकम्पाचे केन्द्र मात्र खिलारी गावच होते.

व्यक्तिगत व सामूहिक स्वरूपात बरीचशी माणसे व सेवा-संस्था तेथे मदतीसाठी पोचल्या. त्यांनी अनेकांचे जीव वाचवले आणि ढिगाऱ्यांखालून जिवन्त माणसांना व जनावरांना बाहेर काढले. अनेक सरकारी शाखाही त्यांचा बचाव व मदतीसाठी एकत्र आल्या. त्यांनी खाणे, कपडा, डोक्यावर छप्पर व औषधे या स्वरूपात खूपशी मदत केली. त्याबरोबरच आपद्ग्रस्तांना आर्थिक सहाय्यही देण्यात आले.

भूकंपांबाबत काही वैज्ञानिक सिद्धान्त आहेत. काही नैसर्गिक प्रकोपांचा पूर्व अन्दाज करता येत नाही. त्याप्रमाणेच भूकंपाचाही असा अन्दाज करता येत नही. जमिनीच्या आतील पाणी घटू लागले की एक प्रकारची पोकळी निर्माण होते आणि जमीन दुभंगू लागते. मानवप्राणी पाण्यासाठी जमीन खोदतो, अविचाराने झाडे तोडतो. अशा वेळी 'झाडे जमीनीला एकत्र घट्ट धरून ठेवतात ' हे तत्त्व, ते विसरून जातात. अशा परिस्थितीत भूमातेचा आपल्यावर कोप झाला, तर त्यात आश्चर्य कसले?

चार्लस फ्रान्सिस रिश्टर (१९००–१९८५) या अमेरिकन शास्त्रज्ञाने भूकंपाच्या १.१० पर्यन्तच्या शक्तीचे मापन करायची पध्दत शोधून काढली. या पध्दतीने भूकंपामुळे होणाऱ्या स्पंदनाच्या शक्तीचे मापन होवू शकते. यापूर्वी मेर्कल्ली मापनपध्दती यासाठी अुपयोगात आणली जात असे. (इटॅलियन भूकंप-वैज्ञानिक गिसेप्पे मेर्कल्ली यांच्या नावावरून या पद्धतीला हे नाव दिले गेले.)

## पृथ्वीवरील प्रमुख भूकंप

**भारत**

ऑक्टो. ११,१७३७, कलकत्ता, ३,००,००० पेक्षा अधिक प्राणहानी.
जाने. १५,१९३४, भारत-नेपाळची सरहद्द (८.४), मृत्युसंख्या १०,०००.
मे ३१, १९३५, क्वेट्टा (आता पाकिस्तानात) (७.५), मृतक ३०,०००.
जून २६, १९४१,अंदमान (८.१).
ऑगस्ट १५, १९५०, आसाम (८.५).

**बाकीचे जग**

पूर्व मेडिटरेनियनमधे १२०१ च्या जुलै महिन्यात जगातला सर्वात मोठा भूकंप झाला. त्यात १,१००,००० इतके लोक मृत्युमुखी पडले होते.



# खरी संपत्ति

रामपुरमधे गंगाधर हा एक लहानसा व्यापारी होता.त्याची बायको बाळंतपणासाठी माहेरी गेलेली होती. बायको व नवजात बाळाला पाहून गंगाधर संध्याकाळी घराकडे येत असताना दुरूनच त्याला आपल्या घरासमोर एक बग्गी अुभी असलेली दिसली. रेशमी पडदे वगैरे लावून ती सुशोभित केलेली होती. त्याची आई स्वतः बग्गीपर्यन्त येअून तिने पाहुण्यांना निरोप दिला. हा प्रकार पाहून गंगाधरला भारी आश्चर्य वाटले. हे इतके श्रीमन्त पाहुणे आपल्या घरी कसे?"

गंगाधर घरी पोचेपर्यन्त बग्गी बरीच पुढे निघून गेली होती. आईने त्याला पहाताच विचारले, "सुनबाई ठीक आहे ना? मुलगा कसा आहे दिसायला?"

"दोघंही ठीक आहेत आई. पण आपल्या घरी कोणी बडी माणसं आली होती? बग्गीला रेशमी पडदे वगैरे लावलेले दिसले. कोण आलं होतं आपल्याकडे?"

मुलाच्या या प्रश्नाने अन्नपूर्णा एकदम दचकली. पण स्वतःला सावरून ती पटकन् म्हणाली, "ते लोक? अरे कोणी दोन-चार माणसं नव्हती रे; एकच बाई आली होती बग्गीतून. माझी लहानपणची ती मैत्रीण खुशाली विचारायला आली होती."

"पण तू तर कधी आपल्या या श्रीमन्त मैत्रिणीबद्दल बोललीही नव्हतीस माझ्याशी?" आश्चर्य प्रकट करत गंगाधर बोलला.

"एक काळी ते कुटुम्बही मध्यमवर्गीयच होतं. भाग्य अुजळलं अन् आता लखपती बनलीय ती. तुझे वडील गेल्यावर आपल्यालाही नाही का संकटांना तोंड द्यावं लागलं? भाग्यानं आपणही आता चांगले आहोत नं! कुणाचं नशीब कसं पालटेल

अरविन्द तावसे

"सांगता येतं का कुणाला?" अन्नपूर्णाने समजावणी केली.

गंगाधरच्या वयाच्या आठव्या वर्षीच त्याचे वडील वारले. झोपडीच्या चारी बाजूंना जी मोकळी जागा होती तीत नारळाची बरीच झाडे होती. गंगाधर नारळ हातगाडीवर घालून गल्लोगल्ली फिरून विकत असे. त्याची आई तीन चार घरी मोलकरणीचे काम करी. लहानपणापासूनच गंगाधरने आईला खूप मदत केली, अन् आता त्याने एक छानसे घरही बांधले होते.

मागील दारच्या विहीरीवर पाय धुवून घरात येत गंगाधरने आईला विचारले, "काय बोलत होती मैत्रिण तुझी?"

"ती अुगीच काही गप्पा मारायला नव्हती आली रे! तिच्या एकुलत्या एका मुलाचं लग्न ठरलंय. एका आठवड्यानंतरचाच मुहूर्त आहे. तिनं आग्रहानं चार दिवस अगोदर पासूनच बोलावलं आहे आपल्याला." अन्नपूर्णाने सांगितले.

जरा विचार करून गंगाधर म्हणाला, "तुझी जवळची मैत्रिण असेलही ती. पण तीन-चार दिवस अगोदर जाणं गैरसोयीचं आहे आपल्याला. आपण फक्त आदल्या दिवशीच जाऊ. ठीक आहे नं?"

अन्नपूर्णाला हा बेत तितकासा रुचला नाही. पण तिने 'हो' म्हणत डोके हलवले. लग्नाला जायच्या दिवशी तिने खरीदलेले कपडे गंगाधरला दाखवत म्हटले, "मी हा पोषाक नवऱ्यामुलासाठी घेतलाय. कसा आहे?"

गंगाधरच्या चेहऱ्यावर नाराजी दिसत होती. तो बोलला, "चांगला तर आहेच; पण तुला शहरात घेऊन जाऊन डॉक्टरकडून तपासण्यासाठी मी जे पैसे बाजूला ठेवले होते, त्यातून तू पाचशे रुपये खर्च केलेस. बास, याचंच वाईट वाटलं मला जरासं."

यावर काही बोलायचे मनात असूनही अन्नपूर्णा गप्प बसली.

संध्याकाळी मायलेक लग्नघरी पोचले. दुसऱ्या दिवशी लग्न होते. थाटामाटाचे, किंमती कपडे घातलेल्या तिथल्या लोकांनी सामान्य पोशाखातल्या या दोघांकडे काहीसे दुर्लक्षच केले.

दोनतीन खोल्या ओलांडून पुढे गेल्यावर अन्नपूर्णाला आपली मैत्रिण इन्दुमती दिसली. "या, या!" म्हणत तिने अन्नपूर्णाचा हात पकडला.

अन्नपूर्णाने विचारले, "पण नवरामुलगा कुठाय?"

"इतकी काय अुतावळी होतेस? चल दाखवते." असे म्हणत इंदुमती त्या दोघांना आपल्या महालवजा वाड्याच्या मागल्या भागात घेऊन गेली.

तिथे नवरामुलगा कमल आपल्या मित्रांसह बसलेला होता. मोठ्याने बोलणे-हसणे चालू होते सर्वांचे. आईला तिथे आलेली पाहून चिडचिडत तो म्हणाला, "आई, किती वेळा सांगितलंय मी तुला, कि मी मित्रांबरोबर बसलेला असताना तू येत जाऊ नकोस म्हणून!"

ते ऐकून जरा खिन्न होत इन्दुमती म्हणाली, "माझ्या या मैत्रिणीला तुला पाह्यचं होतं म्हणून घेऊन आले रे!"







"हं, असल्या येऱ्यागबाळ्या मैत्रिणी तुझ्या!" असे म्हणत कमलने अन्नपूर्णा व गंगाधरकडे तुच्छतेने पाहिले.

पण त्याच्या या बोलण्याची काही पर्वा न करता अन्नपूर्णा त्याच्याजवळ जाऊन म्हणाली, "लग्न करून शंभर वर्ष सुखी रहा बाळ!" अन् नवा पोशाख तिने त्याच्या हाती दिला.

त्या कपड्यांकडे तीक्ष्ण दृष्टीने पाहून कमल म्हणाला, "अगदी वेळेवर कपडे आणलेस पहा मावशी! आमचा नोकर त्याला लग्नासाठी नवे कपडे न घेतल्याबद्दल तक्रार करत होता." अन् लगेच नोकराला बोलावून त्याने तो पोशाख त्याच्या हवाली केला.

अन्नपूर्णा आणि इन्दुमतीने एकमेकींकडे पाहून माना खाली घातल्या. अन् त्या तिथून बाहेर निघून आल्या. गंगाधरचा तर या अपमानाने अगदी तिळपापड झाला होता!

वाड्यापासून दोन गल्ल्या दूर असणाऱ्या एका मोठ्या महालात लग्नसोहळा धुमधडाक्याने पार पडला.

नवरीमुलगी दिसायला अगदीच कशीतरी होती. मित्र जेंव्हा कमलजवळ तिच्या रूपाबद्दल बोलले, तेंव्हा तिथेच असणाऱ्या गंगाधर व अन्नपूर्णा यांची दखल न घेता त्याने तारे तोडले, "काय करायचं! माझा जो व्यापार आहे नं, तेवढ्यावर मी खूष नाहीये. समुद्री व्यापारासाठी खूपच मोठी रक्कम हवीय मला. या लग्नामुळे मला पाच लाख हुंडा मिळतोय, म्हणून मी बायकोच्या रूपाचा विचारच नाही केला. आणखी एकदोघांनी दहा लाखांचीही गोष्ट केली होती. पण त्या तर अगदीच 'हिडिंबा' होत्या! म्हणून हे स्थळ पत्करलं; दुर्भाग्य माझं!"

हे प्रलाप ऐकून तर गंगाधर चाटच पडला! अन्नपूर्णाच्या डोळ्यातही अश्रु उभे राहिले!

मायलेक त्याच दिवशी भाड्याच्या गाडीने घरी निघून गेले. आईला फार दुःख झालंय, अन् ती मधून मधून पदराने डोळे पुसतेय हे पाहून गंगाधरलाही वाईट वाटले. तो म्हणाला, "आई, कमलने केलेल्या अपमानानं वाईट वाटतंय का तुला? पण आपण तरी काय करणार? मोठा गर्विष्ठ आहे तो. बास झालं, आता नको रडूस."

पण आता मात्र तिला रहावेना. ती



म्हणाली, "तुला माहीताय, हा कमल कोण ते?"

"तूच तर म्हणालीस ना, की तो तुझी मैत्रिण इंदुमति हिचा मुलगा म्हणून?" आश्चर्याने गंगाधरने विचारले.

"नाही. तो भाऊ आहे तुझा! आजपर्यन्त मी ही गोष्ट गुप्त ठेवली होती तुझ्यापासून! आता मात्र सांगितल्या शिवाय रहावत नाही मला!" तिने दृढपणे म्हटले. पतिनिधनानन्तर अन्नपूर्णा आसपासच्या घरांतून मोलकरणीचे काम करू लागली. त्यावेळी गंगाधर जवळपास आठ वर्षांचा होता. तो नारळ विकायचे काम करू लागला. पण त्याच्यापेक्षा धाकटा कमल दोनच वर्षांचा होता.

एके दिवशी दुपारी इन्दुमति आपल्या बग्गीतून घरी परतत होती. ऊन्ह लागून ती बेशुद्ध झाली. ते पाहून गाडीवान घाबरला अन् अन्नपूर्णाच्या झोपडीसमोर त्याने बग्गी थांबवली. त्याचवेळी नारळ विकून गंगाधर घराकडे येत होता. त्याने भरकन नारळ फोडून त्यातले पाणी इंदुमतीच्या चेहऱ्यावर शिंपडले अन् ती सावध झाल्यावर तिला नारळाचेच पाणी पाजले. संध्याकाळपर्यन्त तिने झोपडीतच आराम केला. गंगाधर तर तिला देवासारखाच वाटू लागला.

निघण्यापूर्वी अन्नपूर्णाला जरा बाजूला घेऊन जाऊन इंदुमती म्हणाली, "तुझ्या मुलानं आज माझा जीव वाचवलाय. मला कोणी मूलबाळ नाहीय, म्हणून एकादा मुलगा



दत्तक घ्यायचाय मला. तुझी हरकत नसेल तर गंगाधरलाच दत्तक घेईन मी. नीट विचार कर अन् चार दिवसात कळव मला. आपले नाव आणि पत्ता एका कागदावर लिहून दिला तिने."

"गंगाधर तसा मोठा झालाय. मला मदत करतो. पैशांच्या दृष्टीनेही हातभार लावतो. त्याला दत्तक दिला तर माझ्या अडचणी आणखीनच वाढतील. पण धाकट्या कमलचं लालन-पालन मात्र माझ्याकडून ठीक होत नाहीय. मुलांना दूर करायचं मन होत नाहीय, पण याला दत्तक दिला, तर त्याचं तरी भविष्य बरं होईल!" अन्नपूर्णेने विचार केला आणि तिने हा निश्चय केला अन् इतरांना 'आपण कुंभमेळ्याला जात आहोत' असे सांगून

कमलला इन्दुमतीच्या हवाली केला.

"होय. तू हा बरोबर विचार केलास. हा लहान असल्याने त्याला ही काहीच आठवण रहाणार नाही. 'आपण माझाच मुलगा आहोत' असं तो समजेल. पण आता माझी एक अट- या जन्मात तू पुन्हा कधी माझ्या घरात पाअून ठेवायचं नाहीस." असे म्हणून इन्दुमती तिला दहा हजार रुपये देअू लागली.

पण नकार देत अन्नपूर्णा म्हणाली, "मी आपल्या मुलाला विकत नाहीय. त्याच्या सुखद भविष्यासाठीच केवळ मनावर दगड ठेअून त्याचा त्याग करतेय. कमीत कमी त्याच्या लग्नाच्या वेळी बोलावलं तर आई म्हणून आशिर्वाद देअून परत फिरेन." इतके बोलून अन्नपूर्णा घरी आली.

गावी परत आल्यावर 'मुलगा मेळ्यात हरवला' असे लोकांना सांगून तिने वेळ निभाअून नेली.

हा सारा वृत्तान्त अन्नपूर्णेने आता गंगाधरला सांगून म्हटले की, "खरं तर कमलच्या जागी तू असायचा होतास. ती सारी इस्टेट अनं ऐश्वर्य खरं म्हणजे तुझंच होतं. इन्दुमतीच्या मनात तुलाच दत्तक घ्यायचं होतं."

गंगाधरला यावर हसू आले. तो म्हणाला, "आई, जगात सुखी आणि संपन्न जीवन जगायला पैसा हेच काही एकमात्र साधन नव्हे. कमलजवळ ऐश्वर्य आहे, पण तो काय आज समाधानी आहे? हुंड्याच्या लालचेनं त्यानं एका कुरूप मुलीशी लग्न केलंय; आणि आणखी जास्त हुंडा देणारीला नकार द्यावा लागल्याबद्दल असमाधानी आहे तो! माझ्या भावाजवळ 'तृप्ति' नावाचं जी खरी संपत्ति नाहीय, ती आज माझ्याजवळ न मोजता येण्याइतकी आहे."

मुलाचे हे बोलणे ऐकून आपल्या डोक्यावरचे ओझे अुतरल्यासारखे अन्नपूर्णेला वाटले. मुलाची विचारशक्ती आणि मनोप्रवृत्ती पाहून ती आनन्दित झाली. बस यापेक्षा एका आईला आणखी काय हवे?





# अद्‌भुत फूल-८

(शताब्दी फुले घेअून अुत्तुंग मध्यरात्री समुद्राच्या पाण्यात शिरला. त्याला तिथे राक्षसी प्राणी दिसला. जमीन शोधत तो जेंव्हा परत फिरू लागला, तेंव्हा एका मोठ्या लाटेने त्याची नाव अुचलली आणि समुद्रकिनाऱ्यावर भिरकावली. नंतर तो जेंव्हा जरा डुलकी घेत होता, तेंव्हा पहाडी जातीच्या काही तरुणी तिथे आल्या आणि शताब्दि फुले अुचलून त्या आपल्या वस्तीकडे चालू लागल्या. मग अुत्तुंगही त्यांच्या पाठोपाठ त्यांच्या वस्तीत गेला. —त्यानन्तर)

अंथरलेली एक चटई दाखवत घरी आलेल्या त्या धष्टपुष्ट माणसाने अुत्तुंगला विचारले, "श्रृंग्माय पर्वत प्रदेशातून इतक्या दूर तू एकटाच कसा काय आलास?"

चटईवर बसत अुत्तुंग अुत्तरला, "माणिक्यपुरीच्या दक्षिण सरहद्दीपासून काल संध्याकाळी मी नावेतून निघालो. बरेच अंतर चालून आल्यावर सकाळी समुद्रात एक मोठी लाट अुसळली अन् त्यामुळे माझी नाव किनाऱ्यावर येअून पडली. मी मुद्दाम होअून इकडे आलो नाहीय."

इतक्यात एक वृद्ध स्त्री दोन रुंदशा भांड्यातून खाण्यापिण्याचे पदार्थ घेअून त्या खोलीत आली. दोघांसमोर भांडी ठेवून ती स्त्री आत निघून गेली.

त्या धष्टपुष्ट माणसाने त्यातले एक भांडे स्वतः अुचलत दुसरे अुत्तुंगला दाखवत



म्हटले, "घे."

"मी इथे आल्याबरोबर त्या स्त्रीने मला पेय देऊन माझी तहान शमवली आहे." असे म्हणत त्याने मोठ्या उत्साहाने भांडे हातात उचलले.

त्या मजबुत माणसाने विचारले, "केंव्हा आलास इथे तू? "

अुत्तुंग म्हणाला, " मी स्वत: नाही आलो. मला इथं आणलं गेलंय!"

"कोणी आणलं?" त्या माणसाने विचारले.

हातातले पेय पिअून भांडे खाली ठेवत अुत्तुंग म्हणाला, "मी जेंव्हा नावेतून बाहेर फेकला गेलो, त्यावेळी मी फार थकून गेलो होतो. जरा आराम करावा म्हणून मी डोळे मिटून घेतले. एकाएकी हसण्याच्या आवाजाने मी जागा झालो, तेंव्हा माझ्याभोवती पहाडी जातीच्या काही युवतींचा गराडा पडलेला होता. मी आणलेली फुलं त्यांच्या हातात होती. त्यांचं बोलणं मला समजलं नाही, पण त्यांच्या खुणा ओळखून मी त्यांच्याबरोबरच इथे येअून पोचलोय. त्या मला इथं घेऊन आल्या आहेत. मी आपण होऊन इथं आलेलो नाही."

इतक्यात त्या प्रौढ स्त्रीने फुलांचा एक मोठा गुच्छ आणला आणि तो त्या माणसासमोर ठेअून ती म्हणाली, "काबुई, आपली मुलगी ही फुलं घेअून आलीय, पाहिलंस किती सुन्दर आहेत ती?"

काबुई म्हणाला, "सुंदर आहेत खरी, पण आपली मुलगी ती इकडे घेअून का आली? तिनं असं करायला नको होतं."

"यांचा वास फार छान आहे ना? तिलाही आवडली फुलं, म्हणून घेअून आली." प्रौढा म्हणाली.

"पण या तरुणानं ती कुठेशी घेअून जाण्यासाठी आणली आहेत. ती अशी आणणं बरं नव्हे! यामुळे हा अडचणीत आला तर?" काबुई म्हणाला.

यावर काही न बोलता ती स्त्री तेथून निघून गेली. तिचे बोलणे अुत्तुंगला कळले नव्हते, पण त्याने इतके मात्र ओळखले की काबुई हा त्या कबिल्याचा प्रधान आहे. आणि अधिकार-वाणीने सर्वांशी बोलत आहे.

"यांना 'शताब्दि फुलं' असं म्हणतात. एका अत्यन्त आवश्यक कामासाठी मी ती दूर एका प्रदेशात घेअून चाललो आहे." अुत्तुंग म्हणाला. पण खरी गोष्ट त्याने हेतुपुरस्सर गुप्तच ठेवली.

काबुई म्हणाला, " आमच्या या प्रान्ताचं नाव आहे नागपुरी. माणिक्यपुरीपासून हे काही विशेष लांब नाही. तुला इथून किती दूर जायचंय? तोपर्यन्त ही फुलं सुकून जातील ना!"

आता मात्र अुत्तुंगला वाटले की खरी गोष्ट गुप्त ठेवून काही अुपयोग नाही. नंतर आपल्या प्रवासाच्या अुद्देशाबद्दल त्याने काबुईला सविस्तर सगळे सांगितले. ते ऐकून काबुई म्हणाला, "समुद्रात तू राक्षसी प्राण्याला तोंड द्यायचा निश्चय केलायस. तुझं धैर्य नक्कीच प्रशंसनीय आहे. संकटात सापडलेल्या आपल्या राज्यातल्या जनतेचं रक्षण करण्याचा तुझा संकल्पही अुत्तम आहे. तू एक आदर्श युवक आहेस. त्या राक्षसी प्राण्यापासून आमचं काहीही नुकसान होणं शक्य नाही. कारण आमच्या या प्रान्ताच्या चारी बाजूंना एकाचा किल्ल्याच्या तटाप्रमाणे मोठमोठे खडक आणि पहाड आहेत. निसर्गानंच हे वरदान दिलंय आम्हाला. शत्रूच्या आक्रमणाचं भय आम्हाला कधीच नसतं. आणि आमचं आयुष्य सुखशान्तीचं आहे."

"होय, खरी गोष्ट आहे ही. पण आमच्या माणिक्यपुरीचा समुद्रकिनारा लांबच लांब पसरलेला आहे. त्यामुळेच तो राक्षस आमच्या



राज्यात धुमाकूळ घालत आहे. माझ्या समोर केवळ एकच मार्ग आहे. अन् तो म्हणजे - ही शताब्दि फुलं त्याच्या निवासस्थानी पोचवणं. याहून अन्य काही मार्ग निदान मला तरी सुचत नाही." अुत्तुंग बोलला.

"तू तर आताच म्हणालास की तुमच्याकडील पहाडात पसरलेले शताब्दि फुलांचे वृक्ष तुम्ही कापून टाकले आहेत? अन् तू असंही म्हणालास की आता पुन्हा ही फुलं फुलायला शंभर वर्षं लागतील? मग तर तो राक्षसप्राणी निकट भविष्यात पुन्हा माणिक्यपुरीकडे फिरकायची शक्यताच नाही ना?" काबुईने विचारले.

"आपण ठीकच म्हणत आहात. तरीही त्या राक्षसी प्राण्याला जमेल तितकं दूर



हाकलून द्यायचा माझा प्रयत्न आहे." अुत्तुंग अुत्तरला.

"तुझा प्रयत्न अुचितच आहे. तरीही मला असं वाटतंय तो राक्षसप्राणी तुमच्या राज्यात न यावा यासाठी तू आणखी एकाद्या अुपायाचा विचार करावास. यासाठी आमच्या राजाचा सल्ला घेअून त्याप्रमाणे अुपाययोजना केलीस, तर फारच चांगलं होईल. जेवणानंतर आजच मी तुला राजा महेन्द्रसिंगकडे घेअून जाईन." असे अुत्तुंगला म्हणत त्याने आतला दरवाजा खटखटवला.

आतून ती स्त्री आली आणि काबुई आपल्या भाषेत तिच्याशी काही बोलला. लगेच ती आतून खाण्याचे पदार्थ घेअून आली आणि तिने ते काबुईच्या समोर ठेवले. तिच्याबरोबर एक तरुणीही होती. भांडी ठेवून त्या जेंव्हा परत फिरल्या तेंव्हा काबुईने तिला 'चित्रा' अशी हाक मारली. 'तुम्ही हाक मारली मला?' असे म्हणत ती काबुईकडे वळून पाहू लागली.

"होय. इकडे ये." आणि अुत्तुंगकडे बघत काबुई पुढे म्हणाला, "ही माझी मुलगी चित्रा. चित्रा, बाकी सगळ्या कुठायत?"

चित्राने दरवाज्यावर दोन तीन थापा मारताच आतून पाच तरुणी बाहेर आल्या.

काबुई अुत्तुंगला म्हणाला की त्या चित्राच्या मैत्रिणी आहेत. नंतर त्याने मुलींना विचारले, "तुम्ही ही फुलं इकडे का घेअून आलात?"

"ही फुलं फार सुन्दर आहेत अन् त्यांचा वासही छान आहे, म्हणून घेअून आलो आम्ही ती." अुत्तुंगकडे एकटक पहात त्यांनी कारण सांगितले.

"बरं, आता जा तुम्ही." काबुई म्हणाला, अन् "ठीक आहे" म्हणून त्या तरुणी आत निघून गेल्या.

जेवण झाल्यानंतर काबुई अुत्तुंगला राजाच्या दर्शनासाठी आपल्याबरोबर घेअून गेला. काबुईची बायको व मुलगी यांनी दारापर्यन्त जाअून त्यांना निरोप दिला.

वस्तीच्या बाहेर आल्याबरोबर काबुईने फुले अुत्तुंगच्या हाती देत म्हटले, "ही तुझ्यावळच असू देत."

अुत्तुंग काबुईच्या मागे मागे चालत राहिला. आणखी बरेच दूर चालल्यावर



एक ओबडधोबड टेकाड चढून जाअून ते दोघे नागपुरी या राजधानीच्या शहराजवळ पोचले.

नगराच्या गल्ल्या पार करत असताना बरेच जण काबुईला खूप आदर दाखवत असलेले दिसले. समोरून येणारे लोक प्रत्येक वेळी आपण बाजूला सरून त्याला रस्ता देत होते. अुंच आणि धष्टपुष्ट असणारा काबुई खूपच गंभीर दिसत होता. त्याच्या डोक्यावर छोटासा नागमुकुट होता. त्याची एकूणच वेषभूषा बरीच विचित्र दिसत होती. हातात एक मोठा भाला त्याने पेलून धरला होता. अुत्तुंगच्या लक्षात आले की समोरचे लोक काबुईला मान देत आहेत, पण त्यांच्या मनात त्याच्याबद्दल भीतीही आहे!

राजवाड्यात पोचताच तेथील सैनिकांनी काबुईला नमस्कार केला. एक पहारेकरी या दोघांना राजवाड्याच्या आत घेअून गेला. दोन्ही बाजूंना मोठमोठे खांब होते. मार्ग विशाल होता. त्यांना आता एका ठिकाणी थांबवून ठेवून पहारेकऱ्याने आत जाअून काबुई आल्याची वार्ता राजाला सांगितली. परत येअून तो काबुई व अुत्तुंगला घेअून आत गेला.

सिंहासनावर बसलेला राजा मंत्र्यांशी बोलत होता. त्याला पाहिल्याबरोबर काबुईने झुकून प्रणाम केला.

"काबुई, तुझ्या कबिल्याचे सारे लोक



खुशाल आहेत नं? त्यांना काही अुणं पडत नाहीये ना?" हसतच राजाने काबुईला विचारले.

काबुई अुत्तरला, "आपल्या दयेनं सर्व ठीक आहे महाराज." राजाने अुत्तुंगकडे पाहिले. त्यानेही लगेच काबुईप्रमाणे लवून राजाला प्रणाम केला.

"हा तरुण माणिक्यपुरीहून आलेला आहे. याचं नाव अुत्तुंग." काबुईने माहिती दिली.

"अच्छा, तुमचे महाराज प्रतापवर्मा खुशाल आहेत ना?" राजाने अुत्तुंगजवळ चौकशी केली.

अुत्तुंगने राजा खुशाल असल्याचे विनयपूर्वक सांगितले.



राजाने समोरच्या आसनांकडे इशारा करून दोघांना बसायला सुचवले.

"अुत्तुंग चुकून आपल्या राज्यात आला आहे." असे म्हणत काबुईने त्याच्या हातातली फुले घेअून राजासमोर ठेवली.

"तरीच तुम्ही लोक आल्याबरोबर एक प्रकारचा सुगंध इथे पसरला. आता कारण कळलं." राजा म्हणाला.

"ही फुलं अुत्तुंग शृंग्माय पर्वतातून घेअून आला आहे. शंभर वर्षातून एकदाच फुलणारी अद्‌भुत फुलं आहेत ही! म्हणूनच यांचं नाव 'शताब्दि फूल' आहे." काबुईने माहिती दिली.

यावर राजाने मोठ्या आश्चर्याने विचारले, "अच्छा, म्हणजे माणिक्यपुरीच्या राजा प्रतापवर्माने माझ्यासाठी इतक्या लांबून ही फुलं पाठवलीत?"

"नाही महाराज," असे म्हणत काबुईने सारी हकिकत सविस्तर सांगितली. या फुलांमुळेच माणिक्यपुरीवर संकट कोसळलेय असेही तो म्हणाला. राक्षसीप्राण्याच्या शोधासाठी बाहेर पडलेला अुत्तुंग आपल्या राज्यात कसा पोचला वगैरे माहिती देत काबुई म्हणाला, "महाराज, आपणाला ही हकीकत सांगून आपणाकडून अुत्तुंगने सल्ला घ्यावा, अशी इच्छा मी व्यक्त केल्यामुळे तो माझ्याबरोबर इथे आला आहे."

"जनतेच्या कल्याणासाठी अुत्तुंगनं ही जबाबदारी स्वतःच्या शिरावर घेतलीय. त्याचं हे काम वाखाणण्यायोग्यच आहे. त्या राक्षसजंतुशी यानं एकट्यानंच झगडणं योग्य होणार नाही. या साहसी तरुणाबरोबर आपल्याही काही वीरांना पाठवायची व्यवस्था करू या आपण." राजा म्हणाला.

इतक्यात पंधरा वर्षांची एक मुलगी तेथे येअून विचारू लागली, "पिताजी, ही फुलं कुठून आणवलीत? फारत छान आहेत ही!"

मोठ्या प्रेमाने तिला आपल्याजवळ बसवून घेत हसून राजा तिला म्हणाला, "माणिक्यपुरीहून तुझ्यासाठीच ती या तरुणानं आणलीत."

"हां? खरंच माझ्यासाठी आणलीत?" असे म्हणत ती मोठ्या आश्चर्याने अुत्तुंगकडे



पाहू लागली.

काय अुत्तर द्यावे, हे न समजून अुत्तुंग नुसताच हसत राहिला.

राजा त्याला म्हणाला, "ही माझी कन्या मल्लिका. तिला ही फुलं फारच आवडलीत."

"होय राजकुमारी, ही फुलं मी आपल्यासाठीच घेऊन आलोय." उत्तुंग बोलला.

मल्लिका एकदम म्हणाली, "मग पिताजी, मी घेऊन जाते ही!"

"हां, जा घेऊन. तू आत जा मी येतो थोड्या वेळाने." राजाने असे म्हटल्यावर ती फुलं घेऊन आनंदाने मल्लिका निघून गेली.

राजा काबुईला म्हणाला, "या फुलांचा शाप, किंवा त्या राक्षस प्राण्याबद्दल राजकुमारीला काही न कळण्याची खबरदारी घ्यायला हवी." असे म्हणून जरा विचार करून राजा काबुईला म्हणाला, "तुम्ही दोघे आज रात्री इथेच आराम करा. त्या राक्षसाची कशी खबर घ्यायची याबद्दल आपण अुद्या ठरवू या." आणि तो आत निघून गेला.

राजा जाईपर्यन्त मंत्री, काबुई आणि अुत्तुंग अुभेच होते. नंतर मन्त्री काबुईला म्हणाला, "तुम्ही दोघं माझ्याबरोबर चला. तुमची रहायची सोय करून देतो." दोघांना स्वत:बरोबर घेऊन जाऊन एक विशाल खोली दाखवत तो म्हणाला, "तुम्हाला आवश्यक ते सारं इथले सेवक देतील. अुद्या सकाळपर्यन्त इथेच विश्रान्ती घ्या."

मन्त्री गेल्यावर थोड्या वेळाने एक सेवक तेथे येऊन म्हणाला, "राजकुमारीची मला आज्ञा झाली आहे की, त्यांच्यासाठी फुलं आणणाऱ्या तरुणाला मी त्यांच्याकडे घेऊन जावे."

अुत्तुंग आश्चर्याने काबुईकडे पाहू लागला. काबुई त्याला म्हणाला, "जा तू. पण राजाचं बोलणं नीट लक्षात ठेव. सावध रहा. राक्षसाबद्दल काही बोलू नकोस."

-पुढे चालू





# मानवधर्म व प्राणीधर्म

दृढनिश्चयी विक्रमराजा पुन्हा त्या झाडाकडे गेला. फान्दीवरून प्रेत अुतरवून त्याने ते आपल्या खांद्यावर टाकले आणि मौन धारण करून तो स्मशानाची वाट चालू लागला. प्रेतातला वेताळ लगेच राजाशी बोलू लागला, "राजा, हा मिट्ट काळोख फारच भयानक वाटतोय. मध्यरात्रीच्या या प्रहरी अन् असले कष्ट उपसत आहेस. तुझ्या जीवनाचं ध्येय तरी काय आहे हेच कळत नाहीये, शेवटी काय साधायचंय तुला? का इतके कष्ट करतोयस? तुझे हे प्रयत्न अजूनही मला कोड्यातच टाकत आहेत. पण एक गोष्ट मात्र नीट समजून अस. जर एकाद्या राजानं, किंवा भोळ्याभाबड्या लोकांना आपण मोठे न्यायदक्ष आहोत, असे भासवणाऱ्या एकाद्या न्यायाधीशानं तुला ते काम सांगितलं असेल, तर मात्र तू सावध व्हावंस, यातच तुझं कल्याण आहे, कारण राजाचा प्रत्येक निर्णय आणि न्यायाधीशाचा प्रत्येक निकाल



न्यायसंगतच असेल अशी जर तुझी कल्पना असेल, तर ते मात्र तुझं अज्ञान आहे. अुदाहरणादाखल रामभद्र नावाच्या एका न्यायाधीशाच्या निकालाबद्दलची गोष्ट माझ्याकडून ऐक. गोष्ट ऐकता ऐकता तुझा थकवाही दूर होईल.''

पुष्पगिरी राज्यातल्या एका गावात वीरगिरी रहात असे. त्याला गंधर्व नावाचा एकुलता एक मुलगा होता. लहानपणापासूनच गंधर्वाला संगीताचे फार प्रेम होते. पक्ष्यांचे मधुर आवाज तो मोठ्या आवडीने ऐके. अैकताना स्वतःला विसरून गायचा तो. वहात्या नदीच्या पाण्याची खळखळ त्याला गाण्यासारखी वाटे.

गंधर्व पाच वर्षांचा असताना एका साधूने त्याला पाहून वीरगिरीला म्हटले, "अरे, याच्या चेहऱ्यावर तर मला सरस्वतीचेच स्थान असल्यासारखं वाटतंय. याला संगीत शिकव, मोठा गायक बनेल तो!''

पण वीरदासला काही साधूचे बोलणे पटले नाही. त्याने मुलाला शेतीवाडीच्या कामाला लावले. मुलाला तो म्हणे, ''शेतात काम केलंस, तर तुलाही खायलाप्यायला मिळेल अन् दोन-चार लोकांनाही खायला घालू शकशील. गाण्यानं काही लाभ नाही होणार! व्यर्थ विद्या आहे ती!''

गंधर्वाला शेतीवाडीची मुळीच आवड नव्हती. 'आपण गाणं शिकू' असे तो सारखे टुमणे लावी बापाजवळ. मुलाच्या हट्टाने रागावून वीरदासने एकदा गंधर्वला खूप मार दिला अन् एका खोलीत कोंडून ठेवले; दोन दिवस त्याला अुपाशीही ठेवले.शेवटी गंधर्व भुकेमुळे शरण आला अन् बापाचे म्हणणे त्याने कबूल केले. तरीही कधी त्याने पुन्हा हट्ट केला, तर बाप त्याला चांगले बडवून काढी.

काहीही असो, पंधराव्या वर्षी गंधर्व एक चांगला शेतकरी म्हणून ओळखला जाअू लागला. त्याच्या शेतीच्या ज्ञानामुळे म्हणा, किंवा त्याच्या भाग्याचा चमत्कार म्हणा, गावातल्या सर्व शेतांपेक्षा गंधर्वाच्या शेतातच अधिक पीक निघे

एका वर्षी गावात दुष्काळ पडला. असाच लागोपाठ दोन वर्षे दुष्काळ पडल्यामुळे वीरदास कर्जबाजारी झाला. गावच्या मारवाड्याने निर्दयतेने त्याचे शेत आपल्या ताब्यात घेतले. त्याच्या कुटुंबाला आता गाव सोडून जाण्यावाचून अुपाय अुरला नाही.

वीरदासचे कुटुंब शहराची वाट चालू लागले. शहराच्या सीमेवर एका झाडाखाली ते बसले असताना अचानक एक माकडाचे पिल्लू वरून त्यांच्या समोरच खाली पडले. त्याला त्यामुळे चांगलीच जखम झाली. वीरदासने त्याला उचलून त्याची जखम धुतली अनं आसपासच्या झाडपाल्याने ती बांधून टाकली. जवळच्या फळांपैकी काही त्याला खायलाही दिली. आता ते माकड पाळीव बनले. ते पळून जाअू नये म्हणून वीरदासने त्याच्या गळ्यात दोरीही बांधली.

शहरात पोचल्यावर तिथल्याच एका झाडाखाली ते सारेजण राहू लागले. गंधर्व गल्लीबोळातून फिरून कामाचा शोध घेअू लागला. या अवधीत वीरदासने माकडाला तऱ्हेतऱ्हेचे खेळ शिकवले. सुरुवातीला ते वीरदासचे ऐकायला तयार नसायचे. मग वीरदास त्याला अुपाशी ठेवायचा, दांडक्याने मारायचा. पण सांगितल्या शिकवल्या प्रमाणे केले, म्हणजे खूप खायलाही द्यायचा. अशा तऱ्हेने आठवडाभरात माकडाने बरेच काही शिकून घेतले.

वीरदास आता माकडाला बरोबर घेअून जाअून शहरात त्याचे खेळ दाखवायचा. लोकांची चांगली गर्दी जमायची अन् त्यांनी फेकलेल्या पैशांमुळे वीरदासला अुत्पन्नही चांगले मिळू लागले. गंधर्व बिचारा दिवसभर मेहनत करून जे काही मिळवायचा, त्यापेक्षा या माकडाची कमाईच दुप्पट असे.





माकडाला नाचवत असताना एक दिवस गंधर्व बापाला म्हणाल, "हे मनोरंजन खूप चांगलं आहे. पण लवकरच तेच ते पाहून लोक कंटाळून जायचाही धोका आहे. त्यापेक्षा मी हातात डफ घेऊन गात जाईन अन् आपण त्या तालावर नाचायला याला शिकवू. मी नवनवी गाणी गात जाईन अन् त्यामुळे लोकांची रुचिही जागृत राहील. आपल्यालाही चार पैसे जास्त मिळतील."

वीरदासने गन्धर्वचे म्हणणे मानले. गाणे गाऊन माकडाला नाचवायला लागल्यापासून अुत्पन्न दहापट वाढले.

आता त्या कुटुम्बाचे दिवस आरामात, मजेत जाअू लागले. एक दिवस जेंव्हा एका गल्लीत गंधर्व गाणे गात होता, तेंव्हा तेथून एक संगीत विद्वान जात होता. गाणे ऐकून गंधर्वच्या जवळ जात तो त्याला म्हणाला, "तुझा आवाज खूपच गोड आहे रे! गाण्यात लयही चांगली आहे. माझ्याबरोबर येतोस तू? मी तुला पद्धतशीर संगीत शिकवीन. गंधर्व त्याच्याबरोबर जायला खुशीने तयार होता; पण वीरदासने नकार दिला. तरीही यावेळी पित्याची पर्वा न करता गंधर्व त्या संगीतज्ञाबरोबर निघून गेला. वीरदासला याचे फार वाईट वाटले. त्याने मुलाला व त्या संगीतज्ञाला खूप शिव्या दिल्या.

दोन वर्षे निघून गेली. माकडाचा खेळ दाखवून वीरदासने थोडी बहुत माया जवळ केली. त्याने एक लहानशी झोपडी खरेदी केली. त्याचे स्वतःचे दिवस सुखात जात होते; पण मुलगा बरोबर नसल्याचे दुःखही होते त्याला. नवरा-बायको खूपदा मुलाच्या आठवणीने दुःखी होत.

एके दिवशी शहरातल्या एका श्रीमन्त माणसाने त्याला माकडाचा खेळ दाखवण्यासाठी आपल्या घरी बोलावले. एक हजार अशर्फ्या देण्याचे त्याने कबूल केले होते. मोठ्या आशेने वीरदास तेथे गेला. आजपर्यन्त ए-करकमी इतका पैसा त्याला कधीच मिळालेला नव्हता.

वीरदास एका मोठ्या महालात पोचला. ठरलेल्या दालनात पोचल्यावर त्याला दिसले की, तो श्रीमन्त माणूस मौल्यवान पोशाख चढवून रत्नासनावर बसलेला होता. त्याने एकट्यानेच माकडाचे खेळ पाहिले अन् शेवटी अशर्फ्यांची थैली वीरदासच्या पुढ्यात फेकली. वीरदास ती अुचलू लागला, तेव्हा तो धनी माणूस म्हणाला, "मला तुम्ही ओळखलं नाहीसं दिसतंय! मी गंधर्व! तुमचं ऋण चुकवण्यासाठीच तुम्हाला इथं बोलावलं मी. या अशर्फ्या घ्या अन् सुखात रहा."

मुलाला ओळखून वीरदास म्हणाला, "अरे, तुझ्या भेटीची आम्ही कित्ती दिवस आतुरतेने वाट पहात आहोत रे! तू इतका बडा कसा झालास?"

"सहा महिन्यातच मी संगीताचं अुत्तम ज्ञान मिळवलं. इतक्याशा लहान अवधीत माझा दोनदा कनकाभिषेकही झाला. खूप पैसा कमवला मी! इतका की दहा पिढ्यांनाही पुरेल पुढच्या." गंधर्व बोलला.

"आता तू जर इतक्या चांगल्या स्थितीत पोचलायस, तर आम्हाला माकडाच्या जिवावर जगायची काही जरूर नाही. हे सारं पाहून तुझ्या आईला कित्ती आनन्द होईल!" वीरदास आनन्दाने बोलला.

पण गंधर्व मात्र गंभीरपणे म्हणाला, "तुम्ही कसं आयुष्य जगताय, याच्याशी माझा काय संबंध? तुम्ही किंवा आईनेही माझ्या या महालात पाऊलही ठेवता कामा नये! आईला भेटायची इच्छा झाली, तर स्वतःच येऊन भेटीन मी. तुम्ही मोठं केलंय. म्हणून हजार आशर्फ्या देअून तुमचं ऋण चुकवलंय मी. माझ्या मनात येईल, तेव्हा काही मदत करत राहीन मी यापुढे; पण तुम्ही येअून माझ्याकडे काहीही मागायचं नाही.





आता आणखी जास्त काही बोलायचीही गरज नाही; जाऊ शकता तुम्ही परत." असे म्हणत गंधर्व झटकन तेथून निघून गेला.

वीरदासने घरी येऊन बायकोला सारे काही सांगितले. फारच नाराज होत ती म्हणाली, "स्वतःच्या बापाशी असं बोलायचं धाडस केलं त्यानं? जन्मदात्या आईलाही घरात पाऊल न घालायची सूचना दिली त्यानं? आत्ता आपण न्यायाधीशाकडे तक्रार नोन्दवू या त्याची."

नवराबायको दोघंही न्यायालयात गेले अन् त्यांनी मुलाविरुद्ध तक्रार केली न्यायाधीशाने ताबडतोब गंधर्वला बोलावून घेतले, अन् त्याची बाजू ऐकून घेतली.

न्यायाधीशाने नंतर आपला निकाल दिला, "गंधर्वला ज्याने संगीत शिकवले, त्याला त्याच्या कुटुंबासह आपल्या जवळ ठेऊन घेऊन त्यांची तो उत्तम रीतीने काळजी घेतोय. संगीतज्ञालाच तो आपला पिता मानतो आहे. असं करणं, हे न्यायासंगतही आहे. पण जन्मदात्या आईबापांना केवळ एक हजार आशर्फ्या देऊन ऋणमुक्त होण्याची त्याची वागणूक असंगत वाटतेय. या ऐवजी त्याने त्यांना एक माकड द्यायला हवे होते."

वेताळाने विक्रमाला इतकी गोष्ट सांगून म्हटले, "राजा, आईबापांची जबाबदारी मुलाने उचलायला हवी. श्रीमंती आली, तेंव्हा गंधर्व आपलं हे कर्तव्य विसरला, हा पितृद्रोहच नव्हे काय? पंडित माणसंच नव्हे, तर सामान्य माणूसही हे धर्मसूत्र आपला धर्म मानतो. पण हे सोडून न्यायाधीशाने दिलेला निकाल अविवेकी नव्हे काय? आईवडलांना फक्त एक माकड द्यायला सांगून न्यायाधीश रामभद्रने अन्याय नाही केला? न्याय देण्याची योग्यता तरी आहे का त्याच्यात? माझ्या या प्रश्नांची उत्तरं माहीत असूनही तू ती देण्याचं टाळलंस, तर तुझ्या डोक्याची छकलं-छकलं होऊन पडतील."

उत्तरादाखल विक्रमराजा ताबडतोब म्हणाला, "मानव हाही एक प्राणीच आहे. केवळ त्याला बुद्धि असते, विचार करण्याची शक्ती असते म्हणून त्याला निराळं मानलं जातं. कोणता प्राणी कसा वागेल, हे त्याच्या जन्मापासूनच ठरलेलं असतं. पण माणसाच्या बाबतीत हे लागू पडत नाही. कारण तो आपली शक्ति व बुद्धीच्या मदतीने 'आपण कसं वागावं' हे ठरवू शकतो. त्यामुळेच काही माणसं कवि बनतात, तर काही चित्रकार; काही शेती करतात तर काही शासक बनतात. आपल्या मुलांना त्यांच्या योग्यतेनुसार प्रोत्साहन देणं हे आईबापांचं कर्तव्य असतं. हा धर्म म्हणजेच मानवधर्म. वीरदासनं तसं न करता जबरदस्तीने त्याला आपल्या धंद्यात बन्दी करून ठेवलं. मुलाच्या इच्छेविरुद्ध त्याला आपल्याजवळ डांबून ठेवलं. शेतीबरोबरच संगीतही शिकायची संधी त्याने गंधर्वला दिली नाही. जे माकड त्याला सापडलं, त्यालाही खूप मारपीट करून अन् भीति दाखवून नवीन खेळ शिकवले. आपल्या मुलाशीही तो तसंच वागला की नाही? म्हणजेच त्याने फक्त जनावर धर्म किंवा प्राणीधर्म आचरला. म्हणजे अर्थ असा की, कुठून तरी आलेलं माकड आपल्या कर्तृत्वानं मिळालेला पैसा स्वतःच्या आईबापांना देऊ शकलं नाही, पण तो वीरदासला मिळत राहिला. प्राणीधर्माचं पालन करणाऱ्या लोकांची मुलं आपलं फळ आईबापांना नाही देत. संगीतज्ञानं गंधर्वला त्याच्या इच्छेनुसार संगीत शिकवलं, प्रोत्साहन दिलं, त्याला पारंगतही बनवलं, म्हणूनच त्याला 'मानवधर्म आचरणारा पिता' म्हणायला हवं. गंधर्वनेही आपल्या गुरूला मान देऊन मानवधर्म आचरला. बापाला सोडून देऊन गंधर्व निघून आला होता. म्हणूनच त्याला धन न देता माकड देणंच न्याय्य आहे. कारण वीरदास हा अन्य प्राण्यांचाच बाप बनण्यायोग्य आहे. आणखी एका माकडाला आपल्या मनासारखं शिकवून तो कमाई करू शकतो. यामुळेच रामभद्र हा उच्चकोटीचा न्यायाधीश ठरतो; इतकंच नव्हे तर त्याला न्यायालयाचा 'मुकुटमणी'च म्हणायला हवं."

बरोबर उत्तर देऊनसुद्धा राजाचा मौनभंग झाल्याने वेताळ प्रेतासह पुन्हा अदृश्य होऊन झाडावर लटकू लागला.



# घोर अपराध

हेलापुरी राज्यात बाहेरील राज्यातून सोने आणायला मनाई होती. कोणी बाहेरून ते आणून राज्यात विकले, तर त्याला अत्यंत कडक शिक्षा देण्यात येऊ लागली.

कलिंग राज्यातल्या एका युवकाने हेलापुरी नगराच्यां प्रवेशद्वारावरील जकात अधिकाऱ्याला नगरप्रवेशापूर्वी विचारले, "मी पुढल्या वेळी या नगरात येईन, तेंव्हा आमच्या राज्यातून सोनं आणून इथे विकू शकेन काय?"

अधिकारी हसून नकार देत म्हणाला, "मुळीच नाही विकता येणार. असं करणं, हा घोर अपराध आहे." आणि त्याने त्या युवकाला नगरात जाऊ दिले.

पुढल्या आठवड्यात तो युवक पुन्हा प्रवेशद्वारी आला. तेंव्हा त्याला बरोबर ओळखून दारावरच अडवत अधिकाऱ्याने त्याला नीट तपासले. त्याच्याजवळ थोडे सुद्धा सोने सापडले नाही.

अधिकारी त्याला म्हणाला "तू म्हणत होतास की पुढल्या आठवड्यात आपल्याला सोनं आणून इथं विकायचंय; म्हणून मी तुझी तपासणी केली. गैरसमज करून घेऊ नकोस हं!"

मोठ्या बेपर्वाईने युवक म्हणाला–"ओहो! असं होय? आपण या खेपेला सोनं विकायला मनाई केली होती, म्हणून मी ते सोनं गेल्या आठवड्यातच विकून टाकलं इथं! जकात अधिकारी 'आ' वासून पहातच राहिला!









भारतातील पशुपक्षी

## कावळ्यांचा राजा कावळा नव्हे-कोतवाल

रंगाने केवळ काळेच असणारे पक्षी भारतात फारच कमी आहेत. कावळा हा सामान्य पक्षी त्यापैकीच एक होय. कोतवाल हाही तसाच एक. कावळा-परिवारातला नसला तरी यालाच जास्त लोक 'कावळ्यांचा राजा' मानतात. कदाचित काळेपणामुळे त्याचा संबंध कावळ्याशी जोडला जात असावा. त्याचे रूप कावळ्यापेक्षा काहीसे भिन्न असते. उदाहरणार्थ त्याची कात्रीसारखी विसकारी लांब शेपूट! हा पक्षी साधारणतः शेतांच्या आसपास किंवा गावाच्या बाहेर आढळतो. इलेक्ट्रिकच्या तारेवर किंवा कंपाउंडच्या खांबावर हा बसलेला असतो. पवतावर सरपटणाऱ्या किड्यांवर तुटून पडून तो त्यांना खाऊन टाकतो.

कोतवाल मोठा साहसी पक्षी आहे. आकारने आपल्यापेक्षा मोठ्या असणाऱ्या पक्ष्यांशीही हा लढतो. कावळ्यांप्रमाणेच हा पक्षीही अन्य पक्ष्यांना आपल्या घरट्याकडे फिरकू देत नाही. आपल्या घरट्यांजवळ असणाऱ्या अन्य घरट्यांचेही हा रक्षण करतो. म्हणूनच त्याला 'कोतवाल' असे म्हटले जाते.

भारतात आठ प्रकारचे कोतवाल आढळतात. कात्रीच्या आकाराच्या शेपटीवाल्या कोतवालाच्या डोक्यावर तुरा असतो. त्याच्या कात्र्यासारख्या शेपटीच्या शेवटी तारेसारखी दोन टोके असतात.

उत्तर भारतात कोतवालाला भीमराज असे म्हणतात. एका जातीच्या कोतवालांचे पोट पांढरे असते. Ashy (राखाडी) नावाचा एक कोतवाल असतो. माणकासारख्या गडद लाल रंगाचाही एक प्रकार आहे.

# आधुनिक भारतातील चित्रकार

## शोभा सिंग



"हॅलो बेटे, तू सुद्धा आपल्या पित्याप्रमाणेच सैनिक बनणार ना?" पंजाबच्या सैनिक शिबिरातल्या एका माणसाने एका मुलाला प्रश्न विचारला.

प्रश्न विचारणाऱ्याकडे नीट पाहून घेऊन बालकाने हसतच नकार दर्शवत मान हलवली. नंतर त्याने बोट दाखवून त्या गृहस्थाचे जमिनीकडे लक्ष वेधून घेतले. जमिनीवर काही आकार रेखलेले होते. अशा तऱ्हेने न बोलताच त्याने दर्शवले की, "मला चित्रकार बनायचंय!"

तो गृहस्थ हसून म्हणाला, "अरे, चित्र काढतच जर तू आपला वेळ घालवलास, तर पोट कसं भरेल? भाकरी कुठून मिळवशील तू? दुसरं काही काम करायचं नसेल तर तुझी गुजराण कशी व्हायची?" अशा कटु प्रश्नावर मुलाची प्रतिक्रिया काय होते, हेच त्या माणसाला जाणायचे होते.

मुलाने आपली मोठी बहीण जिथे घरकामात मग्न होती, त्या खोलीकडे इशारा केला.

बालक शोभाचा आपली बहीण बीबी लक्ष्मीदेवी हिच्यावर अतूट विश्वास होता. पाच वर्षांचा असतानाच त्याची आई वारली होती. त्याचे वडील सैन्यात एक सुपरिंटेंडंट होते. मुलाकडे लक्ष द्यायला त्यांना वेळच नसे. बीबी लक्ष्मी आणि तिचा नवरा मंगलसिंग या दोघांनी मुलाची जबाबदारी स्वतःच्या डोक्यावर घेतली.

पंजाबमधील हरगोविन्दपुरमधे १९०१ मधे शोभासिंगचा जन्म झाला. दहा वर्षांचे असतानाच त्यांच्या पित्याचे देहावसान झाले. लहानपणी शोभाचे शिक्षण फारच कमी, म्हणजे पाचवी पर्यंतच झाले. नंतर त्यांना नकाशे बनवण्याचे (ड्राफ्ट्समन) काम शिकवण्यात येऊन लवकरच एका पलटणीबरोबर इराकला पाठवण्यात आले. तेथे आपल्या वरिष्ठ सहकाऱ्यांकडून इंग्रजी शिकायची संधी त्यांना मिळाली. त्याबरोबरच पश्चिमेकडील नामवन्त चित्रकारांची चित्रे असलेली काही पुस्तकेही पहायला मिळाली. लहानपणातील त्यांचे कलेचे प्रेम व आसक्ती यामुळे आणखी तीव्र झाली.

१९२३ मधे ते भारतात परत आले. त्यांनी विवाह केला आणि निश्चय केला की यापुढील उदरनिर्वाह एक चित्रकार बनूनच करायचा. सैन्यातील कामाचा त्यांनी राजिनामा दिला. लाहोरमधे त्यांनी आपला स्टुडिओ उघडला. दोन गोष्टींमुळे त्यांना स्फूर्ति मिळत राहिली. पहिली गोष्ट म्हणजे-शीख गुरूंनी अत्याचार व मृत्यु यांची पर्वा न करता आपली मान ताठ ठेवली. दुसरी म्हणजे—पंजाबच्या प्रेम व साहसपूर्ण अशा लोकप्रिय लोककथा.



नंतर ते दिल्लीला राहू लागले. यानन्तर १९४२ मधे ते लाहोर व अमृतसर यांच्यामधील आदर्शगावी राहू लागले. 'प्रीतलरी' नावाच्या पंजाबी पत्रिकेचे संपादक गुरुबक्षसिंग यांनी या गावी त्यांची रहाण्याची व्यवस्था केली होती. परन्तु काही काळानन्तर ते पुन्हा लाहोरला परतले.



१९४७ मधे मोठी दुःखद घटना घडली. ती म्हणजे देशाची फाळणी. जवळचे सारे काही सोडून त्यांना तेथून निघावे लागले. त्यांची महत्वाची चित्रेही त्यांना सोडून द्यावी लागली. नंतर ते हिमाचल प्रदेशाच्या कांगरा गावात रहायला गेले. त्यांची चित्रकलेची आवड इतकी तीव्र होती की ते या कलेत जास्तच अभिरुची दाखवू लागले. 'चित्रकार' म्हणून त्यांनी इथे एक नवाच अध्याय सुरु केला. तोपर्यन्त त्यांना भरपूर प्रसिद्धीही मिळालेली होती.

२१ ऑगस्ट १९८६ रोजी ते दिवंगत झाले. त्यांना चित्रकलेचे काही शिक्षण मिळालेले नसूनही स्वतःच्या पायावर उभे राहून त्यांनी आपले व्यक्तित्व एक उदाहरण म्हणून जनतेपुढे ठेवले.

गुरु नानक व इतर गुरुंची चित्रे ही त्यांची काही सुप्रसिद्ध चित्रे होत. याशिवाय भगवान कृष्ण व राम यांचीही त्यांनी काढलेली चित्रे प्रसिद्ध आहेत.

# तुम्हाला माहीत आहे काय?

१. सध्या अस्तित्वात असलेल्या पक्ष्यात सर्वात जास्त उंची असणारा पक्षी कोणता?
२. भारतीय शासन पद्धती केंव्हा पासून अंमलात आली?
३. 'आंतर्राष्ट्रीय भाषा' एकूण पाच आहेत. त्या कोणत्या?
४. खाली दिलेल्या पाचांपैकी भारताचा खरा प्रशासक कोण?
   १) भारताचा राष्ट्रपती, (२) उपराष्ट्रपती, (३)प्रधानमन्त्री, (४) राज्यसभेचा अध्यक्ष, (५) लोकसभेचा अध्यक्ष.
५. जगातला सर्वात मोठा समुद्र कोणता? दोन नंबरचा मोठा समुद्र कोणता? दोन्हींच्या आकारप्रकाराची तुलना करा.
६. 'वन्दे मातरम्' आणि 'जन गण मन' मधे कोणता फरक आहे?
७. सहित्यासाठी पहिला नोबेल पुरस्कार कोणाला मिळाला?
८. सर्वात जास्त नियतकालिके कोणत्या भाषेत निघतात?
९. 'मध्यरात्रीचा सूर्य' म्हणून कोणता देश ओळखला जातो?
१०. भारतातील सर्वात जास्त जुने संगीत वाद्य कोणते?
११. ऑलिंपिक स्पर्धा केंव्हा केंव्हा आयोजित केल्या जातात?
१२. भारतात गुलाम राजवंशाची स्थापना कोणी केली? तो कोणाचा गुलाम होता?
१३. जगातील सर्वात अधिक रुन्दीचा धबधबा कोणता?
१४. भारतातील पहले चलत् -चित्र कोणी बनवले? त्याचे नाव काय?
१५. 'थायलंड' चे जुने नाव काय?
१६. बुद्धाचे निर्वाण केंव्हा झाले?
१७. जगातल्या सर्वात मोठ्या विमानतळाचे नाव काय?

## उत्तर

१. शहामृग.
२. जानेवारी २६, १९५०.
३. इंग्रजी, फ्रेंच, स्पॅनिश, इटॅलियन, रशियन.
४. प्रधानमन्त्री.
५. पॅसिफिक आणि दुसरा अँटलांटिक, पॅसिफिक आकाराने अँटलांटिकच्या दुप्पट आहे.
६. 'वन्दे मातरम्' हे राष्ट्रगीत आहे, तर 'जनगणमन' हे राष्ट्रीय स्तवन गीत.
७. आर्. एफ्. ए. सल्ली.
८. हिन्दी. (३००० हून अधिक)
९. नॉर्वे.
१०. वीणा.
११. चार वर्षांनी एकदा.
१२. कुतुबुद्दीन. हा महम्मद घोरीचा गुलाम होता.
१३. लाओसमधील खोन धबधबा, (१०,८०० मीटर रुंद).
१४. दादासाहेब फाळके, १९१३. राजा हरिश्चन्द्र.
१५. सयाम.
१६. इ. स. पू. ४४८.
१७. किंग खलीद आंतरराष्ट्रीय विमानतळ (रियाध–सौदी अरेबिया).



# पुण्यपुरुष

शिवला अचानकच पैशांची गरज पडली. ज्यांना ज्यांना तो ओळखत होता, त्या सर्वांकडे त्याने पैसे मागून पाहिले, पण कोणाकडूनच ते मिळाले नाहीत. शेवटी त्याने आपला एक नातेवाईक केशव याच्याकडे मदत मागितली.

केशव शिवला म्हणाला, " तू श्रीपुरला जा. तिथे गुणाढ्य नावाचा एक पुण्यपुरुष रहातो. कोणीही आला, तरी त्याच्यावर दया करून तो कर्ज देतो. त्या पैशातून तुझी परिस्थिती सुधारेल ही कदाचित्!"

शिवा श्रीपूरला गेला आणि गुणाढ्यला भेटला. त्याने शिवाकडून त्याची सर्व माहिती काढून घेतली. आणखीही अन्य काही प्रश्न विचारले आणि म्हटले, "हे पहा, तुझ्या बोलण्यावरून असं वाटतंय की व्यापार करायची तुझ्यात चांगली योग्यता आहे. मी तुला एक हजार अशर्फ्या देतो. त्यातून तू काही व्यापार सुरू कर. एका वर्षात तुला अधिक लाभ झाला, तर तू मला दोन हजार अशर्फ्या परत द्यायच्यास. मुद्दल परत करायला दोन वर्ष लागली, तर चार हजार अशर्फ्या चुकवायच्यास. अशा तऱ्हेने प्रत्येक वर्षी ही रक्कम दुप्पट होईल बघ. कबूल आहे का?"

"नाही तरी आपल्याला अशा हजार अशर्फ्या एकरकमी कोण देणार?" अशा विचाराने शिवने गुणाढ्यच्या अटी मान्य केल्या. त्याने शिवकडून तसा कागद लिहून घेऊन सही घेतली आणि एक हजार अशर्फ्या त्याच्या हवाली केल्या.

गुणाढ्यच्या धनाचा काय महिमा होता कोणास ठाऊक, पण एका वर्षात सगळा खर्चवेच जाऊन शिवाने पाच हजार अशर्फ्या कमवल्या. त्यातल्या दोन हजार गुणाढ्यला नेऊन द्यायचा त्याचा विचार होता. पण

शृति.तांबे



इतक्यात एक व्यापारी तेथे येऊन त्याला म्हणू लागला, "तुझ्याकडे पाच हजार अशर्फ्या असतील तर हात पकड माझा! एकाच वर्षात पन्नास हजार अशर्फ्यांचा फायदा होईल असा एक व्यापार करू या दोघं मिळून."

हा प्रस्ताव ऐकून शिव विचारात पडला. त्याला वाटू लागले की, आत्ता गुणाढ्यला दोन हजार अशर्फ्या दिल्या, तर व्यापारात तेवढा फायदा कमी होईल. पण आता एका वर्षात पन्नास हजार मिळत असतील ,तर दोन वर्षांच्या मिळून चार हजार देणं जास्त फायद्याचं होईल नं?

त्या व्यापाऱ्याला शिवने धन दिले अन् दोघे भागीदार बनले. त्यांचा व्यापारही खूप जोरदार चालला. गुणाढ्यला जे धन द्यायचे होते, त्यापेक्षा कितीतरी पटीने पैसा वेगाने वाढत राहिला आणि शिव ते पैसे परत करणे पुढेपुढे ढकलत राहिला.

पाच वर्षांत शिवने लाखांनी अशर्फ्या मिळवल्या. हिशोबाने गुणाढ्यला आता बत्तीस हजार अशर्फ्या द्यायला हव्या होत्या. पण एकाच हप्त्याने एकदम इतकी मोठी रक्कम परत करायला त्याचे मन काचकुच करू लागले.

"हं, एक हजार अशर्फ्या देऊन पाच वर्षांत बत्तीस हजार घेणारा कसला आलाय पुण्यवान्! खरं तर मदतीच्या आडोशाने गरीबांना लुटणारा डाकूच म्हणायला हवं गुणाढ्यला!" मनात असे म्हणत शिवने गुणाढ्यला काहीच दिले नाही.

इकडे गुणाढ्यच्या मुलीचे लग्न ठरले. त्यासाठी दागिने घ्यायला तो शिवच्या दुकानातच आला. चार हजारांचा एक दागिना त्याने पसन्त केला, पण एक हजार अशर्फ्या कमी पडत होत्या! खिशात होत्या तीन हजारच. शिवने ही नाजुक परिस्थिती जाणली आणि तो आपल्या नोकराला काही सूचना देऊन तेथून सटकला. नोकराला त्याने सांगितले होते की, "गुणाढ्यशी आदराने बोल. वेळ पडली, तर पैसे न घेताही गुणाढ्यला दागिना दे."

नोकर गुणाढ्यला म्हणाला, "महाराज, आमचे मालक काही कामासाठी अचानक बाहर गेलेत. पण या दागिन्याचे जे काही पैसे देऊ शकत असाल तितके देऊन दागिना आपल्याला देण्याबद्दल ते सांगून गेलेत."

गुणाढ्य संकोचत म्हणाला, "मी जे पैसे बरोबर घेतले होते, त्यातले बरेचसे अन्यत्रच खर्च झाले. अजूनही बरीच काही खरेदी व्हायची आहे. दागिन्यासाठी आणखी एक हजार अशर्फ्या मी तुम्हाला देऊ लागतो. पण त्या देण्यासाठी मला थोडी मुदत हवी." "आपणाला योग्य वाटत असेल तसेच करा. आमचे मालक आपले कर्जदारही आहेत नं!" नोकर विनयपूर्वक बोलला.

"ती गोष्ट वेगळी! त्याचं व्याज वसूल करणार आहे मी! कर्ज चुकवायला त्याला जेवढा उशीर होईल, तितका माझा फायदाच अधिक होईल. पण हं, या पैशांचं मी मात्र व्याज नाही देणार बरं का!" गुणाढ्य म्हणाला.

नोकराने गुणाढ्यची ही अट मान्य केली. तीन हजार अशर्फ्या घेऊन त्याने दागिना त्याच्या हाती सोपवला. शिव परत आल्यावर नोकराने सारी हकिकत त्याला सांगितली.

ती ऐकून शिवच्या मनात आले, "गुणाढ्यला आपण जी रक्कम देणं लागतोय, त्यातलं मूळ मुद्दल वसूल करायलाच आला असला पाहिजे तो. बाकी सगळं नुसतंच नाटक आहे झालं! नाहीतर बरोबर एक हजार अशर्फ्याच कशा कमी पडल्या?"

या घटनेनंतर दुसऱ्याच दिवशी हृदयविकाराच्या झटक्याने गुणाढ्यचे देहावसान झाले. शिवला मनातल्या मनात आनन्दच झाला. "मी त्याला काहीच दिलं





नाही, अशी अुगीच रुखरुख नको माझ्या मनाला. कालच तर तो हजार अशर्फ्या घेअून गेला. अन् म्हणजे मी त्याला तेवढ्याच तर देणं लागत होतो?'' शिवने आपली समजूत करून घेतली.

गुणाढ्यच्या क्रियाकर्मानंतर आसपासच्या साऱ्या प्रमुख लोकांना त्याच्या मोठ्या मुलाने जेवायला बोलावले. शिवलाही बोलावणे होतेच. 'गुणाढ्य फार निस्वार्थी अन् महा पुण्यवान होता' वगैरे शब्दात सर्वजण त्याची प्रशंसा करत होते. 'अन् यामुळेच त्याला मृत्युही अगदी सहज आला, त्याला नक्कीच स्वर्गात स्थान मिळणार.' असेही ते म्हणाले. हे सारे बोलणे ऐकून शिव मात्र मनातल्या मनात हसत म्हणत होता, ''हो, मोठा आलाय पुण्यवान! पैसा मिळवायच्या लोभानेच तर सर्वांना कर्ज देअून चांगलं दणदणीत व्याज वसूल करत होता, अन् असल्या कंजूस प्राण्याची अगदी तोंड भरभरून स्तुती चाललीय! वा रे वा!'' ते सगळे स्तुतिपाठक शिवच्या दृष्टीने मूर्ख अन् नालायकच होते.

गुणाढ्यचा मुलगा सर्वांना अुद्देशून बोलू लागला, ''माझ्या बाबांनी अनेकांना मदत केली. काही लोकांना कर्जही दिलंय. मी असं ऐकलंय की त्याबाबत सर्व काही त्यांनी एका वहीत लिहून ठेवलंय. त्यातच त्यांचं मृत्युपत्रही आहे. पण ती वही कुठे ठेवलीय हे मात्र मला माहीत नाही.शोधूनही नाही सापडली ती मला.''

श्रीपुरचा पाटील लगेच म्हणाला, ''अरे, मला माहीत आहे. ती वही अन् मृत्युपत्र त्याने आपल्या कपाटात चोरकप्प्यात सुरक्षित ठेवलंय. मी दाखवीन तो कप्पा तुला. पण आजचा दिवस चांगला नाहीय. अुद्या अुघडू आपण ते कपाट.'' असा सल्लाही त्याने दिला.

आता मात्र डोक्यावर आकाश कोसळल्यासारखेच वाटले शिवला! 'ती वही सापडली, तर आपल्याला गुणाढ्यच्या कुटुंबाला खूपच मोठी रक्कम द्यावी लागणार!'

शिवसारखेच आणखी चारपाच कर्जदारही त्यावेळी तेथे उपस्थित होते. एक लाखाहूनही अधिक अशर्फ्या गुणाढ्यला देणं लागत असलेलेच होते बहुतेक जण.

ते सारे व्यापारी एकत्र आले आणि त्यांनी एक कट रचला. रात्री घरात प्रवेश करून गुणाढ्यच्या मुलाला धाक दाखवून ती हिशोबवाली वही मिळवून आणायच्या कामावर त्यांनी एका चोराला नेमले. चोराने आपले काम बरोबर केले आणि आपली बक्षिसाची रक्कम घेअून तो निघून गेला.

कर्जदारांनी वही जाळून टाकायचे ठरवले. पण वहीत इतके लिहिलेय तरी काय; आपल्या कर्जांचा अुल्लेख त्यात आहे की नाही इ. जाणण्याच्या अुत्सुकतेमुळे त्यांनी वही अुघडली. वहीत असे लिहिलेले होते-

''मी गरजू लोकांना 'कर्ज' म्हणून रक्कम देत असतो. 'दान देतोय' असे म्हटले तर कर्जाची जरूर नसलेले लोकही अुगीचच पैसे घ्यायला येतील. पैशांबरोबरच मी लोकांना योग्य सल्लाही देतो. माझा पैसा आणि सल्ल्यामुळे अनेकांचं कल्याण झालेलं आहे. त्यांनी पैसा परत दिला, तर मी तो पुण्यकार्यात खर्च करतो; परत केले नाहीत, तर मी जबरदस्ती, जुलूम कधीच करत नाही. त्यांच्याकडून जो कागद मी लिहून घेतलेला असतो तो ते गेल्यावर लगेच फाडून टाकतो. माझ्या थोरल्या मुलाने असंच केलं तर माझा आत्मा संतुष्ट राहील.''

हे सारे वाचल्याबरोबर आश्चर्याने त्या व्यापाऱ्यांनी आ वासला! त्यांच्या चेहऱ्याचा रंगच अुडून गेला!

यानन्तर ज्या कोणाचे काही पैसे देणे होते त्याबद्दलचा हिशोब लिहिलेला होता. शिवला द्यावच्या हजार अशर्फ्यांचाही त्यात अुल्लेख होता. म्हणजे अगदी आदल्या दिवसाचाही हिशोब होता!

शिव आणि त्या अन्य व्यापाऱ्यांना आता कोठे कळून चुकले की गुणाढ्यला लोक 'पुण्यपुरुष' का म्हणत, त्यांनी पुन्हा मुकाट्याने ती वही होती तिथे तावडतोब नेअून ठेवायची व्यवस्था केली. त्यांनी जे कर्ज फेडायचे होते, ते धनही गुणाढ्यच्या मुलाकडे नेअून दिले.

शिवही आता गुणाढ्यच्या मुलाबरोबर गुणाढ्यने दाखवलेल्या मार्गाने चालू लागला.





# बुटक्याचा विवाह

बेलापुर नावाच्या गावात टिंगू नावाचा एक बुटका रहात असे. भारीच ठेंगणा अन् रूपानंही कुरूप. पण एक कला मात्र अवगत होती त्याला. कसलाही हत्ती असला, तरी त्याला सहज वश करू शकत असे तो.

राजाने स्वतःच एकदा टिंगूचं हे कौशल्य पाहिलं अन् तो फारच खूश झाला. तो टिंगूला म्हणाला, ''. आजपासूनच माझ्या गजशाळेचा पर्यवेक्षक म्हणून मी तुझी नेमणूक करत आहे.''

झालं!बुटका महाराजांच्या हत्तींची देखरेख करणारा प्रमुख अधिकारी बनला. आता त्याला कशाची कमतरता नव्हती. खूपसे नोकर त्याच्या हाताखाली काम करत असत, त्याच्याशी मोठ्या आदराने वागत. पण इतकं सारं असूनही त्याला आपल्या शरीराबद्दल फार दुःख वाटे.

राजाच्या हे लक्षात आलं. टिंगूला विचारले, ''दरबारात तुला चांगलं अुच्च स्थान आहे. हत्तींवर हुकुमत चालवायचं तुझं सामर्थ्य पाहून सारे चकित होतात. तरीही तू जरासुध्दा अुत्साही आणि समाधानी दिसत नाहीस. मला वाटतंय की, लवकर लग्न कर बाबा तू.''

जबरदस्तीनं हसल्यासारखा टिंगू हसत बोलू लागला. ''महाराज, आपल्या औदार्यानं मला चांगली नोकरी मिळालीय.'' अन् क्षणभर थांबून पुढे म्हणाला, ''स्पष्टवक्तेपणाबद्दल माफी असावी, पण लग्न करायचा सल्ला देऊन आपण माझी टिंगल करत आहात, असं म्हणायचं धारिष्ट माझ्यात नाही.''

टिंगूच्या बोलण्याने वाईट वाटून राजा म्हणाला, ''मी टिंगल नाही केली रे तुझी ! प्रत्येक प्राण्याला जोडीदाराची गरज असतेच. तुझं लग्न एका सुंदर मुलीशी लावून देईन मी.''

राजाला प्रणाम करून बुटका गप्प राहिला. आता या बुटक्याच्या लग्नाबद्दल राजा विचारात पडला. बराच विचार करून राजाने घोषणा केली की ''जी मुलगी टिंगूशी विवाह करायला तयार होईल, तिच्या पित्याला, त्याला हवी असेल तिथे जमीन, घर आणि भत्ता दिला जाईल.''



घोषणा ऐकून अनेक मुलींचे आईवडील आपलं भाग्य आजमावण्यासाठी बुटक्याचे सासूसासरे बनायला तयार झाले, पण आपल्या मुलींचे नकार आणि नातेवाईकांच्या टोमण्यांमुळे पुढे आले नाहीत. मुलीचं लग्न हे त्यांना एक स्वप्नच राहिलं. शेवटी राजानंच तीन मुली निवडल्या. त्यांच्यापैकी दोघी साधारण सुंदर होत्या. तिसरी जी होती, ती टिंगूप्रमाणेच बुटकी होती.

राजाने तिघींना निरनिराळं बोलावून विचारलं, ''मी राजा आहे. माझ्यासमोर घाबरायची काही आवश्यकता नाही; अगदी निर्भयपणे स्वतःचे विचार व्यक्त करा या लग्नाबद्दल.''

पहिली मुलगी अुत्तरली, ''महाराज, माझी सावत्र आई फारच छळते मला. माझे वडील तर तिचे गुलामच आहेत! ती एका म्हाताऱ्याशी माझं लग्न करून द्यायच्या प्रयत्नात आहे. आपल्या घोषणेमुळे तिच्या मनात आशा पालवली की, देवानंच प्रसन्न होऊन तिला वर प्रदान केलाय. काहीही असो, महाराजांची आज्ञा पाळायला मी तयार आहे.''

''मी जर दुसरा कुणी चांगला मुलगा पाहिला, तर टिंगूला नाकारशील का तू ?.'' राजानं पुन्हा विचारलं.

मोठ्या विरक्तपणे ती मुलगी म्हणाली, ''मी राजाज्ञेचं पालन करीन; निर्णय आपल्या हाती आहे.''

आता दुसऱ्या मुलीची गोष्ट. तिचा बाप फारच गरीब होता. या मुलीपाठच्या लग्नाच्या आणखीही दोन मुली होत्या त्याला. ती मुलगी राजाला म्हणाली की, ''माझं लग्न बुटक्याशी झालं, तर त्यामुळे आमचं बाकीचं कुटुंब तरी सुखी होईल. शक्य तितकी जास्तीत जास्त रक्कम माझ्या बाबांना देण्यात यावी.''

राजा नंतर बुटक्या मुलीला म्हणाला,

प्रथमेश बागडे

"माझ्या मनात असेल तसं करू शकतो मी! मनात आणलं, तर एकाद्या सुन्दर मुलीशीही टिंगूचं मी लग्न लावून देऊ शकेन. तशीच तुझ्या स्वयंवराची व्यवस्थाही करू शकेन मी. देशातल्या कोणत्याही मुलाशी तुझा विवाह मी मोठ्या थाटात करून देऊ शकेन. टिंगूसारख्या बुटक्याशीच तुझा विवाह व्हावा, अशी माझी मुळीच इच्छा नाहीय. तुला माहीत आहेच की. सौन्दर्यासमोर चांगुलपणा, बुद्धिमानी आणि कौशल्य यांचं काहीच मोल नाही!"

बुटक्या मुलीने लवून आपल्या लांड्या हातांनी राजाला प्रणाम करून म्हटलं, "महाराज, राजाज्ञेनं मदनासारख्या सुन्दर मुलाशी आपण माझं लग्न लावून तर चाल; पण आमचं दोघांचं मनोमीलन तर आपण नाही ना करू शकणार? टिंगूच्या दरबारतल्या स्थानायोग्य बायको मी नसेनही, पण मी त्यांची उत्तम काळजी घेऊ शकेन, त्यांच्या इच्छेप्रमाणे वागेन आणि धर्मपत्नी म्हणवून घ्यायचा प्रयत्न करीन."

बुटक्या मुलीचे हे विचार जाणून राजा फार खूश झाला. त्याने दुसऱ्या दिवशी टिंगूला बोलावून घेतलं. "जी मुलगी तुझ्या हुद्याला महत्व देऊन तुझं बुटकेपण चालवून घ्यायला तयार आहे, ती तुला बायको म्हणून आवडेल का? मला तर ती बुटकी मुलगीच तुझ्या योग्य वाटते, कारण ती तुझ्या विचारांचा आदर ठेवील, तुझ्या म्हणण्याप्रमाणे वागेल; खऱ्या अर्थानं ती तुझी सहधर्मचारिणी बनेल. ती तुला पसंत नसेल तर उरलेल्या दोघींपैकी तू म्हणशील तिच्याशी मी तुझं लग्न लावून देऊ शकतो."

जराही संकोच न दाखवता टिंगूने ताबडतोब त्या बुटक्या मुलीशीच विवाहाला आपली संमती दर्शवली. राजाने मोठ्या थाटामाटाने हा विवाह घडवून आणला.

आपल्या दीन परिस्थितीमुळे टिंगूशी लग्न करायला तयार असलेल्या त्या इतर दोन मुलींचे विवाहही राजाने योग्य अशा तरुणांशी करून दिले.





# वीर हनुमान

अंजना देवीने मोठ्या प्रेमाने अभ्यागतांचा सत्कार केला. सर्वांना तिने फुले दिली व उत्तम मेजवानीची व्यवस्था केली. तिने सर्वांना भेटी ही दिल्या. भोजन करून राम व त्याच्या बरोबर आलेले सर्व लोक संतुष्ट होऊन अयोध्येला जायला निघाले.

रस्त्यात सीता यशोधरेला म्हणाली—"बघ, मी तुला म्हटलं होतं ना की तुझ्या नवऱ्यावर काही ही संकट येणार नाही, तू मुळीच भिऊ नकोस. हनुमानाला शरण गेल्यामुळे ययातीचे प्राण वाचले. असे काही आम्हाला पहायला मिळेल अशी आम्ही कल्पना ही केली नव्हती."

कृतज्ञता प्रकट करीत यशोधरा म्हणाली—"सीता नि राम यांच्या कृपेने सर्व काही घडले. हनुमानाच्या हृदयात रामाबरोबर आम्ही सर्वांनी तुला ही पाहिलं. आमच्या दृष्टीचे पारणे फिटले."

टाळ्या वाजवून चंद्रांगद व चंद्रमुखी पण म्हणाले—"होय सीतादेवी, आम्ही पण तुम्हाला पाहिलं." यशोधरेने मुलांना गप्प रहायला सांगितलं. तिच्या असं लक्षात आलं की सीता आपल्या बालकांकडे मोठ्या वात्सल्याने बघत आहे. ती सीतेला म्हणाली—"देवी, तू लवकरच माता बनणार! तुझ्या मुख-मंडलावर मातृत्व झळकत आहे. तुझ्या पोटी वाढणारा जीव रामाहून अधिक सहृदय व पराक्रमी निश्चित असणार!"

मंदस्मित करत लाजून सीता म्हणाली—"वयाने तू माझ्याहून लहान



असलीस, तरी अशा रत्नांना जन्म दिल्यामुळे मला तू श्रेष्ठ वाटतेस! मोठी भाग्यशाली आहेस तू! तुझे बोल मला आशीर्वादच वाटताहेत."

पालखीत बसून अशा रीतीने संभाषणात मग्न असताना सर्व जण अयोध्येला पोचले. ययातीने आपल्या परिवारासह रामाच्या आतिथ्याचा स्वीकार केला. सीता यशोधरेशी मोठ्या उत्साहाने गप्पा-गोष्टी करीत होती, तिच्या मुलांबरोबर खेळत-नाचत ती आपले मन-रंजन करीत होती. दोन्ही मुले 'आई! आई!!' म्हणत तिच्या भोवती घुटमळत, तेव्हा तिला फार आनंद होई. ती ही त्यांच्या बरोबर उत्साहाने नाचे, बागडे. त्यांचा सहवास तिला फार आवडतो आहे असे दिसत होते.

काही दिवसांनी रामाची परवानगी घेऊन ययाति नि यशोधरा मुलांसह आपल्या राज्यात परतले. अयोध्येत राम व सीता यांच्या सहवासात काढलेला काही काळ मात्र अविस्मरणीय बनून राहिला.

पौर्णिमेच्या रात्री राम सीतेसह अंतःपुरातील उद्यानात हिंडत होता. त्याच वेळी चन्द्रोदय होत होता. चन्द्राकडे बोट दाखवीत राम सीतेला म्हणाला—"तिकडे बघ! आकाशात आकर्षक असे काही तुला दिसत आहे का?"

भावुकपणे सीता म्हणाली—"पूर्व दिशा नावाच्या कौसल्यामातेच्या घरी रामचंद्राचा उदय होत आहे!"

राम म्हणाला—"नाही. पूर्व दिशा भविष्यवाणी करीत आहे की सीतेच्या घरी ही लवकरच असा चन्द्रोदय होणार आहे. आणि मग तुझा आनंद गगनात मावणार नाही."

"ती असं पण सांगत आहे ना की तो चन्द्र रामचन्द्रासारखा असेल?" सीतेने प्रश्न केला.

मंदस्मित करीत रामाने उत्तर दिले—"तो चन्द्र जानकी सारखा असेल!"

दोघे ही आनंदाने हसत राहिले. ते जेथे बसले होते तेथेच मागच्या बाजूला एका छोट्या सरोवरात दोन कमलाच्या कळ्या उमलत होत्या. दिसायला त्या फार सुंदर होत्या. अगदी सहज त्यांच्याकडे पहातच रहावे असे वाटे. थोडा वेळ दोघे ही त्या कळ्यांकडे पहात राहिले नि नंतर अंतःपुराकडे निघाले.

नंतर थोड्या वेळाने सीता बाहेर आली आणि उद्यानातील बागेकडे पहात राहिली. पौर्णिमेचं चांदणं सर्वत्र पसरलं होतं. सरोवरांतील दोन कमळाच्या कळ्या त्या प्रशांत वातावरणात नक्षत्रांसारख्या चमकत होत्या. ती त्या दोन कळ्यांकडे अनिमेष पहातच राहिली. अगदी थोड्या वेळात किती तरी विचार तिच्या मनात आले.

* * *



गंधमादन पर्वतावर हनुमान आपल्या जप-तपात मग्न होता. किती वर्षे गेली याचे ही त्याला भान राहिले नाही. एके दिवशी रामाचा एक प्रिय वयोवृद्ध सेवक भद्र अयोध्येहून तेथे आला आणि म्हणाला—"रामाने तुला ताबडतोब बोलवले आहे."

भद्र मोठा चिंतित दिसत होता. हनुमानाने त्याला विचारले—"काय झालं? अयोध्येत काही विशेष घटना घडली आहे काय? तू फारच चिन्तेत आहेस असें दिसते. राजधानीत असं घडलं तरी काय आहे? तुझ्याकडे पाहूनच मला खूप चिंता वाटू लागली आहे. काय घडलंय?"

एक दीर्घ निःश्वास सोडीत भद्र म्हणाला—"झालं, सगळं काही संपलं! सांगू तरी काय काय तुला? ज्याची आपण कल्पना ही करू शकणार नाही अशा अघटित गोष्टी घडल्या आहेत."

"काय म्हणतोस? जरा स्पष्ट करून सांग ना?" हनुमानाने पृच्छा केली.

भद्र म्हणाला—"ऐक, तुला थोडक्यात सांगतो. एके दिवशी ऋषींसह ब्राह्मणांचा एक गट रामापाशी आला. ब्राह्मण रामाला म्हणाले—"शंबूक नावाच्या एका शूद्राने वेदांचं अध्ययन केलं, त्याने तपश्चर्या पण केली. यामुळे धर्माचा क्षय झाला. त्यांच्याकडील एक एक बालकाला असमय मृत्यु आला. त्यांनी रामाला आज्ञा दिली—"ताबडतोब शंबूकाचा वध कर. अन्यथा होत असलेले अनर्थ असेच वाढत राहतील. त्यांना वेळेवर उपाय योजलेला बरा. कसला ही विचार न करता



अगोदर शंबूकाचे पारिपत्य कर."

सर्वांचं सुख-वर्धन करणं हा तर रामाचा आदर्श. म्हणून ब्राह्मणांच्या आज्ञेनुसार साधूचं जीवन जगणाऱ्या शंबूकाचा रामाने वध केला. शंबूकाची पत्नी कपिला खूप रागावून म्हणाली—"राजा, तू ही जी दारूण हत्या केलीस त्यामुळे तुझ्याकडे काही भयंकर अनर्थ होणार!" रामाला सावधान करीत कपिलेने प्राण सोडले.

या घटनेनंतर थोड्या दिवसांनी एकदा असं झालं. राम गुप्त वेषात माझ्यासह अयोध्येत धोब्यांच्या वस्तीत हिंडत होता. तिथं एक जोडपं आपापसात भांडत होतं.

धोब्याची बायको बाहेर कुठे काही दिवस राहून आली. यावर रागावून धोब्याने तिला खूप मारहाण केली आणि तिला घरात येऊ दिलं नाही. आपली रक्तबंबाळ पाठ दाखवीत ओक्साबोक्षी रडत ती म्हणाली—"राजा रामाने सुद्धा सीतेचा स्वीकार केला! तू कोण मोठा लागून गेलास?" दारू प्यालेला धोबी सर्वांसमक्ष कठोरपणे म्हणाला—"रामाला राजा होण्याचा अहंकार होता. त्याला वाटलं असेल-मला कोण प्रश्न विचारणार? सीता लंकेत एका पर पुरुषाबरोबर अनेक वर्षे राहिली. अशा पत्नीसह राम आनंदात रहात आहे. तुझा स्वीकार करायला मी काही त्याच्यासारखा निर्लज्ज नाही. तुला या घरात इथून पुढे प्रवेश बंद!"

याचा परिणाम असा झाला की सीतेला जंगलात सोडून देण्याची आज्ञा रामाने लक्ष्मणाला दिली. सीता या वेळी गर्भवती होती मुनींच्या आश्रमात जाऊन मुनिपत्नींचे दर्शन घेऊन तिथे काही दिवस राहण्याची आपली इच्छा आदल्याच दिवशी सीतेने रामाला सांगितली होती. या निमित्ताने रामाने सीतेला वनात पाठविले. आपल्या मोठ्या भावाच्या आज्ञेनुसार लक्ष्मण सीतेला वनात सोडून आला.

सीतेचा त्याग केल्यावर रामाने झोप व अन्न वर्ज्य केले. रामाची स्थिति मोठी चिंताजनक झाली. प्रभु रामचंद्राची ही स्थिति मला पाहवेना. राम लहान होता तेव्हा मी त्याला कडेवर घेऊन हिंडवीत असे. तो





रागावला तर त्याची मनधरणी करीत असे. त्याच्या बरोबर मी नाचत-बागडत असे. राम जेव्हा चंद्रासाठी हट्ट करी तेव्हा मी त्याला आरशातील चन्द्र देत असे. आरशात स्वतःला व चन्द्राला पाहून बोबडे बोल तो बोले—'लाम चंदूल!' मग मी आपला चेहरा त्याच्याजवळ नेऊन विचारी—'आता कोण आहे?' राम म्हणे—'लामबद्‌ल!' तेव्हांपासूनच नवी नावे झाली—रामचन्द्र, रामभद्र. माझं रामावरील प्रेम वर्णनातीत होतं. त्या धोब्याचे तुकडे-तुकडे करून टाकायची माझी इच्छा होती. लोक म्हणाले—"आमचीच त्याला मारून टाकायची इच्छा होती. पण तो कुणाच्या तावडीत सापडला नाही. कुठे पळून गेला कोण जाणे! त्याची बायको ही कुठं दिसत नाही."

लक्ष्मणाने सीतेला वनात सोडल्यावर तिला फार दुःख झालं. डोंगरावरून नदीच्या प्रवाहात उडी टाकायला ती निघाली कि इतक्यात महर्षि वाल्मीकींनी जाऊन तिला वाचविले. त्यांनी तिला आपल्या आश्रमात नेले. सीतेने दोन जुळ्या मुलांना जन्म दिला. वाल्मीकींनी त्यांची नावे ठेवली कुश नि लव. त्याना अनेक विद्या शिकवल्या. आपण रचलेली रामकथा गीतांच्या रूपाने गाण्याचे शिक्षण ही त्यांनी या दोघांना दिले. सीतेने मुलांना धनुर्विद्या शिकविली.

एके दिवशी कुश आणि लव रामायणाच्या रामाचे दर्शन घेण्यासाठी आणि आपल्याच आईचे नाव असलेली सीता पाहण्यासाठी मोठ्या उत्साहाने रामकथेचे गायन करीत अयोध्या नगरीत पोचले.

रामाला सीतेचे विस्मरण व्हावे अशी वशिष्ठां सारख्या ज्ञानी व तपस्वी ऋषींची ही इच्छा होती. म्हणून त्यांनी रामाला आदेश दिला की रघुवंशातील राजे लोक-कल्याणासाठी ज्याप्रमाणे अश्वमेध यज्ञ करीत आले तसा रामाने ही यज्ञ करावा. सीतेची सोन्याची मूर्ति जवळ ठेवून रामाने यज्ञ आरंभ केला. त्याच दिवशी आपल्याला मुनि-बालक म्हणविणाऱ्या कुश व लव यांनी नगरीत प्रवेश केला. त्यांनी अयोध्येच्या मार्गांवर रामायणाचे गायन



सुरू केले. त्यांना पाहून लक्ष्मणाला आश्चर्य वाटले. ते कोण असावेत याबाबत त्याने काही तर्क केला. तो त्यांना राजमहालात घेऊन गेला.

राजप्रासादात कुश व लव यांनी सीतेच्या अग्नि-प्रवेशाची घटना गाऊन दाखवली. त्यांच्या गायनातून ती सर्व घटना सर्वांच्या डोळ्यापुढे साक्षात् उभी राहिली. तेथे उपस्थित असलेल्या स्त्रिया, कौसल्या व सुमित्रा, यज्ञासाठी आलेले ऋषि व सर्व प्रमुख नागरिकांच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. त्यांनी सर्वांनी सीतेच्या मूर्तीला नमस्कार केला. रामाला वाटलं की हे मुनि-बालक आहेत. त्याने त्यांना मोठ्या प्रेमाने जवळ बसवून घेतले व त्यांचे चुंबन घेतले. त्यांना मूल्यवान बक्षिसे देऊन रवाना केले.

यज्ञातील प्रारंभिक विधि संपले. रघुवंशाचे चिन्ह सूर्य अंकित असलेला ध्वज घोड्यावर सजवून त्याला मुक्तपणे सोडण्यात आले. तो घोडा दौडत थेट वाल्मीकींच्या आश्रमापाशी आला. घोड्याच्या डोक्यावर जी पट्टी बांधलेली होती त्यावरून कुश व लवांच्या लक्षात आले की हा घोडा रामाचा आहे, त्यांनी घोड्याला बांधून ठेवले.

शत्रुघ्न, भरत, लक्ष्मण वगैरे घोड्याला सोडवायला गेले. कुश व लव यांच्याशी युद्ध करता करता सर्वजण बेशुद्ध झाले. राम प्रत्यक्ष येऊन त्यांच्याशी युद्ध करू लागला.

आमची आई सीता पवित्र आहे असे म्हणत कुश लव रामावर बाण सोडू लागले. त्या बाणांनी राम ही बेशुद्ध झाला. सीता आली व तिने रामाच्या पायांना स्पर्श केला. तेव्हा राम शुद्धीवर आला.

वाल्मीकीने रामाला अनुरोध केला की सीता पवित्र आहे. त्याने सीतेला आपल्या बरोबर अयोध्येला घेऊन जावे.

तेव्हा राम म्हणाला—"सीतेने आपल्या पावित्र्याची शपथ घेतली व नागरिकांची संमति मिळवली तर फार बरे होईल."

सीता अयोध्येला आली आणि आपल्या दोन्ही मुलांना रामाच्या हाती सोपविले. नंतर





ती भूदेवीला म्हणाली–"हे माते, माझे पावित्र्य अबाधित असेल तर माझा स्वीकार कर." तिने असे म्हणताच चारी दिशांना दाट अंधकार पसरला. वीज कडाडली. मेघांचा गडगडाट झाला. अयोध्येचे सर्व नागरिक घरातून बाहेर पडले नि धावत तेथे आले. जिथे सीता उभी होती, तेथे जमीन दुभंगली. रत्नजडित सिंहासनावर बसलेली भूदेवी प्रगट झाली. नागकन्या ते सिंहासन ओढीत होत्या. आई आपल्या मुलांना उचलते, त्याप्रमाणे भूदेवीने सीतेला आपल्या हातांनी उचलले. अयोध्या नगरी हलली. पण कुठल्या ही घराचे एक कौल खाली पडले नाही. भूदेवी सीतेला घेऊन पाताळात निघून गेली. जमीन पुन्हा सांधली गेली. हे सर्व क्षणार्धात झाले आणि सर्वांनी आपल्या डोळ्यांनी पाहिले.

रामाने रागावून भूमि कापण्यासाठी आपले धनुष्य सावरले. तेव्हा आकाशवाणी झाली–"रामा, रघुवंशातील सर्व राजांनी धरतीवर सुशासन केले आहे. तूच शपथ घेववून सीतेला अपल्या माहेरी पाठविलेस. आता हा राग कशाला?" रामाने आता मुकाट्याने आपले धनुष्य खाली ठेवले.

रामाने कुश व लव यांना युवराज बनवून सिंहासनावर बसवले. आता रामाला आपण जे काही केले त्याबाबत अत्यंत विषाद झाला.

तिकडे अश्वमेध यज्ञ चालू आहे. यज्ञाचा घोडा उत्तरेकडून पूर्वेकडे चालला आहे. लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न वगैरे आपल्या सैन्यासह घोड्या बरोबर जात आहेत." अशा रीतीने भद्राने पूर्ण वृत्त निवेदन केले.

हनुमान एकाद्या मूर्तीसारखा स्थिर होऊन अश्रू गाळीत होता. अश्रू पुसत तो भद्राला म्हणाला–"हा चाललो मी रामाकडे. तू ही माझ्या बरोबर चल." हनुमानाने गदा खांद्यावर टाकली आणि आकाशमार्गाने उडत तो अयोध्येला पोचला.





# अक्षय धन

विजयपुरमधे रामदास नावाचा एक माणूस मजुरी करून कुटुम्बाचा अुदरनिर्वाह चालवत असे. पण त्याला फारच कमी मजुरी मिळे. त्यामुळे कधीकधी तर घरातील सर्वांनाच अुपास घडे.

रामदासच्या एकुलत्या एका मुलाचे नाव होते शिवदास. लहानपणापासूनच तो आईबापांचे कष्ट पहात आला होता. त्याची तीव्र इच्छा होती की, आपण असे धन कमवावे की जे कधीच कमी होणार नाही; अक्षय धन असेल ते! त्याच्या मदतीने आपण सर्वजणांनी सुखाने रहावे.

एकदा अचानक शिवदासची आई आजारी पडली आणि मरून गेली. लोक म्हणत की तिला बरोबर औषधोपचार झाला असता, तर ती जगू शकली असती. पुरेशा अुपचाराअभावीच तिचा मृत्यु ओढवला. 'गरीबीमुळेच आपण आईला वाचवू शकलो नाही' ही गोष्ट शिवदासच्या मनाला लागून राहिली. या घटनेमुळे त्याची अक्षय धन मिळवण्याची इच्छा आणखीच तीव्र झाली.

यान्तर दोन वर्षांनी पिता रामदासही मरून गेला. या मृत्यूमुळे शिवदास घाबरून गेला. त्याच्या दुःखाला सीमाच राहिली नाही. त्याचे भविष्य अुजाड दिसू लागले. अशा परिस्थितीत गावचा प्रमुख भूषण त्याला बोलावून घेअून म्हणाला, "शिव, तुझ्या आयुष्यात तुला काही त्रास होअू नये म्हणून तुझ्या बापाने कोणाला कळू न देता थोड्या थोड्या करून शंभर अशर्फ्या शिल्लक टाकून माझ्या जवळ देअून ठेवल्या आहेत. ते धन मी आता तुला देअून टाकतो. पण अगोदर हे सांग की या पैशांनी तू काय करशील?"

हे ऐकून शिवच्या जिवात जीव आला. त्याने आपण फार दिवस पहात असलेल्या

शंतनु इनामदार

स्वप्नाबद्दल भूषणला सांगून टाकले.

यावर भूषण हसत म्हणाला, "प्रथम न संपणाऱ्या धनाची तुझी गोष्ट आढ्याला टांगून ठेव! या शंभर अशर्फ्या हजार करशील तेंव्हा मला येऊन भेट."

त्या शंभर अशर्फ्यांतून शिवदासने कोंबड्यांचा व्यापार सुरू केला. काही दिवसात त्यांनी अंडीसुद्धा दिली. सुरुवातीला या व्यापारात फायदा झाला. पण नंतर कसल्याशा रोगाने कोंबड्या मरून गेल्या, इतकी मेहनत केल्यानंतरही तो शंभर अशर्फ्यांच्या फक्त दोनशे अशर्फ्या करण्यात सफल झाला.

या दोनशे अशर्फ्यांच्या शिवदासने दहा बकऱ्या खरीदल्या. त्यातल्या दोन कोल्हयाने खाऊन टाकल्या, चार चोरांनी पळवल्या, अन् एकीचा पाय मोडला! या व्यापारात काही राहिले नाही हे ओळखून त्याने बाकीच्या बकऱ्या पन्नास अशर्फ्यांना विकून टाकल्या. या पैशातून त्याने फुलांच्या विक्रीचा व्यवसाय सुरू केला. पण जितकी फुले तो आणी, त्यातली काही विकली जात नसत, तर काही कोमेजून जात. एका आठवड्यातच त्याचे पंचवीस अशर्फ्यांचे नुकसान झाले.

तरीही शिवदास हार मानायला तयार नव्हता. ज्या पंचवीस अशर्फ्या वाचल्या, त्यातून त्याने मिरचीच्या भज्यांचा धंदा सुरू केला.एक दिवस भजी विकायला जात असताना अचानक मोठा पाऊस आला. आणि सारी भजी भिजून गेली. ती भजी त्याने नुकसानीत विकली आणि त्याच्याजवळ फक्त पाच अशर्फ्या राहिल्या.

व्यापार करून कधी न संपणारी इस्टेट जमवायचा त्याचा विचार होता, पण प्रत्यक्षात तर सारे उलटेच घडले! जे त्याचे स्वतःचे पैसे होते, तितकेसुद्धा वाचले नाहीत! मोठ्या दुःखी अंतःकरणाने शिवदास घरी जायला निघाला. रस्त्यात त्याला एक चार वर्षांचा मुलगा रडत जात असलेला दिसला. त्याला विचारल्यावर समजले की तो एका गावप्रमुखाचा मुलगा आहे. सर्वजण बाजारात गेले असताना मुलगा गर्दीत हरवला होता.

शिवदासने त्याला मिठाई खायला घातली आणि त्याला तो त्याच्या गावी घेऊन गेला. त्या व्यापात त्याची एक अशर्फी खर्च झाली.

मुलाच्या आईवडलांनी शिवदासचे आभार मानले आणि ते म्हणाले, "आम्ही एके काळचे गावप्रमुख असलो, तरी सध्या आमची परिस्थिती खालावलेली आहे. मुलाला तू आणून पोचवलंस त्याची परतफेड म्हणूनही आम्ही तुला काही देऊ शकत नाही."

त्यांची हकिकत जाणून शिवदासला दुःख झाले, तो म्हणाला, "मी कसल्या परतफेडीच्या आशेने मुलाला इथवर घेऊन नाही आलो." अन् तो आपल्या गावी परतला.

येताना एका पायवाटेच्या कडेला शिवदासला एक छोटीशी पोटली पडलेली दिसली. उघडून पाहिली, तेंव्हा त्यात शंभर अशर्फ्या मिळाल्या. बराच वेळ तिथेच उभा राहून त्याने पोटलीचा मालक शोधत येईल, म्हणून वाट पाहिली. पण कोणीच आले नाही.

मग शिवदास तेथून निघाला, थोडे पुढे गेल्यावर एका ठिकाणी लोकांची गर्दी







जमलेली त्याला दिसली. गर्दीच्या मध्यावर एक बाई रडत बसलेली होती. चौकशी केल्यावर कळले की, त्या बाईच्या नवऱ्याला साप चावलाय. त्यावर अुपाय करण्यासाठी वैद्य शंभर अशर्फ्यांची मागणी करत आहे; पण इतके धन जवळ नसल्याने ती बाई रडत आहे.

शिवदासने ताबडतोब ती पोटली बाईच्या स्वाधीन करत म्हटले, "बाई, रडू नका तुम्ही. ही पोटली घ्या.त्यात शंभर अशर्फ्या आहेत. ताबडतोब निघा आणि आपल्या नवऱ्याला औषधोपचार करून घ्या." पोटली बाईला देअून शिवदास गर्दीतून बाहेर पडला.

पुढे दाटशा जंगलातून घराकडे जात असताना वाटेत चिंतामणी नावाच्या प्रवाशाशी त्याची गाठ पडली आणि दोघे बोलत बोलत पुढे जाअू लागले-इतक्यात चार चोरांनी त्यांची वाट अडवली.

चिंतामणीजवळ थोडेसे सोने होते. चोरांनी शिवदासचे कपडे चाचपले, तेंव्हा त्यांना काहीच मिळाले नाही. पण ते जेंव्हा चिंतामणीकडे वळले तेंव्हा चिन्तामणीने ते सोने शिताफीने शिवदासच्या थैलीत टाकून दिले. त्यामुळे चोरांना चिन्तामणीजवळही काही मिळाले नाही. दोघांना शिव्या देत चोर आपल्या वाटेने निघून गेले.

चोर गेल्याबरोबर चिन्तामणीने शिवदासच्या थैलीतले सोने बाहेर काढले अन् म्हटले. "शिवदास, तुझ्यामुळेच मी आज आपलं सोनं वाचवू शकलो." शिवदास नाकारत असतानाही त्याला काही सोने बक्षीस देअून चिन्तामणी निघून गेला.

आणखी थोडे पुढे गेल्यावर शिवदासला असे दृश्य दिसले की, एक माणूस झाडाच्या फांदीला दोराचा फास लावून आत्महत्त्या करण्याच्या प्रयत्नात आहे. त्याला पाहिल्यावर शिवदासला वाईट वाटलेच, पण त्याचा रागही आला.

त्या माणसाजवळ जाअून शिवदास म्हणाला, "अरे, हे काय करतोयस तू? छी छी! आपल्या घरातच हे काम केलं असतंस तर बरं झालं असतं ना! इतक्या दूर येअून हे करायची गरज नव्हती."

त्या माणसाचे नाव होते दामोदर. त्याने आपल्या मुलीचे लग्न ठरवून नवरदेवाला हुंडा द्यायचे वचन दिले होते. ऐन मुहूर्त-वेळी तो हुंडा देअू शकत नाहीसे पाहून लोकांनी त्याला खूप शिव्या दिल्या. सर्वांसमक्ष त्याची नाचक्की झाली. या अपमानाने लज्जित होअून तो आत्महत्त्या करायला निघाला होता.

"तू जर हुंडा देअू शकत नव्हतास, तर तसं कबूल का केलंस? यात तुझी बुद्धिहीनताच दिसून येते. बरं आता हे सोनं घे अन् आपल्या मुलीचं लग्न अुरकून टाक." असे म्हणत शिवदासने ते सोने त्याच्या हातावर ठेवले.

कृतज्ञतेने दामोदरचे डोळे भरून आले. "दिसायला तू खूप लहान दिसतोस, पण माझ्यासारख्या अनोळखी माणसाला तू मदत केलीयस. मी तुला असा आशिर्वाद देतो की, देव तुला इतकी संपत्ति देईल की जी कधीच संपणार नाही. चल, माझ्याबरोबर येअून माझ्या मुलीला आशिर्वाद दे. 'नाही' म्हणू नकोस."

शिवदास दामोदरबरोबर गेला. लग्नाच्या वेळी एक माणूस त्याच्या जवळ येअून म्हणाला, "तू रामदासचा मुलगा ना? माझं नाव नागेश्वर. चार वर्षांपूर्वी जंगलात चोरांनी मला खूप मारपीट केली. मी खूप जखमी झालो. पण तुझ्या वडलांनी मला मृत्युच्या तोंडातून ओढून काढून आपल्या घरी पोचवलं. माझे प्राण वाचले. आता कसे आहेत ते?"

शिवदासने त्याला रामदासच्या मृत्युची



खबर दिली. तेंव्हा नागेश्वर फार दुःखी झाला. शिवदासला आपल्या घरी घेअून जाअून त्याने त्याला नवी वस्त्रे देत म्हटले, "त्यावेळी तुझ्या पित्याला काही मदत करण्यासारखी माझीही परिस्थिती नव्हती. आता माझ्याकडून ही छोटीशी भेट स्वीकार कर. अव्हेर नको करू तिचा." असे म्हणत नागेश्वरने शिवदासला एक हजार अशर्फ्या दिल्या.

ते धन घेअून शिवदास आपल्या गावी पोचला. लगेच गावप्रमुख भूषण याला भेटायला जाअून त्याला त्या हजार अशर्फ्या दाखवत तो म्हणाला, "शंभरच्या हजार अशर्फ्या बनवून आणल्यात मी! आता तरी तुम्ही मानलं नं, की कधी न संपणारी संपत्ती-अक्षय धन-मी मिळवू शकतो?"

डोके हलवत भूषण म्हणाला, "पण ही संपत्ती तू कशी मिळवलीस, हे कुठे सांगितलंस मला,?"

जे, जसं घडलं, ते सारं शिवदासने भूषणला सविस्तर सांगितले. सर्व काही ऐकल्यावर भूषण हसत त्याला म्हणाला, "अरे शिव, इतक्या अनुभवानंतरही तुझ्या लक्षात नाही आलं, की कधी न कमी होणारी अक्षय संपत्ती म्हणजे काय असते अन् ती कशी मिळवता येते ते? हे तर मोठंच आश्चर्य म्हणायचं! जिद्दीनं का होईना, स्वतःच्या शक्तीच्या जोरावर तू हरतऱ्हेचे व्यापार करून पाहिलेस; पण त्यात तू असफल झालास. मोठं नुकसान झालं तुझं. आता तुझ्याजवळ ज्या एक हजार अशर्फ्या मिळाल्या आहेत, खरं सांग बरं या कमाईत तुझं व्यापार-कौशल्य आहे की स्वतःची काही शक्ती आहे? विचार कर म्हणजे खरी गोष्ट तुझ्या लक्षात येईल."

भूषणच्या बोलण्याने शिवदासला भासले की, 'आपण नुसतेच जे हवेत तरंगत होतो, ते आता जमिनीवर अुतरलोत.' तो ताबडतोब भूषणच्या पाया पडला अन् म्हणाला, "काका, तुम्ही मला जागं केलंत."

शिवदासला आशिर्वाद देत भूषण म्हणाला, "शिवा, एक गोष्ट लक्षात ठेव. जगात कधी न संपणारं अक्षय धन कोणीही मिळवू शकत नाही. पोटापुरतं मिळवण्याचा दावाही कोणी करू शकत नाही. कारण या दोन्हीच्या सीमा अमर्याद आहेत."

त्या हजार अशर्फ्या शिवदासने भूषणसमोर ठेवत विचारले, "आता तुम्हीच सांगा, आता मी काय करावं?"

"वाटलं तर तू माझ्या शेतात काम कर, मला मदत कर. चांगला पगार देईन मी. तुझं लग्नही लावून देईन. धनाच्या बाबतीत एक गोष्ट पक्की समज, अनावश्यक खर्च न करणं हीच कधी न संपणारी संपत्ती, 'अक्षय धन' आहे."

यानंतर शिवदास सर्व कामात भूषणला मदत करत राहिला. त्याने विवाह केला आणि सुखात राहू लागला.



## चान्दोबाच्या बातम्या

### छोटे कुराण



मुस्लीम धर्मांच्या पवित्र ग्रंथाची अत्यंत लहान आकाराची प्रत स्वीडनच्या लॅण्डस्करोना नावाच्या शहरात आढळली आहे. त्याची लांबी केवळ २.७ सेंटिमीटर इतकी आहे. हे कुराण अरबी भाषेत लिहिलेले आहे. ही प्रत ज्याच्याजवळ आहे, त्याला ती त्याच्या पित्याकडून मिळाली असून ती त्याने १९६०-१९६३ च्या दरम्यान एका लिलावात खरीदली होती. आतापर्यन्त असे मानले जात असे की कुराणाची सर्वात लहान प्रत चीनमधे आहे. स्वीडन मधल्या या ग्रन्थाला लवकरच 'गिनीज बुक' मधे स्थान मिळेल.



### बर्फाची आगगाडी

आरामात प्रवास घडवणाऱ्या आणि जगातील सर्वात जास्त वेगाने जाणाऱ्या आगगाडीचे नाव आहे-बर्फाची आगगाडी. पण याचा अर्थ असा नव्हे, की ती बर्फावरून चालते. ही अत्यन्त आकर्षक व गुळगुळीत अशी गाडी जर्मनीतील शहरांतून धावते. हिचा वेग आहे ताशी २५० मैल. अमट्रॅक नावाची एक बिनसरकारी रेल्वेसंस्था लवकरच अशा पंचवीस गाड्या सुरू करणार आहे. या गाड्या अुत्तर व दक्षिण अमेरिकेतील काही भागातून १९९४ मधे धावू लागतील.

### व्हिडिओ वर भूत अवतरले



आतापर्यन्त भुताची स्थिरचित्रे घेतली गेली आहेत. परन्तु बहुधा आता प्रथमच भुताच्या हालचाली व्हिडिओवर चित्रित केल्या गेल्या आहेत. फिजी देशाच्या संसदेच्या तटीयवर्ती सुरक्षा सैनिकांनी असे खात्रीपूर्वक जाहीर केले आहे की त्यांनी भुताला आत फिरताना पाहिले आहे. त्यांनी ताबडतोब त्याचे व्हिडिओ चित्रण करवले. यानंतर ती टेप देशाचे प्रधानमंत्री आणि विरोधी पक्षाचा नेता यांना दाखवली गेली व त्यांनी ती टी. व्ही. वर दाखवायला परवानगी दिली. एका भुताची छाया खोलीत इकडे-तिकडे फिरत असलेली दाखवण्यात आली आहे. या भुताने फिजीचा पारंपारिक पोषाख धारण केलेला आहे आणि वल्कले नेसलेली आहेत.

### 'देवी'चा मृत्यु

काही वर्षांपूर्वी पर्यंत नवजात बालकांना 'देवी' ची लस टोचणे सक्तीचे असे. या स्पर्शजन्य रोगामुळे लाखो लोकांचा मृत्यु ओढवलेला आहे. आणि त्यातील पन्नास टक्के बळी वीसपेक्षा कमी वयाचे होते. जेंव्हा 'देवी' ची लस शोधली गेली तेंव्हा या रोगाचा समूळ नायनाट करण्याचे जोरदार प्रयत्न केले गेले. गेल्या काही वर्षात या रोगाची एकही लागण झालेली ऐकिवात नाही. या रोगाचे जे जंतु केवळ संशोधनासाठी प्रयोगशाळेत सुरक्षित ठेवलेले आहेत, २९ डिसेंबरला त्यांचाही विनाश केला गेला, आणि विश्व स्वास्थ्य संघटनेने या घातक रोगापासून जनतेची कायमची मुक्तता केली.



# गंगास्नानाचे फळ

एका गावात एक भोळाभाबडा संसारी ब्राह्मण रहात असे. त्याच्या हातून काही पाप घडल्यामुळे तो ज्याला त्याला या पापानाशार्थ प्रायश्चित्त विचारू लागला. त्या गावात प्रायश्चित्त-विद्या जाणणारा पंडित कोणी नव्हता. जे कोणी अर्ध-पंडित होते, ते म्हणत—"बाबा रे, उगाच काही तरी सल्ला तुला देणे योग्य नव्हे. प्रायश्चित्त सांगण्यासाठी खरोखरीच कोणी तरी अधिकारी विद्वान् मिळाला पाहिजे. अन्यथा हानीच होण्याची शक्यता अधिक.

योगायोगाने एकदा रामशास्त्री नावाचे एक महापंडित त्या गावी आले. ही वार्ता कानी पडताच ब्राह्मणाला अत्यानंद झाला. तो रामशास्त्र्यांकडे गेला नि आपली सर्व कहाणी त्यांना सांगितली. सर्व ऐकून शास्त्रींनी सल्ला दिला "तू जिवन्न असेपर्यन्त गंगाकिनारी राहून रोज गंगास्नान करत जा आणि देवाचे ध्यान कर. बास, हेच तुझं प्रायश्चित्त."

ब्राह्मणाने आपली सारी संपत्ती मुलाच्या हवाली केली आणि तो गंगेच्या शोधार्थ निघाला. जाता जाता त्याला एक मोठा प्रवाह आढळला. तीच गंगा समजून तिथे मुक्काम ठोकून तो रोज नदीत आंघोळ करू लागला. बाकीच्या वेळेत तो देवाची आराधना करी. असेच पाच महिने गेल्यावर एके दिवशी तेथून एक शिवभक्त रस्त्याने जात होता. त्याने ब्राह्मणाला विचारले, "मुला, तू इथे काय करत आहेस?"

ब्राह्मण म्हणाला, "स्वामीजी, अज्ञानामुळे माझ्या हातून एक मोठं पाप घडलं, त्यातून निवृत्त होण्यासाठी मी या गंगेत स्नान करून देवाचं ध्यान करत प्रायश्चित घेत आहे."

"अरे, ही गंगा नाही का?" ब्राह्मणाच्या या प्रश्नावर जोरात हसून शिवभक्त म्हणाला, "अरे वेड्या, गंगा आणि हा जलप्रवाह यांच्यात आकाशपाताळाचा फरक आहे. मुंग्यांच्या वारुळाला तू मेरू पर्वत समजत आहेस, तुझ्यासारखा अज्ञानी आणि मूर्ख माणूस जगात असेल असं वाटलं नव्हतं मला. तू ज्या गंगेबद्दल बोलत आहेस, ती इथून शंभर कोसांपेक्षाही जास्त दूर आहे!"

"स्वामीजी, आपण मोठाच उपकार केलात माझ्यावर, फार पुण्यवान आहात आपण." असे म्हणून आपले बाडबिस्तर आवरून ब्राह्मण पुढे चालू लागला. चालता चालता त्याला एक लहानशी नदी दिसली. पहिल्या प्रवाहापेक्षा ही मोठी दिसली म्हणून त्याला वाटले, हीच गंगा असावी. फार आनंदित होऊन तो आता या नदीत स्नान करून ध्यान वगैरे करू लागला. तेथेही अशीच पाच वर्षं गेल्यावर त्याला एक कापालिक भेटला. सारी हकिकत कळल्यावर कापालिक त्याला म्हणाला, "किती भोळा रे तू! या नदीला तर काहीच महत्त्व नाही. इतके दिवस खरंच गंगाकाठी घालवले असतेस, तर केवढा पुण्यसंचय झाला असता तुझा!"

दचकून ब्राह्मणाने त्याला विचारले, "म्हणजे? ही सुद्धा गंगा नव्हे?"

"ही? अन् गंगा? कोल्हा कधी सिंह बनू शकतो काय? हिच्यात अन् गंगेत काहीच साम्य नाही." कापालिकाने माहिती पुरवली.

"बरं झालं स्वामी, आपण इथे आलात. मला हे सांगून आपण मोठंच पुण्य कमावलंत." असे विनयाने बोलून पुन्हा



सोनिया वैद्य

आपलं सामान आवरून ब्राह्मण तेथून निघाला.

चालताचालता थोड्या दिवसांनी तो नर्मदाकिनारी पोचला. तो मोठा प्रवाह पाहून 'आता मात्र नक्की ही गंगाच!' असे समजून स्नान, ध्यान करत तो पाच वर्ष तिथे राहिला. एके दिवशी एक यात्रेकरू ब्राह्मण येऊन नदीत फुलं टाकून म्हणाला, "जय नर्मदामाई!" अन् नर्मदेबद्दलचे काही श्लोक तो म्हणू लागला.

ब्राह्मणाने त्याला विचारले, "महाराज, या नदीचं नाव काय?"

"ही अतिपवित्र नर्मदा नदी. ही नर्मदा हे तुला खरोखरीच माहीत नाही?" यात्रेकरूने विचारले.

लांब उसासा सोडत ब्राह्मण म्हणाला, "फार उपकार झाले महाराज माझ्यावर." आणि पुन्हा एकदा बाडबिस्तर बांधून तो तेथून निघाला.

परंतु आतापर्यन्त बिचाऱ्या ब्राह्मणाची सारी शक्ती संपुष्टात आली होती. घर सोडून पंधरा वर्षं झाली होती; वयही खूप झाले होते, तपस्या करता करता शरीर वाळून गेले होते. आता पुढील यात्रा त्याला फार कठीण पडू लागली; दिवसा ऊन्ह सहन होईनासे झाले. अशक्तपणामुळे पावले नीट पुढे पडत नाहीशी झाली. तरीही वचनबद्ध असल्यामुळे कसाबसा उठतबसत तो चालत राहिला. शेवटी अशी स्थिति आली की त्याला चालणेच अशक्य झाले. तरीही तो कसातरी सरपटत राहिला, श्वास चालू असेपर्यन्त हट्टाने शरीर चालवत राहिला. शेवटी एका टेकाडावरून त्याला गंगानदी दिसली, तिच्यात पुण्यस्नान करणारी असंख्य माणसे दिसली. आनन्दाने ब्राह्मणाचे हृदय गदगदू लागले आणि तिथेच त्याचे प्राणोत्क्रमण झाले!

यमदूत त्याला यमराजाकडे घेऊन गेले. यमाने चित्रगुप्तला त्याचा हिशेब विचारला. "याने आयुष्यात एकच पाप केलं. पण पंधरा वर्षं गंगास्नान करत राहिल्यानं त्याचं पाप धुवून गेलंय!" चित्रगुप्त उत्तरला..



## बहुरूपा वसुन्धरा



### पोपट

सुंदर अशा पाळीव पक्ष्यांमध्ये पोपट हा प्रमुख आहे. त्याला बोलायलाही शिकवता येते. पोपटांच्या तीनशेपेक्षाही अधिक जाती आहेत. त्यातील सत्तर प्रकार नामशेष होण्याच्या मार्गावर आहेत. 'माकास' नावाचा पोपट आकाराने सर्वात मोठा असतो. तो मध्य व दक्षिण अमेरिकेत आढळतो. न्यूगिनी मधे आढळणारे 'पिग्मी' हे आकाराने सर्वात लहान पोपट होत. सामान्य पोपट हा हिरवा असून त्याची चोच लाल असते. मेक्सिकोत आढळणारा लाल पोपट (जो चित्रात आहे) हाच सर्वात सुन्दर पोपट मानला जातो. मोठ्या पोपटाची लांबी जवळजवळ ८५ सें. मी. आणि लहान पोपटाची १० सें. मी. असते. न्यूझीलंडमधील 'किया' नावाचे पोपटच फक्त मांस खातात. पोपटांची चोच बाकडी असून त्यांच्या पायांची दोन बोटे पुढे अन् दोन मागे असतात. उलटे पाय हेच पोपटांचे वैशिष्ट्य होय.



### काटेवाला मासा

स्वसंरक्षणासाठी निरनिराळे प्राणी निरनिराळे मार्ग वापरतात त्याचे ज्वलन्त उदाहरण म्हणजे 'काटेवाला मासा.' दुसरा कोणी प्राणी आपल्याला खायला येत आहे, असे लक्षात येताच हा मासा पोटभर पाणी पिऊन घेतो आणि आपले शरीर खूपसे फुगवून चेंडूसारखा बनतो. त्यामुळे त्याच्या अंगावरचे काटे सरळ उभे रहातात. ते पाहून त्याला खायला येणारा प्राणी भिऊन पळून जातो.



### गुलाबाची जपमाळ

गुलाबाचे फूल कोणाला आवडत नाही? जवाहरलाल नेहरूंना गुलाब फार आवडे आणि त्यांच्या कोटाच्या बटनहोलमध्ये नेहमी गुलाब अडकवलेला असे ही गोष्ट सर्वविदित आहे. मुसलमान लोक आपली मातृभूमी 'पर्शिया' येथून गुलाबाची रोपे घेऊन आले. सहाव्या शतकात पर्शियाला 'गुलाबांचा देश' असे मानले जाई. तेथील गुलाबांच्या बागा 'गुलिस्तान' या जगप्रसिद्ध आहेत. असे म्हणतात की या बागा ओलांडायला घोड्यावरून जाऊनही सहा दिवस लागत असत. ई. स. पू. ३,००० मध्येही चीनमधे गुलाबांच्या बागा अस्तित्वात होत्या. गुलाबाच्या पाकळ्या चांगल्या कुटून सुकवल्या जातात. त्यात काळा रंग घालून नंतर त्याच्या जपमाळा तयार केल्या जातात.

विशेष समाचार

# एकमेकांचे शत्रु असलेले दोन नोबेल पुरस्कार विजेते:



सर्वांची दृष्टि सध्या नॉर्वेची राजधानी ओसिमो या शहराकडे लागलेली आहे. इथेच दरवर्षी नोबेल पारितोषिकाच्या समितीची बैठक होते आणि निर्णय घेतला जातो. दरवर्षी डिसेंबरमधे हे पारितोषिक-वितरण होते. आता जगातल्या सर्व गण्यमान्य व्यक्ति टी. व्ही. कडे डोळे लावून बसल्या आहेत, कारण या ऐतिहासिक अुत्सवात जगातल्या दोन सर्वात आदरणीय व प्रतिष्ठित व्यक्तींना नोबेल पुरस्कार दिला जाणार आहे. या दोन व्यक्ति म्हणजे दक्षिण आफ्रिकेचे अध्यक्ष श्री. एफ्. डब्ल्यू. डे. किर्क आणि आफ्रिकेचे राष्ट्रीय कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. नेल्सन मंडेला.

एक काळ असा होता की, तेव्हा हे दोघे एकमेकांचे कट्टर शत्रु होते. अशा दोन शत्रूंना एकाच वेळी नोबेल पुरस्कार देण्याचा निर्णय समितीने का घेतला? इतिहासाची पाने अुलटून पाहिली तर आपल्याला असे दिसून येईल की, दक्षिण आफ्रिकेने गेल्या शंभर वर्षांपासून वर्णभेद आणि जातीभेद नीति अंगिकारलेली होती. गोरे लोक या देशात स्थिर झाले आणि सरकार चालवण्यातही त्यांचेच वर्चस्व राहिले. त्यांनी तेथील स्थानीय काळ्या लोकांवर खूपशी बंधने लादली. हे सांगायची गरजच नाही, की हे काळे लोकच तिथले खरे निवासी असून त्यांची संख्याही अधिक होती. तरीही सरकार दरबारी त्यांचे काही स्थानच अुरले नाही, अन् त्यांना काही क्षेत्रातच अडकवून ठेवले गेले. आपल्या आर्थिक क्षेत्रात कसली सुधारणा करण्याची काही सोयही त्यांना अुपलब्ध करून दिली गेली नाही. इतकेच नव्हे, तर शिक्षण व सर्वसामान्य प्रगति करून घ्यायचा हक्कही त्यांना नाकारला गेला. देशाची आर्थिक स्थिति व प्रगति यांत त्यांना भागच घेअू दिला गेला नाही. असा दबाव ते किती दिवस सहन करणार? गोऱ्यांच्या या दमन-नीतीला जबरदस्त विरोध करण्यात आला. त्या लोकांनी न्याय, स्वातन्त्र्य व समानता यांची मागणी केली. त्यांच्या मागण्यांचे योग्य तऱ्हेने प्रतिनिधित्व करू शकेल असा नेता त्यांना श्री. नेल्सन मंडेला यांच्या रूपात लाभला. १९६० मधे त्यांनी राष्ट्रीय कॉंग्रेसच्या एका गोरिल्ला शाखेची स्थापना केली. त्यांचे ध्येय होते प्रजातंत्र, धर्म-निरपेक्ष अशा दक्षिण आफ्रिकेची स्थापना. काळ्या लोकांनी जेव्हां आन्दोलन सुरू केले, तेव्हां मंडेलांना

कारागारात कोंबण्यात आले. त्यांना 'आतंकवादी' म्हणून जाहीर केले गेले. 'एकटेपणा आणि निरुद्योग' अवस्थेत त्यांना २१ वर्षे बन्दीवासात काढावी लागली. त्यांचा हा बन्दीवास म्हणजे मुद्दामच डोळेझाक करून एकाद्या जमातीविरुद्ध केलेल्या अत्याचाराचे ज्वलन्त अुदाहरण होय! भारतातील गांधीजींच्या अहिंसात्मक आन्दोलनाशी याची काहीशी तुलना होअू शकेल.

या दरम्यान काळ्या लोकांचे आन्दोलन चालूच राहिले. शासकही बदलत राहिले. मंडेलां प्रमाणेच वकील असणारे श्री. डे. किर्क १९४० मधे आफ्रिकेचे अध्यक्ष बनले. दक्षिण आफ्रिकेबद्दलचा त्यांचा दृष्टिकोणच निराळा होता. काळ्या-गोऱ्यांमधले जे कुत्सित नियम होते, ते तोडून टाकले गेले आणि केवळ गोऱ्यांनाच ज्या सुविधा प्राप्त होत्या त्या समाप्त करण्यात आल्या. सरकारमधेही काळ्यांना स्थान देण्याचा निर्णय त्यांनी घेतला. काळ्यांनी त्यांच्या या निर्णयाचे स्वागत करून आपल्या नेत्याच्या सुटकेची मागणी केली. १९९० मधे ही घटना घडली. कसल्याही प्रकारचे शत्रुत्व व द्वेषाची भावना न ठेवता श्री. नेल्सन मंडेलांची कारावासातून मुक्तता झाली! त्यांनी ही गोष्ट लगेच स्पष्ट केली की, "माझे पूर्वीचे जे ध्येय होते, ते आजही कायम आहे!" त्यांचे राजनैतिक लक्ष्य होते-"बहुसंख्याकांचे सरकार बनावे, बहुसंख्य काळ्यांचे नव्हे!" गोऱ्यांच्या सरकारशी त्यांनी ताबडतोब चर्चा सुरु केली. त्यांचा प्रस्ताव असा होता की-नवी राजनैतिक नीति सुरु व्हावी, पण ती शान्तिपूर्वकच व्हावी.त्यांच्या प्रस्तावाचा सिद्धान्त होता-एक व्यक्ति, एक मत!

त्यांची ही चर्चा गोऱ्यांचे सरकार व आफ्रिकी राष्ट्रीय कॉंग्रेस यांच्यात चालू राहिली. काळ्या लोकांच्या दुसऱ्या संस्थाही या चर्चेत सामिल झाल्या. फलस्वरूप–शतकानुशतके चालू असणारा त्यांच्यातला अविश्वास दूर होअून प्रजातंत्र राज्यव्यवस्थेच्या स्थापनेचा मार्ग खुला झाला.

हां, पण शान्तीचा हा प्रस्ताव कार्यान्वित होत असताना अनेक अडचणी आल्या, खूपसे अपघात घडले, हिंसात्मक आन्दोलने झाली; तरीही दोन्ही नेत्यांनी प्रजातन्त्र स्थापनेचे आपले प्रयत्न चालूच ठेवले. या प्रयत्नांमुळेच नोबेल पारितोषिक समितीचे त्यांच्याकडे लक्ष गेले, समिति त्यामुळे प्रभावित झाली.

हा पुरस्कार जेव्हा घोषित झाला, तेव्हा डॉ. किर्क म्हणाले, "हा खूपच मोठा सन्मान आहे. या प्रशस्तीचा मी स्वीकार करतो." श्री. मंडेला म्हणाले, "हा नोबेल पुरस्कार म्हणजे साऱ्या दक्षिण आफ्रिकेचा सन्मान होय." केप टाउनच्या आर्च बिशप डेजमॉंड टुटु यांनाही हा पुरस्कार १९८४-त मिळाला होता. ते म्हणाले, "दोन विभिन्न प्रकारच्या व्यक्तींना सम्मिलित स्वरूपात मिळणारा हा पुरस्कार अत्यन्त अुचित असाच आहे."

असे दोन नेते पुरस्कार स्वीकारायला जेव्हा मंचावर येतील, तेव्हा त्यांना पाहून कोणाचे डोळे आनन्दाश्रूंनी चमकणार नाहीत?

### या साली पुरस्कारप्राप्त अन्य विजेते:

साहित्य - टोनी मॉरिसन, आफ्रिकी-अमेरिकन स्त्री, लोरियनची रचयित्री, ओहिओ, यु. एस्. ए.;

चिकित्सा शास्त्र – डॉ. रिचर्ड जे. रॉबर्ट्स्, युनायटेड किंगडम, व डॉ. फिलिप ए. शार्प, यु. एस्. ए.;

भौतिक शास्त्र–श्री. रसेल ए. हल्स व प्रो. जोसेफ एच्. टेलर, (दोघेही) यु. एस्. ए.;

रसायन शास्त्र–श्री. कॅरी बी. मुल्लीस, यु. एस्. ए. व श्री. मायकेल स्मिथ, कॅनडा;

अर्थशास्त्र–प्रो. रॉबर्ट डब्ल्यू. फोगेल व प्रो. डग्लस सी. नॉर्थ, (दोघेही) यु. एस्. ए.



# अदृश्य रुपातलीमोलकरीण

सुन्दरी ही श्रीमन्त सुकुमारीची मैत्रीण होती. पण गरीब असूनही ती कधीच कुणापुढे हात पसरत नसे. मनात कोणताही भेदभाव न बाळगता दोघी मैत्रिणी एकमेकींकडे जातयेत असत.

सुकुमारीच्या घरी एकदा दागिन्यांचा एक व्यापारी दूर प्रान्तातून आला. सुकुमारीच्या वडलांनीं चार पाच दागिने खरेदीही केले.

या व्यापाऱ्याबरोबर नलन्द नावाचा एक तरूणही होता. दिसायला तो खूपच सुंदर व रुबाबदार होता. सुकुमारी त्याच्याकडे आकर्षित झाली व त्याच्याशीच विवाह करावा असे तिने ठरवले. सुंदरीला बोलावून तिने तिच्यासमोर आपली इच्छा प्रकट केली. ती सुन्दरीला म्हणाली, "दागिन्यांचा व्यापारी धर्मशाळेत अुतरलाय: कसंही करून तू त्या तरुणाला भेटून त्याला माझ्या त्याच्यावरच्या प्रेमाबद्दल सांग. त्याला हवा तेवढा हुंडाही माझे बाबा देअू शकतील."

त्याच दिवशी संध्याकाळी सुंदरी धर्मशाळेत जाअून नलन्दला भेटली. स्वतःच स्वतःचा परिचय करून देअून तिने त्याला आपली मैत्रीण सुकुमारी हिची इच्छा सांगितली.

नलन्द सुन्दरीकडे पहातच राहिला. तिच्याकडून सारी हकिकत जाणल्यावर तो सुन्दरीला म्हणाला, "तुझ्या सौन्दर्यानं माझ्यावर जादू केलीय. तुझं बोलणं मी ऐकलंय, पण माझं तिकडे नीट लक्ष लागलं नाही. मी लग्न करीन, तर तुझ्याशीच. हे न घडलं तर मी जीव देईन."

असा काही विपरीत परिणाम होईल, याची सुंदरीने कल्पनाच केली नव्हती! घाबरत ती तेथून काही न बोलताच सटकली. त्या दोघांचे बोलणे व्यापाऱ्याने मात्र दुरून

श्रुति तांबे



ऐकले होते. तो नलन्दजवळ येऊन म्हणाला, "ही मुलगी चांगलीच हुशार वाटतेय. पण ती तर आपल्या मैत्रिणीबद्दल बोलायला तुझ्याकडे आली होती. तेंव्हा आता तू स्वतःच सुकुमारीकडे जाऊन तिच्याशी बोलून या विवाहासाठी संमति मिळवायला हवीस. तसं न झालं, तरं सुंदरी तुझ्याशी लग्नाला तयार होणार नाही."

दुसऱ्या दिवशी नलन्द सुकुमारीला भेटायला गेला आणि जे काही घडले, ते त्याने तिला स्पष्ट सांगून टाकले. पुढे तो म्हणाला, "यात सुन्दरीचा काहीही दोष नाहीय. तेंव्हा तिच्याबद्दल गैरसमज नसावा. तिच्याशिवाय मी दुसऱ्या कुणाशीही लग्न करणार नाही. तूच तिला नीट समजावून या लग्नाला राजी कर."

ही सारी हकिकत ऐकून सुकुमारीला काही बोलायला वावच उरला नाही. नाइलाज म्हणून तिला त्याला 'होय' म्हणावेच लागले.

सुन्दरी व नलन्दचा रीतसर विवाह होऊन दोघेही ते गाव सोडून निघून गेले. यानन्तर थोड्याच दिवसांनी सुकुमारीचा विवाहही एका संपन्न माणसाशी होऊन गेला.

काही वर्षे निघून गेली आणि एक दिवस सुकुमारीला समजले की सुन्दरी आपल्या पतीसह चक्रपुरी गावात रहात आहे. तिला हेही समजले की ते दोघे तिथे छान सुखासमाधानात आहेत. हे ऐकून ती द्वेषाने जळू लागली. आपण स्वतः किती वैभवात व चैनीत रहात आहोत हे नलन्दला दाखवून द्यावे, अशा इच्छेने तिने चक्रपुरला सुन्दरीकडे जायचे ठरवले. एक मोलकरीण बरोबर घेऊन ती चक्रपुरीला गेली.

सुन्दरीने मोठ्या प्रेमाने आपल्या मैत्रिणीचे स्वागत केले. दोघेही नवराबायको एकमेकांवर खूप प्रेम करत आहेत व त्यांच्यात कसल्याही प्रकारचा झगडा वगैरे नसल्याचे पाहून सुकुमारीच्या मनात जास्तच आग पेटली.

दुसऱ्या दिवशी खोटी सहानुभूती दाखवत ती सुंदरीला म्हणाली, "तुझ्या घरात कोणी नोकरचाकर नाहीत ही मोठी दुःखाची गोष्ट आहे."

यावर हसतच सुन्दरी म्हणाली, "अरे, माझ्याकडे मोलकरीण नाही, असं कां वाटलं



तुला? ती तुला न दिसता, अदृश्यपणेच सगळी कामं करून टाकत असते. पाहिलंस ना, माझं घर किती स्वच्छ अन् नीटनेटकं आहे? मग तूच सांग बरं, मोलकरीण नसून इतकं कसं शक्य झालं असतं?"

मैत्रिणीच्या या बोलण्याने सुकुमारीचे औत्सुक्य वाढले. तिने खूप जागरुकतेने पाहिले, पण तिला मोलकरीण कुठे दिसलीच नाही. चार दिवस राहिल्यावर तिने परत जायचे ठरवले.

निघण्यापूर्वी काही नवीन साड्यांचे एक गाठोडे तिच्यासमोर उघडत सुन्दरी म्हणाली, "सुकुमारी, तुझ्या येण्यामुळे मला किती आनन्द झाला, कसं सांगू? यातली तुला आवडेल ती साडी घे, माझी आठवण म्हणून."

सुकुमारीने लगेच आपल्या मोलकरणीला बोलावून साडी पसन्त करून घ्यायला सांगितले. सुन्दरीच्या चेहऱ्यावर उमटलेले आश्चर्य पाहून ती म्हणाली, "अग, मी नेसण्यालायक साडी काही तू देऊ शकणार नाहीस. असली साडी मी नेसली तर माझी किती नाचक्की होईल, तुला काय माहीत? म्हणून मी ती आपल्या मोलकरणीला घ्यायला सांगते आहे." सुन्दरी यावर काय बोलणार?

या घटनेनन्तर काही दिवसांनी सुन्दरीही आपल्या माहेरी गेली. सुकुमारी मुद्दामच तिला भेटायला गेली, अन् परत निघताना म्हणाली, "सासरी जाण्यापूर्वी एक दिवस नक्की माझ्याकडे जेवायला ये."



जेवणानन्तर सुकुमारीने ही साड्यांचे एक गाठोडे सुन्दरीसमोर ठेवून साडी पसन्त करायला सांगितली अन् म्हटले, "या काही साध्या सुध्या साड्या नव्हेत, खूप महाग आहेत या! मी नेहमी असल्याच साड्या वापरते."

सुन्दरीने त्यातली एक साडी निवडून घेत म्हटले, "मी तुला देऊ केलेली साडी तू आपल्या मोलकरणीला देऊन टाकलीस. आता ही साडी मीही माझ्या मोलकरणीला दिली, तर ते सयुक्तिकच होईल न? गैरसमज नको करून घेऊस हं!"

"हो, माझ्या मोलकरणीला मी स्वतः नेसते तसलीच देते साडी." असे उत्तर देऊन सुन्दरी तेथून निघून गेली.

सुन्दरीचे हे बोलणे सुकुमारी विसरू शकणे शक्यच नव्हते. तिने ओळखले की जशास तसा टोला देऊन सुन्दरीने एक प्रकारे आपला अपमानच केलाय. ती मनातल्या मनात चरफडत राहिली.

एक महिन्यानन्तर सुकुमारीच्या नवऱ्याला काही कामासाठी चक्रपुरला जायचे होते. सुकुमारीही त्याच्याबरोबर मुद्दामच गेली. तिच्या मनात अजूनही तो अपमान सलत होता. नवरा आपल्या कामाला निघून गेला अन् सुकुमारीने सुंदरीकडे जाऊन तिचा दरवाजा खटखटावला.

सुन्दरीने दरवाजा उघडला. पण त्यावेळी ती कपडे धूत असताना मधेच बाहेर आल्याने तिच्या तोंडावर व हातापायांवर पाण्याचे शिंतोडे पडलेले होते, अन् केसही विसकटलेले होते. विशेष म्हणजे त्यावेळी तिने नेमकी सुकुमारीने दिलेली साडीच नेसलेली होती.

"तुझ्या मोलकरणीलाच पाह्यला आले होते मी! आज ती कामाला आली नाही वाटतं? अन् तिचं नाव सांगून आणलेली साडी तू कशी काय नेसलीयस?" आश्चर्याने अन् व्यंगाने सुकुमारीने विचारले.

सुंदरी हसत बोलू लागली, "म्हणजे? अजूनही समजलं नाही तुला? अग, मीच तर ती मोलकरीण! तूच सांग, आपलं काम आपणच करावं, आपलं खाणं आपणच बनवून खावं हेच बरं नव्हे का? यासाठीच तर देवाने आपल्याला शरीराचे अवयव दिलेत ना? त्यांचा उपयोग न करता, आपली कामं दुसऱ्याकडून करवून घेणारे, एक प्रकारे पांगळेच समजायचे की नाही? मग आता मी ही साडी का नेसलीय याचं आश्चर्य गेलं की नाही? घरगुती कामं करतानाही मी याच साड्या नेसते."

सुन्दरीचा भलेपणा व हुशारी पाहून तिची प्रशंसा करत सुकुमारी म्हणाली,"द्वेष अन् अहंकारामुळे मी तुझ्यासारख्या चांगल्या मैत्रिणीला मुकणार होते. क्षमा कर मला! लग्नापूर्वी होता तसाच पवित्र अन् निस्वार्थ स्नेह आपण कायम ठेवू या."





# हमी-पत्र

चन्द्र हा एक गरीब तरूण होता. मायारामकडे गुमास्त्याची एक जागा रिकामी असल्याचे कळल्यावरून तो नोकरी बाबत विचारायला त्याच्याकडे गेला.

मायाराम चन्द्रला म्हणाला, "मला एका गुमास्त्याची आवश्यकता आहे ही गोष्ट खरीच. मला दर आठवड्यात एकदा माल खरीदायला शहरात जावं लागतं. इथे त्या दिवशी जी विक्री होते, ती सगळी रक्कम त्या दिवशी गुमास्त्याजवळच रहाते. यापूर्वीही दोन नोकरांनी मला दगा दिलाय. आता ही नोकरी तुला हवी असेल, तर अमानत म्हणून तुला माझ्याकडे एक हजार रुपये जमा करावे लागतील. किंवा दोन तीन प्रतिष्ठित लोकांची शिफारस आणून त्यांच्याकडून हमी-पत्र लिहवून आणावं लागेल.

मायारामचे बोलणे ऐकून चन्द्र म्हणाला, "असं करा महाराज, दुकान बन्द झाल्यावर आपण माझ्याबरोबर चला. आपल्याला हवी असणारी हमी देवू शकेन मी."

त्या दिवशी संध्याकाळी चन्द्र मायारामला बरोबर घेऊन सावकारी करणाऱ्या सियारामकडे गेला, अन् त्याने एक हजार रुपये कर्जाऊ मागितले.

यावर व्यंगाने हसून सियाराम म्हणाला. "तू तर माझ्या घराजवळच्याच झोपडीत रहातोस. खूप दिवसांपासून मी ओळखतोय तुला. मुद्दलाची गोष्ट सोडा, पण माझं व्याजही देऊ शकणार नाहीस तू. तुझ्यासारख्याला कर्ज देऊन संकट ओढवून घ्यायला मी मूर्ख थोडाच आहे!"

चन्द्र मायारामला म्हणाला "अमानतीच्या पैशांसाठी मी केलेला प्रयत्न फसलाय. आता मी प्रतिष्ठित लोकांकडून हमी मिळवायचा प्रयत्न करतो." असे म्हणून त्याला घेऊन

अरविन्द नावसे

गावपाटील गंगाराम याच्याकडे गेला.

आश्चर्याने चन्द्रकडे पहात गंगाराम म्हणाला, "ओहो, तुझं नाव चन्द्र होय? अनेकदा पाहिलंय मी तुला. माझा नोकर म्हणत होता की, तू इतर मुलांसारखा कुठलं वाईट कामही करत नाहीस; चांगला मुलगा आहेस तू. पण याचा अर्थ असा नव्हे, की मी तुला हमी-पत्र लिहून देईन."

एक शब्दही पुढे न बोलता चन्द्र मायारामला घेऊन गाव कोतवालाकडे गेला. सारी हकिकत सांगून त्याने कोतवालाला हमीपत्र देण्याची विनन्ती केली.

कोतवाल गुरगुरत बोलला, "अरे तू समजतोस कोण स्वतःला? माझ्याकडे हमीपत्र मागायची हिंमत तरी कशी करवली तुझ्याच्याने?" अन् रागाने धुमसत त्याने एका शिपायाला बोलावून विचारले, "कायरे, हा कोणी चांगला कसलेला गुन्हेगार असावा नाही का?"

पण तो पोलीस उत्तरला, "तसं नाही साहेब, याचं घर त्या तलावाजवळ आहे; अन् तिथले सारे लोक म्हणतात की हा मोठा चांगला मुलगा आहे. तुम्हाला वाटतं, तसा हा कोणी चोर किंवा अपराधी नाहीय. पण बिचारा बेकार आहे."

शिपायाच्या या बोलण्याने कोतवाल शांत झाला. पण तरीही तो म्हणाल, "तू काहीही म्हण. पण बेकार माणूस फार दिवस चांगला राहू शकत नही. तो लवकरच चोऱ्या वगैरे करू लागतो. तू याच्यावर चांगली नजर ठेव." आणि नंतर चन्द्रकडे वळून तो म्हणाला, "लवकर चालू लाग इथून. सज्जनांना इथे यायला मनाई आहे."

चन्द्र तिथूनही मायारामसह परत फिरला. वाटेत तो म्हणाला, "महाराज मी एक अभागी माणूस आहे. मी कोणाकडूनही आपल्याला हमीपत्र देऊ शकत नाही."

चन्द्रच्या या बोलण्यावर हसून मायाराम म्हणाला, "तुझ्या लक्षात नसेल आलं. पण 'नाही, नाही' म्हणत त्या तिघांनीही तुला हमी-पत्र दिलंय; तुझ्या सद्गुणांची पुरेशी प्रशंसा केलीय. यापेक्षा अधिक मला काय हवंय? तू उद्यापासूनच नोकरीवर रुजू हो."





# अद्भुत फूल

## १

(अुत्तुंग चुकून नागपुरी नामक प्रदेशात पोचला. त्या पहाडी कबिल्याच्या काबुईने त्याचे चांगले आगतस्वागत करून त्याला आपल्या राजाकडे नेले. राजाने अुत्तुंगच्या साहसाचे कौतुक करून त्याला मदतीसाठी आपले काही शूर शिपाई बरोबर देऊ केले. त्याच दिवशी एक शिपाई पाठवून तिथल्या राजकन्येने अुत्तुंगला भेटीसाठी व काही विचार-विनिमयासाठी बोलावून घेतले.) -यानन्तर

शिपाई अुत्तुंगला बरोबर घेऊन गेला. एका मोठ्याश्या खोलीत त्याला थांबवून शिपाई स्वतः राजकुमारीकडे तसे सांगायला गेला.

अुत्तुंग त्या खोलीतच थांबला आणि शिपाई गेल्यावर तिथल्या खिडकीतून बाहेर पाहू लागला. खोलीबाहेर खालच्या बाजूला एक सुन्दर बगीचा होता. कमळ-तलावात एकाहून एक सुंदर फुलं फुलली होती. त्यांवर भृंगे गुंजारव करीत होते. ते मनोहारी दृश्य पहात असतानाच राजकुमारी तेथे आली अनुम्हणाली, "आलास तू? मी तुझी वाटच पहात होते."

उत्तुंगने तिच्याकडे वळून पहाताच ती म्हणाली, "तुला फुलं हवीत ना? पण तुला कसं माहीत, की मला फुलं खूप आवडतात? ती सुंदर फुलं मी आपल्या खोलीत छान सजवून ठेवलीत. त्यांचा मादक सुगंध सर्वत्र



दरवळत आहे. पण आता एक सांग बरं, की इतकी सुन्दर फुलं शापग्रस्त का?''

राजकुमारीच्या या प्रश्नावर अुत्तुंग दचकलाच. पण क्षण भरातच स्वतःला सावरत अुत्तरला, ''शाप? कुणाला राजकुमारी? शताब्दी फुलं, अन् शापग्रस्त? तुम्ही काय विचारताय हेच माझ्या लक्षात येत नाही.''

''माझ्या पिताजींशी तुम्ही जे बोललात, त्यातलं थोडंफार माझ्या कानांवरही पडलं. अचानक महालात सुगन्ध पसरला अन् त्याबद्दल बाबा मन्त्र्यांशी बोलत असतानाच मी तिथे प्रवेश केला. बाबांच्या हातात ही फुलं होती आणि त्यांतूनच सुगन्ध पसरत होता. काबुई त्यावेळी म्हणत होता की या फुलांसाठी राक्षसप्राणी येईल. तेव्हां तिथेच आडोश्याला अुभी राहून मी ती बोलणी ऐकली; अन् तुझं बोलणंही ऐकलं. मला माहीतच नव्हतं की राक्षसप्राणी या फुलांवर इतका मुग्ध झालाय!'' आश्चर्याने आपले डोळे मोठे करत राजकुमारी बोलली

यावर काय बोलावे हे अुत्तुंगलाही समजेनासे झाले. जरा चाचरत तो म्हणाला. ''हो हो, फुलांवर माझंही फार प्रेम आहे; पण मी काही राक्षसप्राणी नव्हे!''

''कोण म्हणतं की तू राक्षस आहेस? होय, पण तू राक्षसी प्राण्याच्या शोधासाठी निघालेला साहसी वीर आहेस. होय ना? केवढं धाडसाच हे काम तू आपल्या अंगावर घेतलं आहेस? तुला यश मिळावं हीच माझी इच्छा!'' हसत हसत राजकुमारीने प्रश्न केला.

''फुलं तर तुमच्याचसाठी आणली मी राजकुमारी, विश्वास ठेवा माझ्यावर.'' अुत्तुंग बोलला.

''विश्वास ठेवायचा प्रयत्नच तर करते आहे.'' संदेहदृष्टीने अुत्तुंगकडे पहात राजकुमारी म्हणाली.

विषय बदलायचा प्रयत्न करीत अुत्तुंग म्हणाला. ''पण मला इथं का बोलावलं गेलंय हे अजून नाही सांगितलंत मला? मी आपणांसाठी काय करू शकतो?''

''तू राक्षसप्राण्याच्या नाशासाठी निघाला आहेस. अनं मी ही राक्षसासारख्याच एक शत्रूला टक्कर देण्यासाठी तुझ्या मदतीची





अपेक्षा करत आहे. किती तरी दिवस अशा एकाद्या साहसी तरुणाच्या शोधात मी आहे. आज तूं सापडलास!" राजकुमारी म्हणाली.

"राजकुमारी, शत्रु? अन् तुम्हाला? काबुई तर म्हणत होता की नागपुरीला कोणी शत्रुच नाही! मग कां बरं असं म्हणताहात तुम्ही?" अुत्तुंगने आश्चर्याने विचारले.

"मी बोलले ते खरंच आहे. तसा बाहेरून नागपुरीला कोणी शत्रु नाही, हे ही खरंच. शत्रु तर आमच्यातलाच आहे." चिंतायुक्त स्वरात राजकुमारी बोलली.

अुत्तुंगच्या प्रश्नांकित चेहऱ्यावरचा अुमटले—हा शत्रु कोण? ते पाहून राजकुमारी सांगू लागली, "तो कोणी दुसरा तिसरा नसून माझा मामा नागसिंहच आहे. माझ्या बाबांनी त्याला सैन्यातला, एक दलनायक बनवला आहे. पण आपल्या या स्थानाबद्दल त्याला समाधान नाहीय. तो सेनाधिपती बनण्याचं स्वप्न बाळगून आहे. माझ्या आईकडून त्यानं बाबांना तसं कळवलंय. पण माझे बाबा याला तयार नाहीत. त्यामुळे रागावून मामा आपल्या बरोबरच्यांना म्हणू लागले—'सेनापतीच काय, पण मनात आणलं, तर मी इथला राजाही बनू शकेन!' हे कळल्यावर बाबांनी त्याला राजप्रसादात पाअून ठेवायलाच बन्दी केलीय. अन् मला आणि आईला जागरूक रहायला सांगितलंय."

"मग सध्या सेनापती कोण आहे?"

"दुर्जय आहे सेनापती. मुलगा नसल्यामुळे माझ्या बाबांची इच्छा आहे की, मला या देशाची राणी बनवावं. ते नेहमी प्रजेच्या हिताचाच विचार करत असतात. त्यांना भय पडलंय की नागसिंहमुळे प्रजेचं काही अहित घडू नये; राज्यातील शान्ति भंग पावू नये. मला हे सर्व माझ्या मातेकडून कळलंय."

"जो राजा सदान् कदा प्रजाकल्याणाचाच विचार करत असतो, त्याच्या केसालाही कोणी धक्का लावू शकत नाही. सैनिकांपेक्षाही प्रजाच त्याचं अधिक रक्षण करू शकते. पण तो नागसिंह सध्या आहे तरी कुठे?" अुत्तुंगने राजकुमारीला विचारले.

"माझ्या बाबांच्या सांगण्यावरून सेनापतीने त्याला काही सैनिकांसह अुत्तरसरहद्दीच्या रक्षणासाठी पाठवलं आहे.





त्याच्याबाबतीत रोज बातमी कळत असते. पण माझ्या आईला शंका आहे की, तो काही चुप रहाणार नाही. सिंहासनाच्या प्राप्तीसाठी तो काही ना काही कारस्थान नक्कीच रचेल. हे सांगण्यासाठीच मी तुला इथे बोलावून घेतलं. अजून काही दिवस तू इथंच राहिलास तर बरं होईल." राजकुमारीने विनन्ती केली.

"असंच करीन मी राजकुमारी! मी एका मुख्य कामासाठी दूर प्रान्तात जात आहे. या कामात मला मदत करायचं महाराजांनी कबूल केलंय." अुत्तुंग म्हणाला.

"हो, ते माहीत आहे मला. पण नागसिंहबद्दल मी तुझ्याजवळ काही बोलले हे कोणालाही कळू देअू नकोस. नवीन काही कानीं आलं तर तुला कळवीन. आता जा तू." राजकुमारी म्हणाली.

शिपायासमवेत अुत्तुंग अतिथिगृहात परतला. तेथे काबुई त्याची वाटच पहात होता. त्याने काही विचारण्यापूर्वीच अुत्तुंग त्याला म्हणाला. "शताब्दी फुलांबद्दल राजकुमारी काही विचारत होती. आपण राजाशी जे बोललो त्यातलं काही संभाषण तिने ऐकलं असावंसं वाटतंय. मी तिला इतकंच बोललोय की, ही सुंदर फुलं शंभर वर्षांतून फक्त एकदाच फुलतात."

काबुई त्याचं कौतुक करत म्हणाला, "फारच चांगलं केलंस तू." दुसऱ्या दिवशी सकाळी शिपाई त्यांना घेअून जाण्यासाठी निघाल्यावर अुत्तुंग व काबुई राजाला भेटायला निघाले. त्यांना पहाताच राजा म्हणाला. "काल मी जसं ठरवलं होतं, त्याप्रमाणे दलनायक नागसिंह अन् काही शिपाई मी तुमच्याबरोबर पाठवत आहे. नागसिंह आमच्या देशाच्या अुत्तर दिशेला आहे. तो इथे पोचेपर्यन्त दोन-तीन दिवस लागतील. तोपर्यन्त अुत्तुंगनं इथेच रहावं. तुम्हाला जायचं असेल, तर काबुई, तुम्ही परत जाअू शकता."

राजाला विनयपूर्वक नमस्कार करून काबुईने त्याचा निरोप घेतला. अुत्तुंगला अतिथिगृहापर्यन्त सोबत देअून तो आपल्या वस्तीकडे निघून गेला.

भोजनोत्तर अुत्तुंग त्या नगरातील वैशिष्ट्यपूर्ण रचना वगैरे पहायला निघाला. नगरातील मार्ग स्वच्छ होते. तेथील इमारती



बघून तो आश्चर्यातत पडला. एकंदरीन त्याला असे वाटले की हे नगर सौंदर्यपूर्ण असून येथील नागरिकांना कसलीही ददात भासत नसावी; त्यांचे जीवन सुखशांतिपूर्वक व्यतीत होत असले पाहिजे. त्याच्या मनात हाही विचार चमकून उठला की, नागसिंहच्या करस्थानामुळे जर अचानक या राज्यावर संकट कोसळले तर या लोकांची स्थिती कशी होईल! संध्याकाळपर्यन्त अुत्तुंग आपल्या अतिथिगृहात पोचला. दोन दिवस असेच निघून गेले आणि तिसऱ्या दिवशी संध्याकाळी एका सैनिकाने, त्याला राजकुमारीने भेटायला बोलावले असल्याचा निरोप आणला. त्या सैनिकाबरोबरच तो राजभवनात पोचला. त्याचीच वाट पहात असलेली राजकन्या त्याला म्हणाली. "मामा नागसिंह राजधानीत आत्ता पोचतच आहे. तुला त्याच्याबद्दल फार सावध रहायला हवं. आमचं राज्य हस्तगत करण्यासाठी तो एकादं कारस्थान रचीत आहे की काय याचा तू शोध घे. तू राजाचा माणूस आहेस असं कळलं तर तो तुला ताकास तूर लागू देणार नाही. तुमची यात्रा सफल झाल्यावर तू सरळ माणिक्यपुरीला निघून जाशील, की इकडे येण्याचा प्रयत्न करशील?"

"नक्कीच इकडे येईन राजकुमारी; इथली परिस्थिति ठीक करून मगच आपल्या देशी जाईन." अुत्तुंगने आश्वासन दिले.

"तू नागसिंहाच्या योजना चतुराईने समजून घेतल्यास, तर त्याचे डाव हाणून पाडण्यात तू सहजपणे सफल होशील. हे सांगण्यासाठीच मी तुला बोलावलं होतं. आता जाअू शकतोस तू." असे म्हणून राजकुमारी आत निघून गेली. अुत्तुंगही अतिथिगृहात परतला.

त्याच दिवशी दलनायक नागसिंह अुत्तर प्रदेशातून परत आला. आणि सरळ सेनापती दुर्जयकडे गेला. त्याला प्रणाम करून तो म्हणाला, "मला अचानक इथे का बोलावण्यात आलं हे कळेल?"

दुर्जय अुत्तरला, "उत्तुंग नावाचा एक तरुण माणिकपुरीहून काही फुलं घेअून आला आहे. राजाची आज्ञा आहे की काही शिपाई बरोबर घेअून जाअून तू त्याला मदत करावीस."

"तो तर मोठाच पराक्रमी असला पाहिजे. इतक्या दूर एकटाच आला आहे, तर आणखी पुढे जाणं त्याला अवघड थोडंच आहे?" नागसिंह व्यंगपूर्वक म्हणाला.

"तुमचं म्हणणं खरंच आहे. त्याने एकटंच जायचं ठरवलं होत. आपल्या मदतीच्या अपेक्षेनं तो इकडे आलेलाच नाही. परन्तु तो कोणा राक्षसप्राण्याच्या शोधाला निघालेला आहे. असं ऐकलं की तो प्राणी माणिक्यपुरीत घुसून तिथल्या लोकांना 'त्राही-त्राही' करून सोडत आहे. त्याला तिकडे येण्यापासून रोखण्यासाठी अन् त्याचं निवासस्थान शोधण्यासाठी हा साहसी युवक शताब्दी फुलं बरोबर घेअून निघाला आहे. आपला राजा त्याच्या साहसावर फार खूश झाला आहे. म्हणून त्याच्या मदतीसाठी आपले काही सैनिक पाठवायचा महाराजांचा विचार आहे." सेनापती म्हणाला.

नागसिंहने थोडा वेळ शांतपणे विचार करून विचारले—"पहाडी जातीचा कोणी युवक एकटाच राक्षसीप्राण्याच्या शोधाला निघाला आहे—यावर तुम्ही कसा काय विश्वास ठेवलात?"

सेनापती म्हणाला, "माणिक्यपुरीहून एकटयानेच इथवर आलेल्या त्या युवकावर आम्ही का बरं विश्वास ठेवू नये? अन् ही राजाज्ञा आहे, हेही विसरू नका! तिचं पालन करणं ही आपली जबाबदारी आहे!"

"आपली आज्ञा शिरोधार्य आहे. बोला, मी केंव्हा भेटू त्या तरुणाला?" नागसिंहने



विचारले.

अुद्या, याच वेळी भेटायचं. आता जाअू शकता तुम्ही." सेनापती दृढ स्वरात बोलला.

नागसिंह चिडचिडत तेथून निघून गेला.

दुसऱ्या दिवशी सकाळी राजाने सेनापतीला बोलावणे पाठवल्यावर तो लगेच हजर झाला. राजा फारच गंभीर दिसला, अन् राजकुमारी तर अश्रू ढाळत होती!

सेनापतीने मोठया काळजीने विचारले, "काय झालं महाराज?"

"शताब्दि फुलं नाहीशी झालीत! राजकुमारीनं फूलदानात ठेवलेली फुलं त्यातून नाहीशी झाली. राजकुमारीच्या अंतःपुरात शिरून असं दुस्साहस कोणी केलं

असावं? त्या फुलांच्या सुगंधाने दासींना नक्कीच आकृष्ट केलं असणार! पण एकाद्या दासीचं हे कृत्य असावं, असे मला वाटत नाही. कोणतीही दासी याबाबत काही सांगू शकत नाहीय! राजकुमारीच्या स्वतःच्याच लक्षात आलं, की फुलं गायब झालीत; तिला अन्य कोणीही ही खबर दिली नाही. चोरी मोठ्या हुशारीनं झालीय. ती कोणी केलीय हेही काही कळत नाही." राजाने मोठ्या चिन्तेने हे सारे सांगितले.

"राजमहालाची चांगली माहिती असणाऱ्याचेच हे कृत्य असले पाहिजे. कारण राक्षसप्राणी महालात येण्याची काहीच शक्यता नाही." आपली शंका सेनापतीने व्यक्त केली.

आश्चर्य प्रकट करत राजकुमारी एकदम बोलली, "राक्षसप्राणी? राजमहालात राक्षसप्राणी? आपण काय म्हणताय कळत नाही मला!"

राजाने मधेच दखल देत म्हटले. "घाबरू नको बाळ! ती गोष्ट मी नन्तर सांगेन तुला."

नन्तर तो सेनापतीला म्हणाला, "ती फुलं परत कशी मिळवायची याचा विचार करायला हवा आपल्याला."

"होय महाराज, मी तावडतोब शिपायांची या कामावर योजना करतो. ती फुलं कुठंही असली तरी त्यांचा सुगन्ध पसरणारच, त्यामुळे ती सापडवणं सोप जाईल. अन् काल कोणकोण राजप्रसादात येऊन गेलं याचाही शोध घेईन मी." जरा विचार करत सेनापती पुन्हा म्हणाला. "महाराज, कालच आपला दलनायक नागसिंह राजधानीत आलाय. सैनिकांना घेऊन अुत्तुंगबरोबर जायला तयार झालाय तो!"

"नागसिंह आलाय? कालपासून तो राजधानीत आहे? शाब्बास! म्हणूनच कदाचित् विचित्र घटना घडू लागल्या असाव्यात!" राजा जरा वेळ विचार करून पुढे म्हणाला. "प्रथम तुम्ही फुलांचा शोध घ्या. मगच अुत्तुंगने केव्हा निघावं, हे ठरवू आपण."

क्रमशः





# वेताळ-कथा

## महिमाशाली अंगठ्या

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा एकदा झाडा जवळ गेला. नेहमी प्रमाणे त्याने झाडावरून प्रेत खाली उतरवले नि तो स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हा बेताळ त्याला म्हणाला—"राजा, हे कठोर परिश्रम कोणासाठी करतो आहेस याची मी कल्पना ही करू शकत नाही. समज, एके दिवशी तुला आपले ध्येय प्राप्त झाले, तर तू अनंग देशाची राजकुमारी अवंती सारखी बुद्धिहीन व व्यवहारशून्य वागणूक करू नकोस. तुला सावध राहता यावं म्हणून मी तुला त्या राजकुमारीची गोष्ट सांगतो, ती तू लक्षपूर्वक ऐक." आणि वेताळाने गोष्ट सांगायला सुरूवात केली.

अनंग देशातील एका डोंगराळ भागात तीन क्षत्रिय तरुण रहात असत. जय, विजय व अजय अशी त्यांची नांवे होती. तिघांनी ही आता तारुण्यात पदार्पण केले होते. तिघेही जेथे जात, तिथे एकोप्याने रहात.

एक दिवशी तिघे ही डोंगरावरच्या



शंकराच्या देवळात गेले. जय म्हणाला—"आपण कोणीच काही काम करीत नाही. असल्या जीवनाचा आता कंटाळा आलाय."

मोठ्या दुःखाने विजय म्हणाला—" आपण शिकले-सवरलेले आहोत. पण आपल्यामुळे कोणाला काही फायदा मिळत नाही."

कंबरेला लटकणाऱ्या तलवारीवर हात ठेवून गंभीरपणे अजय म्हणाला-"लवकरच आपली लग्ने ही होतील. मग असं स्वच्छंदपणे हिंडता-फिरता पण यायचं नाही. त्यापूर्वीच आपण असं काही काम करू या की त्यामुळे कोणाचा तरी काही फायदा होईल."

त्यांना प्रसाद देण्यासाठी आलेल्या मंदिराच्या पुजाऱ्याने त्यांची सर्व बोलणी ऐकली.तो त्यांना म्हणाला—"ज्या तलवारीचा उपयोग केला जात नाही व ज्या बुद्धीचा वापर केला जात नाही, त्यांना काळाच्या ओघात गंज लागतो. आता महत्त्वाची गोष्ट म्हणजे काम कोणतं करावं? निःस्वार्थपणे केलेली कोणती ही सेवा ही महत्त्वाची असतेच. आसपासच्या जंगलात एक वाघ मोकाटपणे हिंडतो आहे. तो शेळ्या नि बकऱ्यांना उचलून घेऊन जातो. तुम्ही तिघांनी मिळून त्या वाघाला ठार केलंत तर गावाचं कल्याण होईल."

"वाघाला मारणं तर आमच्या हातचा मळ! त्याला काही मोठ्या साहसाची आवश्यकता नाही. मोठ्या राक्षसाला ही आम्ही धूळ चारू!" असे मुक्त कंठाने म्हणून तिघे ही तिथून निघाले.

दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे तिघे जण जंगलात पोचले. दुपार पर्यंत तिघांनी जंगलात वाघाला शोधायचा प्रयत्न केला. पण व्यर्थ. ते निराश झाले. जंगलात जी फळं मिळाली, ती खाल्ली. ओढ्यावर पाणी पीत असताना एक करुण स्वर त्यांच्या कानी पडला. हा आवाज़ डोंगरावरील एका गुहेतून येत होता. कोणी तरी महान संकटात सापडल्याचं स्पष्ट दिसत होतं.

तिघांना वाटलं, या वेळी वाघाला शेळी-बकरी नाही, माणूसच खायला मिळालेला दिसतोय. तिघे ही तिकडे पळत जाऊ लागले. ते जेव्हा गुहे पाशी पोचले तेव्हा तेथून भयानक मोठा-थोरला साप फूत्कार करीत बाहेर आला. तिघांनी आपल्या तरवारींनी सापाची खांडोळी करून टाकली.

आता त्यांना गुंफेतून एका माणसाचं कण्हणं ऐकू येऊ लागलं. तिघेही आत शिरले. त्यांना दिसलं की एक मध्यम वयाचा साधु मृत्यूशी झगडत आहे.

जय म्हणाला—"आपल्याला तर माहीतच नव्हतं की गावाच्या सरहद्दीवर या डोंगरी गुहेत एक साधू पण रहात आहे."

मरणासन्न अवस्थेत असलेला साधु त्यांना म्हणाला—"लोभामुळे मी हिमालय पर्वत सोडून इकडे आलो. मी साधु असलो तरी सांसारिक सुखोपभोगाची मला इच्छा झाली. आपल्या गुरूच्या तीन महिमावान अंगठ्या मी चोरुन आणल्या. या कालसर्पाने मला डंख मारला. मरणापूर्वी त्या तीन अंगठ्या मी तुमच्या स्वाधीन करतो. यातील एकीत लाल हिरा जडवलेला आहे. ही बोटात घातली की समयानुसार चांगले विचार मनात उत्पन्न होतात. दुसऱ्या अंगठीत हिरव्या रंगाचा खडा जडवलेला आहे. ही अंगठी घातली की ते विचार केव्हा नि कसे फलद्रूप होतील नि कशा रीतीने सफलता प्राप्त होईल हे लक्षात येते. तिसऱ्या अंगठीत निळा खडा बसवलेला आहे. तिच्या प्रभावाने सर्व अंगीकृत कामात यश मिळेल. तुम्ही तिघे जण आहात. एकेकाने एकेक अंगठी घ्या. लाल खड्याची अंगठी जयला, हिरव्याची विजयला आणि निळ्या खड्याची अंगठी अजयला देऊन साधूने प्राण सोडले.

जे काही घडलं त्याचं तिघांना ही आश्चर्य वाटलं. ते विचार करू लागले—हे सगळं खरं असेल काय?





त्यांनी डोंगरातून चन्दनाची लाकडं गोळा केली आणि साधूचा दाह-संस्कार केला.

त्या रात्री तिघांना ही झोप आली नाही. प्रत्येकाला वाटलं की या अंगठ्या देशाच्या राजाजवळ असल्या तर देशाचे कल्याण होईल. आपल्या जवळ असल्या तर त्यांचा काय उपयोग? जर घरातल्या लोकांना हे समजलं तर ते या अंगठ्या राजाला देऊ देणार नाहीत. अंगठ्यांचा खरा अधिकारी राजाच आहे–असा त्यांनी निर्णय घेतला. ते सुप्रभाती उठले आणि घोड्यांवर बसून राजाला अंगठ्या समर्पण करण्यासाठी राजधानीकडे निघाले.

सर्वप्रथम जय राजाला भेटला नि म्हणाला–"महाराज, माझ्या जवळ एक अद्भुत महिमामयी अंगठी आहे. आपल्या देशाच्या उन्नतीसाठी जे उच्च विचार मनात आले पाहिजेत, ते आपल्या डोक्यात येतील. माझ्यासारख्या सामान्य नागरिकाजवळ ही अंगठी असण्यापेक्षा ती आपल्या जवळ असली तर जनतेचे कल्याण होईल. म्हणून ही अंगठी आपल्याला समर्पण करण्यात मला मोठा आनंद होत आहे."

"तू मला एवढं मूल्यवान बक्षिस दिलंस याबद्दल मला खूप आनंद वाटत आहे. तू काही दिवस पाहुणा म्हणून इथं रहावंस अशी माझी इच्छा आहे." राजा म्हणाला.

थोड्या वेळाने विजय तेथे आला आणि राजाला हिरव्या खड्याची अंगठी देत म्हणाला–"महाराज, या अंगठीचा महिमा असा आहे की आपल्या मनात जे विचार येतील, त्यांची अंमलबजावणी कशी करावी हे आपल्याला झटकन समजेल. या कार्यवाहीचे जे सुपरिणाम होतील, त्यामुळे प्रजेचे हित होईल."

आपल्याकडे काही दिवस पाहुणा म्हणून राहण्याचा राजाने विजयला ही आग्रह केला.

एवढ्यात अजय पण तिथे आला. निळ्या रंगाचा खडा असलेली अंगठी त्याने राजाला दिली आणि म्हणाला–"राजन्, ही अद्भुत अंगठी मी आपणास अर्पण करीत आहे. लोक-कल्याणाच्या ज्या योजना आपल्या मनात उत्पन्न होतील, त्यांची अंमलबजावणी सहज करण्याची शक्ति ही अंगठी आपणात निर्माण करील."



राजाला वाटलं ही अंगठी अन्य दोन अंगठ्यांहून अधिक महिमाशाली आहे. अजयने ही आपल्या महालात अतिथि म्हणून रहावे अशी आपली इच्छा राजाने प्रकट केली.

अवंती राजाची एकुलती एक मुलगी होती. राजा तिच्या लग्नाच्या प्रयत्नात होता. विवाहानंतर जावयाचा राज्याभिषेक करून त्याला राजा बनवावं असा राजाचा विचार होता. पण राजकुमारीला कोणत्याही राज्याचा राजकुमार पसंत पडत नव्हता.

राजा एकाद्या राजकुमाराबाबत जेव्हा तिच्याशी बोले, तेव्हा ती म्हणे–"माझ्या पेक्षा आपल्या राज्याचा मोह त्याच्या मनात अधिक आहे असं मला वाटतंय. त्याला माझा लोभ नाही, राज्याचा आहे! माझ्यावर ज्याचे प्रेम नाही, त्याच्याशी लग्न व्हावे असं मला नाही वाटत. आपल्या प्रजेवर त्याचे प्रेम असले पाहिजे. प्रजेचं कल्याण त्याच्या ध्यानी-मनी प्रथम असलं पाहिजे. अशा राजकुमाराशीच मी लग्न करीन." असं काही तरी अस्पष्ट बोलून ती लग्नाचा विषय टाळी.

त्या दिवशी संध्याकाळी राजा राजकुमारीकडे गेला. तिन्ही अंगठ्या तो आपल्या बरोबर घेऊन गेला होता. राजकुमारीला अंगठ्या दाखवून त्यांचा महिमा राजाने कथन केला. राजा म्हणाला–"बेटा, हे तिन्ही युवक एकाहून एक सुंदर आहेत, बुद्धिशाली आहेत. साहसी आहेत. यांनीच मला अंगठ्या अर्पण केल्या."

"आपल्या राजोद्यानात हिंडताना मी या तिघांना अगोदरच पाहिलं आहे." अवंती म्हणाली.





"ते तिघे ही मोठे उमदे तरूण आहेत. आपल्या राज्याचं कल्याण व्हावं अशी त्यांची इच्छा आहे. त्यांनी दिलेल्या अंगठ्या त्यांना परत द्याव्यात असं मला वाटतं. त्यांच्या पैकी कोणाला तू पसंत करून त्याच्याशी लग्न केलंस तर माझ्या मनाला शांति लाभेल!" राजाने आपला मानस सांगितला.

अवंती म्हणाली—"पण यासाठी त्यांचे विचार ही मला जाणन घ्यायला नकोत कां?"

राजकुमारी विवाहाला तयार आहे हे जाणून संतुष्ट होऊन राजा मुलीला म्हणाला—"प्रथम तू आपला विचार सांग. त्या तिघांपैकी कोणाशी लग्न करण्याची तुझी इच्छा आहे?"

लाजून मान खाली घालून अवंती म्हणाली—"पिताजी, आपण तर या अंगठ्या परत देणार आहात. मला वाटतं लाल खड्याची अंगठीवाल्या जयशी माझा विवाह व्हावा."

राजाने यावर काही प्रश्न केला नाही. मुलीच्या लग्नाची कठिण समस्या सुटत आहे याबाबत त्याला संतोष वाटला. त्याने आपल्या मुलीचा विवाह जयशी केला नि त्याला राजा बनवले.

अनंग देशचा राजा बनल्यावर जयने विजयला मंत्री-पद दिले आणि अजयला सेनापति-पद बहाल केले.

एवढी गोष्ट सांगून झाल्यावर वेताळ विक्रमादित्याला म्हणाला—"राजा, राजकुमारीने जयला आपला पति म्हणून निवडले हा तिचा अविवेकच नाही का? ती बोलते तर अशी की जणू माणूस पाहून त्याच्या स्वभावाची पारख करू शकते. अनेक राजकुमारांचे खरे प्रेम तिच्यावर नाही, राज्यावर आहे हे ती समजते. म्हणून त्यांच्यापैकी कोणाशी लग्न करणे तिला इष्ट वाटले नाही. मग आता तूच सांग जयशी विवाह करायला ती कशी तयार झाली? जयची दृष्टि तिच्या राज्यावर नाही हे तिने कसे ताडले? जयच्या मनात ही राजसिंहासनाचे आकर्षण कशावरून नाही? तिघांपैकी कोणा एकाशी लग्न करावयाचे असेल, तर तिने अजयशी लग्न करणे अधिक योग्य नाही का? कारण त्याच्याजवळ सर्व इच्छांची पूर्ति करणारी महिमावान अंगठी आहे. माहीत असून ही माझ्या या प्रश्नांची उत्तरे तू दिली नाहीस तर तुझे शिर धडावर राहणार नाही."

राजा विक्रमादित्याने उत्तर दिले—"साधूने तिघांना जेव्हा अंगठ्या दिल्या, तेव्हा तिघांना ही वाटलं की या अंगठ्या राजाला समर्पण कराव्यात, कारण त्यात राज्याचं कल्याण आहे. यावरून हे स्पष्ट होते की तिघेही निःस्वार्थी आहेत. कोणाला ही संपत्तीचा मोह व राज्याची आकांक्षा नाही. ही गोष्ट राजकुमारीच्या लक्षात यायला वेळ लागला नाही. ती जेव्हां या अंगठ्यांबद्दल विचार करू लागली तेव्हा तिच्या लक्षात आले की हिरव्या खड्याची अंगठी डोक्यात येणाऱ्या विचारांची कार्यवाही कशी करावी याचा मार्ग दाखविते, तर निळ्या खड्याची अंगठी ते विचार प्रत्यक्षात आणण्याची शक्ति प्रदान करते. ज्यामुळे राज्याचे कल्याण होईल असे विचार मनात आणण्याची शक्ति केवळ लाल रंगाच्या खड्याच्या अंगठीतच आहे. याचा अर्थ असा की बाकीच्या दोन अंगठ्यांचा प्रेरणा-स्रोत लाल खड्याच्या अंगठीतच आहे. आणि ती अंगठी त्याच्या जवळ आहे. म्हणून अवंतीने जयलाच पसंत केले, नि त्याच्याशी विवाह केला. उत्पन्न होणाऱ्या विचारांची अंमलबजावणी करण्याची योग्यता विजयच्या अंगठीत आहे म्हणून जयने त्याला मंत्री-पद दिले. आणि आपले विचार प्रत्यक्षात आणण्याची ताकत असणाऱ्या अजयला त्याने सेनापति-पद दिले. म्हणून राजकुमारीला अविवेकी म्हणणं तर्कसंगत होणार नाही. तिची बुद्धि फार कुशाग्र आहे असंच म्हटलं पाहिजे. आपल्या निर्णयाने तिने हे सिद्ध करून दाखवले."

राजाचा मौन-भंग करण्यात वेताळ सफल झाला. तो प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाच्या फांदीवर पुन्हा जाऊन बसला.

आधार-विशालची एक कथा



# आज्ञाधारक कुत्रा

हेलापुरीच्या बाजारात एक माणूस आपला कुत्रा विकायला घेऊन आला होता. भोवती जमलेल्या गर्दीस अुद्देशून तो कुत्र्याचे गुणवर्णन करू लागला. "हा कुत्रा आपण म्हणाल ते ऐकतो; सांगितलेलं काम बिनचूक करतो. मग ते किती का अवघड असेना!"

गर्दीतल्या एकाने विचारले. "अरे, कुत्रा सर्व काही ऐकून त्याप्रमाणे करतो; काम अवघड असलं तरी फत्ते करतो; म्हणजे हा कुत्रा तर खूपच चांगला असला पाहिजे. मग विकायला का काढलास तू?"

यावर तो विक्रेता सांगू लालागला. "अहो काय सांगू! काल रात्री माझ्या घरात चोर शिरले. या कुत्र्यानं त्यांनी सांगितल्याप्रमाणे सारं काही केलं. त्यांची सगळी कामं केली. मला अन् बायकोला ते चोर खांबाशी बांधत असताना जराही न भुंकता हा गप्प राहिला. यानं त्यांच्या कामात इतकी मदत केली, की तोंडात कंदील धरून, घरात जिथं जिथं काही मूल्यवान सामान होतं, त्या साऱ्या जागा चोरांना दाखवल्या! त्या चोरांचा मदतनीस बनून माझं घर लुटणं यानं फार सोपं करून दिलं, अन् मला पार धुळीला मिळवलं!" हे सारं सांगताना तो कुत्र्याकडे दातओठ खाअून बघत होता!

त्याचे बोलणे ऐकून जमलेले सारेजण खदाखदा हसू लागले.



# चांदोबा पुरवणी-६२

भारतातील पशु-पक्षी

## कलाकार अस्वल

स्वभावाने आळशी असणाऱ्या अस्वल या प्राण्याची खास खूण म्हणजे त्याच्या छातीवरील 'व्ही' आकाराची पांढरी खूण. भारतात अस्वले जागोजागी सापडतात. खडकाळ जंगले व वने ही अस्वलांची खास आश्रयस्थाने होत. अस्वले सुलभतेने पकडली जातात आणि त्यांना शिक्षण देणेही सोपे असते. दरवेशी जी अस्वले दारोदार नेअून नाचवतात ती याच प्रकारातील होत. भारतातील सर्कशीत 'अस्वलाचा नाच' हा एक खास लोकप्रिय भाग असतो. त्याच्या शरीरावर अगदी दाट असे केस असूनही जळत्या चक्रातून ते जेंव्हा अुडी मारते, तेंव्हा या केसांवर कसलाही परिणाम होत नाही.



अस्वल लांबीला साधारणतः १४० सें. मी. इतके असते. माणसाप्रमाणे अस्वलही अुभे राहू शकते. अुभ्या अस्वलाची अुंची ६५ ते ८५ सें. मी. इतकी असू शकते. त्याचे पाय अगदी माणसाच्या पायांसारखेच असतात. त्याचा रंग भुरकट काळा असतो.

दिवसाच्या वेळात एकाद्या गोलाकार दगडाच्या आडोशाला पडून रहाणे त्यांना आवडते. अन् गुहेत तर ती झोपून जातात. अस्वलांना मध फार आवडतो. ताडीच्या मडक्यांपर्यन्त पोचण्यासाठी ती झाडांवरही चढतात अन् ताडी पिअून तर्र होतात. जंगलात रहाणारी माणसे अशा तर्र झालेल्या अस्वलांच्या गोष्टी एकमेकांना ऐकवून आनन्दित होतात.

त्यांची दृष्टी आणि श्रवणशक्ती कमजोर असली, तरी त्यांची घ्राणेन्द्रिये फारच तीक्ष्ण असतात. एकादा माणूस आपणाकडे येत आहे की जवळ पोचला आहे, हे अस्वले खूपच दुरून ओळखू शकतात.

हिमालयातली काळी भुरकी अस्वले ही या अस्वलांचीच चुलत किंवा मामे भावंडे होत.

## आधुनिक भारतातील चित्रकार

# नन्दलाल बोस

भारतातील आधुनिक कलेबद्दल आपण विचार करतो, तेव्हा प्रथमतः श्री. नंदलाल बोस यांचेच नाव आठवते. ते एक अभिजात कलाकार असून त्यांची ही मौलिकता अद्‌भुत व अद्वितीय आहे. इतकेच नव्हे, तर अन्य कलाकारांना त्यांच्या कलासाधनेत त्यांची अनमोल अशी मदत मिळाली आहे. त्यांचे शिष्यत्व स्वीकारून त्यांनीही कलेच्या क्षेत्रात कमाल करून दाखवली आहे.



नंदलाल यांचा जन्म सन १८८० मधे झाला. अवनीन्द्रनाथ टागोर हे त्यावेळी कलेच्या क्षेत्रात रुचि असणाऱ्या युवकांना मार्गदर्शन करत असत. त्यांची ही पाठशाळा कलकत्यास होती. नंदलाल बोस हे एक फारच सुयोग्य शिष्य आहेत असे त्यांना आढळून आले.

त्या काळात रवीन्द्रनाथ टागोर हे निसर्गाच्या सन्निध्यात एक विद्यापीठ स्थापन करण्याचे स्वप्न पहात होते, पूर्ण केरू पहात होते. ते त्यांचे स्वप्न 'शान्तिनिकेतन'च्या स्वरूपात साकार झाले. १९१४ मधे श्री. नन्दलाल या संस्थेत सामील झाले. त्यांनी लवकरच 'कलाभवन'चा भार आपल्या शिरावर घेतला. 'कलाभवना' द्वारे कलेला प्रोत्साहन दिले जात असे, अन् कलेचे बारकावे शिकवले जात असत. नंदलाल बोस तनमनधनाने 'कलाभवना'च्या सेवेस लागले. त्यांनी स्वतःला भवनाच्या वृद्धीस वाहून घेतले.

नंदलाल बोस यांच्या कलात्मक चित्रकारीमुळे त्यांचे शिष्य प्रेरित झाले. टीकाकार व अन्य कलाप्रेमींना त्यांच्या अभिव्यक्तीत एक निराळेच वळण दिसून आले. त्यात भारतीयतेची अलौकिकता होती. नंदलालांनी तीन सिद्धान्तांवर जोर दिला. कलाकाराला हे सिद्धान्त अनुसरणे आवश्यक आहे. पहिला निसर्गाचे लक्षपूर्वक अवलोकन करणे; दुसरा-आपली संस्कृति पूर्णतः समजून घेणे; आणि तिसरा-अगदी अभिजात अशी परिक्षण शक्ती.

नंदलालांच्या सर्व कलात्मक कृतीत हे तीन सिद्धान्त पूर्णांशाने दिसून येतात. निसर्गाच्या विभिन्न कोनांचा विचार करून त्यांनी जी रेखाचित्रे काढलीत-मग ती झाडे असोत, फुले असोत, प्राणी असोत किंवा पक्षी असोत-त्या सर्वात अंतर्निहित तत्त्वे त्यांनी शोधून काढली असल्याचे आपल्याला स्पष्ट दिसून येते.

याशिवाय, त्यांनी भारतीय संप्रदायांचा सखोल अभ्यास केला. त्यांचे हे अध्ययन सृजनात्मक असे. त्यामुळेच मोठ्या अद्‌भुत पद्धतीने त्यांनी ते पुन्हा प्रस्तुत केले. उदाहरणार्थ अजिंठ्याची कला.



निसर्ग व आपले परंपरागत संप्रदाय प्रस्तुत करण्यात त्यांनी मौलिकतेची पराकाष्ठा केली आहे. 'त्यांनी त्यांचे पुन्हा सृजन केले' असे म्हटले, तर ती अतिशयोक्ती ठरणार नाही. कला म्हणजे त्यांचे साधन नव्हते, धंदा नव्हता; तर ती त्यांची यौगिक साधनाच होती! ज्या वस्तूचे त्यांनी चित्रीकरण केले किंवा जो विचार ते चित्रीकरणाद्वारे व्यक्त करू इच्छित होते, त्याच्याशी त्यांनी परिपूर्णपणे तादात्म्य स्थापित केले.

१९६६ मधे मृत्यु होण्यापूर्वी त्यांनी अगणित पारितोषिके मिळवली. परंतु ते कधी त्याच्या ओघात वाहून गेले नाहीत. शेवटपर्यन्त त्यांचे व्यक्तिमत्व साधेच राहिले, अन् आपल्या कलेबद्दलची त्यांची निष्ठाही स्थिरच राहिली.

त्यांनी स्वतःला कलेसाठी वाहून घेतले होते. आपल्या आधुनिक कलाकारांवर त्यांची अमिट अशी छाप आहे.

# तुम्हाला माहीत आहे काय?

१. अुटकमंडला 'थंड हवेच्या ठिकाणांची राणी' म्हटले जाते. त्याचे वर्तमान नाव काय?
२. मुलांसाठी लिहिले गेलेले पहिले नाटक कोणते? ते कोणी लिहिले?
३. एका विशिष्ट प्रकारच्या भरीव धातुसाठी कर्नाटक प्रसिद्ध आहे. त्याचे नाव काय?
४. सर रोजर बॅनिस्टर हे सुप्रसिद्ध ॲथलीट होते. कोणत्या प्रकारच्या ॲथलेटिक्स साठी ही प्रसिद्धी आहे?
५. 'चारमिनार' पहाण्यासाठी तुम्हाला कोठे जावे लागेल?
६. किती कागदांचा एक दस्ता? किती दस्त्यांचे एक रीम. रिमातील कागदांची संख्या बदलू शकते का?
७. लंडनमधे झालेल्या तीन्ही गोलमेज परिषदात दोन भारतीयांनी भाग घेतला. त्या परिषदेत स्वातन्त्र्याबद्दल चर्चा झाली होती. भाग घेणारे हे दोन सभासद कोण?
८. बॅक्टेरियापासून अुत्पन्न होणाऱ्या रोगांचा शोध कोणी लावला?
९. भारताचे आर्थिक वर्ष १ एप्रिलपासून सुरू होते. ब्रिटनमधे ते केंव्हा सुरू होते?
१०. टी. व्ही. सीरियल 'मालगुडी डेज' ही एका प्रसिद्ध कादम्बरीवर आधारित आहे. कादंबरीचे व त्या लेखकाचे नाव काय?
११. 'किवी' पक्षी कोणत्या देशात आढळतो?
१२. मयूरसिंहासन कोणासाठी बनवले गेले होते?
१३. चार मूलभूत हक्क कोणते?
१४. १८८५ त मुंबईत झालेल्या इंडियन नॅशनल कॉंग्रेसचे अध्यक्ष कोण होते?

## उत्तर

१. अुदकमंडलम.
२. पीटर पॅन. जेम्स बॅरिकने हे नाटक १९०४ मधे लिहिले.
३. बिद्रिवेर. अुत्तर कर्नाटकमधील बीदरहून हा धातु येतो. काळ्या भरीव धातूवर चांदीचा मुलामा असणे हे त्याचे वैशिष्ट्य.
४. १९५४, मे ४ रोजी चार मिनिटांच्या आत १ मैल अंतर पळणारे ते पहिले व्यक्ति होत.
५. आंध्र प्रदेशाची राजधानी हैद्राबाद येथे.
६. २४ कागद. बीस दस्ते. हल्ली रीम वजनाने ठरवावे लागते. त्यामुळे त्यातील कागदांची संख्या कमी-अधिक होअू शकते.
७. तेज बहादुर सप्रू आणि बॅ. एम्. आर्. जयकर.
८. फ्रान्समधील केमिस्ट लुई पाश्चर.
९. अेप्रिल ६.
१०. स्वामी ॲण्ड हिज फ्रेण्डस्-लेखक: आर. के. नारायण.
११. न्यूझीलंड.
१२. मोगल बादशाहा शहाजहानसाठी.
१३. बोलण्याचे स्वातन्त्र्य, पूजेचे स्वातन्त्र्य, नैसर्गिक गरजा व भयापासून मुक्तता.
१४. डब्ल्यू. सी. बॅनर्जी.



# चतुर शत्रु

विशालपुर गावात दोन प्रमुख व्यक्ति होत्या. एकाचे नाव भूषण व दुसऱ्याचे रोहित. भूषण हा शेतकरी असून त्याच्याजवळ शरीरिक बळ अधिक होते, तर रोहित हा व्यापारी असून त्याच्याजवळ धन अधिक होते. दोघात कट्टर शत्रुत्व होते. त्यामुळे दोघेही एकमेकांचे अुणे दाखवण्याची संधी शोधत रहात.

सर्वजण त्यांच्याशी नेहमीच गोड बोलत अन् नम्रतेने वागत. भूषण व रोहित या दोघांनाही वाटे की सर्वजण आपल्याच मुठीत असावेत.

रमण हा विशालपुरचा नावापुरताच पाटील होता. एकाद्या मुख्य विषयावर निर्णय घ्यायचा असेल तर भूषण आणि रोहित यांच्या परवानगीशिवाय घ्यायचं धाडस तो करूच शकत नसे.

अशातच एकदा शेतीपद्धतीत काही सुधारणा करून जास्त अुत्पादन मिळवायच्या दृष्टीने एक योजना आखून तेथील राजाने या बाबत विचारविनिमय करण्यासाठी गावोगावचे अधिकारी बोलावून घेतले. पण त्या सर्वजणात 'मला यासाठी गाववाल्यांशी चर्चा करायला हवी' असे म्हणणारा एक रमणच निघाला!

राजा रमणला म्हणाला. "अरे, गावच्या कल्याणासाठीच मी हे काम हाती घेतलंय अन् तूच एकटा असं म्हणतोयस की गाववाल्यांशी बोलायला हवं?"

रमण अुत्तरला "महाराज, आमच्या गावात रोहितला विचारल्याशिवाय कुणाला कसला व्यापार करायचा हक्क नाहीय. तेंव्हा हे खत आपणाला रोहित द्वाराच विकावं लागेल. पण शेतकरी भूषण व रोहित यांच्यात तर कट्टर शत्रुत्व आहे, म्हणूनच त्यांच्या अनुमतीशिवाय गावात खत येणं अशक्य

प्रसाद खांबेटे



आहे.

पण महाराज, तसे ते दोघंही मोठे चतुर आहेत. चुकूनही ते कधी कुठला अपराध करत नाहीत.''

बाकीच्या सगळ्या ग्रामाधिकाऱ्यांना परत पाठवून राजाने एकट्या रमणलाच तेथे थांबायला सांगितले. पण इतक्यात मन्त्री तिथे येऊन राजाला सांगू लागला की, ''महाराज, आपल्या दूतांकडून बातमी मिळालीय की आपल्या जवळचा राजा माधवसेन याची जनता क्रुद्ध झालेली असून लवकरच तिथे बंडाळी माजणार आहे. त्या राज्यावर हल्ला करायला यासारखी छान संधी मिळायची नाही.''

''माधवसेनची गोष्ट सोडा हो. पूर्वेकडील चन्द्रगुप्त जर अजून तसाच चांगला मजबूत असेल, तर आपण माधवसेनवर हल्ला करायला गेल्याबरोबर तो आपल्यावर हल्ला करील. मग आपल्या सैन्याला या दोन्ही आघाड्या येतील का संभाळता?'' राजा गंभीरतेने म्हणाला.

तरीही मन्त्री म्हणाला. '' महाराज! आपल्या विदुषकाने दोन दूत शिकवून ठेवलेत. एकाला त्यानं माधवसेनकडे पाठवलंय अन् दुसऱ्याला चन्द्रगुप्तकडे. ते दोघंही वेळोवेळी या दोघांचे एकमेकांविरूद्ध कान भरायचं काम करत आहेत. त्यामुळे आत्ता आपण जर माधवसेनला हरवलंत, तर चन्द्रगुप्त भलताच खूश होईल!''

इतक्यात तिथेच उभा असलेला रमण मधेच म्हणाला. ''महाराज, आपला हा विदुषक तर मोठाच हुशार दिसतोय! त्यानं जर आमच्या विशालपुरच्या भूषण आणि रोहित यांच्यात वैमनस्य आणून दोघांना झगडा करायला लावला तर माझीही अडचण दूर होईल.''

राजाने तावडतोब विदुषकाला बोलावून घेतले. रमणने विदुषकाला आपली समस्या स्पष्ट करून सांगितली. विदुषकाने ती ऐकून विचारले. ''भूषण आणि रोहित यांच्यासारखी दोन माणसं गावात असूनही तुम्ही गावपाटील कसे काय बनू शकलात? त्यांनीच पाटील बनायचा प्रयत्न कसा केला नाही?''

''हं! दोघंही तुल्यबल आहेत. आपसात झगडण्यामुळे आपलं नुकसान होईल, हे दोघंही खूप समजून आहेत. त्यामुळे जो कोणी पाटील बनेल, त्याची स्थिति नेहमी नाजुकच बनेल. ही परिस्थिती दोघंही ओळखून आहेत. म्हणूनच त्यांनी तिसऱ्याच माणसाला त्या गादीवर बसवलंय.'' रमणे म्हणाला.

''पण शेतकरी आणि व्यापारी असे दोघंही जर एकाच गावात रहात आहेत, तर एकमेकांच्या आधाराशिवाय राहूच कसे शकतात?'' विदुषकाने पुन्हा शंका प्रदर्शित केली.

रमण अुत्तरला, ''भूषणला ज्या वस्तुंची गरज लागते, त्या तो इतरांच्या द्वारा रोहितकडून खरीदतो. रोहितही तसंच करतो. पण कोणत्याही परिस्थितीत ते दोघं एकमेकांशी काही बोलत नाहीत.''

''म्हणजे दोघं एकमेकांचे शत्रु असूनही, कसं जगावं हे दोघंही अुत्तम जाणतात तर! असल्या माणसांना दक्ष आणि चतुर अशा व्यक्तीच्या चालीनंच नामोहरम करता येईल. मी अशी दोन चतुर अन् प्रशिक्षित माणसं तुमच्याकडे पाठवतो.'' विदुषकाने अुपाय सुचवला.

नन्तर विदुषकाच्या योजनेप्रमाणे शंकर भूषणकडे गेला आणि गोपाल रोहितकडे. दोघेही आपापल्या कामात वस्ताद होते. ते रोज भूषणविरुद्ध रोहितचे व रोहितविरुद्ध भूषणचे कान भरू लागले. ते एकमेकांविरुद्ध नित्यनवीन खोट्या तक्रारी सांगू लागले. भूषण व रोहित एकमेकांविरुद्ध कागाळ्या ऐकून दातओठ तर खात, पण त्यांच्यात प्रत्यक्ष भांडण असे झालेच नाही!





असाच एक महिना निघून गेला अन् शंकर व गोपाळ गुप्तपणे एकमेकांना भेटले. ते आपसात बोलू लागले. "अरे, मला तर असं वाटतंय की या दोघांचा आपल्या सांगण्यावर खरा विश्वासच बसलेला नाहीये. आता आपल्याला यापेक्षाही सक्षम अशी काही योजना आखायला हवी अन् त्याबरोबरच साक्षीदारही मिळवायला हवेत; म्हणजे तरी त्यांचं आपापसात प्रत्यक्ष भांडण जुंपेल."

या योजनेप्रमाणे एक दिवशी शंकर भूषणला म्हणाला, "अहो, तुमची गुरं बघून रोहित मनोमन तुमचा हेवा करतो. तो त्यांना वीष चारून त्यांचा निकाल लावायच्या विचारात आहे."

शंकरने ज्या माणसाची या कामावर योजना केली होती, तो विषासकट पकडला गेला. भूषणने त्याला रागावून, धमकी देऊन विचारले, तेंव्हा त्याने-आपण रोहितचा माणूस असून, त्यानेच हे काम आपल्यावर सोपवल्याचे सांगितले.

त्याच सुमारास गोपाळने निवडलेला माणूस रोहितकडे चोरी करताना सापडला व त्यानेही रोहितला सांगितले की—भूषणच्या आज्ञेवरून आपण ही चोरी करत होतो.

तरीही आश्चर्य असे की भूषण व रोहित यांनी आपण पकडलेली माणसे पाटलाच्या हवाली तर केली, पण त्याच्याकडे एकमेकांबद्दल जराही तक्रार केली नाही, की एकमेकांचे नावही उच्चारले नाही. उलट ते पाटलाला म्हणाले, "आपल्या बचावासाठी काहीच्या काहीच बोलताहेत हे! त्यांच्या बोलण्याकडे मुळीच लक्ष देऊ नका. फक्त त्यांना चांगली कडक शिक्षा मात्र करा."

एके दिवशी भूषणने शंकरला समोर बोलावून म्हटले. "मला अशी शंका आहे की, तू रोहितवर जे आरोप करतो आहेस, ते सारे अगदी बिनबुडाचे आहेत! आत्तापर्यन्त तू त्याच्याबद्दल जे जे सांगितलंस, ते सगळं अगदी निखालस खोटं आहे. तेंव्हा एका आठवड्याच्या आत तू काही खरं दाखवलंस तरच तुझी धडगत आहे. नाहीतर तूच माझ्या जनावरांवर विषप्रयोग करायचा प्रयत्न केलास असं पाटलाकडे सांगून, तुझीच मान देईन अडकवून!"

इकडे रोहितनेही गोपाळला अगदी अशीच धमकी दिली.

पुन्हा एकदा शंकर व गोपाळ लपूनछपून एकमेकांना भेटले अन् म्हणू लागले, "अरे आपण तर मोठ्या चतुर्यानं जाळं पसरलं. पण आता स्वतःच त्याच अडकायची वेळ आली की! आपल्या खोट्या आरोपांचा काही उपयोग झाला नाही अन् आपण त्यांना फसवू शकलो नाही. आता एका आठवड्यात आपण काही सत्य उघड केलं नाही, तर आपलं कारस्थान उघडं पडेल आणि राजाचीही उगीच बदनामी होईल. या वेळचा आपला प्रयत्न चांगला भरीव असायला हवा."

या दरम्यान भूषण व रोहित या दोघांनाही पाटलांच्या कडून खताच्या योजनेबद्दल समजले. भूषण सरळ म्हणाला की, "हे खत परस्पर शेतकऱ्यांकडे पोचायला हवं. मी कोणाही व्यापाऱ्याकडून ते घ्यायला तयार नाही." उलट रोहित पाटलाला म्हणाला की, "ज्याला कुणाला खत हवं असेल, त्यानं ते माझ्याकडूनच खरेदी केलं पाहिजे." दोघांचा अडेलतट्टूपणा सर्वांना कळला. त्याची खूप चर्चाही झाली. आता या दोघांच्या हट्टीपणाचा काय परिणाम होणार इकडे सर्वांचे लक्ष लागून राहिले.

अशातच शंकरला एका गोष्टीचा पत्ता लागला. पाटलाकडून आपल्या व भूषणच्या तंट्याची बातमी पोचण्यापूर्वीच राजाकडे आपला माणूस पाठवायचे रोहितने ठरवले व त्या माणसाने राजाकडे जाऊन म्हणायचे होते, "शेतकऱ्यांना खतांची खरोखरच फार गरज आहे. आपण ते खत परस्परच शेतकऱ्याकडे पाठवले, तर छान होईल. या मधे व्यापाऱ्याचं काय काम?"

रोहितला असे वाटले होते की स्वतः





व्यापारी असूनही आपण राजाकडे असे निवेदन केल्याने आपल्याबद्दल राजाचे मत चांगले होईल.

ही बातमी कळताच शंकरने ती भूषणला जाऊन सांगितली. त्याची तारीफ करत भूषण म्हणाला, "फारच चांगली बातमी आणलीस रे. एका व्यापाऱ्यानेच असा प्रस्ताव मांडला तर राजा नक्कीच मानेल. गावचा कोणीही माणूस माझ्या विरोधी चकार शब्द काढू शकणार नसल्याने सगळं खत अगोदर माझ्याकडेच पाठवलं जाईल. ते खत नन्तर मी शेतकऱ्यांना विकीन. यामुळे मलाही व्यापाराचं ज्ञान होईल. आजपर्यंत आपण पैदा केलेलं धान्यच आणून विकत होतो. पण स्वतः कुठला माल खरेदी करून विकला नव्हता. आता या अनुभवाचा उपयोग करून घेऊन मी व्यापार सुरू करीन. व्यापारी शेती करू शकणार नाही. पण शेतकऱ्याला व्यापारी बनणं काही फारसं कठीण नाही."

गोपाळकडून ही गोष्ट रोहितला कळली, त्याने गोपाळची खूप तारीफ करून म्हटले- "तू ही बातमी देऊन फार चांगलं केलंस बघ! नाहीतर मी आपला माणूस राजाकडे पाठवला असता, अन् स्वतः आपल्या पायावर कुऱ्हाड मारून घेतल्यासारखं झालं असतं. अन् नसतं संकट मात्र ओढवून घेतलं असतं."

आता पाटील, शंकर आणि गोपाळ हे तिघेही राजा, मंत्री व विदुषक यांना भेटायला गेले. त्यांनी सगळी हकिकत सांगितली.

ती ऐकून राजा म्हणाला, "हां, आता बोल, मी काय करावं?"

पाटील रमण राजाला म्हणाला, "रोहितला कळवा की राजाच्या आज्ञेप्रमाणेच खताची विक्री होईल. भूषण दुसऱ्या कुणाकरवी खत विकत घेईल. इतकं मात्र खरं, की ते स्वतः होऊन आपला गुन्हा कबूल करणार नाहीत. पण राजाज्ञा मोडायचं धाडसही ते करू शकणार नाहीत."

मोठा निश्वास टाकत राजा म्हणाला. "असली माणसं आपसात मिळूनमिसळून राहिली, तर किती छान होईल!

शंकर व गोपाळ विदुषकाला म्हणाले, "आम्हाला याचं मोठं आश्चर्य वाटतंय की आम्ही ज्या ज्या योजना आखल्या त्यांचा त्यांना दरवेळ अगोदरच पत्ता लागत असे .आम्ही एकदाच फक्त खरं बोललो, तेव्हां त्यांनाही ते खरं वाटलं! हे सर्व कळायला त्यांच्याजवळ खरोखरच काही जादू असली पाहिजे.

हे ऐकून विदुषक हसू लागला. तो म्हणाला, "माझ्या आता हे बरोबर लक्षात येतंय. यात जादूबिदू काही नाही. भूषण अन् रोहित या दोघांनाही एकमेकांच्या बुद्धीबद्दल बरोबर अंदाज आहे. शत्रूची बुद्धी मोजणं मोठं कठीण आहे हेही त्यांना माहीत आहे. ज्या गोष्टींची आपण सहज कल्पना करू शकतो, त्या गोष्टी तक्रार म्हणून सांगितल्या, तेंव्हा त्यांनी त्यावर विश्वास नाही ठेवला. पण आपल्या कल्पनेपलीकडील गोष्ट त्यांना कळली, तेंव्हा त्यांनी पटकन विश्वास ठेवला. ते खरोखरच जीवन जगायची कला जाणणारे शत्रु आहेत. अशा लोकांच्या शत्रुत्वामुळे त्यांना आणि आसपासच्या लोकांना लाभच होतो."

विदुषकाचे हे बोलणे ऐकताच राजा एकदम भानावर आला. तो म्हणाला– "म्हणजे याचा अर्थ असा की, आपल्या दूतानं स्वतःच्या कल्पनेनुसार जी बातमी आणलीय, त्यावर आपण विश्वास ठेवलाय अन् आपण माधवसेनवर हल्ला करायचा विचार करत होतो! पण तो केवढा मूर्खपणा झाला असता! या रमणचा बहुधा असाच अभिप्राय असावा की, आपणही आपल्या शेजारच्या राज्याचे शत्रु असूनही तसंच जगायला शिकावं! म्हणूनच तुम्ही मला आपलं आक्रमण थांबवायचा सल्ला दिलात नं?" राजाने पाटलाला विचारले.

रमण विनयाने राजाला म्हणाला. "महाराज, जे शत्रु, शत्रु असूनही जीवन जगणं जाणतात, त्यांच्यात मी अधिकारी म्हणून रहात आहे. मी तसा मन्दबुद्धी आहे. तरीही जीवनाचं हे सत्य मला कळलंय. अशा दोन चतुर शत्रूंमधे राहून कसं जगावं हे जाणणाऱ्या सूक्ष्मग्राही महाराजाच्या बोलण्याला मी विरोध कसा करू?"

भूषण व रोहित यांच्यातल्या शत्रुत्वाच्या कृपेमुळे त्या देशाचा राजा आपल्या शत्रूंच्या मधे राहूनही अनेक वर्षेपर्यन्त सुखशान्तीने राज्य करत राहिला.



# पोहण्याची कला न जाणणारे बेडुक

राघवपूर गावातील एका शेतकऱ्याने शेतीच्या कामासाठी सावकाराकडून काही रक्कम कर्जाऊ घेतली. काही वर्षे तो कर्ज परत फेडू शकला नाही. मधून मधून आवश्यकतेनुसार तो आणखी ही रक्कम घेत राहिला. यामुळे मुद्दल व व्याज मिळून खूप मोठी रक्कम झाली. ती परत फेडणे त्याला अशक्य झाले. सावकाराने त्याचे शेत आपल्या ताब्यात घेतले. गावचा सरपंच शेतकऱ्याला काही मदत देऊ शकला नाही, म्हणून त्याने राजाकडे जाऊन तक्रार केली. राजाने सावकाराला बोलवले आणि सुनावणी सुरु झाली.

राजाने शेतकऱ्याला विचारले—"तू जे कर्ज घेतलेस ते सव्याज परत करणे आपले कर्तव्य आहे हे तुला माहीत नाही?"

शेतकरी म्हणाला—"माहीत असून त्याचा काय उपयोग महाराज? बेडकांना पोहता का येत नाही? येतं, पण पाच वर्षांचे झाले तरी आपल्या गावातील बेडकांना पोहता येत नाही."

राजाने हसत मंत्र्याला विचारले—"हा शेतकरी असं असंबद्ध का बोलतो आहे?" शेवटी राजाने सावकाराला त्याची सर्व रक्कम देऊन टाकली.

नंतर राजा शेतकऱ्याला म्हणाला—"तुझ्या गावचे बेडूक जेव्हा पोहू लागतील, तेव्हा सरकारी खजिन्यात रक्कम भरुन टाक." असं म्हणून राजाने शेतकऱ्याला घरी रवाना केले.

राजाचं हे बोलणं ऐकून मंत्र्याला मोठं आश्चर्य वाटलं. राजाच्या मनात काय आहे हे मंत्र्याच्या लक्षात आलं नाही. तेव्हां मंत्र्याला समजावीत राजा म्हणाला—"शेतकऱ्याचं म्हणणं असं की गेली पांच वर्षे पाऊस पडला नाही, शेतात काही पिकलंच नाही! पण ते तसं सांगण्या ऐवजी शेतकरी म्हणाला—"गावातील बेडकांना पोहता येत नाही!"





# वीर हनुमान

हनुमान अयोध्येहून निघाला. वाटेत तो वाल्मीकीच्या आश्रमात उतरला. मुनिश्रेष्ठ वाल्मीकींना वंदन करून त्याने विचारले—"महामुहिन, रामावर असे संकट का बरे आले? तो तर एक आदर्श राजा आहे."

मंदस्मित करीत वाल्मीकि म्हणाले—"हनुमान, राज्य-कारभार करणं सोपं काम नाही. शंबूक मोठा साधु पुरुष होता. तो निरपराधी होता. उच्च वर्गाच्या मिथ्याभिमानाने अशा तपस्वी व ज्ञानी माणसाचा बळी घेतला. त्यांच्या अहंकार, गर्व व मिथ्याभिमानाला शंबुकाचे प्राण घेतल्यावरच शांति मिळाली. शंबुकाचा वध करणे अन्यायाचे आहे याची रामाला जाणीव होती, पण उच्च-वर्गीयांच्या समाधानासाठी आणि सामाजिक व्यवस्था उत्तम प्रकारे चालावी यासाठी त्याला हे अकार्य करणे भाग पडले. अडाणी व संस्कारहीन लोक जी बडबड करतात त्यांच्या दुष्परिणामांपासून समाजाचे रक्षण करणे हे राजाचे कर्तव्य असते. धोब्याचं बोलणं ऐकून रामाने सीतेला वनात पाठवलं हे तुला ठाऊकच असेल. राम आदर्श राजा आहे. त्याचे काही विशेष आदर्श व सिद्धांत आहेत. त्यांची स्थापना करण्यासाठी रामाने आपले व्यक्तिगत सुख गमावले. पण लक्षात ठेव, रामाचे आदर्श चिरंतन आहेत, ते मानवी जीवनाचे मार्गदर्शक आहेत. तुला याबाबत तिळमात्र शंका नको."

हनुमानाने सीतेचे निवास-स्थान पाहिले.



कुश व लव यांनी आपल्या बाणांनी वृक्षांवर जी चिन्हे अंकित केली होती ती कौतुकाने पाहिली. आश्रमात सीता ज्या मार्गावरून चालत असे, तेथे श्रद्धा-भक्तीने हनुमानाने प्रणाम केला व तो अयोध्येकडे निघाला.

हनुमान उडत अयोध्येला पोचला. राजभवनासमोरील उद्यानात तो खाली उतरला. तेथे कुश व लव निरनिराळ्या विद्या शिकून आपले मनोरंजन करीत होते. त्यांनी आपल्या बाणांनी एक सुरेख महाल बनविला होता. कुश व लव यांनी हनुमानाला पाहिले व एकमेकांकडे मौन संकेत केले. नंतर दोघांनी आपल्या बाणांनी हनुमानाला चारी बाजूंनी वेढले. त्यांना वाटले हा कोणी शत्रु आपल्याकडे आला आहे.

ओरडून लवाने प्रश्न केला—"हे मायावी, तू कोण आहेस?" लवाचे सीतेशी अधिक साम्य होते नि कुशाचं रामाशी. सीता व रामांच्या प्रतिमास्वरूप लव-कुशाकडे हनुमान पहातच राहिला. तो त्यांना म्हणाला—"मी हनुमान आहे. मला रामाला भेटायचंय!"

"आम्ही तुझ्यावर कसा विश्वास ठेवावा? हातात गदा घेतली की थोडाच कोणी हनुमान होतो? तू तर आम्हाला कोणी मायावी वाटतोस." असे म्हणत लवाने हनुमानाच्या दिशेने धनुष्याला बाण लावला.

कुश रामाप्रमाणे शांत स्वभावाचा होता. तो शांततापूर्वक म्हणाला—"तू जोपर्यंत स्वतःला हनुमान सिद्ध करीत नाहीस, तोपर्यंत आम्ही तुला सोडणार नाही. आम्ही तुझ्यावर कसा विश्वास ठेवावा? तूच सांग बरं!"

लव म्हणाला—"तू आपला पराक्रम दाखव. आपले विशाल रूप आम्हाला दाखव."

हनुमानाने विशाल रूप धारण केले नि त्या दोघांना आलिंगन दिले. त्यांना आपल्या खांद्यावर बसवून तो आकाशात उडाला. शरयू नदी पार करून त्याने दोघांना आकाशातून अयोध्या नगरी दाखवली. तो खूपच वेगाने चालला होता. तो जणू आकाशाला स्पर्श करीत होता. त्याने तीव्र गतीने आपली शेपूट घुमवली आणि तिची एकाद्या किल्ल्यासारखी रचना केली. कुश व लव यांना आपल्या दंडांवर बसवून तो



म्हणाला—"महिरावणाच्या संहाराच्या वेळी मी राम व लक्ष्मण यांना असेच आपल्या भुजांवर बसविले होते. आणखी ही रामाला मी कित्येक वेळा मदत केलेली आहे." आणि आता हनुमान उडत उडत आकाशातून खाली उतरला.

कुश व लव यांनी हनुमानाला प्रणाम केला. ते हनुमानाला म्हणाले "हनुमान, आपल्या डोळ्यांनी तुझा पराक्रम पाहण्याची आमची फार इच्छा होती. म्हणून आम्ही हे सर्व नाटक केले. आम्हाला क्षमा कर. आता तू हनुमानच आहेस यावर आमचा विश्वास आहे."

हनुमान हसत म्हणाला—"मग तुम्हा दोघांची इच्छा पूर्ण करण्यासाठी मी खूपच काही केले हे खरं ना?"

कुश व लव हनुमानाला रामाकडे घेऊन गेले. हनुमानाला पाहताच अतिशय दुःखामुळे रामाच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. रामापुढे गुडघे टेकून हनुमान म्हणाला—"रामा, एकाद्या सामान्य माणसाप्रमाणे तुझ्या डोळयांतून अश्रू आलेले मला पाहवत नाहीत, राज्यकारभार करणं ही पुष्प-शैया नाही, फारच कठिण काम आहे. राजाला कठोर त्याग करावा लागतो. भविष्य काळात राज्यपालन करावं तर रामा सारखं! म्हणून हे सर्व असं घडलं. तुझे आदर्श चिरस्मरणीय आहेत. तू जे काही करतोस त्यात केवळ परमार्थ असतो. ज्यांची हे समजण्याची योग्यता आहे, त्यांच्या हे लक्षात येईल आणि ते आपल्या जीवनात याचे



अनुकरण करतील." अशा प्रकारे हनुमानाने रामाचे सांत्वन केले.

एक दीर्घ निःश्वास सोडीत राम म्हणाला—"हनुमान, तुला पाहून अन् तुझे विचार जाणून मला थोडी शांति मिळाली. सीतेच्या विरहाने मला किती अपार दुःख झाले हे तू जाणतोसच. याबरोबरच जर अश्वमेध यज्ञ सफल झाला नाही तर तुझा राम जिवंत राहणार नाही. अश्व मणिपुरच्या दिशेने जात असल्याचे समजले. घोड्याचे संरक्षण करण्याची जबाबदारी आता तुझी. म्हणूनच मी तुला आता इथं बोलवलं. घोड्या बरोबर माझे तीन भाऊ ही चालले आहेत. तू पण त्यांच्या बरोबर अस."

रामाच्या आज्ञेचं पालन करण्यासाठी



हनुमानाने गदा आपल्या खांद्यावर चढवली नि तो आकाशात उडाला.

हनुमान आकाश-मार्गाने जात होता. वाटेत दाट जंगलात एक राक्षस व एक राक्षसी विजयोन्मादात नाचताना त्याला दिसले. हे दोन्ही राक्षस खूप प्यायले होते. हनुमानाला संशय आला, म्हणून सूक्ष्म रूप धारण करून तो एका झाडावर जाऊन बसला व हे राक्षस काय करीत आहेत ते पाहू लागला. त्यांनी नाचणं बंद केलं आणि ते त्याच झाडाखाली येऊन एकमेकांशी बोलू लागले. हनुमानाने लक्षपूर्वक त्यांची बोलणी ऐकली.

राक्षसी म्हणाली—"म्हणतात ना, शत्रुरहित होणं बरं नाही? हे सत्य आहे. आपल्याला आता कोणी शत्रूच राहिला नाही. आपण जिवंत राहून आपल्या भाईबंदांचं ऋण चुकवलं हे बरे झालं. करालकंठ, त्या रात्री धोबी बनून किती सुरेख नाटक केलंस तू? तुझ्या आरडा-ओरडीमुळे गल्लीतल्या कोणी आपल्या तोंडातून शब्द काढला नाही."

"शूर्पणखे, तुझे दागिने किती सुंदर दिसत होते नाही त्या दिवशी? काय छान आपलं रूप बदललं होतंस नाही तू!" राक्षसाने उत्तर दिले.

करालकंठ हा शतकंठ रावणाचा भाऊ होय. राम-रावणांच्या युद्धात हा रणभूमीवरून पळून आला. आपला थोरला भाऊ शतकंठ रावणाचा वध करणाऱ्या राम व सीतेचा सूड उगवण्यासाठी धोब्याचा वेष घेऊन हा अयोध्येला आला. रावणाची बहीण शूर्पणखा ही पण जिवंत होती. योगायोगाने राम व सीता यांचा सूड घेण्यासाठी ती ही धोबीण बनून अयोध्येला आली. दोघांची अयोध्येत गाठ पडली.

दोघांना ही खूप भूक लागली होती. एकादा माणूस दिसला तर खाऊन टाकावा अशा विचाराने दोघे ही नगराच्या सरहद्दीवर हिंडत होते. शूर्पणखेने एक तीव्र नेत्र-कटाक्ष टाकून करालकंठाला आपल्या मोहात पाडले आणि त्याला आपल्या बरोबर घेतले. करालकंठाला ही वाटलं की ही बरोबर असली म्हणजे संधि साधून हिला ही खाऊन टाकावं.

थोडे अंतर चालून गेल्यावर शूर्पणखेने राक्षसाचे रूप धारण केले आणि ती त्याला



खाणार एवढ्यात कराल ओरडला—"अरे, तू पण राक्षस आहेस होय?" करालकंठ ही राक्षस बनला. दोघांनी मिळून एक कट रचला आणि त्यानुसार धोबी नि धोबिणीचे रूप घेऊन रामाची निंदा केली, त्याचे चारित्र्य कलंकित केले. आपली योजना फत्ते करून त्यांनी अयोध्या सोडली आणि जंगलात जाऊन राहू लागले.

झाडावर बसलेला हनुमान दोघांचा संवाद लक्षपूर्वक ऐकत होता. "बरं झालं की हनुमान त्या वेळी तिथे नव्हता. तो असता तर त्याने आपल्याला शोधून काढून ठार केलं असतं. तो वानर त्यावेळी एका पर्वतावर तपश्चर्या करीत होता हे आपलं भाग्यच!" मोठ्या आनंदाने करालकंठ बोलत होता.

"त्या हनुमानाबद्दल मुळिच काही बोलू नकोस. त्याचं नाव काढलं की माझ्या तळपायाची आग मस्तकाला जाते!" शूर्पणखा म्हणाली.

"याचा अर्थ तू त्याला भीतेस. दुसरं काय?" कराल कंठ गडगडून हसत म्हणाला.

"त्या माकडाने माझ्या भावाचा सोन्याचा महाल भस्मसात् केला. त्याला भ्यायचंय काय? मला भारी राग येतो त्याचा." असे म्हणत शूर्पणखा आपल्या पाठीवर काही शोधू लागली.

तिच्या पाठीवर भाजल्यामुळे एक डाग पडला होता. जेव्हा लंका जळत होती, तेव्हा एक जळता खांब तिच्या पाठीवर पडला होता. त्यामुळे हा डाग पडला होता. त्या डागाकडे व्यंगपूर्वक पहात कराल म्हणाला—"हं, म्हणून तुला एवढा राग आला होय? अजून ही दुखत असेल नाही? महाल जळला तर काय बिघडलं? हा डाग तर वाचला ना?"

त्याच्या या थट्टेमुळे शूर्पणखा नाराज होऊन म्हणाली—"गप बस, आता जास्त बोललास तर माझ्याशी गाठ आहे, लक्षात ठेव."

"शूर्पणखा, त्याचं नाव घेतलं की मी किती चिडतो तुला ठाऊक नाही. अग तो अगदी सैतान आहे, महा सैतान!" कराल म्हणाला.

"आता तू ठीक बोललास. उगाच आपला पराक्रम नको सांगूस. तू आपले प्राण वाचविण्यासाठी पळून आलास हे काय मला माहीत नाही? भ्याड कुठला! युद्धात





वीरासारखं मरायचं, पण तू पाठ दाखवून पळून आलास!" शूर्पणखेने करालला डिवचले.

कराल म्हणाला–"पळून आलो, म्हणून तर आता सूड घेता आला. तुझ्यासारखी सुंदरी मिळाली मला!"

"चल, आता इथून चलू या आपण. दुसरीकडे कुठे तरी जाऊं या." शूर्पणखा म्हणाली.

"जाऊ तू म्हणतेस तिकडे, पण अगोदर एक काम करायचंय. रामाच्या यज्ञाच्या घोड्याला पकडायचंय!" राक्षसाने आपला मानस सांगितला.

"छान कल्पना आहे तुझी. मग आपण घोड्यावर बसून जाऊ या की!" शूर्पणखा.

"अगदीच कशी ग मूर्ख तू? घोड्यावर बसायला नाही जायचं." करालकंठ गंभीरपणे म्हणाला.

"तुच असं बडबडलास तर मी गप्प नाही हं बसणार! सावधान, आपल्या नखांचं पाणी दाखवीन चांगलं. नाक आणि कान थोडे बेढब असले म्हणून काय झालं? अजून तर मी सुंदरच आहे की. माझं लांब नाक नि रुं: कान त्या लक्ष्मणाने कापले रे! पण तरी सुद्धा मी चन्द्रमुखीच आहे म्हटलं! बरं, ते जाऊ दे. आपण कोठे ही धडामदिशी जाऊ शकतो, मग हा घोडा आपल्याला पाहिजे कशाला?" शूर्पणखेने विचारले.

"अग, आपल्याला त्या घोड्याला मारायचंय!" करालने सांगितले.

"घोड्याशी आपलं काय बरं वैर?" शूर्पणखेचा प्रश्न.

वैर घोड्याशी नाही, रामाशी आहे! घोड्याला मारलं की रामाचा यज्ञ निष्फल होईल. सीता नाही म्हणून अगोदरच तो अर्धा मेलेला आहे. यज्ञाचा घोडा मारला की तो सपशेल मरेल!" करालकंठाने शूर्पणखेला समजाऊन सांगितलं.

"मग चला, तावडतोब घोड्याला मारून टाकू या. घोड्याच्या डोक्याचं मांस फार चविष्ट असतं." शूर्पणखा उद्गारली.

"किती ग आधाशी तू? खाण्याशिवाय काही सुचतं का तुला?" करालकंठने टोमणा मारला.

"काही ही असो. चल लवकर. त्या







घोड्याला मारून टाकू अगोदर." असे म्हणत शूर्पणखेने करालक..ा हात पकडला.

दोघे जाऊ लागले तेव्हा हनुमानाने त्यांच्या मार्गावर आपली दीर्घ शेपूट पसरली.

"साप, अरे केवढा मोठा साप!" कराल ओरडला.

जरा नीट पाहून शूर्पणखा ओरडली—"अरे, ह साप नाही. ही तर वानराची शेपूट! यमराजाने आपल्यावर फेकलेला फाशीचा फंदा! ही तर त्या हनुमानाची शेपूट!"

"गप बस. हनुमान इथं कुठून आला? जो पाहशील तो तुला हनुमानच वाटतो!" करालकंठाने शूर्पणखेला धमकावलं.

"हं, मला तर ही शेपूट चांगलीच माहीत आहे. लंका-दहन करणारी शेपूट हीच?" थरथर कापत शूर्पणखा म्हणाली.

शूर्पणखेचं बोलणं ऐकून करालकंठ पळून जाऊ लागला. तेव्हा शूर्पणखा ओरडून म्हणाली—"अरे मला एकटीला इथं सोडून कुठं पळून चाललास?"

हनुमान झाडावरून उतरला आणि आपल्या अक्राळ-विक्राळ स्वरूपात उभा राहिला. करालकंठ नि शूर्पणखा जेव्हा पळून जाऊ लागले तेव्हा हनुमानाने एक मोठा डोंगर उखडला आणि त्यांच्या वर फेकला. ते दोघे ही डोंगराखाली मरून गेले.

राहिलेल्या शत्रूंचा ही नाश झाला हे पाहून हनुमानाला आनंद झाला. गर्जना करीत तो आकाशमार्गाने मणिपुरकडे जाऊ लागला.

सुंदर वनराजीतून वाहणाऱ्या गंगेला पार करून हनुमान मणिपुर राज्याच्या सीमेवर पोचला.

दूर ब्रह्मपुत्रा नदी चमकत होती. चांदीच्या रसासारखी ती भासत होती. एवढ्यात मणिपुरच्या राजधानीच्या सीमेवर वीज कडाडली आणि प्रचंड आवाज करीत अति वेगाने कोणी येत आहे असे हनुमानाने पाहिले. दुसऱ्याच क्षणी हनुमान त्याहून अधिक वेगाने त्या दिशेला उडत जाऊ लागला.





# वनदेवीची कृपा

कश्यपचे वडील वारले त्याला एक वर्ष ही झाले नाही. पण या एका वर्षात अनुभव नसल्यामुळे त्याला व्यापारात खूपच नुकसान आले. तो चांगलाच कर्जबाजारी बनला. सारे कर्ज फेडण्यासाठी आपले वडिलार्जित घर ही विकण्याची पाळी आली त्याच्यावर! आपली बायको नि दोन मुलांना घेऊन तो आपल्या गावी धर्मपुरीला गेला. या गावात आजीने नातवाला दिलेले एक त्याचे छोटे कौलारू घर होते.

नवरा-बायकोने त्या पडक्या घराची डाग-डुजी केली नि तिथे राहू लागले. आता कश्यपपुढे कठिण प्रश्न उभा राहिला की कुटुंबाच्या पालन-पोषणासाठी काय करावे? त्याची बायको कौसल्या मोठी बुद्धिमान होती. पण ती जितकी बुद्धिमान होती, त्याहून जास्त भांडखोर नि गप्पिष्ट होती. आपल्या नवऱ्याला चिंतित पाहून तिने विचारलं—

"एवढी कसली काळजी करीत आहात? जिथे अनेक वर्षे आरामात राहिलो, तो गाव सोडून आपण इतके दूर आलो आहोत. आता इथं लाकूड-फाटा विकू. गावाच्या चारी बाजूंना दाट जंगल आहे. आपल्या जवळ चांगली धारदार कुऱ्हाड ही आहे. आता आणखी काय सांगू तुम्हाला?"

कश्यपने मुकाट्याने कुऱ्हाड खांद्यावर टाकली आणि जंगलाकडे निघाला.

जंगलात हिरवीगार झाडं होती. जिकडे पहावं तिकडे हिरवळ होती. दुपार पर्यंत तो भटकत राहिला, पण कुठे ही वाळकं झाड त्याला दिसलं नाही.

कश्यपने विचार केला—"मी पण किती दुर्दैवी माणूस! आता काय करावं? दिसेल ते झाड आता तोडू या. आठवड्याभरात ते सुकेल. मग कापून शहरात जाऊन लाकडं विकावीत." त्याने कुऱ्हाड उचलली आणि



एका झाडावर घाव घालायला निघाला.

इतक्यात एक जोरदार आवाज आला–"कश्यप, जरा थांब!" हिरवी चकाकणारी साडी नेसलेली एक स्त्री त्याला समोर उभी दिसली. तिच्याकडे पाहून कश्यपला मोठं आश्चर्य वाटलं.

कश्यप क्षण भर स्तब्ध उभा राहिला. तो त्या स्त्रीशी काही बोलणार एवढ्यात तीच म्हणाली–"तू हा काय अत्याचार चालवला आहेस? हिरवंगार झाड कापायचा विचार आहे तुझा?"

"माई, तुला माझं नाव सुद्धा माहीत आहे, मग माझ्या दारिद्र्याची कल्पना तुला असेलच! मी, माझी बायको नि मुलं-बाळं यांना खायला थोडं तरी अन्न पाहिजे ना? म्हणून लाकडं तोडून ती विकण्याचा धंदा करावा म्हणतो. नाही तर मी दुसरं करू तरी काय?" कश्यपने आपली व्यथा सांगितली.

कश्यपकडे सहानुभूतीने पहात ती स्त्री म्हणाली–"मी वनदेवी आहे. तुझं कल्याण व्हावं अशी माझी इच्छा आहे." आणि तिने एक टाळी वाजवली. त्यासरशी एक सुरेख गुटगुटीत गाय पुढ्यात येऊन उभी राहिली.

"ही गाय तू आपल्या घरी घेऊन जा. तू अथवा तुझी बायको यांनीच फक्त हिची धार काढायची. तुम्ही दोघेच काढताहात तोपर्यंत ही दूध देत राहील. इथून पुढे हिरवी झाडं कधी ही तोडू नकोस." असं सांगून वनदेवी अदृश्य झाली.

कश्यपचा आनंद गगनात मावेना. त्याने कुऱ्हाड खांद्यावर टाकली आणि गायीला घरी घेऊन आला.

कौसल्या आपल्या नवऱ्याची वाटच पहात होती. जेव्हा नवरा हात हालवीत घरी आला तेव्हा ती निराशेने म्हणाली–"हातात काही नाही नि मोठ्या आनंदाने घरी आलात! लाकडं कुठे आहेत?"

"आता लाकडं कशाला? कामधेनूसारखी गाय घेऊन आलोय!" जंगलातील घडलेली सर्व घटना कश्यपने बायकोला सांगितली.

नवऱ्याच्या बोलण्यावर कौसल्येचा विश्वास नव्हता. तिने एका पातेल्यातील पाणी फेकून दिलं आणि दूध काढायला बसली. पातेलं भरलं तरी गाय दूध देतच राहिली. कश्यप दूध घेऊन शहरात गेला. दूध विकलं नि घरात पाहिजे असलेल्या सर्व जिनसा घरी घेऊन आला.

एका आठवड्यात गाईची धार काढून काढून कौसल्या दमून गेली. एके दिवशी सकाळी नवऱ्याला म्हणाली–"धार काढून हाताला फोड आले, आता कंटाळून गेले मी. असं करा-ही गाय वनदेवीला परत करा नि झाडं तोडायची धमकी द्या तिला. आणि काही तरी छान वर मागा तिला."

कश्यप मुकाट्याने गाय घेऊन जंगलात गेला. त्याने झाड तोडण्यासाठी कुऱ्हाड उचलली, एवढ्यात वनदेवी हजर झाली. म्हणाली–"कश्यप, पुन्हा हा काय मूर्खपणा चालवला आहेस?"

"काय करू देवी? गायीची धार काढता काढता माझी बायको बिचारी दमून गेली. हे काम करायला तिने साफ नकार दिला." कश्यपने वनदेवीकडे तक्रार केली.

एक क्षण भर वनदेवी थांबली नि तिने टाळी वाजवली. लगेच ती गाय अदृश्य झाली नि त्या जागी एक बदक दिसू लागले.

"कश्यप, आता तू हे बदक घेऊन जा. तुझ्या बायकोने अंडी मागितली की हे बदक अंडी देईल!" असं म्हणून वनदेवी दिसेनाशी झाली.

बदक घेऊन कश्यप आपल्या घरी आला. कौसल्येला खूप आनंद झाला. ती म्हणाली–"बदका, बदका, अंडी दे."

बदकाने लगेच एका मागून एक अंडी दिली. रोज शहरात जाऊन कश्यप अंडी विकू लागला.

दहा दिवसात कौसल्या त्या बदकाला ही





कंटाळली. ती म्हणाली—"'अंडी दे, अंडी दे' असे ओरडून ओरडून आता माझा गळा दुखायला लागला. शेजार-पाजारच्या बायका म्हणतात—कोकिळे सारखा तुझा कंठ असा कर्कश कसा झाला? वनदेवीने दिलेलं हे मायावी बदक तिला परत करून टाका आणि एकादी उपयुक्त वस्तु आणा आता आपल्यासाठी. कुऱ्हाड घेऊन जायला विसरू नका हं!"

कश्यप दुसऱ्या दिवशी बदक घेऊन जंगलात गेला. तो झाडावर कुऱ्हाडीचा घाव घालणार एवढ्यात वनदेवी अवतीर्ण झाली नि म्हणाली—"कश्यप, पुन्हा काय हा वेडेपणा?"

कश्यपने बायकोचं म्हणणं वनदेवीला सांगितलं. वनदेवीने पुन्हा एक टाळी वाजवली, त्यासरशी बदक अदृश्य झालं नि त्या जागी एक मातीचं भांडं आलं!

देवी म्हणाली—"बघ, तुला हे अक्षय-पात्र देते. तुझ्या आणि तुझ्या बायकोच्या मनात जे खाद्य-पदार्थ येतील, ते सर्व हे अक्षय-पात्र देईल. ही हिरवीगार झाडं मात्र तोडू नकोस." आणि वनदेवी अंतर्धान पावली.

अक्षय-पात्र पाहून कौसल्येचा आनंद गगनात मावेना. आता तिच्याकडे भोजनासाठी खूप माणसे येऊ लागली. लोक जे जे मागत, ते ते खाद्य पदार्थ अक्षय-पात्रातून काढून कश्यप बायकोच्या हाती देई. कौसल्या ते पदार्थ ताटात वाढी. संतुष्ट होऊन लोक भोजनाची चांगली किंमत देत.

पंधरा दिवसांत कौसल्या या कामाला ही कंटाळली. ती नवऱ्याला म्हणाली—"वाढून वाढून मी आता थकले. लोक केव्हां ही येतात नि भोजन मागतात. उष्टी भांडी उचलता उचलता नाकी नऊ आले. कोठवर मी आता हे काम करीत बसणार? वनदेवी तुम्हाला मूर्ख बनवून नाचवते आहे. उद्या तुमच्या बरोबर मी पण जंगलात येते. ही कुऱ्हाड तिच्या अंगावर फेकीन. मी काय आणते ते उद्या पहाच तुम्ही!" नवऱ्यावर अधिकार गाजवीत कौसल्या तावातावाने बोलत राहिली.

दुसऱ्या दिवशी अक्षय-पात्र घेऊन कौसल्या नवऱ्या बरोबर जंगलात गेली. एका ठिकाणी तिने कश्यपला इशारा केला, तसा तो कुऱ्हाड घेऊन एका झाडाकडे गेला.



"थांब, अक्षय-पात्र दिल्यावरही तुला संतोष नाही झाला? बायकोला पण बरोबर आणलंस?" असे म्हणत वनदेवी पुढे आली.

कश्यप काही बोलणार, एवढ्यात कौसल्या गरजली—"आम्ही काय करणार? तू मातीचं भांडं माझ्या नवऱ्याला दिलंस, मग मी न येऊ तर काय करू? सोन्याच्या अशर्फ्यांनी भरलेली अक्षय थैली मला दिलीस तर पुन्हा चुकून इकडे येणार नाही! या मातीच्या भांड्याचा काय उपयोग आम्हाला?" आणि अक्षय-पात्र तिने देवीपुढे आपटलं.

अक्षय-पात्राचे तुकडे-तुकडे झाले. तिच्याकडे सहानुभूतीने पहात मंदस्मित करीत वनदेवी म्हणाली—"तुम्ही लोकांनी आपल्या हातांनी आपलं भाग्य मातीमोल करून टाकलं. मी जी वस्तु तुम्हाला दिली, ती सुरक्षित परत आणली तर मी दुसरी वस्तु देऊ शकते!"

कौसल्या निराश होऊन नवऱ्याला म्हणाली—"ती काहीच द्यायला तयार नाही. आणि तुम्ही शुंभासारखे इथे उभे. अंधार होईपर्यंत अर्धे जंगल साफ करून टाका."

बायकोचा राग पाहून कश्यप घाबरला नि झाडं तोडायला निघाला.

"या जंगलातील एक ही झाड कश्यप तोडू शकणार नाही!" असे म्हणत वनदेवी अदृश्य झाली.

दुसऱ्या क्षणी कश्यपच्या हातातून कुऱ्हाड गळून पडली. त्याचे दोन्ही हात लुळे पडले. निर्जीव हातांनी तो काही काम करू शकेना.



कौसल्या जोर-जोराने विलाप करू लागली-"माते, मला क्षमा कर. इतकी कठोर शिक्षा नको देऊस मला!"

ती खूप खूप रडली, पण वनदेवी अवतीर्ण झाली नाही. आता काय करणार? नवरा-बायको दोघे जण घरी आले. वनदेवी प्रकट होईल व आपल्याला क्षमा करील अशी कौसल्येला अजून ही आशा होती. ती विलाप करीत जंगलात हिंडे आणि घरी परत येई. जंगलातील फळे, बाभळीचा डिंक गोळा करून ती विकी. आणि येणाऱ्या थोड्या पैशांतून कसे-बसे घर चालवी.

जंगलातून आंबा, चिंच, आवळा वगैरेची छोटी रोपे तिने आणली आणि आपल्या घराच्या परसात लावली. त्यांच्याच बरोबर काही भाजीपाला ही तिने लावला.

चार वर्षांनी या सर्व झाडांना फळे आली. एक दिवशी आंबे, आवळे, चिंचा वगैरे माल गाडीत भरून ती शहरात गेली आणि तो सर्व माल विकून आलेले हजार रुपये घरी घेऊन आली.

रुपयांनी भरलेली पिशवी नवऱ्याला दाखवीत कौसल्या म्हणाली-"वनदेवीने खरोखरीच आपले डोळे उघडले. पोट भरण्यासाठी माणसाने चांगली झाडे तोडण्याची मुळिच आवश्यकता नाही. झाडे वाढली तर आपल्याला जीवनात अधिक आनंद मिळेल. त्यात जे समाधान आहे, ते अन्यत्र कोठे मिळेल? हे सत्य वनदेवीनेच आपल्याला शिकवले. आपण तिचे आभार मानले पाहिजेत. "तिच्या बोलण्यात खरा-खुरा आनंद व संतोष भरलेला होता.

तिच्या या बोलण्याने खरोखरीच प्रायश्चित्त घडले. कदाचित् म्हणूनच कश्यपचे लुळे हात पूर्ववत् चांगले झाले.

कश्यप पैशांनी भरलेली पिशवी आपल्या हातात घेऊ लागला तेव्हा कौसल्येला अतिशय आनंद झाला. ती म्हणाली-"निःसंशय ही वनदेवीचीच कृपा आहे!" दोन्ही हात जोडून श्रद्धा व भक्तीने तिने अदृश्य वनदेवीला नमस्कार केला.



## चांदोबाच्या बातम्या

### तीन वर्षांची बुद्धिमती



मीनाक्षीचं वय आहे तीन वर्षांचं. उत्तर प्रदेशातील डेहराडून जवळील रैवालन मधे ती राहते. ती खूपच चमत्कार करून दाखवते. ती सहज सहज वृत्त-पत्रे वाचते. सुंदर अक्षरात वाक्ये लिहिते. दोन अंकी संख्यांचा गुणाकार ती लीलया करते. तिचे हवलदार वडील पत्रा नि आई मंजूषा आपल्या मुलीच्या बुद्धिमत्तेवर खुश आहेत. पण आपल्या मुलीला कोणत्याही शाळेत प्रवेश मिळत नाही याचं त्यांना दुःख आहे. जरी मुलगी बुद्धिशाली असली, तरी सरकारी नियमांचे उल्लंघन करून पाच वर्षांहून कमी वयाच्या मुलीला आपल्या शाळेत कोणी ही अधिकारी प्रवेश देऊ शकत नाहीत. तिचे आई-वडील तिला घरी शिकवायला तयार आहेत, पण कसे शिकवणार? कारण त्यांचे स्वतःचे शिक्षण दहावी पर्यंतच झाले आहे. योग्य शिक्षकांच्या देखरेखीखाली आपल्या मुलीचं शिक्षण व्हावं असं त्यांना फार वाटतं.

### स्वतःच आपलं मांस खाल्लं!

मेक्सिको मधील चौदा वर्षांच्या एका मुलाने आपल्या उजव्या हाताचं मांस खाऊन स्वसंरक्षण केलं. बरनाबे अकोस्टाचं शरीर जळत होतं. वीज पडून ही दुर्घटना झाली की विजेच्या तारेच्या स्पर्शाने हे अजून समजलेले नाही. बऱ्याच दिवसांनी तेथील रक्षक आले तेव्हा त्यांच्या लक्षात आलं की दुर्घटनेत जळलेल्या मुलाने आपल्या उजव्या हाताचं मांस खाऊन भूक शमवली होती.

### आगीशी खेळ

ओहियोतील मोरेन येथील पाच वर्षांचा मुलगा ऑस्टिन मेसनर टी. व्ही. वर कार्टून पहात बसे. दोन प्रौढ माणसे आसपासच्या वस्तूंना आग लावून आनंद लुटत आहेत असे दृश्य त्याने एकदा एका कार्टून वर पाहिले. त्याने काड्यांची पेटी हातात घेतली नि तो ही खोलीत सर्वत्र आग लावीत सुटला. त्याच्या आईने त्याला मनाई केली. पण तो सर्व काही जाळतच राहिला. त्याची छोटी बहीण आगीत मरण पावली

### हुंगणाऱ्या कुत्र्याने वाचवले!

नुकताच महाराष्ट्रात जो भयंकर भूकंप झाला, त्यात मंगलूर नावाच्या गावी अठरा महिन्यांची एक मुलगी कचऱ्यात गाडली गेली. ती पूर्ण चार दिवस कचऱ्यात राहिली. ३९ सदस्य असलेल्या एका फ्रेंच संरक्षण-दलाने हुंगणाऱ्या कुत्र्यांच्या मदतीने या मुलीचा शोध लावला. आठ फुट कचरा खोदल्यावर आत ही बेशुद्ध मुलगी सापडली.





# भाग्याचा खेळ

एका गावात एका शेतकऱ्याच्या घरी संजीवी नावाचा एक मुलगा काम करीत असे. तो बैल नि गाई-म्हशींची देखरेख करी. रोज सकाळी उठून तो आपल्या मालकाच्या घरी काम सुरू करी. मिळेल ते शिळे अन्न खाऊन तो जनावरांना चरायला घेऊन जाई.

गावाबाहेर एक पडीक बाग होती. कोणे एके काळी इथे सुरेख वृक्ष होते. वृक्षांना खूप फळे येत. पण आता त्यांची देखरेख करणारा कोणी नव्हता. बागेत सर्वत्र निरुपयोगी वनस्पती वाढलेल्या होत्या. सगळीकडे गवत माजले होते. तिथे जनावरं चरायला सोडली तर विचारणारं कोणी नव्हतं. आपल्या जनावरांना चरायला सोडून मुले झाडांवर चढत नि फळे तोडून यथेच्छ खात. संजीवी पण आपल्या जनावरांना घेऊन याच बागेत येई. जनावरं गवत चरत असत आणि मुलं संध्याकाळ पर्यंत मजेत खेळत. ते निरनिराळ्या प्रकारचे खेळ खेळत. यात संजीवीचा वेळ मजेत जाई.

अंधार पडला की मुलं जनावरांना घेऊन गावात येत.

एक दिवशी संजीवी रोजच्या प्रमाणे जनावरांना चरायला तेथे घेऊन आला. त्या दिवशी सण होता, म्हणून बाकी कोणी मुले आली नव्हती. आज सण असल्याचं संजीवीला माहीत नव्हतं, त्याला एकट्याला करमेनासं झालं. काय करावं या बाबत बराच वेळ तो विचार करीत राहिला. आपल्या विचित्र मनस्थितीत तो जनावरांना मारू लागला. त्यांना गवत खाऊ दिले नाही आणि उगाचच इकडे-तिकडे पळवीत राहिला.

संजीवीच्या अंगावर एकदम एक नाकतोडा येऊन बसला. रागाच्या भरात त्याने नाकतोड्याला मारून टाकलं. इतकं करून ही त्याचं मन शांत झालं नाही. त्याने त्या मेलेल्या नाकतोड्याचे दोन तुकडे केले, आणि त्यांना दूर फेकून दिले. ते एका झाडावर पडले. अन् काय आश्चर्य? नाकतोडा जिवंत झाला नि उडून गेला.

हा चमत्कार पाहून संजीवीला आश्चर्य वाटलं. नाकतोड्याचे तुकडे त्याने जिथे टाकले होते, ती जागा त्याने लक्षपूर्वक पाहिली. तिथे अनेक छोटी-छोटी झाडं होती. भरगच्च पानं भरलेली होती. पानांचा आकार थोडा निराळाच दिसत होता. ती पाने अतिशय मऊ होती. त्याला वाटलं या पानांचाच काही गुण असल्याने नाकतोडा जिवंत झाला. संजीवनी वनस्पतीबाबत त्याने बरेच ऐकले होते, म्हणून त्याला वाटले ही सर्व संजीवनीची पाने असली पाहिजेत. त्याने ही जागा नीट पाहून ठेवली नि लक्षात ठेवण्याचा प्रयत्न केला. वेळ आली तर आपल्याला या वनस्पतीचा उपयोग होईल असा त्याने विचार केला.

संजीवीचा संजीवनी वनस्पतींवर तसा विश्वास नव्हता. त्याच्या मनात विचार आला, जो नाकतोडा उडत पळून गेला, तो तो मेलेला नाकतोडा नसावा. बागेत बराच वेळ हिंडून त्याने एक टोळ शोधून काढला आणि त्याला मारून त्या संजीवनी वर ठेवून दिला. एका क्षणात तो टोळ ही जिवंत झाला नि उडून गेला. आता मात्र संजीवीला वाटले की ही संजीवनी वनस्पतीच!

दुसऱ्या दिवशी सगळी मुलं जेव्हा आपल्या जनावरांना बागेकडे घेऊन निघाली तेव्हां



संजीवीने दोस्तांना सांगितलं—''मी संजीवनी वनस्पति शोधून काढली आहे आणि तिच्या साह्याने मेलेला किडा पुन्हा जिवंत होतो. मी नाकतोडा अन टोळाला काल जिवंत केले!'' सर्व मुलांनी त्याची मनसोक्त थट्टा केली नि त्याला रडकुंडीला आणलं. या थट्टेने त्याची घोर निराशा झाली आणि त्याने आपलं रहस्य आपल्या जवळच ठेवून दिले. तरी पण संजीवनी वनस्पतीबाबतचे विचार नेहमी त्याच्या मनात येऊ लागले.

काही दिवस गेले. एके दिवशी सकाळी गावाचा सरपंच मेला. सरपंचाचं गावात एक मोठ्ठं घर होतं. तो श्रीमंत होता आणि दान-धर्मात ही पैसे खर्च करी. लग्न करून घर-संसार थाटणारांना तो खूप मदत करी.

२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली गोष्ट.

त्यामुळे लोक त्याला फार मान देत. त्याच्या मृत्यूमुळे लोक खूप हळहळले.

तो महिनाभर आजारी होता, नि त्यातच त्याचा अंत झाला. वैद्यांनी त्याच्यावर खूप औषधोपचार केले. शक्य ते सर्व प्रयत्न केले. पण त्यांना यश आले नाही.

सकाळी सरपंचाच्या घरासमोर खूप गर्दी जमली. काही लोक सरपंचाची प्रशंसा करीत होते, तर काही म्हणत होते—जो जन्माला आला तो एक दिवस मरणारच. शास्त्रीजी म्हणाले—वैद्य औषधे देऊ शकतात. बिचारे प्राण कोठून देणार?

सरपंचाच्या मृत्यूची वार्ता संजीवीच्या कानांवर पडली. त्यावेळी तो जनावरांना चरण्यासाठी बागेकडे घेऊन चालला होता. जे काही घडलं, ते समजून तो गावकऱ्यांना म्हणाला—"सरपंचाला जिवंत करण्याचा उपाय मी सांगतो. त्या उजाड बागेत संजीवनी वनस्पति आहे." असे म्हणून त्याने आपले अनुभव गावकऱ्यांना सांगितले.

बऱ्याच लोकांचा त्याच्यावर विश्वास नव्हता. दोन-तीन लोक त्याच्या बरोबर निघाले, पण त्यांना ही विश्वास नव्हताच! त्यांच्या दृष्टीने हा एक तमाशा होता. संजीवी पुढे आणि मागे मागे गावकरी चालू लागले. संजीवनी वनस्पति कोठे आहे हे संजीवीला माहीत होतं. रोज एकदा तिथं तो ती पहात असे. म्हणून तो थेट तिथे पोचला. पण आश्चर्य की आज ती वनस्पति नि पानं त्याला कुठे दिसेनात. त्याला ही संशय आला आणि तो बागेत संजीवनी शोधत राहिला.

गावकऱ्यांची निराशा झाली. ते संजीवीला शिव्या-शाप देऊ लागले. संजीवीला पण संजीवनी वनस्पति न दिसल्यामुळे वाईट वाटलं. त्याने बागेत खूप शोधाशोध केली, पण व्यर्थ! त्याला कोठे ही वनस्पति दिसली नाही.

मेलेल्या सरपंचाच्या भाग्यात पुन्हा जिवंत होणं नव्हतं. म्हणून समोर असलेली संजीवनी त्याला दिसली नाही. भाग्याचा खेळ काही विचित्रच असतो!



# बहुरूपा वसुंधरा

## साप मंद गतीने सरपटतात



साप जोरात पळतात ही भ्रामक कल्पना आहे. खरं म्हणजे साप हळू हळू सरपटतात. जेव्हा एकादी खाण्याची वस्तु पकडायची असेल तेव्हा ते जलद गतीने जरूर धावतात. जमिनीवर सरपटणाऱ्या सापांमधील काळा साप ताशी दहा मैल वेगाने सरपटतो.

## बटाट्यात अंकुर



पूर्ण विकसित बटाटा काही दिवस तसाच ठेवला तर त्यात छोटे-छोटे खड्डे पडतात व त्यातून अंकुर उगवतात. या अंकुरांना आवश्यक ते खाद्य-पदार्थ त्या बटाट्यातूनच मिळतात, ज्यामुळे त्यांचा उत्तरोत्तर विकास होतो.

## उडणारा 'कोल्हा'

वटवाघळे फार छोटी असतात. त्यांची डोकी लहान उंदरांच्या डोक्यासारखी असतात. पण 'कवोद' नावाच्या वटवाघळाचं डोकं कोल्ह्याच्या डोक्यासारखं असतं. म्हणून यांना उडणारा 'कोल्हा' म्हणतात. ही वटवाघळे लहान कोल्ह्याच्या आकारमानाची असतात. यांचे पंख सहा फूट लांबीचे असतात. साध्या छोट्या वटवाघळांच्या चालीवर हे उडू लागतात. या उडणाऱ्या कोल्ह्यांची दृष्टि तीक्ष्ण असते. हे 'कोल्हे' आपल्या देशात काही ठिकाणी आढळतात.



# अध्यक्षाने दिलेली वचने



आपल्या देशाच्या निकटवर्ती मित्रांपैकी एक आहेत मामून अब्दुल गयूम. मागील नोव्हेंबर मध्ये त्यांना सर्वसम्मतीने मालदीवचे अध्यक्ष म्हणून निवडण्यात आले. चौथ्यांदा त्यांना हे अध्यक्षपद मिळत आहे. (स्टेट मजलिस) संसदेने केवळ त्यांचेच नाव या पदासाठी प्रस्तुत केल्यामुळे त्यासाठी खास निवडणूक अशी झालीच नाही. हां, जनतेचा अभिप्राय मात्र यासाठी विचारता १ ऑक्टोबरला ९२ टक्के जनतेने संसदेचा हा प्रस्ताव मान्य केला.

जनतेचा हा अभिप्राय कळण्यापूर्वी गयूम ही निवडणूक लढणार नसल्याचे समजले होते. कारण त्यांचा मेहुणा व व्यक्तिगत सल्लागार इलियास इब्राहिमने आपलेच नाव संसदेने प्रस्तुत करावे, यासाठी खूप प्रयत्न केले होते. परन्तु त्यांच्यावर काही आरोप दाखल होऊन ते सिद्धही झाले व त्यांना देशातून पंधरा वर्षे बहिष्कृत करण्यात आले. आता अध्यक्षपदासाठी गयूम यांच्यापेक्षा अधिक लायक व्यक्ति देशात उरलीच नाही.

निवडणुकीच्या आधी गयूम यांनी आपल्या देशाच्या जनतेला अनेक वचने दिली. त्यापैकी प्रमुख म्हणजे, 'देशाच्या संविधानाला एक निश्चित रूप देईन; अधिकारचे विकेन्द्रीकरण करीन; निवडणुकीची पद्धत सुधारीन?' ते असे म्हणाले की, 'देशात विविध राजनैतिक दलें राहू शकतील आणि त्यांचे सभासदही अध्यक्ष पदासाठी निवडणूक लढू शकतील. विशेषतः तरुण-तरुणींना प्राधान्य दिले जाईल.' तरुणांनी मादक औषधे सेवन करण्याचा त्यांनी तीव्र निषेध केला. त्यांनी असे सांगितले की गेल्या तीन वर्षात १४ ते १७ वर्षांच्या तरुण-तरुणींत मादक पदार्थांच्या उपयोगाचे प्रमाण वाढत आहे. गयूमने अशा युवकांना आव्हान केले की, 'या मादक पदार्थांपासून दूर रहा. स्वतःला वाचवा आणि आरोग्यवान राहून आपल्या देशाच्या विकासाला मदत करा.' ही गंभीर समस्या सोडवण्याचा भार त्यांनी रशीद युसुफ नावाच्या महिलेवर सोपवला.

जगातल्या लहान-लहान स्वतन्त्र राष्ट्रांपैकी मालदीव हे एक गणराज्य आहे. हे राज्य जवळ जवळ १३२ वर्ग कि. मी. इतके मोठे आहे. हा देश म्हणजे १२०० बेटांचा एक समूह आहे. त्यापैकी फक्त २०० बेटांवरच मनुष्यवस्ती आहे. त्यातले कोणतेच बेट १३ वर्ग कि. मी. पेक्षा मोठे नाही.

मालदीवचा प्राचीन इतिहास स्पष्टसा माहीत नाही. असे म्हटले जाते की ई. स. पू. चौथ्या शतकात




भारतातून द्रवीड लोक प्रथम तेथें गेले. यानंतर अुत्तर भारतातले काही लोक येथे आले. याशिवाय श्रीलंकेतीलही काहीजण तेथे जाअून राहू लागले. आणि तेथे बौद्ध धर्माचा प्रसार होअू लागला. बाराव्या शतकात तेथील राजाने मुस्लीम धर्म स्वीकारला अन् तेथील जनतेलाही आदेश दिला कि त्यांनीही मुस्लीम धर्मच स्वीकारावा! त्यानंतर तिथे काही मशिदी ही बांधण्यात आल्या.

१८८७ मध्ये ही बेटे ब्रिटिशांच्या ताब्यात गेली. १९६५ मधे त्यांनाही स्वातन्त्र्य मिळाले व १९६८ मधे ते प्रजासत्ताक राज्य बनले. त्याच वर्षी इब्राहीम नसीर तेथील अध्यक्ष बनले व १९७८ पर्यन्त त्या पदावर राहिले. त्यांच्यानन्तर गयूम हे त्या गणराज्याचे अध्यक्ष बनले.

## या राज्याची काही वैशिष्ट्ये

* मालदीवमधील संपूर्ण जनसमुदाय एका मोठ्याशा स्टेडियम मधे मावेल इतकाच आहे.
* लोक जास्त करून इंग्रजी बोलतात. अरबी शब्द मिसळलेली सिंहली सारखी भाषाही इथे प्रधानतः बोलली जाते.
* या देशात राजनैतिक दले व प्रत्यक्ष कर नाहीत.
* समुद्रतटावरील संरक्षक दलाशिवाय प्रत्यक्ष असे रक्षक दल तेथे अस्तित्वात नाही.
* देशात तुरुंग नाहीत,कारण हिंसात्मक अपराध नसल्यातच जमा आहेत.
* देशाची आर्थिक स्थिति मत्स्योद्योग व पर्यटन विभागावर अवलंबून असते.



# राजाची झोप

सुवर्णदेशाच्या राजाला झोपेत एक स्वप्न पडले. स्वप्नात त्याला आचारी नलमहाराज दिसले. नलाने स्वतःसाठी एक पक्वान्न बनवले. त्याची चव मोठी मजेदार अन् निराळीच होती. लगेच दुसऱ्या दिवशी तो मुदपाक खान्यात गेला.

तेथे पोचल्यावर राजाला असे दिसले की आचाऱ्याने एक पक्वान्न बनवले असून, स्वतःच तो पदार्थ ताटलीत घेअून खात बसला आहे. पक्वान्नाचा सुगन्ध तर अगदी स्वप्नातल्या पक्वान्नासारखाच होता. राजाने त्या पक्वान्नाबद्दल आचाऱ्याला विचारले.

आचारी मना करत असतानाही राजाने भांड्यातले थोडे पक्वान्न घेअून चाखले. राजाला ते फारच आवडले.

पण खरोखरच त्या रात्री राजाला झोप येईना. पोटात आग होत असल्यासारखे त्याला वाटले. खवखवल्या सारखे वाटत होते. पलंगावरून त्याने महाराणीला, आपल्याला झोप येत नसल्याबद्दल सांगितले.

झोपेत पेंगत राणी म्हणाली, "राजकुमार सुखोपभोगात मग्न आहे, याबद्दल तुम्ही चिन्ता करू नका. तो आता विद्येत पारंगत झाला आहे अन् आपली जबाबदारीही नीट ओळखत आहे. त्याचं वयच चैन करण्याचं आहे, म्हणुनच असा आरामात रहातोय. अजून काही दिवस हे असंच चालणार."

राजकुमार सुखविलासात दंग असल्याचे राजाला अजून माहीतच नव्हते. राणीचे बोलणे ऐकून त्याला आश्चर्य वाटले. राजपुत्राच्या बाबत आणखी काही जाणायची त्याला अुत्सुकता होती, पण राणीला झोप लागून गेल्यामुळे त्याला काहीच कळू शकले नाही. झोप बिघडल्यामुळे राजाने राजवैद्याला बोलावून घेतले. वैद्याबरोबर सेनापती आणि मन्त्रीही आले.

आकाश फडणीस



वैद्याने नाडी पाहून ही झोप न येण्याचे कारण कळत नसल्याचे सांगितले. शरमेमुळे आपण खाल्लेल्या पक्वान्नाबद्दलही राजा काही सांगू शकेना.

"काही देशद्रोही माणसांनी शेजारच्या राजाशी हातमिळवणी केली आहे. अन् त्यांचा आपल्या राज्यावर हल्ला करून ते ताब्यात घ्यायचा विचार आहे. पण यासाठी संत्रस्त होऊन आपण आपली झोप का उडवून घेत आहात महाराज? आपणही त्यांच्या विरुद्ध काही योजना आखून त्यांच्या नांग्या ठेचून काढू." सेनापतीने आश्वासन दिले.

आता पाळी मन्त्र्याची, तो म्हणाला, "सरकारी नोकरांच्यात लाचलुचपत फार वाढली आहे. आपण जनतेसाठी ज्या सोयी उपलब्ध करून देत आहोत, त्या त्यांच्यापर्यन्त पोचतच नाहीयेत. त्यामुळे जनता फार असंतुष्ट आहे; अन् ती असंतुष्टता दिवसेंदिवस वाढत आहे. पण यासाठी काळजीत पडून आपण आपली झोप घालवू नका. आम्ही लवकरच यावर उपाय करू."

राजाने नन्तर या सर्वांना निरोप दिला. झोप न येण्याचे यातले एकही कारण नाही, हे त्याला चांगले माहीत होते. 'खरे कारण आपल्या आईला सोडून कोणाला सांगणार?' असे वाटून तो सरळ राजमातेच्या महालात गेला.

राजमाताही त्यावेळी जागीच होती. ती स्वतःशीच काहीतरी पुटपुटत होती. मुलगा आलेला पहाताच ती म्हणाली, "तुला झोप येत नाही हे कळलेय मला. मुलगा सुखविलासात दंग आहे, खजिना बराच रिकामा आहे, जवळचा राजा आक्रमण करायच्या विचारात आहे, अन् देशात सर्वत्र अनागोंदी माजली आहे—याबद्दल विचार करत राहिलं तर झोप तरी येणार कशी? मी तर तुझ्या बाबांनीही तुला काही सल्ला द्यावा म्हणून त्यांच्या अनेकदा मागे लागून पाहिलं, पण त्यांनी मुळी माझ्या बोलण्याकडे लक्षच नाही दिलं. पहा नं, ते तर आरामात झोपले आहेत. तुझी परिस्थिती मला कळतेय. त्याचाच विचार करत बसलेय मी. झोपच येत नाहीय मला. तुझ्या बाबांच्या बेपर्वाईबद्दल फार वाईट वाटतंय मला!"

"माते! माझ्या निद्राभंगाचं कारण यापैकी कोणतंच नव्हे. माझ्या जेवणात बदल झाल्यामुळे मला झोप येत नाहीय." राजा म्हणाला.

यावर राजमाता हसून म्हणाली, "हो, तुझी ही लहानपणापासूनचीच खोड आहे. एवढं वय झालं, पण स्वभावात काही फरक नाही पडला! आपल्या अस्वस्थतेचं कारण तुझ्या स्वतःच्या लक्षातच येत नाही! राजा जेंव्हा आरामात झोपतो, तेंव्हा समजावं की देशाला कशाची अडचण नाहीय. अडचणी असूनही जो राजा मजेत झोपतो, तो राज्याला त्रासदायक असतो, राज्याचं नष्टचर्य आलंच असं समजावं. तुझ्या वयात तुझ्या पित्यानंही अशीच न झोपता खूप मेहनत केली. पण आता त्यांचा तुझ्यावर पूर्ण विश्वास असल्यानेच ते असे मस्त झोपलेत. तुझ्या अडचणींचा विचार मनात येतो, तेंव्हा माझा मात्र मुळीच डोळा लागत नाही. माझीच जर स्थिती अशी आहे, तर तुझ्यावर काय बेतत असेल! आपल्या अडचणींवर तोड काढ, म्हणजेच तुला सुखानं झोप येईल."

एक शब्दही न बोलता आईच्या पाया पडून राजा तेथून बाहेर पडला. आजपर्यन्त त्याला वाटत होतं की, आपल्या कौटुंबिक समस्या आई सोडवते अन् राज्याची देखभाल कोषाध्यक्ष, सेनापती व मन्त्री करत असतात. मोठ्या विश्वासाने तो निश्चिन्त रहात असे. पण आताच असे लक्षात आले की, 'स्वतः राजाच या अडचणींचा गंभीरपणे विचार करत असतो' अशी त्या सर्वांची समजूत आहे.

इतकी गंभीर परिस्थिती असूनही आपण इतके दिवस सुखं भोगत राहिलो आणि निर्विघ्न झोपत राहिलो याची राजाला शरम वाटली. कळत न कळत आचाऱ्याने राजाचे डोळे उघडले. याबद्दल राजाने त्याला मौल्यवान भेट दिली.

इकडे आचाऱ्याला, भीती पडली की आपल्या पक्वान्नामुळेच राजाला झोप येत नाहीय. पण शिक्षेऐवजी त्याला जेंव्हा इनाम मिळाले, तेंव्हा त्याच्या आनन्दाला पारावार राहिला नाही.





# शनीची साडेसाती

बीरवाडीला मोरोपन्त नावाचे एक पुरोहित रहात असत. त्यांना फक्त आपल्या पौरोहित्यासंबंधी मन्त्र वगैरे येत असत, पण ते म्हणत की आपण ज्योतिष-शास्त्राचे मोठे प्रकांड पंडित आहोत, नि भूत, वर्तमान व भविष्य यांची अगदी बरोबर माहिती सांगू शकतो. गावची माणसे त्यांच्या सांगण्यावर विश्वास ठेवून त्यांना 'ज्योतिषी' म्हणून मान देत.

कधी-कधी लोकांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन म्हणत की-गावात काही अशुभ होणार आहे, जनावरात साथीचा रोग पसरणार आहे-इ. आणि नन्तर ते म्हणत की हे अमंगल टाळण्यासाठी यज्ञ करावा लागेल, पूजापाठ करावे लागतील. अशा प्रकारे त्यांची छान पोळी पिकत असे.

अशातच श्रीकान्त नावाचा एक तरुण शिक्षक म्हणून बीरवाडीला आला. मोरोपन्तांच्या जवळच्या घरातच तो राहू लागला. लोकांनी जेंव्हा त्याला सांगितले, की मोरोपन्त हे नाणावलेले ज्योतिषी आहेत, तेंव्हा ते ऐकून घेऊन तो चुप राहिला.

एके दिवशी संध्याकाळी गप्पांच्या ओघात मोरोपन्त श्रीकान्तला म्हणाले. "आमच्या घरात पौरोहित्य वंशपरंपरेने चालू आहे. माझे आजोबापणजोबा सुद्धा भिक्षुकीच करत असत; म्हणूनच केवळ ती परंपरा चालवण्यासाठी मीही भिक्षुकी करतो. पण खरं तर मी ज्योतिष-शास्त्राचा गाढा अभ्यासक आहे. तुझा चेहरा पाहूनच मी तुझं असं भविष्य वर्तवतोय की एका महिन्यातच तुझं प्रकृतिमान खूप खालावणार आहे अन् तुझी आर्थिक स्थितीही बिघडणार आहे. याचं कारण एकच आहे–ते म्हणजे शनीची साडेसाती!"

पण हे भविष्य ऐकून श्रीकान्त जराही घाबरला नाही. त्याने विचारले, "मग या साडेसातीतून वाचायचा काही अुपाय नाही का?"

"आहे तर! असल्या अडचणीतून निभाअून जाण्यासाठीच तर आपल्या पूर्वजांनी ज्योतिषशास्त्र निर्माण केलंय नं! तुला या शनीची शान्ति करायला हवी. या शान्तियज्ञाच्या कृत्यांपैकी प्रमुख म्हणजे माझ्यासारख्या पुरोहिताला गोदान देणे!" मोरोपन्त अुवाच.

क्षणभर विचार करून श्रीकान्त म्हणाला, "गोदान करायचं म्हणजे कमीत कमी पाचशे रुपयांचा खर्च आला! मज जवळ तर फक्त दोनशेच आहेत."

त्याच्या या अुत्तरावर हसून मोरोपन्त म्हणाले, "किती भोंडा आहेस तू! तुला पाचशे रुपये खर्चायला थोडाच लावीन मी? आपण असं करू. माझ्याकडे एक गाय आहे. ती मी तुला दोनशे रुपयांना देतो. येता शनिवार चांगला दिवस आहे. पूजेनन्तर ती गाय तू मला दान दे म्हणजे झालं."

श्रीकान्तने लगेच दोनशे रुपये काढून मोरोपन्तांच्या हातावर ठेवले व त्यांची गाय आणून आपल्या घरी बांधली. मोरोपन्त खूष झाले की, "देणं नास्ती, घेणं नास्ती. फुकटात दोनशे मिळतायत, अन् पुन्हा गाय तर आपलीच होणार!"

चार दिवसांनंतर शनिवारी श्रीकान्तच्या घरी पूजा वगैरे यथासांग झाली. नंतर मोरोपन्त म्हणाले, "हं आता गोदान कर."



श्रीकान्त आढेवेढे घेत म्हणाला, "पण मोरोपन्त गुरुजी! साडेसातीमुळे मी खरंच का आजारी पडेन? माझं आर्थिक नुकसान होईल?"

हे प्रश्न ऐकताच मोरोपन्त भलतेच चिडले अन् आसपासच्या लोकांना बोलावून म्हणाले, "ऐकलंत याचं बोलणं? तुम्हाला सर्वांना तर माहीतच आहे की ज्योतिषशास्त्रात मी चांगलाच पंडित आहे. याचं दुर्भाग्य म्हणा की कुंडलीचा प्रभाव म्हणा, याचा माझ्या ज्ञानावर विश्वास दिसत नाहीये." अन् श्रीकान्तच्या चेहऱ्याकडे रोखून पहात म्हणाले, "म्हणतातच की ज्याच्या त्याच्या कर्माप्रमाणे ज्याला त्याला बुद्धि होते. मी-तर अगदी ठामपणे सांगतोय की, तू गोदान केलं

प्रिणिता सलागरे

नाहीस, तर हा महिना संपण्यापूर्वीच तुला शनीच्या साडेसातीचा प्रभाव दिसू लागेल. माझ्या या भविष्यावर विश्वास ठेव बघ. नंतर मग 'बैल गेला अन् झोपा केला' अशी अवस्था होईल तुझी. मग पस्तावून काय अुपयोग?''

पण मोरोपन्तांच्या या बोलण्याचा श्रीकान्तवर जरासुद्धा परिणाम होईना. अुपस्थित लोकांसमोरच मोरोपन्तांना तो म्हणाला, ''मोरोपन्त, मला असं वाटतंय की या गायीचा आणि माझा पूर्वजन्मीचा काही ऋणानुबन्ध असला पाहिजे. कारण मी आजपर्यन्त कधी असं ऐकलं नाही की पाहिलं ही नाही, पण ही गाय मला रोज दहा शेर दूध देतेय. आता कोणत्याही परिस्थितीत मी गाय दान देणार नाही. पण तुमच्या म्हणण्याप्रमाणे शनीच्या प्रभावानं माझं काही बिघडलं, तर आपल्या ज्योतिष-पांडित्यावर विश्वास ठेवून एकीच्या ऐवजी मी दोन गायी तुम्हाला दान देईन. पण एका महिन्याच्या आत मला काही झालं नाही तर तुमचं शास्त्र खोटं आहे हे सिद्ध होईल. तेंव्हा आता एक महिन्यानन्तरच गोदानाची गोष्ट करा.''

त्याच्या या बोलण्याने मोरोपन्तांचे तोंड गप्पच झाले! अुपस्थित माणसेही म्हणाली की, श्रीकान्तचे म्हणणे सयुक्तिकच आहे.

मोरोपन्त घरी पोचले. त्यांच्या मनाची शान्ती नष्ट झाली. आपल्या बायकोला ते म्हणाले, ''आपल्या गावात नवा आलेला मास्तर श्रीकान्त मोठा नास्तिक दिसतोय. माझं भविष्य खरं होणार नाही, हे तर मला माहीतच आहे. पहाता-पहाता माझी हजार रुपयांची गायही हातची गेली! दोनशे रुपयात ती खरेदी करून चांगलंच नुकसान केलंन यानं माझं! अन् शिवाय आता गावच्या लोकांचाही माझ्या ज्योतिषावरचा विश्वास अुडणार!''

मोरोपन्तांची बायको त्यांचे सान्त्वन करत म्हणाली, ''तुम्ही इथल्या अन् जवळपासच्या गावांचं पौरोहित्य करता ना? त्यात होणाऱ्या प्राप्तीत आपलं घरचं छान भागतं की! आपण चांगले सुखात राहू शकतो. मग आता ज्योतिषी असल्याचं हे ढोंग कशाला हवं?''





# अद्‌भुत फूल
## १०

(नागपुरीचा राजा अुत्तुंगच्या साहसी स्वभावावर खूश झाला अन् त्याने अुत्तुंगबरोबर मदतीसाठी सैनिक द्यायचे कबूल केले. तेथील राजकुमारी मल्लिका हिने अुत्तुंगला सांगितले की तिचा मामा नागपुरीचे सिंहासन हस्तगत करायच्या विचारात आहे अन् त्याचे कारस्थान हाणून पाडण्यासाठी तिने अुत्तुंगजवळ मदतीची अपेक्षा व्यक्त केली. राजकुमारीच्या दालनातून 'शताब्दि फुले' गायब झाली. राजाला या गोष्टीचे मोठे आश्चर्य वाटले. त्याने सेनापतीला ती फुले व ती नेणाराला शोधून काढायची आज्ञा केली. —यानन्तर)

राजभवनाबाहेर येतायेता सेनापतीने विचार केला की शताब्दी फुले शोधून काढायची कामगिरी दलपती नागसिंह याच्यावर सोपवावी. परंतु दलपतीचे शहरात रहाणे राजाला नापसन्त असल्याची आठवण झाल्यामुळे सेनापतीने तो विचार सोडून दिला. नागसिंहवर ती जबाबदारी सोडल्यामुळे राजा नक्कीच नाराज झाला असता.

शताब्दी फुलांचा विचार करतकरतच सेनापती आपल्या भवनात पोचला. थोड्याच वेळात अुत्तुंगही तेथे येअून त्याला नमस्कार करून म्हणाला. ''केंव्हा निघायचं आम्ही? यासाठी एकादा शुभ दिवस पहायचाय का? माझी नाव समुद्रकिनारीच आहे. बाकीच्या नावा तयार आहेत का? जी फुलं मी बरोबर आणली होती, ती सोडून बाकीची फुलं काबुईच्या घरात आहेत. केंव्हा निघायचं हे समजलं तर ती फुलं काबुईच्या घरातून



आपण मागवून आणू शकू." अत्तुंगच्या आवाजातून अुत्साह ओसंडत होता.

"नावा तयार होत आहेत; तुझ्या बरोबर पाठवायच्या सैनिकांची निवड करून टाकू. अगदी पट्टीचे सैनिक तुझ्या दिमतीला देण्याचा विचार आहे आमचा. तुझ्याबरोबर जाण्यासाठी दलपती नागसिंहला मुद्दाम बोलवून घेतलं आहे. केंव्हा निघायचं, कसं जायचं अन् राक्षसप्राण्याशी सामना कसा करायचा हे ठरवण्यासाठी नागसिंह इथेच येणार आहे. त्याचा आणि तुझा एकदा चांगला परिचय करून द्यायला हवा." सेनापतीने सांगितले.

"केंव्हा येणार नागसिंह?" अत्तुंगने पृच्छा केली.

"आतापर्यन्त खरं तर यायलाच पाहिजे होता. अजून का नाही आला, काही कळत नाही. कुठल्या तरी महत्त्वाच्या कामात तो गुंतलेला दिसतोय!" सेनापती हे बोलत असतानाच नागसिंह तेथे येअून पोचला.

त्याला पाहून अत्तुंगशी त्याचा परिचय करून देत सेनापती म्हणाला, "हाच तो तरुण अत्तुंग. तुला याच्याबद्दल सांगितलेलंच आहे. तूही आपल्याबरोबर येणार हे कळल्यापासून मोठा खूश झालाय तो. याला आपल्याबरोबर घेअून जा अन् प्रवासाबद्दल सारं निश्चित करा. केंव्हा, कसं जायचं, कोणची काळजी घ्यायची वगैरेबद्दल आपसात चर्चा करून काय ते नीट ठरवा. पण एक गोष्ट मात्र ध्यानात ठेव. याचं काम सफल झालेलंच पाहयचं आहे आम्हाला. दोघं ठरवून केंव्हा निघणार आहात ते आम्हाला कळवा. एकादा छान दिवस शोधून काढा. काम नक्की फत्ते झालं पाहिजे."

नागसिंह हसून बोलला, "तुमच्या इच्छे-प्रमाणेच सारं होईल, सेनापती महाराज! समुद्रप्रवासाबाबत सारं नक्की ठरवून आज संध्याकाळपर्यन्त तुम्हाला कळवायला स्वतःच येअू." अन् अत्तुंगला अुद्देशून तो म्हणाला, "चल या?" असे बोलून तो बाहेर जायला निघाला. अत्तुंगही त्याच्या पाठोपाठ चालू लागला. दोघे जवळच्याच सैनिकतळावर पोचले. आपल्या दालनात पोचेपर्यन्त नागसिंहाने तोंडातून एकही शब्द काढला नाही. त्याच्या दालनात जे एकच आसन होते, त्यावर तो स्वतः बसला अन् अत्तुंगला त्याने समोर पडलेल्या एका फळीवर बसायला सांगितले.

अत्तुंग बसल्यावर नागसिंह त्याला म्हणाला, "केवळ राजाच नव्हे, तर सर्वचजण तुझ्या सफरीचं मोठं कौतुक करत आहेत. आता मला सांग तरी, इतकी तुझी धाडसाची कल्पना तरी काय आहे? तुझी सर्व हकीगत जाणण्याची मला फार अुत्कंठा आहे." त्याच्या आवाजात व्यंग ओतप्रोत भरलेले होते.

ते व्यंग अत्तुंगच्या लक्षात आले. थोडा वेळ त्याच्या मनात चलबिचल झाली. पण ताबडतोब त्याने स्वतःला सावरले आणि जराही संकोच किंवा भय चेहऱ्यावर न आणता आपल्या प्रवासाचे सारे वर्णन व कारण त्याला सांगितले. ते ऐकल्यावर नागसिंह म्हणाला, "इतक्या लांबून एकटाच आलेला तू मोठाच धाडसी दिसतोस! मग यापुढली आपली यात्रा काय तू एकट्यानंच नाही करू शकत? की आताच तुझं धैर्य, शौर्य सारं संपुष्टात आलं? मला तर वाटतं तू एकटा हे सर्व करायला समर्थ आहेस. माझ्या मदतीची तशी तुला फार अपेक्षा नसावी." त्याच्या स्वरातले व्यंग स्पष्ट कळत होते.

"मी तर एकटाच निघालो होतो. नागपुरी नावाचं एकादं राज्य अस्तित्वात असल्याचं मला माहीतही नव्हतं. पण इथला राजा मात्र फार दयाळू आहे. त्यांनीच ममतेनं माझ्याबरोबर काही सैनिक पाठवायचा आग्रह धरला. माझा अुद्देश इतकाच आहे, की मानववस्तीपासून त्या राक्षसप्राण्याला जितकं दूर नेअून सोडता येईल, तितकं सोडावं. असं करण्यानं केवळ माणिक्यपुरीच नव्हे, तर तुमची नागपुरीही सुरक्षित राहील. आपण मला आपल्या कार्यात शक्य ती मदत अवश्य करावी." अत्तुंग निर्भयते-ने बोलला.

"हुं! नागपुरीची चिन्ता सोड रे! तो राक्षसप्राणीच काय, पण कोणीच आमच्या केसालाही धक्का लावू शकत नाही. आपल्या राज्याचं रक्षण आमचं आम्ही करू शकतो.





त्यासाठी तुझ्या मदतीची काही जरूरी नाही आम्हाला. आता तू त्या प्राण्याबद्दल बोल. तू तो प्राणी पाहिल्याचं सांगतोयस; पण असा कोणी राक्षसप्राणी असेल, असू शकेल हेच मला अुमगत नाहीय. तुझी ही कपोलकल्पित कहाणी खरी मानायला आम्ही काही वेडे नाही आहोत." व्यंगाने हसत नागसिंह बोलला.

"तुम्ही विश्वास ठेवा किंवा नका ठेवू, पण ही गोष्ट शंभर टक्के खरीच आहे. मी त्या प्राण्याला स्वतःच्या डोळ्यांनी पाहृयलंय. माणिक्यपुरीच्या समुद्रतटावर त्याने केलेल्या अुत्पाताला आमचे सैनिकही साक्षी आहेत. त्यानं जिथं जिथं पावलं ठेवली, तिथली झाडं, घरं वगैरे सारं भुईसपाट झालंय. कित्तीतरी माणसं मृत्युमुखी पडली. त्यामुळेच त्या प्राण्याला जमेल तितकं दूर हाकलावं अशी आमच्या महाराजांची इच्छा आहे. आम्हाला हेही नक्की कळलंय की तो राक्षस केवळ शताब्दी फुलांसाठीच माणिक्यपुरीला येत आहे. म्हणूनच ही फुलं खूप दूर प्रान्तात घेअून जाण्यासाठी मी निघालोय. तुम्हाला जर त्या राक्षसप्राण्याची भीती वाटत असेल तर तुम्ही नका येअू बरोबर. मी एकटाच हे काम करू शकेन इतका आत्मविश्वास आहे माझ्याजवळ." अुत्तुंगने दृढतापूर्वक सांगितले.

"भीती अन् मला? राक्षसी प्राण्याला पाहून मी घाबरेन? छे, छे! भीती काय असते हे या वीराला माहीतच नाही. तू हे विसरू नकोस, की मी एक दलपती आहे. आणि प्राण पणाला लावून लढणारा योद्धा आहे." नागसिंह गर्वाने म्हणाला.

"तसे आमच्या माणिक्यपुरीत ही खूप सैनिक आणि योद्धे आहेत. पण त्या साऱ्यांनाच हे पटलंय की त्या प्राण्याच्या समोर आपल्या शक्तिसामर्थ्याचा काहीही अुपयोग होणार नाहीय. म्हणूनच आम्ही सर्वांनी एकमताने हा अुपाय शोधून काढलाय." अुत्तुंग म्हणाला.

"ठीक आहे. आता स्वतःचं वर्णन पुरे. पण हे तर सांग, की तू आणलेली फुलं आत्ता आहेत तरी कुठे? तुझ्या खोलीत आहेत ती? आहेत तरी किती ती—एक की दोन?" नागसिंहने विचारले.





"एकदोन नव्हेत, खूप आहेत. फुलनेली फुलं गोळा करून आणली आहेत मी. माझी नाव उलटली, तेंव्हा काही समुद्रात वाहून गेली. काही मी महाराजांना दिलीत अन् उरलेली काबुईकडे आहेत. निघण्यापूर्वी किती बरोबर घ्यायची आहेत आपल्याला?" अुत्तुंग अुत्तरला.

"म्हणजे याचा अर्थ असा, की मला जर ती पहायची असतील, तर मला राजवाड्यात जायला हवं?" नागसिंहने विचारले.

"होय, पण..." पुढे काही बोलण्यापूर्वी अुत्तुंग एकदम थांबला.

"का? थांबलास का? फुलं नाहीयेत की काय तिथे?" नागसिंहने मोठ्या आवाजात ओरडून विचारले.

"राजकुमारीनं ती महाराजांकडून नेली आहेत, इतकंच माहीत आहे मला! राजवाड्यात ती कुठं ठेवलेली आहेत हे मला मला नाही माहीत." अुत्तुंग म्हणाला.

"तुला त्याची चिंता करायची गरज नाही. मी स्वतःच राजाला विचारून जाणून घेईन. महाराणी माझी मोठी बहीण आहे, हे तुला माहीत आहे?" नागसिंहने हसत हसत विचारले.

अुत्तुंगने अज्ञान दाखवत अुत्तर दिले, "ओहो! हे तर मला आताच कळलं! आनन्द वाटला मला ऐकून."

"आपण निघण्याबद्दल नीट विचार करून तुला सूचना देईन मी. नन्तर आपण दोघं मिळून सेनापतीकडे जाअू. तोवर तू आपल्या अतिथिगृहात थांब. नागसिंहने सांगितले.

अुत्तुंग तेथून निघून अतिथि गृहात पोचला. कुठून काही बातमी कदाचित येईल अशा अपेक्षेत तो बसून राहिला. सगळी दुपार अशीच निघून गेली, परन्तु त्याला बोलावणेच आले नाही. संध्याकाळ झाली तरी दलपती, सेनापती, राजा किंवा राजकुमारीकडून-कोणाकडूनच काही बातमी आली नाही. राजकुमारीच्या दालनातून शताब्दी फुले नाहीशी झाल्याची बातमी त्याच्यापर्यन्त पोचलीच नव्हती. दुसऱ्या दिवशी सकाळी सूर्य वर आल्यानन्तर पहाडी जमातीचा काबुई भरभरा अुत्तुंगच्या अतिथिगृहात आला. त्याला पहाताच अुत्तुंगने अुत्सुकतेने विचारले, "काय बातमी आहे?"



"तू आणलेली शताब्दी फुलं कुठे दिसत नाहीयेत. मी आपल्या मुलीला अनेकदा बजावून सांगितलं होतं, की तू मागितल्याबरोबर फुलं पाठवावी लागतील म्हणून ती मोठ्या काळजीपूर्वक संभाळून ठेवली होती. तिनंही एकही फूल आपल्या एकाद्या मैत्रिणीला व अन्य कुणालाच दिलं नाही. आपल्याच खोलीत तिनं ती ठेवली होती. रात्री तिच्या खोलीत कोणी शिरल्याची चाहूलही लागली नाही. पण सकाळी पहिले, तर फुलं गायब! मैत्रिणींपैकी कुणी चेष्टेनं ती लपवून ठेवली असतील, म्हणून सगळ्यांना विचारूनही पाहिलं. पण त्यांनाही कुणालाच काही माहीत नाही. काही कळत नाहीये की फुलं गेली तरी कशी. काही जादूच झाल्यासारखी वाटतेय! राक्षसी प्राणी इकडे येण्याचीही काही शक्यता नाही." काबुई मोठ्या चिंतेच्या सुरात बोलला.

"समुद्रकिनाऱ्या वरच्या खडकांच्या त्या अरुन्द वाटेनं इतका मोठा प्राणी येअूही शकणार नाही. क्षणभर समजा, की तो आलाही असता, तर तो जिथे कुठे जातो तिथे सर्वत्र विनाशच विनाश पडलेला दिसतो. तेंव्हा फुलं पळवण्याचं हे काम कोणत्याही परिस्थितीत त्या राक्षसीप्राण्याचं नव्हेच!" अुत्तुंगही त्याच्याच म्हणण्यात भर घालत म्हणाला.

काबुई यावर निराशेने म्हणाला, "मग हे काम तरी कुणाचं असावं?" थोडा वेळ मौन राहून अुत्तुंग म्हणाला, "दलपती नागसिंह कालच नगरात आलेला आहे. सेनापती नि महाराजांनी त्याला



माझ्याबरोबर पाठवायचं ठरवलेलं आहे. बोलता बोलता मी त्याला म्हटलं होतं की—काही शताब्दी फुलं तुमच्याकडे आहेत. राजकुमारीनं मला सांगितलं होतं की नागसिंह नागपुरीचं राज्य मिळवायचं कारस्थान करत आहे. त्याच्यापासून महाराजांनाही धोका संभवतो. मला तर वाटतंय की त्यानंच तुमच्याकडची फुलं चोरली असावीत." नंतर त्याने काबुईला राजकुमारीचे सारे बोलणे इत्थंभूत सांगितले.

"नागसिंह राजाचा द्वेष करतो अन् नागपुरीचं सिंहासन काबीज करायच्या विचारात तो आहे हे सारं मी पूर्वीच ऐकलं होतं. असला नीच तुझ्या मदतीला देण्याचं ठरलंय ही दुर्भाग्याचीच गोष्ट! तुला त्याच्याशी फार सावधगिरीनं वागायला हवं. तू इथेच थांब, कारण दलपतीनं तुला खबर द्यायचं आश्वासन दिलेलं आहे. मी राजाकडे जाऊन फुलं नाहीशी झाल्याची खबर देतो." असे बोलून काबूई राजाकडे निघून गेला.

काबुईचे बोलणे ऐकून राजा म्हणाला, "तुझ्या घरचीही शताब्दी फुलं नाहीशी झाली? म्हणजे फक्त राक्षसप्राण्यालाच त्याची आवश्यकता आहे असे नसून ती आणखीही कुणाला तरी हवी आहेतसं दिसतंय." जरा विचार करून राजाने सेनापतीला ताबडतोब बोलावणे करायला नोकर पाठवला.

सेनापती आल्याबरोबर राजा म्हणाला, "दुर्जय, काबुईच्या घरची फुलंही नाहीशी झालीत! कोणीतरी मोठं कारस्थान रचत आहेसं वाटतंय."

"महाराज, सारंच खूप विचित्र वाटतंय. कारस्थान रचणाराचा मी लवकरच पत्ता लावीन." सेनापती बोलला.

अुत्तुंगने सांगितलेली सारीच हकिकत काबुईने सेनापतीला सांगितली.

"ओहो! असं आहे काय? शताब्दी फुलं तुझ्याही घरी असल्याचं नागसिंहला माहीत आहे तर!" डोके हलवत असे बोलून सेनापती गंभीर विचारात गढला.





## राजाचा माहूत

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडाकडे परतला. नेहमीप्रमाणे फांदीवरील प्रेत खाली अुतरवून त्याने आपल्या खांद्यावर लादले आणि तो स्मशानाची वाट चालू लागला. इतक्यात प्रेतात रहात असलेला वेताळ बोलू लागला, "राजा, तू आपलं कार्य साधण्यासाठी जो मनोनिग्रह आणि एकाग्रता दाखवत आहेस ती अविस्मरणीय अशीच आहे. तुझी तल्लीनता मला आश्चर्यात पाडत आहे. पण या साऱ्याचा अुपयोग काय? मनुष्यप्राण्याला म्हातारपण म्हणजे एक शापच. तू सुद्धा जेंव्हा म्हातारपणात पदार्पण करशील, तेंव्हा तुझं सामान्य ज्ञान, तुझी चेतना यांचा काहीही अुपयोग होणार नाही. अुदाहरण म्हणून मी तुला एका राजाची गोष्ट सांगतो, नीट ऐक. ऐकता ऐकता तुला आपला थकवाही विसरल्यासारखा वाटेल." असे म्हणून वेताळ राजा सूर्यसिंहाची गोष्ट सांगू लागला.

अुदयपूरचा राजा सूर्यसिंह हा फारच

वेताळ-कथा



पराक्रमी आणि दयाळु होता. परन्तु बिचाऱ्याला मूलबाळ नसल्याने त्याच्यानन्तर राज्य चालवायला कोणी वारस नव्हता.

असेच दु:खाचे जिणे जगत त्याने म्हातारपणात पदार्पण केले. शासनाच्या जबाबदारीचा एक भाग आता त्याने आपल्या मन्त्र्यांवर सोपवला. पण त्यामुळे राजकर्मचाऱ्यांच्यातच खूपशी लाचलुचपत सुरू झाली; राज्यात चोरांची संख्या वाढली; वाटसरूंना वाटेत अडवून लुटारू त्यांना लुटू लागले.

सूर्यसिंहच्या दरबारात भद्र नावाचा एक माहूत होता. तोही जवळ जवळ राजाच्याच वयाचा होता. खूप वर्षेपर्यन्त तो 'राजाच्या हत्तीचा माहूत' म्हणून काम करत होता.

राजाकडे जाऊन तो म्हणाला. "महाराज, मला माफ करायचे आश्वासन देत असाल तर मनातली एक गोष्ट आपल्याला संगायची इच्छा आहे."

त्याला आश्वासन देत राजा म्हणाला, "अवश्य! अगदी नि:संकोचपणे बोल काय ते!"

"महाराज, माझा पुत्र प्रताप हत्तींवर ताबा मिळवण्यात मोठा प्रवीण आहे. माझी आपणाला अशी विनंती आहे की, आपण त्याला राज्याच्या मुख्य हत्तीचा माहूत म्हणून नेमावे."

सूर्यसिंह यावर म्हणाला, "अरे मग त्यासाठी इतक्या नाकदुऱ्या काढायची काय गरज? आपल्या मुलाला एकदा आपल्या गजशाळेत यायला सांग. तो हत्तीवर ताबा मिळवण्यात कितपत पटाईत आहे ते पाहूनच घेऊ ना!"

दुसऱ्याच दिवशी प्रताप गजशाळेत पोचला. तिथे कालमेघ नावाचा एक हत्ती होता. तो मोठा हट्टी आणि मस्तीखोर होता.त्याच्यावर काबू मिळवणं फारच कठीण आहे-असे सर्वांना वाटत असे. प्रतापला आज्ञा केली गेली की त्याने या कालमेघवरच स्वार होऊन राजप्रासादाला प्रदक्षिणा घालावी."

प्रताप जवळ आलेला पहाताच कालमेघ सोंड गरगरवत जोराने चित्कारला. पण त्याला जराही न भिता प्रताप चपळाईने उडी मारून त्याच्या गंडस्थळावर स्वार झाला आणि हातातल्या अंकुशाच्या मदतीने



त्याने हत्तीवर तावडतोबच ताबा मिळवला. नंतर हत्ती मुकाट्याने त्याच्या अधीन होऊन राजप्रासादाला प्रदक्षिणा घालू लागला.

प्रतापचे नैपुण्य पाहून राजाने त्याला आपल्या राज्याच्या वज्रदन्ती नामक प्रमुख हत्तीचा माहूत बनवले.

दरवर्षीप्रमाणेच त्या वर्षीही सूर्यसिंहच्या वाढदिवसानिमित्त राजधानीतले सगळे रस्ते सजवण्यात आले. सजवलेल्या हत्तीच्या हौद्यात बसून रस्त्यातून जाणाऱ्या राजाचे दर्शन घेण्यासाठी लोग रांगेने उभे होते.

राजा हौद्यात बसल्याबरोबर प्रतापने हत्तीला हळूच पुढे सरकवले. त्या वेळी आकाशात काळे ढग दाटलेले होते. सडकेच्या दोन्ही बाजूंना उभे असणारे प्रजानन राजाला पहाताच हर्षाने त्याचा जयजयकार करू लागले.

रस्त्यांवर काही काही ठिकाणी स्वागतासाठी तोरणे बांधलेली होती. हत्ती त्यांच्याखालून जाऊ लागला. एका मोठ्या कमानी जवळ तो पोचला आणि अचानक कडकडाट होऊन वीज त्या कमानीवरच कोसळली. ती कमान हत्तीवर कोसळणार इतक्यात शिताफीने अंकुश चालवून प्रतापने हत्तीला सावध करून झरकन पुढे काढले अन् राजा जणू मृत्युमुखातूनच वाचला!

तसे तर हळूहळू चालत असलेल्या हत्तीला एकदम वेगात पळवणे ही गजविद्येतील अत्यन्त अवघड गोष्ट मानली जाते. त्यासाठी खूपच समयसूचकता, मनोधैर्य अन् सामर्थ्याची गरज असते. प्रतापमधले हे गुण पाहून सूर्यसिंहने त्याची मनोमन खूपच





तारीफ केली.

अंत:पुरात पोचल्याबरोबर राजाने मन:पूर्वक प्रतापची प्रकट स्तुति केली आणि त्याला म्हटले, "माग! काय मागशील ते तुला द्यायला मी तयार आहे. माझं हे वचन समज."

आता प्रताप विचारात पडला. एकाच वेळी त्याच्या मनात तीन इच्छा अुफाळून आल्या. पहली-आपला मित्र जनार्दन याच्यासाठी. या जनार्दनने प्रतापबरोबरच गुरुकुलात शिक्षण घेतले होते. नन्तर त्याने राजदरबारात नोकरीसाठी खूप प्रयत्न केले. पण सर्व निष्फळ ठरले होते. आता प्रतापला वाटले की त्याला नोकरी मिळवून देणे हे आपले मित्रकर्तव्य आहे.

दुसरी—प्रतापच्या जवळच रहाणाऱ्या वीरदासचे घर डाकूंनी लुटले होते. नगरच्या अुच्च अधिकाऱ्यांकडे त्याने तशी तक्रारही नोन्दवली होती. चोर तर मिळाले नाहीतच, पण त्याला अन्य कुठल्या प्रकारची मदतही पोचवण्यात आली नव्हती. तेंव्हा शेजारधर्म म्हणून त्याला मदत करणे .

तिसरी—सुधर्मा हे प्रतापचे लहानपणचे गुरुजी. ते आजारी पडले. अनेक वैद्यांचे अुपचार होअूनही काही अुपयोग झाला नाही. आपले राजवैद्यच त्यांना बरे करू शकतील असे सिद्ध झाले आहे. त्यांना ही संधी मिळवून देणे हा प्रतापचा शिष्यधर्म होय.

विचारात पडलेल्या प्रतापकडे पहात सूर्यसिंह म्हणाला. "अरे प्रताप बोल ना! कसल्या विचारात पडला आहेस? आपल्या मनातले विचार सांग. मी तुझी अडचण सोडवू शकेन."

प्रतापने आपल्या मनातले तीन्ही विचार राजासमोर मांडले. त्याच्या इच्छा जाणून राजाला आश्चर्य वाटले, कारण या तीनही गोष्टीत प्रतापचा स्वत:चा असा कोणताच स्वार्थ नव्हता, लाभ नव्हता. त्याच्या जागी दुसरा कोणी असता तर अमाप धन आणि मौल्यवान भेटवस्तु मागता!

राजाने आपले आश्चर्य प्रकट न होअू देता म्हटले, "तुझ्या तीन्ही इच्छा योग्यच आहेत. पण नीट विचार करून मी त्यातली कोणती पूर्ण करावी एवढेच सांग मला."

जरा विचार करून प्रताप बोलला, "महाराज, राजकर्मचाऱ्यांपैकी बरेच लोक लाचखाअू बनलेत. त्यांना जास्तीत जास्त कडक शिक्षा देअून लाचलुचपतीचे निर्मूलन करण्यात यावे."

हे ऐकून राजा सूर्यसिंह फारच प्रसन्न झाला अन् म्हणाला, "पुत्र प्रताप, मला कोणी वारस नसल्याचं दु:ख बऱ्याच काळापसून माझं मन कुरतडत होतं. माझ्यानन्तर राज्याचं काय होणार ही चिंता मला खात होती. आता त्या दु:खापासून अन् चिन्तेपासून माझी सुटका झालीय. तू जी मागणी केली आहेस, त्यामुळे हे सारं घडलंय! लवकरच मी तुला राज्याभिषेक करून माझा वारस म्हणून घोषित करीन. माझ्यानन्तर हे अुदयपूरचं सिंहासन तुझंच आहे!"

इथे आपली गोष्ट संपवून वेताळ विक्रमादित्यला म्हणाला, "राजा, एका मामुलीशा माहुतावर राजसिंहासन सोपवून सूर्यसिंहने आपली बुद्धिहीनता, असमंजसपणा अन् अनौचित्यच सिद्ध केले की नाही? हे तर स्पष्टच दिसतेय की प्रतापच्या तीन्ही इच्छा अन् प्रत्यक्ष मागणी यांचा आपसात काहीच मेळ बसत नाहीय. आणि असल्या निरर्थक विचाराच्या तरुणाला आपला वारस म्हणून निवडणे हे 'साठी बुद्धी नाठी'चंच अुदाहरण होय. म्हातारपणामुळे त्याचं व्यवहारज्ञान लुप्त झालंय. बरे वाईट यातला फरकही तो समजू शकत नाहीय. स्पष्टच आहे की म्हातारपणामुळे त्याच्या साऱ्याच शक्ति बोथट झाल्या आहेत, होय ना? माझ्या या शंकांचं योग्य अुत्तर दिलं नाहीस तर तुझ्या मस्तकाच्या चिंधड्या



चिंधट्या होतील."

विक्रमादित्य अुत्तरला, "काही व्यक्ति अशा असतात की, त्या वय व म्हातार पणापलिकडे पोचलेल्या असतात. त्यांचं मन इतकं दृढ आणि मोजलंमापलेलं असतं की वयाचा त्यांच्यावर काही परिणाम होतच नाही. असं घडणं हे निसर्गाविरुद्ध मुळीच नव्हे. हां, पण अशी माणसं संख्येनं मात्र कमीच असतात. राजा सूर्यसिंह वृद्ध तर आहेत,पण प्रतापला आपला वारस करून त्यांनी सिद्धच करून दाखवलंय की त्यांची बुद्धी अजूनही चांगली तीक्ष्ण आहे अन् योग्य दिशेने विचार करू शकतेय. प्रतापने तीनही इच्छा सांगितल्या, पण राजाने फक्त एकच पूर्ण करायचे कबूल केले. यावर प्रताप ने 'लाचखाअू कर्मचाऱ्यांना शिक्षा द्यावी' अशी मागणी केली. या इच्छेचा सरळ संबंध त्याच्या पहिल्या दोन इच्छांशीही आहे. या एकाच मागणीमुळे त्याच्या बाकीच्या इच्छांचा मार्ग मोकळा होतोय. लाचखाअू लोकांमुळे त्याच्या मित्राला नोकरी मिळत नाहीय. त्यांच्याचमुळे शेजारी झालेल्या चोरीचा माल परत मिळू शकलेला नाहीय. आता राहिला गुरुजींचा औषधोपचार. प्रताप हे चांगलंच ओळखून आहे, कि त्यानं आपल्या गुरुंबद्दल राजाजवळ नुसतं बोलायाचाच अवकाश; कि दयाळू राजा त्यांचा औषधोपचार नक्की करवीलच. राजाने प्रतापची सूक्ष्मबद्धी ओळखली अन् याशिवाय त्याने स्वतःसाठी काहीही मागितले नाही हेही लक्षात घेतले. आपल्या शेजाऱ्यांच्या खुशालीचा तो मनापासून विचार करतो, अन् राज्याची सुरक्षा आणि कल्याणाचीही त्याला मोठी चिंता आहे हे ओळखले. याच साऱ्या कारणांमुळे प्रतापला राजाने आपला वारस नेमले आहे. यात तुझ्या म्हणण्याप्रमाणे 'बुद्धि नाठी' वगैरे काहीच नाहीय."

असे योग्य अुत्तर मिळूनही राजाचे मौन भंग झाल्यामुळे वेताळ त्या प्रेतासह अदृश्य होअून पुन्हा त्याच झाडाच्या फांदी वर लटकू लागला.



# चान्दोबाच्या बातम्या

## अुंदीरमामांचा अुदरप्रवेश

चीनमध्ये अुंदीर संख्येने फारच आहेत. हे अुन्दीरही अनेक प्रकारचे आहेत. गुवान सियांग नावाचे गाव जियांग्स प्रान्तात आहे. हॉंग होक्सिका नावाची एक स्त्री याच गावात रहाते. एका छोट्याशा अुन्दराने या बाईच्या आयुष्यात मोठीच खळबळ अुडवून दिली. एका रात्री ती गाढ निद्रेत असताना एक छोटासा अुन्दीर चक्क तिच्या तोंडातच शिरला! ती ओरडली तेंव्हा तिचा पति हातात कंदील घेअून धावतच तेथे आला. बायकोच्या तोंडात शिरलेल्या अुंदराची शेपूटच फक्त त्याला पहायला मिळाली. त्याने तावडतोब ती पकडून उंदराला बाहेर ओढायचा प्रयत्न केला. पण त्याचा प्रयत्न असफलझाला. एक इंजेक्शन देअून गोळ्याही दिल्या. पुढील तीन दिवसपर्यन्त त्या स्त्रीला आपल्या पोटातल्या अुन्दराची हालचाल जाणवत होती. नंतर मात्र त्याचे काय झाले ते कळलेच नाही!



## तोंडभरून धूर

अमेरिकेत दरवर्षी धूम्रपानाविरुद्ध प्रचार-मोहीम केली जाते. अशा मोहीम काळातच 'जिम' नावाच्या एका माणसाने १५५ सिगरेटी फुंकून एक नवीन अुच्चांक प्रस्थापित केला. या सिगरेटी ओढण्याची त्याची पद्धतही वेगळीच होती. एकापाठोपाठ एक या क्रमाने त्या न ओढता त्याने त्या सगळ्याच्या सगळ्या एकदम तोंडात घालून ओढल्या. या वर्षीचा हा एक मोठाच चमत्कार होता!

## सर्वात कमी वयाचा विमान-चालक

ऑगस्टिन ओर्टिज हा नअू वर्षांचा मुलगा सँटियँगो मधे रहातो. गेल्या ऑक्टोबरमध्ये त्याने सिंगल एंजिनवाले एक विमान स्वतः एकट्याने अुडवून नवा अुच्चांक केला. इतक्या कमी वयाचा हा पहिलाच विमानचालक होय.



## शंभर वर्षांपेक्षा अधिक वयाच्या दोन बहिणींची आत्मकथा

एलिथाबेथ डिलानी व सारा डिलानी या दोघीही न्यूयॉर्क राज्याच्या नागरिक आहेत. दोघी निग्रो बहिणी आहेत. त्यांनी लिहिलेल्या ग्रन्थाचे नाव 'डिलानी भगिनींच्या आयुष्याची पहिली शंभर वर्षे.' त्यांची ही 'आत्मकथा' मोठ्याच प्रमाणात विकली जात आहे. विदुषी सारा डिलानी हिचे वय १०४ वर्षे इतके असून तिच्या दंतवैद्य भगिनीचे वय आहे १०२ वर्षे. दोघींचीही तब्येत अजून अुत्तम असून 'आपण अजून २० वर्षे तरी नक्कीच जगू' असा त्यांचा पक्का विश्वास आहे.

# विचित्र प्रश्न

एकांबर नावाच्या तरुणाला कळले की चिदम्बरच्या दुकानात हिशोब कारकुनाची जागा रिकामी आहे, म्हणून तो त्याला भेटायला गेला. एकांबरला पाया पासुन डोक्यापर्यंत न्याहाळून झाल्यावर आपला उजवा हात त्याच्यासमोर पसरत चिंदबरने विचारले, "या पाच बोटांपैकी मोठं कोणतं ते सांग बरं!"

"मधलं बोट" एकांबर उत्तरला. "मुळीच नाही, सगळ्या बोटांचं वय सारखंच असतं." चिदंबर म्हणाला.

नंतर आपला डावा हात दाखवून त्याने विचारले, "यातलं लहान बोट कुठलं?" आता मोठ्या आत्मविश्वासाने एकाम्बर उत्तरला, "सगळ्या बोटांचं वय सारखंच असतं."

"नाही, करंगळी!" चिदंबर चिडून म्हणाला. नंतर क्षणभराने त्याने एकांबरला विचारले, "बोल, यावरून तुझ्या काय ध्यानात आलं?"

"तुमच्याकडे मला नोकरी मिळणार नाही.–हेच!" फट्कन एकांबर उत्तरला.

"चूक आहे तुझी ही सुद्धा. मी तुला ही नोकरी देत आहे. उद्यापासून कामावर यायला लाग." हसत हसत चिदंबर म्हणाला.

पण आपले डोके हलवत एकांबर ताडकन् म्हणाला, "तुमच्या-सारख्या विनचुडाच्या गोष्टी करणाराकडे काम करण्यापेक्षा रस्त्यावर भीक मागणं बरं." अन् तो लगेच तेथून निघून गेला.



# चांदोबा पुरवणी-६३

भारतातील पशु-पक्षी

## बुलबुल



राकेश शर्मा म्हणतात, "मी जेंव्हा अंतराळातून पहात होतो, तेंव्हा आपला भारत देशच मला सर्वात सुन्दर वाटला." सुप्रसिद्ध कवि महम्मद इकबालने लिहिले आहे, "सारे जहाँ से अच्छा, हिन्दोस्ताँ हमारा." याच काव्यात ते पुढे म्हणतात, "हम बुलबुलें हैं इसकी, यह गुलिस्ताँ हमारा." म्हणजे याचाच अर्थ असा ना, की बुलबुल पक्षी हे बगीचाच्या सौंदर्यात भर घालतात? हे बुलबुल जेंव्हा एका झाडावरून दुसऱ्या झाडाकडे उडतात, तेंव्हा त्यांचा चिवचिवाट चालू असतो.

"आपल्या देशातील बुलबुल गात नाहीत." असे म्हटले जाते. पर्शियन बुलबुलच फक्त गाऊ शकतात. म्हणूनच जहाँगीर बादशहाची बेगम नूरजहाँ हिने पर्शियातून हे पक्षी आणवले होते. या जातीतले पक्षी हल्ली जास्त करून काश्मीर सरहद्दीवरच्या पर्वतात आढळतात. यांचे शरीर भुरी रंगाचे असून, डोके काळे व गाल पांढरे असतात.

डोक्यावर तुरा, गाल व शेपूट काळी, अन् बाकीचे शरीर भुरी व खाकी असणारे गुल्दुम बुलबुलच जास्त सापडतात. शेपटीवर सुरुवातीला लाल डाग व शेवटचे टोक पांढरे, लाल नाक, डोक्या वर तुरा, पाठ भुरी व पोटाचा भाग पांढरा अशा वर्णनाचे बुलबुलही आढळतात. यांच्या छातीवर हारासारखी एक काळी रेघ असते. लाल नाकवाल्या या बुलबुल पक्ष्यांना 'शिपाई-बुलबुल' असे म्हणतात.

बुलबुल नेहमी जोडी-जोडीने रहातात. यांच्यात आपसात नेहमी भांडण चालू असते. परंतु ते आपले घरटे मात्र मोठे सुबक व स्वच्छ ठेवतात.

# आधुनिक भारतातील चित्रकार



## अमृता शेरगील

चित्रकार अमृता शेरगिल या वयाच्या एकोणतिसाव्या वर्षीच दिवंगत झाल्या. परंतु आपल्या जीवनाच्या या अल्पकाळातच या अद्‌भूत चित्रकर्त्रीने आधुनिक भारतीय चित्रकलेत आपले विशिष्ट स्थान मिळवले.

अमृता शेरगिल ही संपन्न राजा अुमरावसिंग शेरगिल व हंगेरी देशातील मेरी या जोडप्याची कन्या. हिचा जन्म हंगेरीची राजधानी बुडापेस्ट येथे सन १९१३ मधे झाला. तिचे पिता अुमरावसिंग हे संस्कृत व फारसी आदि अनेक भाषांचे पंडित होते.

बालपणीच तिच्यात चित्रकलेबद्दलची अभिरुचि दिसून येई. १९२० मधे तिचे पिता भारतात येअून सिमल्याला राहू लागले. तेथील पर्वत व आसपासच्या निसर्ग सौंदर्याने अमृताचे मन मुग्ध झाले. चित्रकलेबद्दलची तिची आवड पाहून माता-पित्यांनी तिला पॅरिसच्या एका सुप्रसिद्ध शाळेत दाखल केले, त्यामुळे तिला चित्रकलेचे अुत्तम ज्ञान मिळविण्याची संधी प्राप्त झाली. परन्तु तिला आधीपासूनच भारतीय चित्रकलेची जास्त आवड होती. युरोपमधील चित्रांपेक्षा अजिंठ्याच्या



शिल्पांनीच तिला जास्त आकर्षित केले. ती भारतात परत आली आणि तिने अमृतसर, सिमला वगैरे ठिकाणच्या जीवनाबद्दलची चित्रे काढायला सुरुवात केली. पण तिला भारतीय टीकाकारांची टीकापद्धत आवडली नाही, म्हणून ती १९३२ मधे युरोपमधे निघून गेली. तेथे गेल्यावर तिने हंगेरीतील आपल्या एका नातेवाइकाशी विवाह केला. नंतर ती पाश्चात्य पद्धतीची चित्रे काढू लागली. १९३९ मधे ती पुन्हा भारतात आली आणि पुन्हा तिने भारतीय पद्धतीची चित्रकला अंगिकारली. परन्तु दुर्भाग्याने ती आजारी पडली आणि



१९४१ मधे मृत्युवश झाली. तिच्या चित्रांत वास्तविकता व काल्पनिकता यांचे अद्‌भुत मिश्रण आढळते. तिने काढलेली मानवांची चित्रे सजीव वाटतात. नवीन मार्ग शोधणाऱ्या युवा कलाकारांची ती आदर्श कलाकार आहे. तिची चित्रे त्यांना स्फूर्ति देतात.

# तुम्हाला माहीत आहे काय?

१. कोणता दिवस जगातील 'पर्यावरण दिवस' म्हणून साजरा केला जातो?
२. 'नागार्जुन सागर' धरण कोणत्या नदीवर बांधलेले आहे?
३. साडे तीनशे वर्षांपूर्वी टास्मानिया व न्यूझीलंड कोणी शोधून काढले?
४. 'इंग्लिश चॅनेल' पोहून जाणारा पहिला भारतीय जलतरणपटू कोण?
५. २२ एप्रिल १९३१ आणि २१ जुलै १९६९ या दिवसांचे वैशिष्ट्य काय?
६. आपल्या पुराणातील कुबेरपुरीचे आजचे नाव काय?
७. फार्मोसा देशाचे दुसरे नाव काय?
८. एका रोमन सम्राटाकडे एक भारतीय स्वयंपाकी होता. तो सम्राट कोण? आणि स्वयंपाक्याचे नाव काय?
९. 'सुमो कुस्त्या' कुठे लढल्या जातात?
१०. 'तमाशा' नावाचे लोकनृत्य हे भारतातल्या कोणत्या प्रान्ताचे वैशिष्ट्य?
११. मोठ्या प्रमाणात मोटारी बनवणारा देश कोणता?
१२. अत्यंत प्राचीन असा वैद्यक-ग्रंथ कोणता?
१३. 'होमिओपथी' या चिकित्साप्रणालीचे प्रवर्तक कोण?
१४. जगातला दुसऱ्या क्रमांकाचा सुंदर समुद्रकिनारा आपल्या देशात आहे. तो कोठे आहे?
१५. आधुनिक ऑलिम्पिक क्रीडा प्रथमतः केंव्हा व कोठे झाल्या?
१६. उत्तर भारतातील 'शहनाई'शी मिळतेजुळते दाक्षिणात्य वाद्य कोणते?

## उत्तर

१. जून ५.
२. कृष्णा नदी.
३. एबेलटास्मान.
४. मेहरसेन. प. बंगाल (१९५८)
५. सोव्हिएट युनियनचा यूरी गागारीन अंतरिक्षात गेला. अमेरिकेचा नील आर्मस्ट्रॉंग याने चन्द्रावर पाऊल ठेवले.
६. अलकापुरी.
७. तैवान.
८. कान्स्टन्ज सम्राट (सहावे शतक), जस्टीनियम
९. जपानमधे.
१०. महाराष्ट्र.
११. अमेरिका.
१२. चरकसंहिता.
१३. हानीमन.
१४. मरीना बीच-मद्रास.
१५. ग्रीक मधील अथेन्स. (१८९६)
१६. नादस्वरम्.



# राक्षसाचा किल्ला

'शौरी एक सुन्दर व स्वस्थ युवक होता. तो चांगला बुद्धिमान, चुणचुणीत व साहसी होता. लहानपणीच तो आईबापांविना पोरका झालेला होता. त्याच्या आजीनेच त्याला वाढवले होते. साहसी शौरीला लहानपणापासूनच आपण सैनिक बनून आपल्या राज्याच्या रक्षणासाठी हातभार लावावा असे वाटे. परन्तु त्याच्या आजीला हे मुळीच पसन्त नव्हते. तिला सैनिकाची नौकरी फार धोक्याची वाटे.

आजी वारल्याबरोबर मात्र शौरी आपल्या इच्छापूर्तीसाठी राजधानीकडे निघाला. त्याची वाट एका दाट जंगलातून जात होती.

जंगलात प्रवेश केल्यावर थोड्याच वेळात त्याला एक भरदार आवाज ऐकू आला—'अरे थांब, अुचललेलं पाऊल खाली टेकू नकोस.' वळून पाहिल्यावर जवळच्या टेकाडावर एक कुरूप माणूस अुभा असलेला त्याला दिसला. शौरीला थांबायला त्यानेच सांगितलेले होते. आपला अुचलेला पाय तसाच अधांतरी ठेवून शौरी काही बोलणार, तोच तो कुरूप माणूस म्हणाला, "तू जिथे पाऊल टेकणार होतास, अगदी तिथेच एक मोठीशी मुंगी आहे बघ. प्राणभयाने तिनं केलेला चीत्कार ऐकून मला दया आली तिची. तुझ्या पायाखाली तिचा जीव जाऊ नये असें मला फार वाटते.!"

वाकून पाहिल्यावर शौरीला खरोखरच तेथे एक मुंगी दिसली. तरीही तो म्हणाला, "मुंगीचा चित्कार तू अैकलास यावर विश्वास नाही बसत माझा. मुंगीचा आवाज ऐकणारा माणूस मी प्रथमच पहातोय." अन् हे बोलतच तो टेकाड चढू लागला.

यावर तो कुरूप माणूस म्हणाला, "माझं नाव आहे ध्वनि. अगदी बारीकात बारीक आवाजही मला ऐकू येतो." दीर्घ श्वास घेत

श्रुति तांबे



ध्वनि पुढे म्हणाला, "माझ्या या विकृत रूपामुळे सर्वजण माझा अपमान करतात. त्यापेक्षा या जंगलातच शांततेनं जगावं, म्हणून इथे रहातो मी. तू मला बिलकुल घाबरू नकोस बघ."

मोठ्या प्रेमाने त्याची पाठ थोपटत शौरी म्हणाला, "तुझी कुरूपता हा काही गुन्हा नव्हे तुझा! न केलेल्या गुन्ह्याची अगाचच शिक्षा भोगावी लागतेय तुला. सैनिक बनून देशाची सेवा करायची इच्छा असल्याने मी राजधानीकडे निघालोय. तुझ्या सारख्याच्या सेवेचीही देशाला फार गरज आहे चल की तू पण माझ्याबरोबर!"

शौरीला होकार देऊन ध्वनि त्याच्याबरोबर चालू लागला. दुपारी तहान लागल्यामुळे दोघे पाणी शोधू लागले. इतक्यात दगडांनी तयार झालेल्या एका टेकाडावरून आवाज आला, "ऊन फारच कडक आहे. थोडा वेळ विश्रान्ती घेऊन मग पुढे जा."

ज्या माणसाने ही सूचना दिली होती, तो ध्वनीपेक्षाही कुरूप होता. त्याने दिलेले पाणी पिऊन दोघांनी आपली तहान भागवली.

"आपल्या कपड्यांच्या आतल्या बाजूला तू जो पैशांचा बटवा बांधून ठेवला आहेस, त्याची एक गाठ सुटली आहे. आणखी एक गाठ सुटली, तर बटवा खाली पडून जाईल." तो कुरूप माणूस शौरीला म्हणाला.

बटवा काढून पाहिला, तेंव्हा खरोखरीच एक गाठ सुटलेली शौरीच्या लक्षात आली.

शौरीने विचारले, "पण कपड्यांच्या आतून बांधून ठेवलेला बटवा तुला दिसलाच कसा मुळी?"

"माझं नावच आहे दृष्टि! भिंतीपलिकडल्या वस्तुही दिसू शकतात मला." तो कुरूप माणूस म्हणाला.

शौरीला त्याच्या बोलण्याचे फारच आश्चर्य वाटले आणि तो म्हणाला, "वा! फारच छान, तुझ्याकडे इतकी उपयुक्त कला आहे. पण त्याचा लाभ काय? देशाला त्याचा काहीच उपयोग नाही होत. तूही आमच्याबरोबर चल अन् देशकार्यात मदत कर. दृष्टीही त्या दोघांबरोबर राजधानीकडे चालू लागला.

ते तिघे जात असताना ध्वनीने त्यांना अचानक थांबवून म्हटले, "अरे थांबा थांबा! वाघ येतो आहे कुठुनसा." "खूप जवळच आहे." असे म्हणून, पुढे जाणाऱ्या शौरीला दृष्टीने आडवले.

झाडीतून बाहेर पडून वाघ त्यांच्यावर झडप घालणार, इतक्यात एक मोठासा धोंडा वाघावर येऊन आदळला अन् तो जखमी होऊन खाली पडला. रक्तबंबाळ होऊन तो जमिनीवर गडाबडा लोळू लागला.

ते पाहून तिघेही आश्चर्यचकित झाले. शौरीने मान उचलून वर पाहिले, तर समोर एक बेडौल माणूस उभा! आपल्या त्या प्राणदात्याला संबोधून शौरी म्हणाला, "दिसायला तर तू अगदीच कमजोर दिसतोयस. पण इतका मोठा धोंडा तू वाघावर कसा मारू शकलास?"

तो बेडौल माणूस खदाखदा हसत म्हणाला, "कसा म्हणून विचारतोस? अरे, माझ्या या डोळ्यांनी मी नुसता इशारा केला की पुरे, अगदी मोठ्यातला मोठा खडकही मी म्हणेन तिथ्थे जाऊन पडेल! माझं नावच आहे 'शक्ती'!"

"मग तर तू आमच्याबरोबर यायलाच हवास." शौरीने आपल्या वाक्‌चातुर्याने त्यालाही पटवले अन् शक्तीला बरोबर घेऊन तो राजधानीकडे निघाला.

चौघेजण काळोख होताहोता एका उंच डोंगरापाशी पोचले. डोंगरावर जुन्या काळातला एक किल्ला होता.

डोंगराच्या पायथ्याशी असलेली गुहा दाखवत दृष्टी म्हणाला, "आज रात्री आपण



इथेच मुक्काम करू या."

"ना बाबा! गुहेत वारा येत नाही. आजची रात्र डोंगरावरल्या किल्ल्यातच काढू या!" शौरी म्हणाला.

चौघेही डोंगरावर चढले. किल्ल्याचे महाद्वार बन्द होते. द्वारावर हजारो वटवाघळे लटकत होती. शौरीने दारावर जोराने ठोकताच वटवाघळे इकडे तिकडे उडू लागली.

किल्ल्यात काय काय आहे हे दृष्टी सर्व पाहू शकत होता. एक म्हातारा कमरेत वाकलेला राक्षस हळू हळू चालत येत होता. दरवाजाजवळील एका भोकातून त्याने शिंगे आणि नखे बाहेर काढून चढवली.

ते सर्व पाहून दृष्टी बाकी तिघांना म्हणाला,



"एक बुढ्ढा राक्षस नकली शिंगं लावून दरवाजा अुघडून बाहेर येणार आहे. काही झालं तरी राक्षस हा शेवटी राक्षसच असतो ना? पळून जाअू या आपण?"

इतक्यात राक्षस दरवाजाजवळ येअून म्हणाला, "ये रे माझ्या लाडक्या! अरे माझ्या सोन्या, तूच दरवाजा खटखटवलास नं?"

शौरी ताबडतोब म्हणाला, "हे अुत्तम राक्षस! दरवाजा अुघड. आपल्या लाडक्या मुलानंच आम्हाला पाठवलंय इथे."

राक्षसाने मोठ्या आतुरतेने दरवाजा अुघडला अन् विचारले, "कुठंय माझा लाडका? केंव्हा येणार आहे तो इथे? अजूनही रुसलेलाच आहे का तो माझ्यावर?" तो अशा प्रश्नांचा वर्षावच करू लागला.

कमजोरपणाचे नाटक करत शौरी म्हणाला, "भल्या सकाळीच निघालो आम्ही, अनं कुठेही न थांबता सलग दहा कोसांची मजल मारलीय, तेंव्हा कुठे आभाळाला भिडणाऱ्या आपल्या किल्ल्यापर्यंत चालत येअून पोचलोय आम्ही! अगदी थकून गेलोय अन् झोपही येतेय आम्हाला. कमजोरीमुळे कुठे धडाक्कन् पडणार तर नाही ना, अशी भीतीही वाटतेय. आज रात्री चांगली विश्रांती घेतो आम्ही इथे. अुद्या सकाळी आपल्या लाडक्याची सारी वार्ता अगदी सविस्तर सांगू हं!"

शौरीच्या या अुत्तरावर राक्षस संतुष्ट झाला. त्याने टोपलीभर फळे आणून चौघांसमोर ठेवली. अन् मोठ्याशा तांब्याच्या भांड्यात पिण्यासाठी पाणी ठेवले. त्यांच्यासाठी दरवाज्या जवळच्याच खोलीत झोपायची सोयही केली आणि म्हटले, "चांगले छान झोपा आता. पण चुकूनही किल्ल्याच्या आत पाअूल घालू नका. म्हातारा आहे म्हणून अुगीच गैरसमज करून घेअू नका, की माझी शिंगं अन् नखं फक्त शोभेचीच आहेत! तुम्ही लोकांनी आपली मर्यादा ओलांडली तर अुभ्याअुभ्याच चिरडून टाकीन सर्वांना!" इतके बोलून तो जोराने दात ओठ खाअू लागला, अन् नंतर कण्हत कुथत आपले गाल पकडत आत निघून गेला.

थोड्या वेळाने त्याच्या घोरण्याचा आवाज किल्ल्यात दुमदुमू लागला.

ध्वनीने त्याच्या घोरण्याचा आवाज ऐकला अन् त्याबरोब्बरच त्याला आणखीही काही ऐकू आले. ताबड्तोब चुटकी वाजवून तो म्हणाला, "त्याच्या घोरण्याच्या भयानक आवाजाबरोबरच मला एक स्त्रीचे रडणेही अैकू येत आहे."

ताबडतोब अुठून शौरी सर्व खोल्या ओलांडून शेवटच्या खोलीत पोचला. त्या खोलीच्या खिडकीतून त्याला दिसले की एक सुन्दर तरुणी चांदण्याकडे पहात रडत बसलेली आहे. तो मुकाट्याने तिच्या जवळ गेला. तिच्या अंगावरचे कपडे, गळ्यातला मोत्यांचा हार, अन् बाकीचे दागिने पाहून असे वाटत होते की, ती नक्कीच कोणी राजकन्या असली पाहिजे.

शौरीला पहाताच ती तरुणी भयाने कापू लागली. तो तिला मृदुतेने म्हणाला, "घाबरू नका! कोण आहात आपण? आपल्या मदतीसाठीच आलोय मी इथं!"

धैर्य गोळा करत ती तरुणी म्हणाली. "मी या राज्याची राजकन्या. माझं नाव रती. चार दिवसांपूर्वी मी आपल्या सख्यांबरोबर डोंगरावरच्या देवळात पूजेसाठी गेले असताना राक्षसानं मला पकडलं आणि आकाशमार्गानं आणून या किल्ल्यात मला कैद करून ठेवलंय. तो म्हणत होता की, माझा मुलगा मदनासारखा सुन्दर आहे. अन् त्याचं म्हणणं आहे की, मी लग्न करीन तर एकाद्या राजकुमारीशीच! पण खुद्द राक्षसाची अशा विवाहाला मुळीच तयारी नाहीये. त्याची तीव्र इच्छा आहे की आपल्या घरात जी सून येईल, ती नेहमी स्वादिष्ट मांसाहारी पदार्थ करून वाढणारी अन् मेहनती असावी. या विषयावर





लाडका मनोहर मुलगा कुठे आहे? तुम्हाला त्यानं काय सांगितलंय? बोला ना."

झुकून नमस्कार करत शौरी त्याला म्हणाला, "हे राक्षसोत्तम! पुत्रविरहाच्या शोकामुळे रातोरात तुमची शिंगं अन् नखंही नाहीशी झालीतसं दिसतंय! तुमचं पितृप्रेम खरोखरच प्रशंसनीय आहे."

राक्षसाने आपल्या डोक्यावर चाचपडून पाहिले तेंव्हा त्याच्या लक्षात आले की तेथे शिंगे नाहीयेत; हातांकडे पाहिले, तर नखे गायब! तो एकदम घाबरून गेला. पण दुसऱ्याच क्षणी क्रोधाचे खोटेच नाटक करत तो ओरडला, "तुला अन् तुझ्या त्या घाणेरडया दोस्तांना मी क्षमा करून सोडून देतोय. कारण तू माझ्या प्रिय मुलाचा मित्र आहेस. आता बोल माझा मुलगा कुठाय?" हुंकारत तो शौरीला रागावू इच्छित होता. पण त्याला अचानक खोकल्याची अुबळ आली.

बापलेकात खूप वादावादी झाली अन् तो मनोहर लाडका कुठेसा निघून गेला. आपल्या एकुलत्या एका मुलाचा विरह राक्षसाला सहन झाला नाही आणि तो मला अुचलून घेअून आला."

शौरीला हे ऐकून त्याच्या मुलाबद्दल महत्वाची बातमीही लक्षात आली. त्याने राजकुमारीला आश्वासन दिले, "भिअू नका राजकुमारी, अुद्याच्या सूर्योदयाबरोबर या राक्षसापासून तुमची मुक्तता करीन मी." नंतर तो त्या तीन कुरूप माणसांकडे निघून गेला.

सकाळ होताच म्हातारा राक्षस शिंगे आणि नखे धारण करायचे विसरून तसाच त्यांच्याकडे आला आणि म्हणाला, "माझा

शौरी म्हणाला, "पण तुम्ही त्याचा विवाह राजकुमारीशी करून देणार की नाही हे तुमचा मुलगा जाणू इच्छितोय. त्यानं हे जाणून घेण्यासाठीच पाठवलंय मला. त्याचं लग्न राजकन्येशी होणार नसेल तर त्यानं कळवायला सांगितलं आहे, की तो समुद्रात बुडून जीव देईल."

हे ऐकताच आपले कान झाकून घेत राक्षस म्हणाला, "असलं अशुभ बोलू नकोस रे! त्याच्यासाठी मी राजकुमारीला आणून इथे किल्ल्यात लपवून ठेवलीय. माझ्या मनोहारी मुलाला इथे यायला सांग, जा लगेच."

"काय म्हणतोस. माझा मुलगा इथेच खाली गुहेत आहे?" म्हणत राक्षस मोठ्या खुशीने स्वतःच डोंगर अुतरू लागला. त्याच्या मागोमाग शौरी आणि ते तीन मित्रही अुतरू लागले. आनन्दाने टाळ्या वाजवत राक्षस जेंव्हा गुहेत शिरला, तेंव्हा शौरीने शक्तीला इशारा केला. तो समजून शक्तीने डोळ्याने खूण करताच एक मोठा खडक घरंगळत येअून त्याने गुहेचे द्वार चपखलपणे बंद करून टाकले!

चौघेही पुन्हा किल्ल्यात राजकुमारीकडे गेले अन् त्यांनी तिला तिच्या मुक्ततेची बातमी दिली. राजकुमारीने विचारल्यावरून शौरीने आपली सारी कहाणी सांगून, तिला आपला घराबाहेर पडायचा अुद्देशही कथन केला.

ते ऐकून आश्चर्य प्रकट करत ती म्हणाली, "हे सारं तर एक स्वप्नच वाटतंय मला. एका राजात जी बुद्धिमत्ता, साहस, सौंदर्य आणि समयसूचकता आवश्यक असते, ते सारं तुझ्यात आहे." असे म्हणत लाजेने तिने मान खाली घातली.

यानन्तर ते पाचही जण डोंगरावरून खाली अुतरू लागले, तेंव्हा त्यांना थांबवत ध्वनी म्हणाला, "अरे हत्ती येत असल्याचं ऐकू येतंय मला."

ते ऐकताच शक्ती म्हणाला, "बापरे! हत्तींची तर फार भीती वाटते मला! अरे दृष्टी, जरा नीट पाहून सांग तरी हत्ती कुठे आहे ते! एक मोठासा खडक लोटून त्याचं गंडस्थळच फोडून टाकतो मी."



दृष्टीने त्या दिशेने पाहून म्हटले, "इकडे येत असलेला तो हत्ती पाळीव आहे. त्याच्या अंबारीत एक माणूस बसलेला दिसतोय मला. त्याच्या डोक्यावर एक लाल पगडी आहे. त्याच्या मिशा बारीक बारीकच आहेत, अन् त्याच्या मागे हातात भाले घेतलेले अश्वारूढ सैनिक आहेत. त्यांच्या मागोमाग दवंडी पिटत काही लोकही येत आहेत."

राजकुमारी ताबडतोब अुत्तेजित होअून म्हणाली, "मग ते महामन्त्री अनन्तवर्माच असणार. त्यांना इथं यायची काय बरं जरूर पडली असावी?"

इतका वेळ गप्प असणारा शौरी म्हणाला, "राजकुमारी, आता आम्हाला निरोप द्या. आपण आपल्या महामन्त्र्यांच्या सोबतीने कसलीच अडचण न येता आपल्या नगरीत पोचू शकाल. मी अन् माझे दोस्त आम्ही राजधानीला जाअू. माझी खात्री आहे की महाराज मला नक्कीच नोकरी देतील. नंतर मी आपल्या या शक्तिशाली मित्रांसाठीही नोकरी शोधेन. त्यांनाही चांगली मानाची स्थानं मिळतील अशी खात्री आहे माझी.

राजकन्येने खोटीच नाराजी दाखवत शौरीकडे पाहिले आणि झाडीतून बाहेर पडून हत्तीच्या दिशेने ती वेगाने निघून गेली. पंधरा मिनिटातच मन्त्री अनन्तवर्मा तेथे आले. हत्तीवरून अुतरून शौरीजवळ येअून त्याचे हात पकडत ते म्हणाले, "तुझ्या रोमरोमात देशभक्ती भरलेली आहे. म्हणूनच तू सैनिक बनायचं ठरवलं आहेस. पण तुझा राजकुमारीशी विवाह होणार असून आमच्या महाराजांनंतर तूच या देशाचा राजा बनणार आहेस. आमच्या महाराजांनी घोषितच केलं आहे की जो राजकन्येला परत आणील, त्याला मी आपलं अर्धं राज्य देईन. सर्व देशवासियांना ही घोषणा कळलीय की नाही, हे पहायालाच मी निघालो होतो. तू केवळ राक्षसावरच विजय मिळवला आहेस असं नाही, तर आमच्या राजकन्येचं हृदयही जिंकलं आहेस. तेंव्हा आमचा भावी राजा तूच आहेस. ये, अंबारीत बस. तुझे हे दोस्त घोड्यांवर स्वार होअून आपल्या बरोबरच राजधानीत येतील.





# वीर हनुमान

मणिपुर राज्याचा राजा मणिध्वज महान पराक्रमी होता. तसाच तो परम शिवभक्त ही होता. त्याने शंभर वेळा यज्ञाच्या हवनकुंडात आपल्या शरीराची आहुति दिलेली होती. दहा वेळा त्याने आपले शिर शंकराच्या पायांवर अर्पण केलेलं होतं. विविध प्रकारच्या विशेष पूजा-अर्चा केल्यानंतर त्याला शिवाचा साक्षात्कार झाला होता. प्रत्येक वेळी शिवाने त्याला वरदान दिले. मणिध्वज खऱ्या अर्थाने शिवाचा परम भक्त होता.

त्याला वाटले की शिवाचा त्रिशूळ त्याच्या मदतीसाठी येईल नि शत्रूचा संहार करील. शिवाने त्याला पाशुपतास्त्र पण दिले होते. त्याची इच्छा असेल तेव्हा शिव स्वतः येअून शत्रूंचा नाश करतील असे ही वरदान त्याला मिळाले होते. संकटकाळी केव्हां ही त्याचे संरक्षण करण्यासाठी शिव तयार होते. परम शिव आपले रक्षक असल्यामुळे आता कोणी ही युद्धात त्याचा पराजय करणार नाही, कोणी ही त्याचे काही वाकडे करू शकणार नाही असा त्याला विश्वास वाटू लागला. यामुळे त्याच्या गर्वाला आता धरबंध राहिला नाही. तो निरंकुश होअून आपला राज्यकारभार चालवू लागला. मनात येईल त्याच्यावर अन्याय करायला तो मागे-पुढे पाहिनासा झाला.

शिवाशिवाय अन्य देवांचे जे भक्त होते, जे अन्य धर्मावलंबी होते, त्यांना त्याने राज्याबाहेर हाकलले. काही चुकून



राहिलेल्यांचा तो छळ करू लागला. शिवमंदिर सोडून राज्यातील अन्य मंदिरे त्याने उध्वस्त करून टाकली. मणिध्वजाच्या अन्यायाने गांजलेले सर्व जण शरणार्थी बनून अयोध्येला गेले नि रामाला आपली करुण कहाणी सांगितली. श्रीरामाने त्या सर्वांना अभय-दान दिले आणि सांगितले की मणिध्वजाच्या अहंकाराचा लवकरच नाश होईल आणि लवकरच त्यांची दुःखे दूर होतील. तोपर्यंत त्यांनी आपल्या राज्यात रहावं असं ही रामाने सुचवले. मग ते सर्व जण रामाच्या राज्यात राहू लागले. मणिध्वजाची कृष्ण-कृत्ये तिकडे पूर्ववत् चालूच राहिली.

स्वतंत्रतापूर्वक दौडणाऱ्या रामाच्या यज्ञाच्या घोड्याने मणिपूर राज्यात पाऊल ठेवताच मणिध्वजाने त्याला पकडले आणि आपल्या अश्व-शाळेत डांबून ठेवले. रामासारख्या राजाच्या घोड्याला आपण बंदी बनवल्याचा त्याला फार आनंद झाला.

यज्ञाच्या घोड्याला सोडून द्यावे नि रामाशी मैत्रीचे संबंध स्थापित करावेत असा संदेश लक्ष्मणाने आपल्या दूतामार्फत मणिध्वजाकडे पाठवला. मणिध्वजाने जळत्या त्रिशूळाने दूतावर प्रहार करीत म्हटले—"रावणासारख्या महान् शिवभक्ताचा रामाने वध केलेला आहे. त्या रामाचे तुकडे तुकडे करून ते शिवाला समर्पित करायची माझी इच्छा आहे. कोट्यवधि राम आले तरी माझ्यापुढे कुणी टिकणार नाही! मी निश्चितपणे त्यांचा वध करणार. जो कोणी येईल, त्याच्यावर हा जळता त्रिशूळ जाऊन धडकेल. माझे हे शब्द त्या तुझ्या लक्ष्मणाला जाऊन सांग." आणि मणिध्वजाने दूताच्या डोक्यावर टोपली भर राख टाकली. खरोखरीच मणिध्वजाचा गर्व नि अहंकार पराकोटीला पोचले होते. आतापर्यंत कोणत्याही राजाशी त्याने संघर्ष केला नव्हता. एवढ्यात रामाच्या यज्ञाचा घोडा त्याच्या राज्याच्या हद्दीत आला होता. आता लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न यांना वाटले की मणिध्वजाशी युद्ध अटळ आहे.

भरताने पांचजन्य फुंकून सर्व दिशा दणाणून सोडल्या. शत्रुघ्नाने सुदर्शन चक्र हाती घेतले. शतशीर्ष शेष नागाप्रमाणे फुफकारत लक्ष्मण पुढे आला. क्षणभर मणिध्वजाला वाटलं आता आपली धडगत नाही. मणिध्वजाने शिवाचे त्रिशूळ सावरले.

तेव्हा मणिध्वजाने आपल्या पूजा-मंदिरातून काडाडत्या विजेप्रमाणे एक त्रिशूळ लक्ष्मणावर फेकला.

नेमका याच वेळी हनुमान तेथे पोचला. हत्तीने आपल्या सोंडेत इक्षुदंड पकडावा त्याप्रमाणे लक्ष्मणाकडे वेगाने येणारा त्रिशूळ हनुमानाने आपल्या डाव्या हातात पकडला. आणि शिवाप्रमाणे तेथे दृढपणे उभा राहिला.

मणिध्वज आश्चर्याने हनुमानाकडे पाहू लागला. क्षण भर त्याला वाटले की शिव प्रत्यक्ष आलेला आहे. तो भक्तिभावाने नमस्कार करणार एवढ्यात हसून हनुमान म्हणाला—"अरे ए शिवभक्ता, मी शिव नाही. मी वानर हनुमान आहे, हनुमान! मी रामाचा सेवक आहे हे तुला माहीत आहे ना?" असे म्हणत हनुमानाने हातात गदा घेतली नि मणिध्वजावर तो तुटून पडला.

मणिध्वज कसा-बसा आपणास वाचवीत दूर पळून गेला. हनुमानाला पाहून त्याची घाबरगुंडी उडाली. हनुमानाच्या जटा हवेत उडत होत्या. लाल-लाल डोळे भयंकर स्वरूपात चमकत होते. हातातील त्रिशूळ जमिनीवर टेकून तो उभा होता, जणू साक्षात् शिवच! भयभीत मणिध्वजाला वाटलं की आता आपलं मरण जवळ आलं आहे. अन्य काही मार्ग त्याला दिसत नव्हता. एकदम त्याला पाशुपतास्त्राची आठवण झाली आणि त्याने त्यासाठी मंत्राचा जप केला. मणिध्वजाच्या हातांत पाशुपतास्त्र आले नि





ते त्याने हनुमानावर सोडले.

पाशुपतास्त्राच्या उष्णतेमुळे आजूबाजूचा सर्व प्रदेश गरम झाला. लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न आणि त्यांची संपूर्ण सेना मूर्च्छित होऊन जमिनीवर पडली.

हनुमान रामनामाचा जप करीत निधड्या छातीने त्या अस्त्राला सामोरा गेला. पाशपतास्त्र हनुमानाच्या छातीत शिरले आणि तेथेच विलीन झाले. हनुमानाने मणिध्वजाचा रथ मोडून टाकला आणि आपली गदा घेऊन मणिध्वजावर तुटून पडला.

मणिध्वज घायाळ तर झाला, पण मेला मात्र नाही. आपल्याला वाचवीत तो धावत-पळत पूजा-मंदिरात गेला आणि शिवलिंगावर आपले डोके फोडीत ओरडू लागला—"हर हर महादेव! आता माझे रक्षण कोण करणार?"

शिवलिंगातून शब्द उमटले—"अरे मणिध्वज, हे काय चालवलयस? कोटि-कोटि राम आले तरी ते पुढं काही करू शकणार नव्हते ना? रामाच्या एका सेवकाचा सामना करता करता असा मेटाकुटीला आलास! युद्ध कर, युद्ध. मी तुला साहय करीन."

आपल्या भक्ताला दिलेल्या वचनाचं पालन करण्यासाठी शिव नंदीवर स्वार होऊन रणांगणावर आले आणि मणिध्वजाला सामोरे आले.

हनुमान शिवाला म्हणाला—"आपण प्रत्यक्ष परमेश्वर असाल, पण मला त्याची पर्वा नाही. माझ्या प्रहारा पासून आपण आपलं रक्षण करावं!" आणि हनुमान शिवावर तुटून पडला.

नंदी घाबरला नि शिवाला खाली फेकून पळून गेला. शिव उठले आणि हनुमानाला म्हणाले—"माझं त्रिशूळ तू पकडून ठेवलंस. पाशुपतास्त्र आपणात लीन करून टाकलंस. हे केवळ विष्णूलाच शक्य आहे. तू विष्णु आहेस की विष्णूचा भक्त आहेस हे सांग बरं!"

"माझा कोणाशी ही संबंध नाही. माझा फक्त रामावर संपूर्ण विश्वास आहे. माझ्या सारख्या वानराचा भगवान केवळ रामच! म्यां वानराची बुद्धि ही अति चंचल आहे. पण मी आपली बुद्धि त्या पुरुषोत्तमावर केन्द्रित



केली आहे. त्याच्याकडून मला अमर्याद संतोष, धैर्य नि साहस मिळालं आहे. ज्या मानव-रामावर माझा पूर्ण विश्वास आहे, त्याने लोक-कल्याणासाठी अश्वमेध यज्ञ आरंभिला आहे. स्वतःला शिवभक्त म्हणवून घेणाऱ्या मणिध्वजाने दुरहंकाराने कित्येक पापे केली. अशा गर्विष्ठ, स्वार्थी, पापी, अत्याचारी निरंकुश माणसाला आपण संरक्षण देत आहात याचे मला मोठे आश्चर्य वाटत आहे." हनुमानाने निःसंकोचपणे जरा ही न घाबरता आपला विचार शिवापुढे स्पष्ट रीतीने कथन केला.

हे सगळं ऐकून शिव हसले आणि म्हणाले—"ठीक आहे. आता मी आपला तिसरा डोळा उघडतो. आपले नीट रक्षण कर."

हनुमान म्हणाला—"अवश्य, पण आपल्या भक्ताचे डोळे उघडतील असं ही काही करा."

शिवाने आपला तिसरा डोळा उघडताच त्यातून निघणाऱ्या ज्वाला हनुमानाच्या दिशेने आल्या. हनुमानाने आपल्या उजव्या हाताची मूठ उघडली नि त्या ज्वालांना आपल्या मुठीत बंद केलं. एकदा ज्याप्रमाणे शिवाने विष-प्राशन केले होते, त्याप्रमाणे 'रामार्पणमस्तु' म्हणत हनुमानाने तो अग्नि आपल्या तोंडात घालून गिळून टाकला.

शिव मणिध्वजाला म्हणाले—"पहात आहेस ना? आता मी याहून अधिक काही करू शकणार नाही. हनुमान कोणी परका



नाही, तो ही माझंच एक स्वरूप आहे. माझ्याच अंशातून त्याचा जन्म झाला, म्हणून माझ्या सर्व शक्ति त्याच्यात लीन होत आहेत. खरी भक्ति म्हणजे काय हे त्याच्याकडून शीक."

हा हा म्हणता हनुमान वायु-वेगाने उडत द्रोणगिरिं वर गेला व तेथून संजीवनी घेऊन आला. बेशुद्ध अवस्थेत पडलेल्या लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न व सेनेतील सैनिकांना त्याने शुद्धीवर आणले.

आता मणिध्वजाचे ज्ञान-चक्षु उघडले. गुडघे टेकून त्याने नम्रपणे हनुमानाला नमस्कार केला.

हनुमान त्याला म्हणाला—"मणिध्वजा, पाहिलंस ना, स्वार्थांध तुझी भक्ति किती क्षुद्र



आहे? आपला स्वार्थ सिद्ध करण्यासाठी परमेश्वराची आराधना करणं नि त्याला आपला सेवक बनवणं ही खरी भक्ति नव्हे. समस्त जीव-सृष्टि सुरक्षित व्हावी असं त्याला वाटतं, नि ही त्याची इच्छा पुरी करणं हे भक्ताचं कर्तव्य असतं हे तू जाणून घे. तुझ्यामुळे तर प्रत्यक्ष परमेश्वराची निंदा होऊ लागली. स्वार्थ, अहंकार आणि तमोगुणांनी भरलेल्या तुझ्या सारख्या भक्तां मुळे तर भले लोक नास्तिक होऊं लागले. आता तुझं अज्ञान दूर झालं, म्हणून द्वेष, अहंकार, गर्व इत्यादि दुर्गुण सोड. अरे, परमेश्वर सर्वत्र आहे, तो सर्वांचं कल्याण करतो. इथून पुढे प्रजेच्या कल्याणाचा आदर्श आपल्या पुढे ठेव आणि उत्तम भक्ताप्रमाणे राज्य-पालन कर."

मणिध्वजाने कबूल केले—"हो आंजनेय, फार गर्व झाला नि त्याचा भंग झाला म्हणजेच ज्ञान उत्पन्न होते. शिवाने दिलेल्या वरदानामुळेच मी अधिक घमेंडखोर झालो. आता माझ्या हृदयात ज्ञानोदय झाला. गर्वाने अंध होऊन मी यज्ञाचा घोडा बांधून ठेवला, यामुळेच मला ही ज्ञान-प्राप्ति झाली. मी स्वतः रामाकडे जाऊन त्याची क्षमा मागतो. त्याने मला ही आपला मित्र म्हणावं अशी मी त्याला प्रार्थना करीन." आणि मणिध्वजाने आपल्या अश्व-शाळेत डांबलेल्या घोड्याला मुक्त करून लक्ष्मणाच्या स्वाधीन केले.

आता यज्ञाश्व स्वतंत्रपणे धाऊ लागला व सर्व लोक त्याच्या मागे जाऊ लागले. मणिध्वजाने सर्वांना प्रमाने निरोप दिला.

मणिध्वजाला दोन मुली होत्या-शुभा आणि शोभा. या जुळ्या बहिणी होत्या. त्यांना घेऊन मणिध्वज अयोध्येला गेला आणि त्याने श्रीरामाची क्षमा मागितली.

रामाने मणिध्वजाचे मित्राप्रमाणे स्वागत केले. त्याने श्रीरामाला प्रार्थना केली की आपल्या दोन्ही मुलींचा रामाने सुना म्हणून स्वीकार करावा. रामाने ही प्रार्थना मान्य केली आणि तो म्हणाला—"अश्वमेध यज्ञ-समाप्तीनंतर हा विवाह संपन्न करू या."

शिवभक्त नसल्यामुळे ज्या राजांना मणिध्वजाने पळवून लावले होते, त्यांना त्याने परत बोलवले. प्रजेचे कल्याण हीच





आता त्याची शिवपूजा झाली. प्रजा-सेवा हीच त्याची ईश-भक्ति!

श्रीरामाच्या यज्ञाचा घोडा पूर्वेकडून दक्षिण, उत्तर व पश्चिम दिशांना स्वातंत्र्यपूर्वक भ्रमण करीत अयोध्येला परत आला.

अश्वमेध यज्ञाच्या समारोप-समारंभासाठी किष्किंधेहून सुग्रीव व अनेक वानर, लंकेहून विभीषण वगैरे, मणिपुरहून मणिध्वज आणि अनेक देशांचे राजे व त्यांचे स्नेही-संबंधी उपस्थित झाले. त्यांनी आपल्या बरोबर उत्तमोत्तम आहेर आणले होते.

विभीषणाने लंकेहून गड्यांवर भरून मौल्यवान मोती, हिरे व जडजवाहर आणले. सुग्रीवाने हिरे नि खूप सोने आणले. मणिध्वजाने नाना प्रकारची रत्ने व वस्त्रे आणली.

देशोदेशीच्या राजांनी आणलेली चांदी, सोने, हिरे, मोती व रत्नांनी श्रीरामाचा खजिना भरून वाहू लागला.

लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न यांचे सर्व देशात भव्य स्वागत झाले. ते दिग्विजयी होऊन अयोध्येला परत आले.

त्यांच्या मागून भरद्वाज, गौतम, अत्रि, अगस्त्य इत्यादि ऋषींसह हनुमान आला. रामाने आपले शस्त्रास्त्र-गुरु विश्वामित्र यांना विशेष निमंत्रण दिले. ते ही उपस्थित झाले.

अश्वमेध यज्ञाची सांगता मोठ्या थाटा-माटात साजरी झाली. श्रीरामाने घरोघरी धन-धान्य पोचविले. राज्यातील सर्व सुवासिनींना रत्नाभूषण व सोने वाटले. सामाजिक कार्य करणाऱ्या सेवकांचा यथोचित सत्कार केला.

यानंतर मणिध्वजाच्या निमंत्रणावरून सर्व जण मणिपुरला गेले. मणिपुर मध्ये लवाचा शुभाशी व कुशाचा शोभाशी थाटामाटात विवाह साजरा झाला. लग्नाच्या वेळी मणिध्वजाने लव व कुश यांना आपले संपूर्ण राज्य बक्षिस देऊन टाकले. आणि थोड्या दिवसांनी मणिध्वज तपश्चर्या करण्यासाठी जंगलात निघून गेला.





# अहंकार

रामपूरचा जमीनदार नरेन्द्र एक प्रामाणिक माणूस होता. आपले कुठलेही निर्णय घाईने न घेता नीट विचारपूर्वक घेत असे तो. जमीनदारीची कामे संभाळण्यासाठी त्याचे चार मुख्य कर्मचारी होते. जमीनदार नरेन्द्रला एकदा अशी बातमी कळली की, काही प्रधान कर्मचारी आपल्या हाताखालच्या नोकरांकडून आपली खाजगी कामेही करवून घेत असतात अन् त्यामुळे जमीनदारीची कामे मागे पडत आहेत.

नरेन्द्रने प्रथम या बातमीवर विश्वास ठेवला नाही. पण त्याने त्या कर्मचाऱ्यांवर कडक नजर मात्र ठेवली. त्याला आपल्याला मिळालेली बातमी खरीच असल्याचे आढळले. एकदा फक्त त्यांना बोलावून घेऊन इतकेच सांगितले की, "जमीनदारीच्या कामात हल्ली काहीशी ढिलाई आलेली जाणवतेय. तुम्ही सर्वजण आपापलं काम जबाबदारीनं पहात आहात न?"

चारही जण विनयपूर्वक उत्तरले, "होय तर! सर्व काही ठीकठाक चालू आहे. जमीनदारीची कामं नित्यनवीन वाढतच आहेत. तेंव्हा आणखी काही नोकर नेमून घेतल्यास बरं होईल."

छत्रपुरमधे नरेन्द्रचे काका रहात असत. त्यांची शंभर एकर जमीन होती. काका शेतीची कामं खूप चांगल्या पद्धतीने करवून घेऊन सुखाने रहात असत. त्यांचे नाव होते चतुर. त्यांची वागणूकही 'यथार्थनामा' होती. सर्वांशी ते मिळूनमिसळून रहात आणि आपल्या चेष्टेखोर स्वभावाने ते सर्वांना हसवत रहात. नरेन्द्रने विचार केला की, काही दिवस या काकांकडे जाऊन राहिलो तर मनाला शान्ति लाभेल.

चतुराकाकांनी पुतण्याचे खूप प्रेमाने

प्रताप खरे



स्वागत केले, खुशाली विचारली. तेव्हा जमीनदार नरेन्द्रने त्यांना आपली अडचण सांगितली. तो म्हणाला, "मला तर असं वाटतंय की माझा हा प्रश्न सुटण्यातला नाहीच आहे. त्यापेक्षा या जमीनदारीला रामराम ठोकून तुमच्यासारखी शेती करीन तर बरं सुखानं, शान्तीनं जगेन मी. काही कटकटी तरी अुपस्थित होणार नाहीत."

यावर हसून चतुरकाका म्हणाले, "अरे, शेती करणंही काही मोठं सोपं काम नव्हे. माझा मुलगा प्रताप सगळ्या अडचणींचा तोडगा शोधून काढतो, म्हणूनच माझं काम सोपं झालंय; नाहीतर माझ्यावरही काय ओढवलं असतं, काही सांगवत नाही."

काकांच्या बोलण्यावर आश्चर्य प्रकट करीत नरेन्द्र म्हणाला, "मग प्रतापला पाठवा माझ्याबरोबर, प्रयत्न तरी करून पहातो, त्याच्या हातून माझ्या अडचणी सुटतात की कशा!"

"प्रताप आपल्या कामात यशस्वी होईल याबद्दल मला खात्री आहे. पण त्याला तुझ्याबरोबर पाठवणं मला पसन्त नाही. कारण तो फार गर्विष्ठ आहे. या शंभर एकरांची शेती काय करतोय; त्याला लगेच वाटतंय की आपण अगदी स्वर्गच जमिनीवर घेअून आलोय; गर्वानं फुगून गेलाय तो. तुझ्याकडे येअून त्याने तिकडची समस्या सोडवली तर मग विचारायलाच नको! अगदीच हाताबाहेर काम जाईल त्याचं. त्याला काबूत आणणं माझ्या शक्ती बाहेरचं होअून बसेल. त्याचा अहंकार सहन करणं मला शक्य होणार नाही. त्याचा हा अहंकार घालवायचे खूप प्रयत्न केले मी; पण असफल झालो.

नरेन्द्र यावर हसत म्हणाला, "काका, तुमची अडचण लहान आहे पण माझी मात्र खूपच मोठी आहे, प्रतापने माझी अडचण दूर करून दाखवली, तर तुमची समस्या सोडवणं हे माझं काम समजा!"

"पण पहिलं काम सफल झालं तरी दुसरं होअू शकणार नाही,, असं माझं म्हणणं आहे." असे म्हणत चतुरकाकांनी प्रतापला नरेन्द्रबरोबर पाठवायची तयारी दर्शवली.

नन्तर ते नरेन्द्रला म्हणाले, "पण तू अगोदर प्रतापला जरा हरबऱ्याच्या झाडावर चढव. त्याला म्हण की, तुझ्याशिवाय माझी अडचण सोडवू शकेल असा कोणी अलम दुनियेत नाहीये; म्हणूनच मी तुझी मदत मागतो आहे. अन् त्याला असंही सांग की, सर्वजण तुझ्या योग्यतेची वाहवा करत असतात. असं सगळं बोललास म्हणजेच तो तुझ्याबरोबर यायला तयार होईल."

संध्याकाळी प्रताप शेतावरून परत आल्यावर त्याला भेटून नरेन्द्रने त्याला काकांनी पढवल्याप्रमाणे बोलणे केले.

आपली स्तुती ऐकून प्रताप खूश झाला. नरेन्द्रच्या समस्येबद्दल त्याने सविस्तर जाणून घेतले, अन् तो म्हणाला, "या एवढ्याश्या कामासाठी मी तुझ्या बरोबर कशाला यायला हवं? मी सांगतो तो अुपाय अंमलात आण. दोन महिन्यात सगळं काही सुरळीत व झालं तर मला येअून विचार."

प्रतापने सांगितलेला अुपाय लक्षपूर्वक ऐकून नरेन्द्र रामपुरला परत आला. आपल्या चारही प्रमुखांना बोलावून तो म्हणाला, "तुम्ही सर्व माझ्या बाबांच्या वेळेपासून आमची कामं करत आला आहात. कुटुंबाचाच एक भाग समजून मी तुम्हाला मान देत आलोय. पण हल्ली जमीनदारीच्या कामासाठी पैसा पुरेनासा झालाय. तुम्ही सर्वजण मला नीट सहाय्य कराल तर आपण आपली प्राप्ती वाढवू शकू. जरूर तर त्यासाठी तुमच्या हाताखाली आणखी काही नोकर देअू शकेन मी. नव्यांची गरज नसून, आहेत त्यांतलेही काही कमी करू म्हणाल, तर तसंही करू."

चौघांनीही नरेन्द्रला पूर्ण मदत करायचे





आश्वासन दिले. परंतु त्यांनी आणखी काही नोकर नेमून देण्याची मागणी केली.

नरेन्द्र म्हणाला, "मग असं करा; प्रत्येक नोकराने काय काय कामं करायची याबद्दल कागद तयार करा. त्यांनी काय काय कामं संपवली हे त्यांनीच लिहून आपापले कागद तुमच्याकडे द्यावे. म्हणजे ते काय काय कामं करत आहेत हे तुमच्या लक्षात येईल. आठवडा भरांत त्यांनी जी कामं करावी अशी अपेक्षा असेल, ती पुरी न झाली, तर तुम्ही त्यांना ताकीद देऊ शकाल. असं केलं म्हणजे हे छोटे नोकर तुमच्या भलेपणाचा गैरवाजवी फायदाही घेऊ शकणार नाहीत."

चारही जणांनी नरेन्द्रच्या या योजनेला मान्यता दर्शवली.

नन्तर नरेन्द्र म्हणाला, "आणखी एक गोष्ट; तुमचा भलेपणा पाहून नोकर तुमच्याबद्दल चुकीचा अन्दाज बांधू शकतात. पण आता तुम्हाला ते काय काय कामं करत आहेत हे कळत राहील. त्यांनी केलेल्या कामांच्या कागदावर तुम्ही आपल्या सह्याही करत चला. म्हणजे ते तुम्हाला घाबरून रहातील. कागदावर सही नसेल, तर त्याचा अर्थ असा होईल की त्यांनी कामं केलेली नाहीत."

हे ऐकून त्या प्रमुखांचा उत्साह वाढला. पण नरेन्द्र पुन्हा म्हणाला, "आणखी त्याही पेक्षा महत्वाचं म्हणजे जे जास्त कामं करतील, त्यांना मजुरीही जास्त मिळेल; जे कमी करतील त्यांना कमी मिळेल. पण याही बाबतीत तुमचा निर्णय शेवटचा ठरेल."

चौघांनीही नरेन्द्रच्या योजना-चातुर्याची तारीफ केली. ते म्हणाले, "तुमच्या या सुधारणांमुळे जमीनदारीत नक्कीच सुधारणा होईल."

"माझीही तशीच इच्छा आहे. परंतु तुमच्यासारख्या मऊ प्रमुखांना हे खालचे नोकर गुंडाळून ठेवू शकतात. तुम्हाला फसवून कामं न करताच तुमच्या सह्याही घेतील ते. त्यांची तुमची रोजच गाठ पडत असल्याने एकादे वेळी नाइलाजाने सही करणंही भाग पडेल तुम्हाला. तेंव्हा तुमच्या सह्या झालेले कागद तुम्ही लगेच माझ्याकडे पाठवत चला. सर्वजण ठीक-ठाक काम करतात की नाही, हे मी सुद्धा पहात जाईन.



कागदावर लिहिलेलं काम प्रत्यक्षात झालेलं नसेल तर तीन प्रकारच्या शिक्षा त्यांना दिल्या जातील. पहिली शिक्षा काम न करण्याबद्दल, दुसरी खोटं लिहून दिल्याबद्दल, अन् तिसरी तुम्हाला फसवायचा प्रयत्न केल्याबद्दल! हे ऐकल्यावर मात्र त्या चारही प्रमुखांचे चेहरे पांढरे पडले! पण या विरुद्ध काही ते बोलूही शकत नव्हते. नरेन्द्र पुढे म्हणाला, "त्यांचं काम बरोबर नसेल, तर त्यांना कामावरून काढूनही टाकता येईल. परन्तु हा निर्णय तुमच्या हाती असेल."

आता प्रमुख कर्मचाऱ्यांना खरं रहस्य समजलं. नवीन लोकांना कामावर ठेवणं, जुन्या सेवकांना काढून टाकणं, कार्यक्षम सेवकांना वेतन-वाढ देणं हे सर्व त्यांच्या कामावर अवलंबून राहील. कामाचा अहवाल तयार करण्यासाठी जमीनदाराने चांगली पद्धति शोधून काढलेली आहे हे त्या सर्वांना समजलं. ही पद्धत अंमलात नव्हती तेंव्हा आपण जे केलं ते केलं. आता इथून पुढे तसं करता येणार नाही.

एक महिन्या भरात जुन्या सेवकांनी पूर्वी पेक्षा खूप अधिक काम केलं. प्रमुख कर्मचाऱ्यांनी आपली व्यक्तिगत कामं करण्यासाठी अन्य व्यवस्था केली. कारण कनिष्ठ सेवकांना त्यांनी प्रत्यक्ष केलेलं काम पाहूनच त्याचं फळ मिळूं लागलं, प्रमुखांच्या नुसत्या सिफारशीवर नव्हे! आता प्रमुखांची व्यक्तिगत कामे करण्यात काय स्वारस्य?

नरेन्द्रला प्रतापची ही योजना यशस्वी



झालेली दिसली. त्याला फार आनंद झाला आणि तो चक्रधरपुरला जाऊन चतुरला भेटला. तो म्हणाला—"आपल्या प्रतापची बुद्धि असामान्य आहे. त्याला माझ्याकडे पाठवा. माझा दिवाण बनून तो माझ्या जमीनदारीची व्यवस्था छान सांभाळेल."

हसून चतुर म्हणाला—"प्रताप फार अहंकारी आहे हे मी तुला अगोदरच सांगितलं आहे. तू त्याच्यापुढे काहीच नाहीस. त्याची वागणूक तुला सहन होणार नाही."

"आपण सांगितलेलं मला खूप चांगलं समजलंय. त्याचा अहंकार कमी करण्याचा उपाय मी योजून ठेवला आहे. शबरीवनात प्रवीण नावाचा एक योगी रहातो. तो फार ज्ञानी आहे. आपला प्रतापच काय, जगातील



महान् बुद्धिवान माणूस ही त्याच्यापुढे तुच्छच! त्याची बरोबरी करणारा विरळाच! तो कोणाशी बोलत नाही. त्याच्या जवळ कोणी जाऊ नये अशी व्यवस्था त्याने मला करायला सांगितली आहे. आपला प्रताप एक आठवडा भर त्याच्या संगतीत राहिला तर त्याचे ज्ञान वाढेल. त्याचा अहंकार आपोआप कमी होईल.'' नरेन्द्रने सुचविले.

''त्या प्रवीणला भेटायला प्रतापला तयार करण्याची जबाबदारी तुझी. त्याच्यात काही बदल घडला तर माझ्याहून अधिक आनंद कोणाला होईल?'' चतुरने विचारले.

रात्री जेव्हा प्रताप शेतावरून परत आला तेव्हा प्रवीण बाबत माहिती देऊन नरेन्द्र म्हणाला—''जो आपल्याला योगी म्हणवतो, त्याने तर आपले ज्ञान दुसऱ्यांना दिले पाहिजे. प्रवीण सारखं अहंकारी असणं योग्य नाही. मी तुला प्रवीणकडे घेऊन चलतो. त्याने आपले ज्ञान इतरांना द्यावे यासाठी तू काही तरी उपाय कर. आणि हे काम केवळ तूच करू शकतोस असे मला वाटते.''

दुसऱ्या दिवशी प्रताप प्रवीणला भेटला. तो प्रवीणला काही समजावू लागला एवढ्यात धमकावत प्रवीण म्हणाला—''मला काही समजाऊन सांगण्याची तुझी योग्यता तरी आहे का? मी ज्या शास्त्रांचं अध्ययन केलेलं आहे, त्यांबाबत मी तुला सांगतो. ते नीट ऐक, नि मग विचार कर की मला काही समजावण्याची तुझी कितपत योग्यता आहे?'' चार दिवसात प्रवीणने प्रतापला निरनिराळ्या शास्त्रांचे सार कथन केले. इतकी भिन्न भिन्न शास्त्रे आहेत हे ही प्रतापला आज पर्यंत माहित नव्हते. प्रथम त्याला मोठं आश्चर्य वाटलं, पण नंतर आपल्याला सावरीत तो म्हणाला—''आपण इतक्या शास्त्रांचं गंभीर अध्ययन केलं खरं, पण त्याचा उपयोग काय? एकाद्या सामान्य माणसाला ते समजावून सांगू शकत नाही आपण! आपल्या सारखं शास्त्रांचं ज्ञान मला नाही. पण सामान्य माणसाला उपयोगी होतील अशी किती तरी कामं मी केलेली आहेत. मी त्यांना काही उपयुक्त सूचना सुद्धा देऊ शकतो.'' आपण केलेल्या सर्व कामांची माहिती त्याने प्रवीणला दिली. त्यात नरेन्द्रसाठी त्याने जे काही केले होते त्याबाबतचे विवरण ही होते.

सर्व शांतपणे ऐकून प्रवीण म्हणाला—''तुझ्या चेहऱ्यावरील तेज पाहूनच तू एक महान माणूस आहेस हे मी जाणलं. तू सांगितलेल्या गोष्टी ऐकून मी तुला पूर्णपणे समजून चुकलो. जगात तुझ्यासारख्या माणसांची खूप आवश्यकता आहे. माझ्यासारखी माणसे जगाच्या दृष्टीने निरुपयोगीच. म्हणूनच मी इथे आश्रमात राहतो. तू नेहमी समाजात रहा नि समाज-सेवेचं काम करीत रहा.''

प्रताप घरी परतला नि घडलेलं सर्व काही आपल्या वडिलांना व नरेन्द्रला सांगितलं. प्रवीण सारख्या योग्याचे प्रमाण-पत्र मिळाल्यावर आता प्रतापचा अहंकार अधिक फोफावणार व त्याला ताब्यात ठेवणे अधिक कठीण होणार असे वडिलांना वाटले. पण आश्चर्य, त्या दिवसापासून आपला मोठेपणा सांगण्याचं प्रतापने सोडून दिलं. जे मागतील त्यांनाच तो योग्य सल्ला देई. आता तो अधिक विनयी झाला होता. प्रताप मधे झालेल्या या बदलाचं कारण वडिलांच्या लक्षात आलं.

त्यांनी विचार केला-प्रवीण खरोखर एक महाज्ञानी माणूस आहे! त्याने प्रतापची प्रशंसा करून त्याला समाज-सेवेत रमवलं आणि स्वतः त्यापासून वाचला. ज्ञानी लोकांना सल्ला देऊन आपण प्रसिद्ध व्हावं अशी त्याची इच्छा नव्हती. हे रहस्य प्रतापच्या लक्षात आलं आणि आपलं ज्ञान फार अल्प असल्याचं ही त्याने जाणलं. प्रतापने प्रवीणला जन-समाजात आणण्याचा प्रयत्न केला, पण ते त्याला जमले नाही. त्याच्या लक्षात आलं की आपल्याहून जे अधिक बुद्धिमान आहेत, त्यांच्यापुढे आपण फिक्के आहोत. प्रवीणने प्रतापची जास्तच तारीफ केली आणि आपल्या विनयाने त्याच्यावर जय मिळवला. दुसऱ्याला अविनयाने जिंकता येत नाही, तर विनयानेच त्याच्यावर मात करता येते हे आता प्रतापच्या लक्षात आलं. हे रहस्य समजल्यावर आता कोणातील अहंकार शिल्लक राहील?





# पवित्र-कर्तव्य

खूप पूर्वी एक भक्त होता. यात्रा करावी अशी त्याची तीव्र इच्छा होती. पण घरून निघणेच त्याला अशक्य होते; कारण त्याचे म्हातारे आई-बाप बिचारे त्याच्याच आधाराने रहात होते.

आपल्या या स्थितीबद्दल त्याला नेहमी फार दुःख वाटे.

'काहीही करून तीर्थयात्रेला जायचेच' अशा प्रबळ इच्छेने कधी कधी 'या म्हाताऱ्यांना तसेच सोडून आपण निघून जाऊ' असाही विचार त्याच्या मनात येई. अशातच एकदा एक संधी त्याच्या हाती आली. त्याचा एक नातेवाईक त्याच्याकडे येऊन म्हणाला, "हे बघ बेटा, तू जा यात्रेला. तू परत येईपर्यन्त म्हाताऱ्या आईबापांना मी संभाळीन."

भक्ताच्या मनची इच्छा पूर्ण होऊन तो यात्रेला निघाला. वाटेत एका जंगलातून जाताना त्याच्या कानी आले की, कुक्कुर नावाचा एक साधु याच जंगलात रहात असून हजारो माणसे त्याच्या दर्शनार्थ जंगलात येत असतात.

मोठ्या उत्साहाने हा भक्तही अुत्साहाने त्या साधूच्या आश्रमात गेला. प्रत्यक्षात त्यांना पाहून भक्ताला फारच आश्चर्य वाटले. कारण साधुमहाराज तपस्या वगैरे काहीच न करता अगदी सर्वसामान्य गृहस्थाप्रमाणेच कालयापन करत होते!

त्या मुनीने स्वयंपाक केला, आपल्या वृद्ध माता-पित्यांना जेवण वाढले. हे सर्व संपल्यावर साधुमहाराज बाहेर आले आणि भक्ताला तिथे पाहून विचारू लागले, "बेटा, काय झालंय? इथे कोणत्या कामासाठी आला आहेस तू?"

भक्त अुत्तरला, "मुनिवर, मी यात्रा करत इथे येऊन पोचलोय. आपलं नाव ऐकून दर्शनार्थ आपल्या आश्रमात आलो. त्रिवेणी संगम इथून जवळच आहे असं कळलंय. इथून तिथे कसं पोचायचं हे सांगू शकाल काय?"

मुनि "बाळा, आपल्या म्हाताऱ्या मातापित्यांच्या सेवेत मग्न असतो मी. त्यांना सोडून कधीही, कुठेही मी गेलो नाही, जावंसं वाटलंही नाही कधी. त्यामुळे त्रिवेणी संगमाकडे जायची वाट मला माहीत नाही." असे म्हणत आत निघून गेले.

भक्ताला वाटले होते की मुनि आपल्याला काही मदत करतील; त्रिवेणी संगमाचा रस्ता सांगून मार्गदर्शनही करतील. परन्तु त्यांच्या या अुत्तराने तो निराश झाला. त्यांच्याबद्दलची आदरभावनाही त्याच्या मनातून नाहीशी झाली. तो असे समजला की, हे कोणी साधु-बिधु नसून आपल्या मातापित्यांच्या सेवेत रत असलेले सामान्य गृहस्थच तर आहेत! 'लोक यांची इतकी प्रशंसा तरी का करतात? लोकांना एवढं आकर्षित करण्यासारखी त्यांच्यात काही महत्ताही नाही' असा विचार करत तो तेथेच अुभा राहिला.

इतक्यात तीन स्त्रिया तेथे आल्या. आणि आश्रमात शिरल्या. तिघींचे ही चेहरे दिसायला अगदी घाणेरडे होते! त्यांना पाहून भक्ताच्या मनात कुतुहल जागृत झाले व पुढे काय होते, हे पहाण्यासाठी तो प्रतीक्षा करू लागला.

थोड्याच वेळात त्या तिघीही स्त्रिया अगदी अप्सरा बनून बाहेर पडल्या! त्यांचे अपूर्व सौन्दर्य पाहून त्यांच्याशी बोलल्याशिवाय भक्ताला राहवेना! त्याने



आशुतोष खोले

तिघींना अुद्देशून विचारले," देवी, आपण कोण आहात? इथे कशासाठी आल्या आहात?"

त्या सुंदरी म्हणाल्या, "आम्ही तिघी बहिणी आहोत. या लोकात आम्हाला गंगा, यमुना आणि सरस्वती असे संबोधले जाते. प्रयागजवळ आम्ही तिघी एकत्र मिसळतो. आपली पापं धुवायला लोक मोठ्या अुत्सुकतेने इथे येअून आमच्या पाण्यात स्नान करतात. ही माणसं तऱ्हेतऱ्हेची पापं करून इथे आलेली असतात. काहीजणं आपल्या आईबापांची अुपेक्षा करून त्यांचा अनादर करतात, अन् काही तर असे असतात की त्यांची पापं क्षम्यच नव्हेत! या पापी लोकांच्या पापांमुळे आमची रूपं मात्र अगदी किळसवाणी बनून जातात. तू थोड्या वेळापूर्वी आमची जी घाणेरडी रूपं पाहिलीस, ती अशा पापांचंच फळ!"

त्यांचे हे बोलणे ऐकून भक्त आश्चर्यचकित झाला. "आपली किळसवाणी रूपं बदलून पहिल्यासारखी करण्यासाठी आम्ही या साधूच्या आश्रमात येतो. जेंव्हा जेंव्हा अधिकाधिक पापांमुळे आम्ही अधिकाधिक घाण होतो, तेंव्हा तेंव्हा आम्ही इथे येअून या महात्म्याचं दर्शन घेतो. याच्या आशिर्वादाच्या बळानेच आम्ही आपल्या पावित्र्याचं रक्षण करत असतो." आणि त्या तिघीही अंतर्धान पावल्या.

त्यांच्या बोलण्याने भक्ताच्या मनात मोठेच परिवर्तन घडले. खूप दीर्घ काळापासून त्याच्या मनात असलेली यात्रा करायची इच्छा त्याक्षणीच लुप्त झाली. आणखी काहीही विचार न करता तो सरळ घरी गेला. त्या दिवसापासून तो आपल्या आईवडलांनाच देव मानू लागला. आणि भक्तिपूर्वक त्यांची सेवा करू लागला.

गंगा, यमुना, सरस्वती यांचे दर्शन घेअून तो आपलं जीवन सार्थकी लावू इच्छित होता. त्याला असे वाटले की, प्रत्यक्ष त्यांना पाहूनच आपले जीवन धन्य झाले आहे.

यानंतर त्या तीन्ही देवींचे स्मरण करत आणि मातापित्यांची सेवा करत तो आपले जीवन निर्विघ्नपणे घालवत राहिला.



# बहुरूपा वसुंधरा

## पाण्याविना जगणारे जीव



अुंटांना 'वाळवंटातील जहाज' असे म्हटले जाते. जहाज पाण्यावर चालते, पण अुंट तर पाणी न पिताही कित्येक दिवस वाळवंटातून सफर करतात. त्यांच्या झुकलेल्या पाठीवरील अुंचवट्यात-मदारीत चर्बीचे प्रमाण अधिक असते. ही चर्बी त्याच्या शरीराला पुरेशी शक्ती पुरवते. अुंटांना जास्त घाम येत नाही; त्यामुळे त्यांच्या शरीरातील पाण्याचे प्रमाण जसेच्या तसेच रहाते. परंतु पाणी दिसल्यावर मात्र तो एकाच वेळी एकदम २५ गॅलन पाणी पिअून घेतो. साधारणतः ते सुके गवत व निवडुंगासारख्या वनस्पती खातात.

## पंख कुरवाळणारे पक्षी

पक्ष्यांच्या शरीराची पिसे काढली, आणि ती पाण्यात भिजवली, तर त्यांचे केस निघू लागतात. पण जोवर ती पंखांना चिकटून असतात, तोवर ती भिजली तरी त्यांचे केस निघत नाहीत. याचे कारण आहे—पक्ष्यांच्या शरीरावर आढळणाऱ्या तैलग्रन्थी. जवळजवळ सर्वच पक्ष्यांच्या शेपटीच्या आरंभाशी या तैलग्रंथी



असतात. पक्षी जेंव्हा आपल्या चोचीने शेपूट कुरवाळतात तेंव्हा या ग्रंथीतून तेल झरते आणि ते एकेका पिसावर पसरते. त्यामुळे पावसात पक्षी जेंव्हा आकाशात अुडतात तेंव्हा त्यांचे पंख भिजत नाहीत. पक्षी नेहमी अशाच प्रयत्नात असतात की पाण्याचे थेंब घरंगळून जातील. यामुळेच पक्षी नेहमीच आपले पंख कुरवाळत असतात. अशी क्रिया करत असताना थोडेसे तेल त्यांच्या तोंडातही शिरून ते व्हिटॅमिनचे काम करते.

## दीर्घायुष्य

मॉरिशियस नावाचे कासव १५० वर्षे जिवन्त होते. ज्यांनी ते पाहिले आहे, असे लोक म्हणतात की ते २०० वर्षे पर्यन्त ही जिवन्त राहू शकते. अमेरिकेतील कॅरोलिना नावाच्या जिवन्त कासवाचे वय १२३ वर्षांचे आहे. जनावरांत हत्ती हा ६०-७० वर्षे जगू शकतो.



गेंडा ४० वर्षे आणि अस्वल ३०-३२ वर्षे जिवन्त रहाते.काही घोडे तर ५० वर्षेही जगतात. कुत्र्याची आयुर्मर्यादा बावीस वर्षांची, तर काही गरुड व पोपट हे पन्नास वर्षेही जगतात. माशांमधे एक प्रकारचा मासा साठ वर्षे जगू शकतो. अमेरिकेत लाईल हा प्राणी ५० वर्षे जिवन्त रहातो.

विशेष बातम्या

## महामस्तकाभिषेक

कुंभमेळा व गोदावरी पुष्कर प्रमाणेच बाहुबलीचा महामस्तकाभिषेकही दर बारा वर्षांनी साजरा केला जातो. कर्नाटकात हासन जिल्हा आहे. या जिल्ह्यात श्रवणबेळगोळा नावाचे सुप्रसिद्ध स्थान आहे. तेथील इन्द्रगिरी नावाच्या पहाडात ही बाहुबलीची मूर्ती आहे. एकाच शिळेत कोरलेली ही मूर्ती जगातील सर्वात उंच मूर्ती आहे. इसवी सन १८९ मधे या मूर्तीची प्रतिष्ठापना झाली. विसाव्या शतकात सात वेळा–१९००, १९१०, १९२३, १९४०, १९५३, १९६७ आणि १९८१ मधे हे महासस्तकाभिषेक साजरे झाले. या शताब्दीतला शेवटचा, आणि आठवा अभिषेक १९ डिसेंबरला मोठ्या थाटामाटात साजरा झाला. प्रतिमेच्या प्रतिष्ठापनेनंतरच्या या २५ व्या महामस्तकाभिषेकात असंख्य भक्तांनी भाग घेतला. महोत्सवाच्या कार्यक्रमाची योजना उच्च स्तरावरुन केली गेली. शुभ नक्षत्र, ग्रह अन् राशीप्रमाणे बारा वर्षांच्या मुदतीत कधी कधी थोडा फार फरक होतोच.

चोवीस तीर्थंकरांपैकी वर्धमान महावीर हा शेवटचा तीर्थंकर होय. त्याने जैनमताची स्थापना केली. पहिला तीर्थंकर आदिनाथ ऋषभदेव हा राजा होता. त्याने इहलोकातील समस्त बंधनांचा त्याग केला



आणि आपला ज्येष्ठ पुत्र भरत याला अयोध्येचे राजपद सोपवले आणि धाकटा पुत्र महावीर याला पोदानपुर राज्य दिले. परन्तु भरताच्या मनात आपल्या भावाचेही राज्य हडपण्याचा विचार आला. बाहुबलीने त्याला विरोध दर्शवला. दोन्ही भावांच्या सैन्यात युद्ध सुरू होणार, इतक्यात त्यांच्या मन्त्र्यांनी दोन्ही भावांना समजावून सांगितले की या भयंकर युद्धात अपार प्राणहानी होणार आहे. दोघांनाही मन्त्र्यांचे म्हणणे पटले अन् त्यांनी निश्चित केले की युद्ध दोन सैन्यांच्यात न होता, त्या दोघांच्यातच मर्यादित राहील आणि दोघांनी आपसात लढून, कोण बलवान आहे आणि कुणाचा विजय झालाय हे ठरवावे. दोघा भावात मुष्टियुद्ध, जलयुद्ध आणि मल्लयुद्ध झाले. तीन्ही युद्धात भरतच पराजित झाला. बाहुबलीने आपल्या दोन्ही हातांनी धरून त्याला उचलले. आता तो त्याला जमिनीवर आपटणार, तोच काही विचाराने तो अकस्मात् थांबला. त्याचा राग आता शान्त झाला होता! लोभ आणि गर्व यांमुळे आपल्या भावाचे किती मर्यादेपर्यन्त पतन झाले हे सत्य ही समजून चुकला अन् त्याच्या मनात ज्ञानोदय झाला. सांसारिक

मोहांबाबत त्याला वैराग्य आले, आणि आपल्या राज्याचाही त्याग करून तो निघाला.

भरतालाही आपल्या कृतीबद्दल पश्चात्ताप झाला. संसारत्याग न करण्याबद्दल त्याने आपल्या भावाची खूप विनवणी केली. परन्तु बाहुबलीने तिकडे दुर्लक्ष केले अन् दृढसंकल्प करून निद्रा व आहार यांचाही त्याग करून महिनोनुमहिने अुभ्यानेच त्याने घोर तपस्या केली. त्याच्या चारही बाजूंना झुडपे अुगवली; वेल त्याच्या हातापायांवर पसरले. भरत पुन्हा एकदा भावाकडे जाअून त्याला म्हणाला, "हे श्रमण, कोणीही तुझं नाही अन् कोणी माझंही नाही." पण बाहुबलीवर त्याचा काहीच परिणाम झाला नाही. त्याचा निश्चय बदलला नाही. यानन्तर काही काळाने बाहुबलीला मोक्ष मिळाला. भरताने आपल्या भावाची एक सुवर्णप्रतिमा बनवली आणि पोदानपुरमधे तिची प्रतिष्ठापना केली.

दहाव्या शतकात गंगावंशातील द्वितीय राजमलच्या संस्थानात चामुंडराय नावाचा प्रधानमन्त्री आणि सेनाधिपती होता. त्याची आई कल्ललदेवी हिला बाहुबलीची सुवर्णप्रतिमा पहायची इच्छा झाली. ती आपला पुत्र आणि आचार्य अजितसेन यांना बरोबर घेअून पोदानपुरकडे निघाली. वाटेत चन्द्रगिरी व इन्द्रगिरी नावांच्या दोन पर्वतांमधील जागेत त्यांनी मुक्काम केला. त्या रात्री तिघांना एकच स्वप्न दिसले. स्वप्नात साक्षात् कुष्मांडिनी देवी प्रकट झाली आणि म्हणाली, "तुम्हाला पोदानपुरात सुवर्ण प्रतिमा पहायला मिळणार नाही. चन्द्रगिरी वर अुभे राहून दक्षिणेकडे इन्द्रगिरिवर एक सुवर्णबाण सोडा." दुसऱ्या दिवशी प्रात:काळी चामुंडरायाने बाण सोडला. तो जिथे पडला, तिथे त्यांना बाहुबलीची आकृती दिसली.

चामुंडरायाने नंतर मूर्ति निर्माण करण्यासाठी शिल्पकारांना बोलावून घेतले. अरिष्टनेमी नावाच्या शिल्पकाराच्या नेतृत्वाखाली बाहुबलीची एक अद्भुत् मूर्ति निर्माण केली गेली. ही मूर्ति एकाच अखंड शिळेत कोरलेली आहे. ९८१ साली १३ मार्च रोजी इन्द्रगिरीवर या मूर्तीची प्रतिष्ठापना होअून स्वत: चामुंडरायाने तिचा पहिला महामस्तकाभिषेक केला. चामुंडरायाला लहानपणी गोम (सुंदर) असे म्हणत असत; म्हणून या बाहुबलीच्या प्रतिमेला गोमटेश्वर असे नाव पडले.

ही मूर्ति अुत्तराभिमुख असून तिची अुंची ५७ फूट आहे. या प्रतिमेच्या चेहऱ्यावर पसरलेले मधुर, गंभीर हास्य पाहून मुग्ध होणार नाही असा माणूस विरळाच. असे वाटते की हा बाहुबली जगाला शान्ति व अहिंसेचा संदेश देत आहे. जैनमत अहिंसेचा पुरस्कार करते आणि जगाला आपल्या मताचा बोध करते. या प्रतिमेच्या पायाजवळ एक छोटासा तलाव आहे. त्यालाच कानडीत 'बोळगोळा' असे म्हणतात. सर्वांगांनी प्रमाणबद्ध अशी, अत्यन्त जागरुकतेने निर्माण केलेल्या कलेचा नमुना म्हणजेच ही मूर्ती.

### अभिषेकाची पद्धत

पूजेचा कार्यक्रम पंधरा दिवस अगोदर सुरू होत असला, तरी प्रत्यक्ष अभिषेक पूर्ण होण्यास फक्त सहा तासच लागतात. प्रथम मूर्तीला अुसाच्या रसाने, दुधाने व अन्यान्य मुळांच्या रसाने अभिषेक केला जातो. नंतर मूर्तीच्या पावलांजवळील तलावातील पवित्र जलाने १००८ कलश भरले जातात. भक्तजन हे कलश अुचलून आणतात व नन्तर त्या पाण्याने अभिषेक करतात. यानन्तर तीन प्रकारची चंदने व विविध फुलांनी मस्तकाभिषेक केला जातो. सर्वसंगपरित्याग केलेल्या महान त्यागी अशा बाहुबलीची पूजा आठ प्रकारच्या फळांफुलांनी केली जाते.



# अद्भुत् वीणा

संगीपुरीत अगदी नावालाही कोणी संगीतज्ञ नव्हता. संगीताची वाद्ये विकणाराचे एकच एक दुकान मात्र होते तेथे; अन् त्यामुळेच गावाचे नाव "संगीतपुरी" असे पडले होतें. वीणा, बासरी, मृदुंग आदि सर्व वाद्ये तेथे मिळू शकत असत. इतकी उतम वाद्ये अन्यत्र कोठे शोधून ही सापडत नसत.

त्या दुकानच्या मालकाचे नाव होते रामावतार. तो आता म्हातारा झाल्यामुळे, त्याचा मुलगा मुरलीच अलिकडे दुकान चालवत असे.

संगीतपुरीपासून कोसभर अंतरावर गुळगुळीत असे डोंगर होते. संगीतवाद्यांसाठी आवश्यक अशी सामग्री तेथे आसपास अुपलब्ध होई. महिन्यातून एकदा मुरली एक बैलगाडी व काही मजूर घेअून तेथे जाई. तेथे तो मजुरांकरवी एकादे झाड तोडवून त्याचे वाद्य बनवत असे. त्याच्या दुकानातील वाद्यांना खूपच मागणी असे. आसपासच्या गावचे सर्व लोक वाद्यखरेदीसाठी मुरलीकडेच येत असत.

त्या राज्याची राजकुमारी चारुलता हिने सागवान लाकडापासून बनवलेली अुत्तम प्रकारची एक वीणा खरीदण्यासाठी आपला माणूस या दुकानात पाठवला.

"माझ्याकडे आत्ता अशा प्रकारची वीणा तयार नाहीय. पण दहा दिवसात तशी वीणा बनवून मी स्वत:च घेअून येतो असे राजकुमारींना सांग. यासाठी मला जंगलात जाऊन एक विशेष प्रकारचे लाकूड शोधून आणले पाहिजे." असे सांगून मुरलीने त्या माणसाला परत पाठवले.

वीणेसाठी आवश्यक असे सागाचे लाकूड आणण्यासाठी मुरली दुसऱ्या दिवशी भल्या सकाळीच एक मजूर बरोबर घेअून त्या पहाडाकडे गेला. अनेक वृक्षांचे त्याने अत्यंत

मल्लिका वाघ



बारकाईने निरीक्षण केले, परन्तु खूप शोधूनही त्याला योग्य असे उत्तम सागवानाचे झाड आढळेना.

दुपारी मुरली आणि मजुराने आपले जेवण उरकले आणि पुन्हा ते दोघे सागवान वृक्षाच्या शोधात निघाले. बऱ्याच शोधाशोधी नन्तर एका झऱ्याकाठी त्यांना सागवानाचा एक मजबूत असा वृक्ष दिसला. मुरलीने त्या वृक्षाचे नीट परीक्षण केल्यावर त्याला तो आपल्या उपयोगाचा वाटला. तरीही झाडाच्या फांद्या इतक्या दाट का अशी शंका त्याच्या मनात आलीच. आता मजुराने आपले काम सुरू करण्यासाठी कुऱ्हाड उचलली. तो आता वृक्षावर आपली कुऱ्हाड मारणार.

इतक्यात तेथे एक आवाज उठला, "थांब, माझं निवासस्थान असं नष्ट करू नकोस!" आवाज एका स्त्रीचा होता. दुसऱ्याच क्षणी एक यक्षिणी त्यांच्या समोर प्रकट झाली. ती दिसायला फार सुंदर होती.

मुरारी व मजूर तिला पाहून भीतीने थरथरू लागले. तेव्हां यक्षिणी म्हणाली, "ही माझी रहायची जागा आहे. बऱ्याच वर्षांपासून मी इथे मोठ्या सुखाने रहात आलेय. तुम्हाला हे झाड तोडायची काय गरज पडली हे कळू शकेल मला? ते न तोडताच तुमचे काम होईल असं मी काही करू शकेन."

यक्षिणी रागावलेली नाहीय हे मुरलीच्या लक्षात आले. ती खूपच शांतपणे बोलत होती. तेव्हा स्वतःला संयत करून धैर्याने तो यक्षिणीला म्हणाला. "एक वीणा बनवून द्यायचं मी राजकुमारीला कबूल केलंय. त्यासाठी आवश्यक असा आणखी एकादा वृक्ष इथे नसल्यामुळे हाच तोडावा असं मी ठरवलं."

मुरलीच्या या बोलण्यावर रागावून यक्षिणी म्हणाली, "फक्त एक वीणा बनवायला तुला काय फक्त माझंच झाड सापडलं होय?" अनं असे बोलताबोलताच तिने आपले हात पसरले.

क्षणभरातच तिच्या पसरलेल्या हातांवर एक अद्भुत अशी वीणा दिसू लागली. तिला अधेमधे मौल्यवान असे हिरे जडवलेले होते.

अवाक होऊन मुरली ती वीणा पहातच राहिला! तेंव्हा ती यक्षिणी त्याला म्हणाली, "ही वीणा मोठी महिमामयी आहे. सा रे ग म सुद्धा माहित नसलेली व्यक्ति ही ही वीणा वाजवू शकेल. हिच्या समोर बसून देवी सरस्वतीचं श्रद्धापूर्वक ध्यान केलं तर मनात असलेला कोणताही राग ती व्यक्ति वाजवू शकेल! वीणेच्या तारांवर नुसता हात फिरवला की पुरे! पण हां, दोन राग मात्र असे आहेत, की जे नीट विचारपूर्वकच वाजवायला हवेत. मोहनराग वाजवला, तर वाजवणारा ज्या स्त्रीचं स्मरण करेल, ती त्याला वश होईल; त्याच्यावर प्रेम करू लागेल. आणि वरूणराग वाजवला, तर मुसळधार पाऊस पडेल. एक गोष्ट नीट लक्षात ठेव-हा वृक्ष जिवन्त असेपर्यन्त मी इथे राहीन; अन् मी इथे असेपर्यन्तच वीणेचा हा महिमा, ही शक्ती, कायम राहील. मी सांगितलेलं हे सर्व कायम लक्षात ठेव. हं, आता घे ही वीणा." ती अजब वीणा मुरलीच्या हाती सोपवून यक्षिणी अंतर्धान पावली.

मुरलीच्या कधी मनातही आले नव्हते, की एक दिवस अशी अद्भुत वीणा आपल्याला प्राप्त होईल! त्याच्या आनन्दाला पारावार उरला नाही. त्याच्या मनात आले की, आपण मनात आणले तर या वीणेच्या साह्याने खुद्द राजकुमारी चारुलतेशी विवाहसुद्धा करू शकू.

मुरली असल्या स्वप्नात दंग असतानाच मजुराने त्याला सावध करत म्हटले, "मालक, आता सूर्य बुडायच्या बेतात आहे. आपण आपल्या घराकडे निघावं हे बरं!"

मुरली आपल्या स्वप्नातून जागा होऊन मजुराला म्हणाला, "ठीक आहे, चल निघू





या. पण नीट ऐकून घे—या वीणेबद्दल कुणाशी, कधी काही बोलू नकोस."

पण आपल्या घरी पोचल्याबरोबर मजुराने बायकोला त्या वीणेबद्दल सर्व काही सांगितले. त्याने तिला 'इतर कोणाकडे वाच्यता न करण्याबद्दलही' बजावले. पण बायकांच्या तोंडात कधी तीळ भिजलाय? तिने ते रहस्य अन्यत्र ओकलेच. आणि सकाळ अुजाडता-अुजाडता ती गोष्ट आगीसारखी गावभर पसरली.

मुरली सकाळी झोपेतून अुठतोय न अुठतोय तोच, त्याच्या घरापुढे मोठी गर्दी जमलेली होती! एकाद्या अुत्सवात भाग घ्यायला आल्यासारखी ती गर्दी भासत होती. का आणि कसे हे घडले असावे—हे मुरलीने लगेच ताडले. गर्दीतली माणसे त्या अद्भुत वीणेच्या तारा एकदा झंकारून दाखवायला त्याला आग्रह करू लागली.

असल्या भाकडकथांवर विश्वास नसणारा एक तरूण तर पुढे येअून आव्हान देअू लागला की, "अुशीर कसला? आपली महिमामयी वीणा वाजवून आपल्या राजकुमारी चारुलतेशीच विवाह कर ना; म्हणजे भविष्यात तूच आपल्या देशाचा राजाही बनशील."

त्याच्या या चेष्टेमुळे मुरली मनोमन रागावला. त्याचे सांगणे खरे करून दाखवण्यासाठी त्याने आत जाअून यक्षिणीने दिलेली वीणा बाहेर आणली. आपल्या घरासमोरच्या चौथऱ्यावर तो पद्मासन घालून बसला आणि थोडा वेळ डोळे मिटून देवी सरस्वतीचे स्मरण करून ध्यान लावले.

प्रार्थना संपल्याबरोबर राजकुमारी चारुलताने आपल्यावर प्रेम करावे असे मनात आणून त्याने रागाचे स्मरण केले. नन्तर त्याने मोठ्या मृदुतेने वीणेच्या तारा छेडल्या आणि जनता तद्रूप होअून वीणावादन ऐकू लागली!

अकस्मात वातावरणात बदल झाला! आकाश काळ्या ढगांनी भरून आले आणि विजेचा जोरदार कडकडाट झाला. जनतेबरोबरच मुरलीही एकदम घाबरून गेला, कारण आता कुठे त्याच्या लक्षात आले की, आपण चूक केलीय! मोहनरागाऐवजी त्याने वरुणरागाचे स्मरण केले होते, अन्



परिणामतः पाअूस सुरू झाला होता! पण आता काय अुपयोग? बाण तर हातून सुटून गेला होता! पाअूस वाढतच राहिला!

"अरे! ग्रीष्मकाळात हा पाअूस कसा?" असे म्हणत लोक आपापल्या घरांच्या आश्रयाला धावले.

आकाशात पुन्हा एकदा डोळे दिपवणारी वीज चमकली अन् दूरवर कुठे तरी वीज पडल्याचा आवाज झाला. 'आपण हा काय अनर्थ केला!' असे मुरलीच्या मनात आले. अकस्मात् आपल्या हातांना कसलासा कोमल स्पर्श होत असल्याचे त्याला जाणवले. त्याने पाहिले तो वीणेच्या जागी एक अजस्र साप फूत्कारत होता! भयकंपित होअून मुरली जोराने किंचाळून पटकन् अुठून अुभा राहिला. सापाने आपली फणा पसरून एकदा मुरारीकडे निरखून पाहिले! ताबडतोब चौथऱ्यावरून खाली अुतरून वेगाने आकाशात झेप घेअून तो अदृश्य झाला!

घरासमोर एकत्र झालेल्या गर्दीचा कोलाहल ऐकून मुरलीचा पिता रामावतार बाहेर आलेला होता. मुलाकडून त्याला सारी हकिकत समजली. तो मुरलीला म्हणाला, "मुरली, तुझी वागणुक आपल्या वृत्तीच्या, धर्माच्या अगदी अुलट झाली! आपल्यावर हा कधी न जाणारा डाग आहे. इथून पुढे का होईना, पण या अनुभवावरून बोध घेअून सद्व्यवहार करत जा. व्यर्थ मोहात पडून स्वतःला कलंकित करून घेअू नकोस. लोक तुला हसतील, असं काम कधीही करू नकोस. आजच जाअून अुत्तम सागवान शोधून राजकुमारीसाठी वीणा बनव. " असाच बराच अुपदेश त्याने मुलाला केला.

मुरली सागाचे लाकूड आणायला गेला, तेव्हा त्याला असे दिसून आले की, यक्षिणीचा निवास असलेले ते सागवानाचे झाडच वीज पडल्याने जळून गेले होते!

पुन्हा मोठ्या कष्टाने आणखी एक सागवान वृक्ष शोधून मुरलीने एका महिन्याच्या आत राजकुमारी साठी एक सुंदर वीणा बनवली आणि स्वतः राजवाड्यात जाअून तिला अर्पण केली.



# योध्यांचा योद्धा

मगधराजा कृतकीर्तीने हेलापुरीपर आक्रमण करून 'हात दाखवून अवलक्षण' करून घेतले. पराजित होअून तो भयंकर जखमीही झाला. विजयी सैन्याचा सेनापती व अन्य योध्यांना बोलावून हेलापुरीच्या राजाने त्यांना अकेकानेक बक्षिसे दिली.

त्यावेळी अशी एक बातमी कळली की वीरबाहु नावाच्या सैनिकाने रणक्षेत्रात अतुल पराक्रम केला. त्याने म्हणे हजाराहून अधिक शत्रुसैनिकांचे हातपाय तोडून टाकले होते! ग्रामवासींना हे समजले तेंव्हा त्यांनी वीरबाहूचा सत्कार केला. त्याच्या गळ्यात अगणित हार पडले आणि त्याची मिरवणूक काढली गेली. त्याच्या प्रशंसापर गाणी गाअून ते लोक नाचलेही. जनतेच्या या अपार आदरप्रदर्शनामुळे आनंदलेला वीरबाहु जेंव्हा डोलत होता, तेंव्हा त्या गर्दीतल्या एका माणसाने त्याला विचारले, "वीरबाहु, अरे तू शत्रूसैनिकांची डोकी न अुडवता फक्त हातपायच का बरं कापून काढलेस?"

वीरबाहूने आपल्या मिशीवर ताव देत जरासा विचार केला, आणि तो अुत्तरला, "मला तशी संधीच कुठे मिळाली? त्या सर्वांची डोकी तर अगोदरच कुणीतरी अुडवलेली होती!"





# अद्भुत् फूल-११

(नागपुरीच्या राजाने ठरवले की दलपती नागसिंहच्या नेतृत्वाखाली काही सैनिक अुत्तुंगबरोबर पाठवायचे; म्हणजे राक्षसी प्राण्याला मारण्यासाठी ते त्याला मदत करतील. त्याच रात्री सरहद्दीवरील प्रांतातून परतलेल्या नागसिंहाशी सेनाधिपती वीरसिंहने अुत्तुंगचा परिचयही करून दिला. पहाडी कबिल्याचा नायक काबुईही तिथे आला आणि त्याने राजा व सेनाधिपतीला आपल्या घरी ठेवलेली शताब्दि फुलेही नाहीशी झाल्याची बातमी सांगितली.) —पुढे

"काही 'शताब्दी फुलं' तुमच्या घरी सुरक्षित ठेवल्याबद्दल अुत्तुंगने बोलण्याच्या ओघात नागसिंहला सांगितले होते. तुला काय वाटतं, त्या फुलांची चोरीही नागसिंहनेच केली असावी?" सेनाधिपतीने काबुईला विचारले.

क्षणभर काबुई विचारात पडला अन् नन्तर म्हणाला, "नागसिंहच्या मनात काही कारस्थान करायचं असलंच, तरी मला हे कळत नाही, की त्याला या फुलांचा काय अुपयोग होणार आहे? शेवटी त्या फुलांचा त्याच्या कारस्थानाशी काय संबंध?"

"तुझा या विचार मलाही बरोबर वाटतोय. शताब्दी फुलांशिवाय अुत्तुंग आपल्या कामासाठी निघूच शकत नाही. तेंव्हा तोपर्यन्त तूही राजधानीत राहिलास तर बरं होईल." सेनाधिपतीने सुचवले.

काबुई अुत्तुंगच्या निवासस्थानाकडे गेला.



त्याने राजा महेन्द्रसिंग आणि सेनाधिपती यांच्याशी झालेले बोलणे अुत्तुंगला सांगितले.

दुसऱ्या दिवशी दुपारी एक शिपाई आपल्याबरोबर दोन आदिवासी तरुणींना घेअून त्यांच्याकडे आला आणि म्हणाला, "काबुई, आपण तुमची मुलगी आहोत असं म्हणत एक मुलगी तुम्हाला भेटायला इथे आलेली आहे."

काबुई त्या खोलीबाहेर आला. "चित्रा, तू इथे?" तो तिला अकस्मात तिथे पाहून आश्चर्यात पडला होता, पण त्याला चिन्ताही वाटत असल्याचे त्याच्या चेहऱ्यावर दिसत होते. "तुझ्या आईला काही झालंय का?"

"नाही बाबा, आई ठीक आहे." चित्रा अुत्तरली. पण ती खूपच अुत्तेजित झालेली दिसत होती.

"मग इथं का आलीस तू?" काबुई आता अगदी अुतावीळ झाला होता.

चित्रा त्याच्या अगदी जवळ जाअून कुजबुजत्या आवाजात म्हणाली, "आम्हाला ती फुलं सापडलीत!"

"म्हणजे 'शताब्दी फुलांचे गुच्छ' असं म्हणायचंय तुला?" काबुईच्या विचारण्यात अविश्वास दिसत होता.

त्याच वेळी अुत्तुंग आतून येअून काबुईजवळ अुभा राहिल्याचे चित्राच्या लक्षात आले. "नेहमीप्रमाणे आज सकाळी आम्ही समुद्रकिनारी गेलो होतो अन् यांची नौका तिथे उपडी पडलेली आम्हाला दिसली. आता ती जरा मोठ्याने बोलू लागली होती. "अन् तिच्या आत शताब्दी फुलांचे गुच्छ लपवून ठेवल्यासारखे आढळले आम्हाला! कोणीतरी ती होडी दोनदा समुद्राकडे ओढून नेली असल्याच्या खुणा तेथे अुमटलेल्या होत्या, जणू काही त्या व्यक्तीला होडीतून जायचे असावे. पण नन्तर त्या व्यक्तीचा विचार बदलला असावा; अन् नन्तर फुलं पाण्यात वाहून जाअू नयेत म्हणून बोट अुपडी केली असावी. तिने बहुधा त्या फुलांसह पळून जायचा प्रयत्न केला असावा." अुत्तुंगकडे पहात ती शेवटचे वाक्य सहेतुकपणे बोलली.

"नाही चित्रा, अुत्तुंग तर रात्री माझ्या बरोबरच होता. बरं, पण आता ती फुलं कुठं आहेत ते सांग." काबुईने विचारले.

"तिथेच, समुद्रतटावर ठेवलेल्या नावेतच





आहेत. हा शुभसमाचार सांगायलाच तर आपल्या मैत्रिणींसह मी स्वतः इथे आलेय." चित्रा म्हणाली.

मोठ्या प्रेमाने आपल्या कन्येच्या खांद्यावर थोपटत काबुई म्हणाला, "चित्रा, तू छानच केलंस. आता तुम्ही दोघी इथेच थांबा. आम्ही ही बातमी सेनापतीना देऊन येतो." नन्तर अत्तुंगकडे वळून तो म्हणाला, "चल, निघू या."

त्याच्याबरोबर चालत अत्तुंगने विचारले, "आपली शताब्दी फुलं मिळाली? तुमची मुलगी काय म्हणत होती?"

मुलीने सांगितलेली सारी हकिकत काबुईने अत्तुंगला सांगितली. फुले मिळाल्याचे ऐकून अत्तुंगला अपार हर्ष झाला. 'ती फुले घेऊन कोणी बरं नावेतून निघून जायचा प्रयत्न केला असेल?' याबद्दल अत्तुंग विचार करू लागला. नागसिंहनेच तो केला असेल, तर यात त्याचा काय उद्देश असावा? असे विचार करत करतच तो काबुईसह सेनापतीच्या महालाजवळ पोचला. त्यांना पहाताच सेनापतीने विचारले, "काय झालं?"

काबुईने सगळी हकिकत साद्यन्त सांगितली.

"शाबास! हा शुभसमाचार आणणारे सैनिक कुठे आहेत?" सेनापतीने विचारले.

"अंहं! सैनिकांनी नव्हे, माझ्या मुलीनं—चित्रानं—ही बातमी सांगितलीय." काबुई म्हणाला.

"चांगलंच केलंन! आता त्या फुलांच्या रक्षणाची व्यवस्था करायला हवी ताबडतोब! मी आपल्या काही सैनिकांना पाठवतो तिकडे. चला आता आगोदर ही बातमी महाराजांना देऊ या?" ते तिघेही राजमहालाकडे निघाले.

त्यांच्याकडून हकिकत ऐकून राजा संतुष्ट झाला. तो म्हणाला, "बरं झालं, आता निश्चिन्त झालो मी. सेनापती, आता ती फुलं राक्षसप्राण्यापर्यन्त पोचवायला उशीर नको. काबुई बोल, तुझा काय विचार आहे?" अन् अत्तुंगकडे वळून विचारले, "केंव्हा निघावं असं वाटतंय?"

"महाराज, आत्ता अगदी ताबडतोब म्हटलंत तरी निघायची तयारी आहे माझी!" अत्तुंग उतावळाच झाला होता.

उभे राहून अत्तुंगच्या खांद्यांवर हात ठेवून राजा म्हणाला, "शाब्बास, तुझ्यासारखे वीर म्हणजे राज्याची अमोल संपत्तीच म्हटली पाहिजे. परत फिरताना आमच्या राज्यात नक्की येऊन जा बरं का!" नंतर तो पुन्हा सेनापतीला म्हणाला, "अत्तुंगला गरज असणाऱ्या साऱ्या वस्तूंची सोय करा. मी आताच जाऊन 'शताब्दी फुलं' सापडल्याची सुवार्ता मल्लिकाला सांगतो." अन् राजा महालात निघून गेला.

राजभवनाबाहेर येऊन सेनापतीने ताबडतोब येऊन भेटण्याबद्दल नागसिंहला निरोप पाठवला.

नागसिंह थोड्या वेळाने तेथे आला. सेनापती, काबुई व अत्तुंग यांना एकत्र पाहून तो चमकलाच. स्वतःवर ताबा मिळवत त्याने सेनापतीला प्रणाम केला.

"अत्तुंग आजच प्रवासाला निघत आहे. तुम्ही स्वतः काही सैनिक घेऊन त्याच्या रक्षणासाठी बरोबर जायचे आहे. ही महाराजांची आज्ञा आहे." सेनापतीच्या बोलण्यात कटुता होती.

"पण ती 'शताब्दी फुलंही' बरोबर न्यायची आहेत ना?" नागसिंहने विचारले.

"होय. हा प्रवासच ती फुलं राक्षसीप्राण्यापर्यन्त घेऊन जाण्यासाठी तर आहे. आज संध्याकाळपर्यन्त तुम्ही समुद्रकिनारी या. खडकांच्या मधल्या रस्त्याने समुद्रात जा, आणि पुढे नावेत बसून यात्रा सुरू करा. तुमच्या मागोमाग दोन नावातून आपले सैनिक असतील अन्



बाकीची सारी कामं अत्तुंगच्या देखरेखीखाली केली जातील." सेनापतीने सांगितले.

"मग फुलं?" नागसिंह पुढे काही बोलणार होता; पण तो बोलता बोलता एकदम थांबला.

"मी तर एकदा सांगून चुकलोय की सर्व तयारी झालेली आहे. फक्त तुमचं निघणंच बाकी आहे." सेनापती दृढपणे म्हणाला.

"जशी आपली आज्ञा!" म्हणत तो झरकन् तेथून निघून गेला.

तो गेल्यानन्तर सेनापती अत्तुंगला म्हणाला, "फुलं चोरीला गेल्याची बातमी नागसिंहला कळली असावी. पण आता या गोष्टीवर टीका करायला वेळ नाहीय. तो एकटाच काही त्या राक्षसाशी लढत देऊ



शकणार नाही. तेंव्हा तुला त्रास व्हायची शक्यता आहे. खूप सावध रहायला हवं तुला. अन् मुख्यतः त्याच्याबद्दल सजग रहा."

अत्तुंग विनयाने म्हणाला, "ही सूचना कायम लक्षात ठेवीन मी."

सेनापती काबुईला म्हणाला, "तुम्ही अत्तुंगसह समुद्रकिनाऱ्या पर्यन्त जाऊन त्याला निरोप द्या."

"जशी आज्ञा!" म्हणून काबुई अत्तुंगसह अतिथि-गृहाकडे गेला. काबुईने त्यांची वाट पहात असलेल्या चित्राला सर्व गोष्टी सांगितल्या.

ते पोचल्यानन्तर थोड्या वेळाने नागसिंह तेथे आला. सर्वजण मिळून समुद्रकिनारी गेले. वाटेत नागसिंहने तोंडातून अवाक्षरही काढले नाही. त्याच्या चेहऱ्यावर काळजी व नापसन्ती स्पष्ट दिसत होती.

ते सर्वजण तेथे पोचल्याबरोबर सैनिकांनी स्वागतादाखल दलनायकाला प्रणाम केला. तीन नावा तयार ठेवण्यात आल्या होत्या. एका नावेत 'शताब्दि फुलं' ठेवलेली होती. ती नुकतीच अुमलल्यासारखी ताजी दिसत होती अन् त्यांचा सुगंधही आसमन्तात दरवळत होता. 'आपण ज्या नावेतून आलो तीच ही नाव आहे' असे अत्तुंगने ओळखले. आपल्या कमरेला बांधलेल्या थैलीत लपवून ठेवलेली रोपे त्याने हळूच सर्वांची नजर चुकवून चित्राच्या हाती सोपवली. अन् संकेतानेच 'ती आपल्या घरी नीट संभाळून ठेवायला' सुचवले.

चित्रा थैली हाती घेअून व्याकूळ नजरेने त्याच्याकडे पाहू लागली.

सोबत ठेवलेली शताब्दी फुले पहाताच नागसिंहला उत्साह आला. त्याचा चिन्तित चेहरा आनन्दित दिसू लागला. आता 'निघायला अुशीर का?' अशा आशयाने तो अत्तुंगकडे पाहू लागला. काबुईने त्याचा आशय जाणून म्हटले "अंधार पसरण्यापूर्वीच निघणं श्रेयस्कर होईल. मी सांगितलेलं सगळं नीट लक्षात ठेव. आपल्या देशी जाण्यापूर्वी इकडे नक्की येअून जा." इतके बोलून त्याने अत्तुंगचा निरोप घेतला.

त्याला प्रणाम करून अत्तुंग नावेकडे निघाला. नागसिंह अगोदरच नावेत जाअून बसला होता.सैनिकांनी त्यांची नाव पाण्यात ढकलली. आणि पाठोपाठ बाकीच्या नौकाही



निघाल्या.

"ही फुलं राक्षसी प्राण्याच्या जवळ नेअून सोडली की तो माणिक्यपुरीकडे येणार नाही, ते तुला कसं माहीत?" नागसिंहचा कर्कश्य आवाज ऐकून अत्तुंगने डोके अुचलून एकवार त्याच्याकडे न्याहाळून पाहिले.

नागसिंह क्रोधाने त्याच्याकडेच पहात होता.

"या फुलांच्या आकर्षणानेच राक्षसप्राणी माणिक्यपुरीकडे आला होता. आता आम्ही अशी व्यवस्था केलीय की आता तिथे शताब्दी फूल औषधालाही सापडणार नाही. ती सगळी फुलं बांधून मी बरोबर घेअून आलोय. पुढील शंभर वर्षं तरी ती पुन्हा अुमलण्याचा प्रश्न अुद्भवत नाही. आमच्याकडच्या वडीलधाऱ्यांचा असा विश्वास आहे की आता तो राक्षस माणिक्यपुरीत प्रवेश करणार नाही." अत्तुंगने मनावर काबू ठेवत त्याला समजावायचा प्रयत्न केला.

"म्हणेज याचा अर्थ असा की ही फुलं दाखवून तू राक्षसाशी तह करू शकशील. मी म्हणतो ते बरोबर आहे नं?" नागसिंहने छद्मीपणे विचारले.

"राक्षसप्राण्याशी तह? तुम्हाला म्हणायचंय काय? त्याच्याजवळ जाअून बोलणं तरी शक्य आहे का? त्याला काय आपली भाषा येत असेल! अन् आता माझ्या शंकेचं निरसन कर, की शेवटी त्या राक्षसाशी तुझं काम तरी काय आहे?" आश्चर्याने अत्तुंगने त्याला सरळ प्रश्न केला.

"खूपच महत्वाचं काम आहे त्याच्याशी



माझं. राजवाडा, राणी मुख्य म्हणजे राजकन्या या सगळ्यांचा निकाल लावायचा आहे. हे सारं करण्यासाठी मला त्या राक्षसाचं साह्य हवंय." नागसिंहने आपला अुद्देश अगदी स्पष्ट सांगितला.

अत्तुंगला असे वाटले, की आपण कोणा भयानक प्राण्याशीच बोलत आहोत. राक्षसी प्राण्याने त्या फुलांसाठी हाहाःकार अुडवला, तर हा नरराक्षस स्वतःच्या स्वार्थासाठी त्याहूनही भयंकर काहीतरी करायला अुद्युक्त झालेला आहे!

"ती तर भली माणसं आहेत, अनं तुमची नातेवाईक आहेत. त्यांचा नाश करायला का टपला आहात तुम्ही?" अत्तुंगने विचारले.

"मला नागपुरीचा राजा बनायचंय. माझ्या

या वेतात जे अडथळे आणतील, मधे येतील, त्या सर्वांचाच मी नायनाट करीन. ते कार्य पुरं करीपर्यन्त ना कोणी माझे बन्धुबान्धव आहेत, ना कोणी सगे-सोयरे आहेत. माझ्या हृदयात त्या कोणालाच स्थान नाही. त्यांच्याबद्दल माझ्या मनात प्रेम नाही, न् दयाभावनाही नाही. तूही माझ्या वाटेत यायचा प्रयत्न केलास, तर तुलाही मारून टाकायला मी मागेपुढे पहाणार नाही!'' आपली मूठ आवळत नागसिंहने आपला दुष्ट हेतु जाहीर केला. त्याच्या चेहऱ्यावर क्रूरता स्पष्ट दिसत होती.

''तू माझाही नाश करशील काय? माणिक्यपुरीहून कष्टानं आणेलली फुलं तुझ्या अपयोगासाठी मी खासच देणार नाही. अन् त्यामुळे राजपरिवाराचं नुकसान होईल, असं काहीही मी करू देणार नाही.'' अत्तुंगने परखडपणे सांगून टाकले. त्याच्या बोलण्यात दृढता होती.

''तू जिवन्त राहिलास, तर ना तुझ्या नकाराचा प्रश्न?'' असे म्हणत नागसिंह जागचा अुठला अन् त्याने अत्तुंगला नावेबाहेर ढकलून दिले. अत्तुंग समुद्रात पडला अन् नन्तर त्याचा काही पत्ताच लागला नाही. नंतर नागसिंहने शिपायांच्या नावेकडे आपली नाव वळवली. आपल्या नावेतली शताब्दी फुले त्याने दुसऱ्या नावेत ठेवली अन् तोही त्याच नावेत जाअून बसला.

समुद्रात पडलेला अत्तुंग हळूहळू पोहू लागला. आपले डोके त्याने पाण्यावर काढून पाहिले. सर्वत्र अंधार पसरलेला होता. अचानक त्याच्या हाती कसलीशी वस्तु लागली. त्याने नीट चाचपून पाहिल्यावर लक्षात आले की ती एक नावच आहे! बऱ्याच प्रयत्नाने ती उलट करून तो त्यात जाअून बसला. त्यात अडकवून ठेवलेली दोन वल्हीही त्याला मिळाली. त्याला अंधुक प्रकाशात एका बाजूला अुंच अुंच खडकही दिसले. 'शताब्दी फुलां' वाचून राक्षसाशी सामना करणं कठीण आहे, हे जाणून तो त्या खडकांच्या दिशेने निघाला.

-क्रमशः





# रंगनाथचे इरादे

विक्रमराजा पुन्हा एकदा त्या झाडाकडे गेला. शव खांद्यावर आडवे टाकले आणि तो स्मशानाची वाट चालू लागला. तेंव्हा वेताळ बोलू लागला, ''हे राजा, मला तर हे कळत नाहीये की तुझा स्वतःचा काही लाभ होणार आहे की दुसऱ्याच कोणाचा? कारण मला असं माहीत आहे की काही निस्वार्थी माणसं, काही मोजक्या लोकांसाठीच नव्हे, तर अगदी निरर्थक अशा लोकांसाठीही त्याग करायला अुभे ठाकतात. परिस्थितीवश ते निरर्थक लोकही कधीकधी सुधारतात, नीतिमार्गाचं अवलंबन करतात. माझ्या या विधानाचं एक ज्वलन्त अुदाहरण आहे.''

वेताळ गोष्ट सांगू लागला.–

रंगनाथ हा रायपुरमधला एक बडा असामी. खरं तर रंगनाथ दुसऱ्यांच्या कामी येणारांपैकी माणूस नव्हता. उलट आपल्याकडे येणाऱ्यांना तो म्हणे, ''एकाद्याचं नुकसान करणं हे जितकं वाईट, तितकंच

## वेताळ-कथा



दुसऱ्या कुणाचं भलं करायला जाणंही वाईटच! खरं म्हणजे प्रत्येकानं आपापलं काम फक्त करावं, अशा प्रकारे जगण्यानेच शान्ति लाभते, स्वतःचं भलं होतं. त्याबरोबरच जगाचंही कल्याण साधतं."

रंगनाथचे हे विचार ऐकून ऐकून गाववाल्यांची परोपकार बुद्धीच नाहीशी झाली.

अशात एकदा गावात एक साधु आला. लोकांना तो सांगू लागला, "दुसऱ्यांसाठी जगण्यातच जीवनाची सार्थकता असते. असा माणूस इहलोकातच नव्हे, तर परलोकातही सुखी होतो." साधु आपल्या विधानांप्रीत्यर्थ काही अुदाहरणंही देई.

हळूहळू गाववाल्यांवर त्या साधूचा प्रभाव पडू लागला.

त्या गावात वीरदास नावाचा एक तरूण रहात असे. घर पडल्यामुळे त्याखाली सापडून त्याचे आईबाप त्याच्या लहानपणीच मरून गेले. अनूं त्या अपघातात तो स्वतः लंगडा होअून बसला. लंगडा वीरदास भीक मागून आपली अुपजीविका करी. धर्मदास हा वीरदासचा नातेवाईक असल्याने त्याला आपल्या घरातच ठेवून घ्यायचा आपला विचार धर्मदासने रंगनाथच्या कानांवर घातला.

"वीरदासला आपल्या घरात ठेवून घेअून नुसतंच त्याचं पालनपोषण करत राहिलास, तर तो आळशी बनून जाईल. सध्या निदान तो भीक मागून तरी आपलं पोट भरतोय. त्यानं कुणावर ओझं बनून राहू नये. तो माझ्या घरात राहील. मी त्याला बांबूच्या टोपल्या आणि तट्ट्या करायचं काम शिकवीन. त्याच्या वस्तु आपले गाववाले खरेदी करतील. काही अुरल्या तर त्या शहरात घेअून जाअून विकून येईल तो. झाली ना मदत त्याला?" रंगनाथनं विचारलं.

धर्मदासला रंगनाथचा विचार पटला. त्याने वीरदासला त्याच्याकडे पाठवून दिले. रंगनाथच्या बायकोला नवऱ्याचं हे कृत्य मुळीच आवडलं नाही. रंगनाथ तिला समजावत म्हणाला, "हा बांबूच्या वस्तूंचा व्यापार किती फायद्याचा आहे हे तुला कळत नाहीये. गावचे सगळे लोक त्या आपल्याकडूनच खरेदी करतील नं? त्यामुळे बनणाऱ्या वस्तूंचं काय करायचं हा प्रश्न रहाणार नाही. वीरदासच्या इथं रहाण्यानं आपलं काही नुकसान न होता अुलट फायदाच होईल. फक्त त्याला खायला घालायचं, अन् किरकोळ खर्चासाठी काही रक्कम द्यायची इतकंच!"

रंगनाथच्या या अुपायाची गावातही प्रशंसा झाली. वीरदास अुद्योगाला लागला होता नं!

सुधाम हा त्याच गावचा एक शेतकरी. त्यानं गावात बालाजीचं एक देअूळ अुभारायचं ठरवलं. रंगनाथनं त्याला सल्ला दिला, "गावात एक रामाचं देअूळ आहेच. तुला देअूळ बांधायचं आहे ना? मग नवं कशाला? मी या देवळाची दुरुस्ती करवतो. राम काय, अनं बालाजी काय; दोन्ही एकाच श्री विष्णूचे अवतार! याच मन्दिराच्या प्रांगणात एक बालाजीचं देअूळ ही घेतो बांधून. सर्व भक्त तिथेच येतील न?"

राममन्दिराचा धर्मकर्ता स्वतः रंगनाथच होता. या जोडमन्दिरामुळे गाववाल्यांची भक्तिभावना वाढत गेली आणि त्यामुळे रंगनाथची कमाई वर्धिष्णु राहिली!

एके दिवशी नन्दबाहु रंगनाथकडे येअून म्हणाला, "आपल्या गावात शाळा नाहीय. गावची पोरं शहरात जाअून शिकत असतात. मी त्यांना नेण्याआणण्यासाठी काही पैसे न घेता बैलगाडीची व्यवस्था करू म्हणतो." पण रंगनाथ म्हणाला कि, 'आपण आपल्या गावातच एक शाळा काढू या!' गावची जी ओसाड जमीन होती, तिथे त्याने एक मोठी झोपडी अुभारली. त्यासाठी झालेला खर्च त्याने गाववाल्यांकडून वसूल केला.





आपल्याच लांबच्या नातेवाईकांना शिक्षक म्हणून नेमून घेतलं. गाववाल्यांची मदतही होत राहिली अन् त्यामुळे शाळेची प्राप्ती वाढली. त्यातून रंगनाथची स्वतःची कमाईही झाली.

गावचा सीतापती म्हणाला की आपण शाळेत शिकणाऱ्या मुलांना पुस्तकं फुकट देऊ. आणखी एकजण म्हणाला की, मुलांना दुपारचं खाणं आपण फुकट देत राहू. परन्तु रंगनाथनं सर्व प्रस्ताव अमान्य केले आणि म्हटलं, "शाळेच्या चारी बाजूंना रिकामी जागा आहे. मुलांना वेळ असेल तेंव्हा आपण त्यांच्याकडून काम करून घेऊ. त्या जमिनीत आपण निरनिराळ्या भाज्या लावू. त्यातून शाळेला जी प्राप्ती होईल त्यातून गरीब मुलांना फुकट पुस्तकं वाटू, त्यांना चांगले पौष्टिक पदार्थ खायला घालू. गरीब मुलांकडून काम करून घेऊन त्यांना आपण थोडे पैसेही देऊ. त्यामुळे स्वकष्टार्जित कमाईबद्दल त्यांना आदर वाटेल; कुणाकडून दान घेणं त्यांना अपमानास्पद वाटेल."

अशा प्रकारे गावची सारी जनता रंगनाथच्या मुठीत आली. शाळा, देऊळ वगैरे सर्वांवर त्याचाच कब्जा राहिला. प्राप्तीही दुप्पट झाली. आसपासच्या गावातूनही रंगनाथची कीर्ती पसरली.

एके दिवशी हंसपुर नावाच्या गावातून अंबर नावाचा एक माणूस रायपुरमला आला. गावच्या प्रमुख व्यक्तींना भेटून तो म्हणाला, "माझ्या जवळ अपार संपत्ती आहे. मला वारसही कुणी नाही. तेंव्हा माझ्या जवळ जे काही आहे, ते गरीबांना वाटून टाकायची माझी इच्छा आहे. त्यांना मदत करून सुखी करावं असं वाटतंय मला. म्हणून सर्व गावं फिरत आहे मी. तुमच्या गावातल्या सर्व गरीबांना बोलावून घ्या. त्यांना मी शेतं खरेदी करून देईन. ज्यांच्या जवळ आधीपासूनच शेतं असतील, त्यांना आणखी उपयुक्त उद्योग लावून देईन."

त्याच्या या प्रस्तावावर गाववाले फार खूश झाले. त्यांनी रंगनाथला बोलावून घेतलं आणि सर्व काही सविस्तर सांगितलं. ते ऐकून रंगनाथ एकदमच चिडला अन् म्हणाला, "दान घेण्याइतका गरीब आमच्या गावात कोणीच नाही. सर्वजण मेहनत करून पैसा मिळवतात. आपल्या कमाईबद्दल त्यांना अभिमानही आहे."

रंगनाथने गावात केलेल्या साऱ्या व्यवस्थेबाबत जाणून घेऊन अंबर म्हणाला, "तुम्ही तर अगदी असामान्य माणूस आहात. माझी संपत्ती तुम्ही आपल्या हाती घ्या आणि त्याचा सदुपयोग करा."

त्याच्या या म्हणण्यावर रागवून रंगनाथ म्हणाला, "तुम्हाला संन्यास घेऊन हिमालयात जायचं असेल तर जा खुशाल! आपली संपत्ती आपल्या देशाच्या राजाला देऊन टाका. मला मुळीच नको ती! गरीब लोक आपल्या पायांवर उभे राहून स्वतःची प्रगती करू शकतील यासाठी मी त्यांना मदत करीन. दान घेणं हे माझ्या सिद्धान्ताविरुद्ध आहे. तुम्ही आजपर्यन्त कुठलं पुण्यकर्म केलेलं नसावं. ही संपत्ती तुम्ही पाप आणि अन्याय्य मार्गांनी मिळवली असली पाहिजे. असलं दान स्वीकारणं हे घोर पाप आहे. म्हणून माझा तुम्हाला असा सल्ला आहे की ही संपत्ती तुम्ही राजालाच अर्पण करा. प्रजेची संपत्ती प्रजेच्याच अधिपतीच्या हातात जाण्यानं तुमची पापंही धुऊन निघतील."

इतकी गोष्ट सांगून वेताळाने विक्रम राजाला विचारले, "राजा, हा रंगनाथ चांगलाच लुच्चा दिसतोय; स्वार्थी आहे तो. 'आपली शेती आपण करू' असं म्हणून गरीबांच्या मिळकतीचा एक भाग त्याने आपल्याच घशात घातला. शाळा आणि देवळाच्या निर्मितीतही त्याचा स्वार्थच आहे, स्वतःचा लाभ आहे. असं असूनही अंबरनं जेंव्हा आपलं धन त्याला देऊ केलं, ते त्यानं नाकारलं. यावरून असं नाही का वाटत; की



त्याच्या स्वतःच्या स्वभावात आमूलाग्र बदल झालेला आहे; अनीतीचा मार्ग सोडून नीतिमार्गाची त्याला ओढ वाटू लागलीय? याचं कारण काय आहे ते सांग बरं. अुत्तर माहीत असूनही द्यायचं टाळलेस तर, तुला माहीतच आहे की तुझ्या मस्तकाचे तुकडे तुकडे होअून पडतील."

अुत्तरादाखल विक्रमराजा ताबडतोब म्हणाला, "तुच्छ आणि स्वार्थी रंगनाथनं अंबरचा प्रस्ताव फेटाळून लावला, याचा असा अर्थ नव्हे की त्याच्या स्वभावात काही इष्ट बदल घडून आला. असा समज करून घेणं ही एक मोठी चूक होईल. रंगनाथच्या वर्तणुकीचं सूक्ष्म परीक्षण करायला हवं, तेंव्हाच त्यातलं सत्य अुलगडेल, त्याचा आशय कळेल. काही भलं कार्य तो करूच शकणार नाही. कोणी भलं काम करत असेल तर तो त्यात आपला सहयोगही देअू शकणार नाही. आपला स्वतःचा काही लाभ नसेल असं कोणतंही काम करायला तो तयार नाही. आपली बदनामी होअू नये याबद्दलही तो जागरूक आहे. कोणी चांगलं काम करायला निघालं की तो त्याला थांबवतो. ते काम कसं बरोबर नाही, हे पटवून देण्याकरता तो आपली सारी बुद्धी पणाला लावतो. अंबरची संपत्ती अनुचित व अन्याय्य मार्गानं मिळवलेली आहे असा आरोप त्याने केला. अन् पुढे त्यानं असंही सुचवलं की ते धन अंबरने राजाला अर्पण करावं अन् स्वतःचं पाप धुवून काढावं! 'अंबर करू पहात असलेलं काम वाईट आहे' असं सर्वांना दाखवून देण्याचाच त्याचा अुद्देश आहे. असे करण्यामुळे लोकांचा स्वतःवरील विश्वास वाढेल, लोक आपल्याला निःस्वार्थी, परोपकारी व मोठा दाता समजतील व त्यांच्या मनातील आपली प्रतिमा झळाळून अुठेल, आपला गौरव होईल अशी त्याची अपेक्षा आहे. ही सारी तथ्यं समजून आली की, त्याच्या स्वभावात कसलाही फरक न झाल्याचं कळून चुकेल."

अशा प्रकारे राजाकडून योग्य अुत्तर काढूनही त्याचं मौन भंग करण्यात वेताळ सफल झाला आणि लगेच अदृश्य होअून झाडाकडे निघून गेला.





# बोलणं एक अन् करणं दुसरंच!

गंगाराम एक व्यापारी होता. शेतकऱ्यांकडून धान्य खरीदून ते शहरात नेअून विकायचा त्याचा व्यवसाय होता. त्याला सुन्दर हा एकुलता एक मुलगा होता. आपला मुलगा शिक्षणात अगदीच कच्चा आहे हे त्याला कळून चुकले होते. त्याने नीट शिकावे म्हणून केलेले सर्व प्रयत्न व्यर्थ ठरले होते. त्यामुळे गंगारामने आता ठरवले की सुंदरला स्वतःबरोबरच शहरात घेअून जाअून आपल्या व्यवसायाचे बारकावे शिकवावे.

एक दिवस सुन्दरला जवळ बोलावून गंगाराम म्हणाला, "सुप्याचा महाडीक आपलं धान्य विकणार आहे. तू अगोदर त्याच्याकडे जा आणि धान्य चांगलं दर्जेदार आहे की नाही हे पाहून घे. ते कळलं की आपण दोघंही तिथं जाअून त्याचा भाव ठरवून खरेदी करून टाकू. तू जवळ असलास म्हणजे व्यापारातले बारकावे हळूहळू तुझ्या लक्षात येतील."

दुसऱ्या दिवशी सकाळीच सुन्दर सुप्याला गेला आणि संध्याकाळी परत आला.

गंगारामने मुलाला विचारले, "तुला परतायला इतका अुशीर का झाला?" वडलांच्या या प्रश्नाने त्रासून सुन्दर अुत्तरला, "तुम्हीच तर धान्य पारखायला सांगितलं होतं ना? महाडीकला शंभर पोती धान्य विकायचंय. प्रत्येक पोत्यातलं धान्य तपासून पहायला इतका वेळ तर लागणारच ना? हेच माझ्या अुशीराचं कारण. हं, धान्य मला चांगलंच वाटलं."

मुलाचे अुत्तर ऐकून गंगारामला हसू आले. तो म्हणाला, "अन्न शिजलंय की नाही हे पहायला सगळंच्या सगळं हातावर घेअून

आशा पोतदार

पाह्यची गरज नसते; त्यातला एकादा दाणा काढून दाबून पाह्यला की पुरतं. तसंच धान्याचा दर्जा पहाण्यासाठी शंभरची शंभर पोती अुघडून पाह्यची गरज नाही. यातलं थोडं त्यातलं थोडं असं पाह्यलं की झालं. आता कळलं का?"

"हां, कळलं." असे म्हणत सुंदरने डोके हलवले. दुसऱ्या दिवशी सकाळी काही जरुरी कामासाठी गंगाराम शेजारच्या गावी गेला होता. त्याला परतायला संध्याकाळ झाली.

तो आल्याबरोबर सुन्दर त्याला म्हणाला, "बाबा, शहरातून नागराज आला होता दुपारी. तो आपले वीस हजार देणं लागत होता नं, ते दिले त्यानं आणि पावती घेअून निघून गेला. पैसे मी तिजोरीत नीट बन्द करून ठेवलेत."

"वाः छान! अुशीरा का होईना, पण आले पैसे एकदाचे! ते वसूल करायला अुद्याच मी जाणार होतो शहरात. बर झालं. माझं जाणं वाचलं. हा नागराज मोठा लबाड माणूस आहे. त्यानं दिलेली रक्कम नीट मोजून घेतलीस ना? काही फरक तर नाही ना?"

सुन्दर तावडतोब अुत्तरला, "फरक कसा असेल? त्यानं हजार हजार रुपयांच्या वीस थैल्या करून आणल्या होत्या. नमुना म्हणून मी त्यातल्या दोन तीन अुघडून पाहिल्या, रक्कम बरोबरच होती. काल तुम्हीच सांगितलंत ना, की नमुना पाहणं पुरेसं असतं म्हणून? मी तसंच केलं. नन्तर मी त्याला पावतीही दिली अन् रक्कम तिजोरीत टाकली."

मुलाच्या अुत्तरावर घाबरून गंगारामने तावडतोब तिजोरीतल्या थैल्या काढून सगळी रक्कम मोजली. एकूणात दोन हजार रुपये कमीच भरले! गंगाराम क्रोधाने मुलाकडे पाहू लागला.

बापाचा राग सुन्दरने ओळखला. स्वतःला वाचवण्यासाठी तिथून दूर जात तो पुटपुटू लागला, "ही मोठी माणसं म्हणजे विचित्रच असतात. त्यांचं बोलणं एक अन् करणं दुसरंच! सांगितलं तसं केलं तरी दोष माझाच! छीः!"



# चांदोबा प्रवणी-६४

भारतातील पशु-पक्षी

## पांढरा वाघ



रेवाच्या पांढऱ्या वाघांचा विषय कोणी काढला, की त्यांच्याबद्दलची एक गोष्ट आपोआपच आठवते. जवळजवळ चाळीस वर्षांपूर्वी, म्हणजेच १९५१ मधे खरोखरच ही घटना घडली. रेवाच्या महाराजांनी आपल्याकडे आलेल्या पाहुण्यांसाठी 'देवा' जंगलात शिकारीचा बेत केला. आपल्या चार पिल्लांसह एक वाघीण शिकाऱ्यांसमोरूनच जात होती. ती वाघीण अन् तीन पिल्ले शिकाऱ्यांच्या गोळ्यांना बळी पडली. पण पांढऱ्या रंगाचे एक पिल्लू मात्र आपला जीव वाचवून पळाले. परन्तु दुसऱ्याच दिवशी त्याला शोधून काढून गोविन्दगडला नेण्यात आहे. ते पिल्लू नअू महिन्यांचे होते. त्याचे नाव 'मोहन' असे ठेवण्यात आले. नंतर 'बेगम' नावाच्या वाघिणी पासून त्याला एकूण दहा पिल्ले झाली; पण त्यांतले एकही पांढऱ्या रंगाचे नव्हते. नंतर 'मोहन' आणि 'राधा' नावाच्या एका वाघिणीची जोडी बनवण्यात आली. त्यांना चार पिल्ले झाली. ती चारही पांढऱ्या रंगाची होती! १९५२ च्या ३० ऑक्टोबरला त्यांचा जन्म झाला होता. अशा प्रकारे 'मोहन' हा आपल्या देशातल्या आणि अन्य देशांतही सापडणाऱ्या पांढऱ्या वाघांचा मूळ पूर्वज होय. १९९० जानेवारीच्या मोजणीप्रमाणे आपल्या देशातल्या दहा प्राणीसंग्रहालयांतून मिळून १३ वाघ व २३ वाघिणी आहेत. विदेशी प्राणीसंग्रहालयांत ४७ वाघ व ३७ वाघिणी आहेत; १० पिल्लेही आहेत. म्हणजेच एकंदर सर्व मिळून १३३ पांढरे वाघ आहेत. अर्थात् ही चार वर्षांपूर्वीची हकिकत आहे.

मामुली वाघांच्या शरीराचा रंग पक्का नारिंगी किंवा सोनेरी पिवळा असतो. शरीरभर काळे पट्टे असतात. जबडा, गळा यांच्या खालील व पोटाचा भाग मात्र पांढरा असतो. पांढऱ्या वाघांचे सर्वच शरीर पांढरे असून त्यावर खाकी रंगाचे पट्टे असतात; डोळ्यात निळा रंग असतो. पांढरा वाघ हा सामान्य वाघापेक्षा आकाराने मोठा असतो. परंतु त्यांच्या सवयी व स्वभाव यात मात्र काहीही फरक नसतो.

अब्दुलफजल हे अकबराच्या नवरत्नांपैकी एक रत्न. १५६१ मधे त्यांनी 'अकबरनामा' लिहिला. विशेष गोष्ट अशी की या 'अकबरनाम्यात' या विरळा असणाऱ्या पांढऱ्या वाघाचा अुल्लेख आहे.

# आधुनिक भारतातील चित्रकार

## रामकिंकर





**शां**तिनिकेतन ही स्व. रवीन्द्रनाथ टागोर यांनी स्थापलेली संस्था आहे. याच्या कलाभवनाचे काम सुप्रसिद्ध चित्रकार नन्दलाल घोष हे पहात असत. १९२५ मधे रामकिंकर नावाच्या एका बालकाला त्यांच्याकडे आणण्यात आले.

नंदलालजींनी त्याला विचारले, "तू काढलेलं एकादं चित्र आहे आत्ता तुझ्याजवळ?"

"हो, आहे!" असे म्हणत रामकिंकरने चाळीस पानांची एक वही मोठ्या संकोचाने त्यांच्या समोर धरली. त्या वहीत त्याने काढलेली चित्रे होती.

चित्रे पाहून हसत हसत नंदलाल घोष यांनी डोके हलवले आणि रामकिंकर याला आपल्या कलाभवनात विद्यार्थी म्हणून प्रवेश दिला.

'मॉडर्न रिव्हयू' चे संपादक रामानन्द चॅटर्जी यांनी यापूर्वीच रामकिंकरची प्रतिभा ओळखली होती. त्यांनीच त्याला शान्तिनिकेतनमधे पाठवले होते. संस्थेला रामकिंकर चांगले यश मिळवून देईल, असा विश्वास ठेवणारांना, आपण त्या विश्वासाला पात्र आहोत हे थोड्याच दिवसात त्याने सप्रमाण दाखवून दिले. आपल्या अद्वितीय कल्पनाशक्तीने त्याने आपले सहपाठी व अध्यापकांचे प्रेम संपादन केले.



श्री रामकिंकर यांनी कलाभवनात पौर्वात्य व पाश्चिमात्य अशा दोन्हीही शैलींचे त्यातील बारकाव्यांसह अध्ययन केले. आणि नंतर त्यातून प्रेरणा घेऊन त्यांनी आपली स्वतःची अशी स्वतंत्र शैली निर्माण केली; ही शैली विलक्षण व अद्वितीय अशी होती. मुख्यतः भारतीय शैलीत निरूपण शैली (Distortio in Arts) सामील करण्याचे श्रेय यांचेच. अशा तऱ्हेने ते या शैलीचे मार्गदर्शकही ठरले.

चित्र जे असे, जसे असेल तसे यथावत् चित्रण न करता त्या चित्रातील प्रमुख भाव जास्त स्पष्ट, खोलपणे व प्रतीकात्मक रूपात चित्रित करण्याची शैली म्हणजेच ही निरूपण शैली. उदाहरणार्थ एकाद्या बुद्धिमान व्यक्तीला अशा रूपात चित्रित केले जाऊ शकते की जिच्या शरीरापेक्षाही डोक्याचाच आकार मोठा आहे!

श्री. रामकिंकर यांची चित्रे मोठी शक्तिवान आहेत. असे वाटते की त्यांची चित्रे ही स्थिर चित्रे नसून त्यांच्यात एक गति आहे. निसर्गातील रमणीय दृश्ये, प्राणी, पक्षी, माणसे व अद्भुत प्राण्यांचे चित्रण त्यांनी केलेले आहे. दिल्लीतील रिझर्व्ह बँकेसमोर रामकिंकर यांनी निर्मिलेल्या यक्षयुगुलाचे शिल्प आहे.

श्री. रामकिंकर हे अत्यन्त साधे-सुधे माणूस होते. अवडंबरापासून ते अनेक कोस दूर रहात. टीकाकारांनी त्यांची खूप स्तुति केली. परंतु त्यांना त्याबद्दल लवमात्र गर्व कधी वाटला नाही.

१९२६ मध्ये विश्वभारतीने त्यांचा खास सन्मान केला. उच्च पदवी देऊन त्यांना पुरस्कृत करण्यात आले. विविध क्षेत्रांतील प्रमुखांनी त्यांची तोंड भरभरून स्तुती केली. १९८० मधे आपल्या वयाच्या सत्तराव्या वर्षी त्यांचे देहावसान झाले.

# तुम्हाला माहीत आहे काय?

१. भारताला स्वातन्त्र्य देण्यात यावे असा निर्णय घेतला गेला, तेंव्हा भारताचे व्हाइसरॉय कोण होते?
२. जगात सर्वात जास्त साखर-अुत्पादन कोठे होते?
३. कालिदासाच्या समकालीन राजे कोण?
४. कोणत्या देशाचे चलन 'लिरा' नावाने ओळखण्यात येते?
५. 'बुद्धचरित्र' या ग्रंथाचा ग्रन्थकर्ता कोण?
६. 'सेफ्टी पिन'चा शोध कोणी लावला?
७. सर्वात अधिक जंगली भाग आपल्या देशातील कोणत्या प्रान्तात आहे?
८. 'गुलाबी दरी' कोणत्या देशात आहे?
९. आपल्या देशातील कोणते राष्ट्रीय अुद्यान एका तलावाच्या मधे वसलेले आहे?
१०. जगातील सर्वात मोठे वाळवंट कोणते?
११. आपल्या देशात रेशनिंगची पध्दत केंव्हा सुरू झाली?
१२. 'जयशंकर प्रसाद' रचित सुप्रसिद्ध काव्याचे नाव काय?
१३. जगात सर्वात अधिक थंड असा शीतकाल कोठे असतो?
१४. मोहनदास गांधी आफ्रिकेतून आपल्या देशात केंव्हा परत आले?
१५. 'इंडोनेशिया'च्या प्रजातंत्राचे संस्थापक कोण?
१६. लवंग व मिरे याचे सर्वात अधिक अुत्पादन कोणत्या प्रान्तात होते?
१७. 'विम्बल्डन चॅम्पियनशिप्स' केंव्हा सुरू झाल्या?
१८. आपल्या देशातील बुद्धिबळ (चेस) चॅंपियन कोण?
१९. 'वन्देमातरम' गीत कोणी रचले?

## उत्तर

१. लॉर्ड वेव्हेल.
२. क्यूबा.
३. चन्द्रगुप्त विक्रमादित्य.
४. इटली.
५. अश्वघोष.
६. वॉल्टर हंट.
७. अरुणाचल प्रदेश.
८. बल्गेरिया.
९. मणिपुरमधील 'मधुपुर नॅशनल पार्क.'
१०. अुत्तर अफ्रिकेतील सहारा वाळवंट.
११. १९४३ मधील बंगालच्या दुष्काळाच्या वेळी.
१२. कामायनी.
१३. सैबेरिया (५०° सेंटिग्रेड)
१४. १९१५ मधे.
१५. सुकार्नो.
१६. केरळ.
१७. १८८७ मधे.
१८. विश्वनाथन् आनन्द.
१९. बंकिमचन्द्र चॅटर्जी.



# बुरखाधारी

कठियाबादच्या कालीचे नव्यानेच लग्न झाले होते. आपली बायको भानुमती हिला सासुरवाडीहून गाडीतून घेऊन येता येता वाटेत एक झरा पाहून, गाडी थांबवून, तो खाली अुतरला. जवळच एक जुने कौलारू घर होते. घराभोवतालच्या बागेत भाज्या लावलेल्या होत्या. एक बुटक्यांचे जोडपे भाज्या तोडून टोपलीत भरत होते.

त्यांना पाहून काली हसू लागला, तेंव्हा भानुमतीने त्याला विचारले, "बुटक्यांचं जोडपं पाहून तुम्हाला हसू का येतंय?"

"चार महिन्यांपूर्वी घडलेला एक प्रसंग आठवून मला हसू आलं. थांब, सांगतोच तुला ती गोष्ट." काली म्हणाला; अन् त्याने ती हकिकत सांगितली.

चार महिन्यांपूर्वी असाच एकदा काली याच रस्त्याने जात असताना पूर आला. गाडीवाल्याने पूर्ण यात्रेचे जेवढे पैसे मागितले होते, त्यातले अर्धे घेअून कालीला तिथेच खाली अुतरायला सांगितले, अन् तो निघून गेला.

अंधार होत आला होता, झिमझिम पाअूसही पडत होता. काली याच घराशी आला अन् त्याने दरवाजा ठोठावला. एका बुटक्या बाईने येअून दार अुघडले अन् विचारले, "कोण आहात आपण? आपल्याला काय हवंय?"

"पुरामुळे मी इथे अडकून पडलोय. मला थोडा वेळ तुमच्या घरात आधार मिळेल का?" कालीने विचारले.

"हे काय विचारायला हवं?" म्हणत एक माणूस बाहेर आला तो ही बुटकाच होता.

त्या जोडप्याच्या आग्रहावरून काली त्यांच्याबरोबर जेवलाही.बोलता बोलता बुटकी बाई म्हणाली, "माझा भाअू राजू संध्याकाळपर्यन्त यायला हवा होता. अजूनही

अशोक पवार



कसा आला नही कुणास ठाऊक!" बोलता बोलता तिने थोडीशी भाजी आणि भाकरी निराळी काढून ठेवली.

नंतर त्या जोडप्याने समोरच्या खोलीत कालीच्या झोपायची [illegible] केली अन् स्वतः ते दोघेजण आतल्या खोलीत झोपले. कालीला आता झोप लागणार, इतक्यात दरवाजा ठोठावल्याचा आवाज झाला.

कालीने अुठून बसत विचारले, "कोण आहे?"

"मी राजू." दरवाज्याबाहेरून आवाज आला. कालीने दार अुघडले अन् समोरच्या माणसाला पाहून भयाने त्याचा थरकाप झाला. बुरखा घातलेला एक माणूस हातात चमकता सुरा परजत अुभा होता.

"माझा भाअू राजू आला का?" म्हणत बुटकी स्त्री बाहेर आली अन् बुरखाधारीला पाहून ती किंचाळलीच.

बुरखाधारीने सुऱ्याचे टोक बुटकीच्या गळ्याला टेकले. काली त्याच्यावर झडप घालणार, इतक्यात त्याला सावध करत बुरखाधारी गरजला, "खबरदार! एक पाअूल पुढं टाकायचा प्रयत्न केलास तर हिचा गळा कापीन बघ मी!"

बुटकीला जिवे मारायची धमकी देत चोराने बुटक्या नवऱ्याला घरात ठेवलेले दागिने आणि पैसे एका गाठोड्यात बांधायला लावले. जाण्यापूर्वी त्याने कालीची अंगठी आणि पैसे ही त्याच्याकडून काढून घेतले. नंतर बाहेर जाअून त्याने दाराला बाहेरून कडी घातली अन् तो पळून गेला.

बुटक्यांची परिस्थिती पाहून कालीला त्यांची दया आली. आपण गडबडीने दरवाजा उघडला नसता, तर ही वेळ आली नसती, असा पश्चात्ताप त्याला वाटू लागला.

काली त्या दोघांची क्षमा मागायला लागला, तेंव्हा त्याला थांबवत बुटका म्हणाला, "अरे बाबा, तुला तर हात जोडून नमस्कार करायला हवा. चोर चाकू दाखवून धमकी देत असताना तू त्याच्यावर झडप घातली नाहीस, ते बरं केलंस. तेंव्हाची परिस्थिती पाहून तसं केलं असतंस, तर त्यानं माझ्या बायकोला मारून टाकलं असतं."

दुसऱ्या दिवशी सकाळी काली आपल्या गावाकडे निघून गेला. पण आपल्या





थोड्याशा हलगर्जीपणाने बुटक्यांचे नुकसान झाल्याची सल त्याच्या मनाला होतीच. घरं गेल्यावर त्याने आईला सारे काही सांगितले ती ही बचारी दुःखी होअून त्याला म्हणाली "त्या बुटक्यांचं तुझ्यामुळे नुकसान झालंय हे खरंच. तेंव्हा आता तू जाअून त्यांना एक हजार रुपये देअून ये."

आईच्या सांगण्याप्रमाणे काली पैसे घेअून निघाला. आता पूर अजिबात नाहीसा झाला होता, त्यामुळे नावेतून तो सहजपणे दुसऱ्या तीरावर पोचला. पण बुटक्यांच्या त्या घराच्या जवळ जाताजाता त्याला जे दिसले, त्यामुळे तो आश्चर्यचकित झाला! त्या दिवशीचा तो बुरखाधारी घराजवळ काहीतरी शोधत होता. झाडामागे अुभा राहून आता काली पुढे काय घडते हे पाहू लागला.

इतक्यात घरामागून ती बुटकी तिथे आली. बुरखाधारी तिच्यावर आता काही संकट आणेल, अशा विचाराने काली त्याच्यावर तुटून पडायचा प्रयत्न करणार, इतक्यात चोराच्या जवळ जाअून त्याच्या कानात काहीतरी कुजबुजून ती बुटकी आल्या वाटेने घरात गेली.

आता कालीला कळून चुकले की बुरखाधारीला ते बुटके दांपत्यही सामील आहे. म्हणजेच या नाटकाचा अर्थ असा की, ते तिघे मिळून आल्या पाहुण्याला लुटायचा अुद्योग करतात!

आता कालीने जराही अुशीर केला नाही. दरवाजा ठोठावणाऱ्या बुरखाधारीच्या जवळ तो पोचला, अन् त्याने जोरात त्याच्या डोक्यावर मुष्टिप्रहार केला. तो बुरखावाला आवाजही करू शकला नाही; धाडकन् खालीच कोसळला लगेच. कालीने त्याचा बुरखा काढून घेअून स्वतःच पांघरला अन् तो दरवाजा ठोकून म्हणाला, "दार उघडा, मी राजू आहे."

मौल्यवान कपडे घातलेल्या साठ वर्षांच्या एका दुबळ्या माणसाने दार अुघडले अन् म्हटले, "राजू, तुझी ताई तुझी वाटच पहात आहे. ये आत." पण जेंव्हा बुरखाधारी काली त्याच्या नजरेस पडला, तेंव्हा तो थरथर कापू लागला, अन् तिथेच खाली कोसळला. तो माणूस त्या रात्री बुटक्यांकडे आश्रयाला

आलेला होता.

बुटक्या स्त्रीला बाहेर काय घडले होते हे माहीतच नव्हते. ती नेहमीप्रमाणेच 'माझा भाऊ राजू आला का?' असे म्हणत बाहेर आली अनं बुरखाधारीला पाहून किंचाळली.

कालीने सुरा तिच्या गळ्याला टेकवून म्हटले "ऐन वेळी तुझा नवरा घरात नाहीये असं दिसतंय." नंतर त्याने त्या बाईकडून घरातले दागिने आणि पैसे एका गाठोड्यात बांधवले. नंतर तिला खोलीत पाठवून देऊन बाहेरून दरवाजा बंद करून निघून गेला.

त्यानन्तर त्याने त्या बुटक्या जोडप्याला एक पत्र लिहिले, ' तुमची बुद्धीही तुमच्या रूपाला योग्य अशीच आहे. चोरीसारखा घाणेरडा धन्दा काही धन्दा नव्हे! शरीरावर पडलेला डाग घालवता येईल; पण एकदा 'चोर' म्हणून झालेला व्रण बुजवता येत नाही. हा डाग शाश्वत असतो. प्रवाशांना फसवून लुटणाऱ्या तुम्हा लोकांना मी पोलिसांच्या हवाली करू शकतो. पण तुमची शारीरिक स्थिती पाहून मला तुमची दया येतेय, राग नाही येत! मी तुम्हाला एक संधी देतोय. तुमच्या घराभोवती भरपूर रिकामी जागा आहे. त्यात तुम्ही तऱ्हेतऱ्हेची भाजी लावू शकाल, रोपं लावू शकाल. मेहनत केलीत की त्याचं फळही मिळेलच. नीट विचार करून ठरवा काय ते. तुमच्या घरातून लुटलेलं धन आणि दागिने मी एकाद्या अनाथाश्रमाला दान करणार आहे."

अशा तऱ्हेने कालीने आपली सारी हकिकत भानुमतीला सांगून म्हटले, "आता त्या बुटक्यांच्या घराभोवती भाजीपाला अनू फुलझाडं दिसत आहेत. ते पाहून मला खात्री वाटतेय की त्यांनी चोरी करणं सोडून दिलंय आणि ते अभिमानानं जगत आहेत. म्हणूनच खूश होऊन हसलो मी."

"तुम्ही केवळ बुद्धिमानच नव्हे, तर साहसीही आहात. पुन्हा कधी इकडून गेलो, तर नक्की इथे थांबून त्या जोडप्याचं अभिनन्दन करू या." भानुमती आनन्दाने म्हणाली.



# चांदोबाच्या बातम्या

## कॉम्प्यूटर स्नान



आंघोळ करायचा तुम्हाला आळस आहे काय? लवकरच नियतकालिकातून प्रकाशित होऊ घातलेल्या 'बाथ-रोबोट'च्या जाहिरातीची प्रतीक्षा करा. जपान मधे कॉम्प्यूटरच्या साह्याने स्नान करण्याचा शास्त्रज्ञांनी शोध लावला आहे. आपण फक्त एकच काम करायचं! १.६ मीटर लांबीच्या एका हौदात बसा. तुमच्या शरीरावर गरम पाणी पडायला लागलं की डोळे मिटून घ्या. नंतर आपल्या अंगावर साबणाचे पाणी पडायला लागेल. थोड्या वेळाने गरम पाण्याचे फवारे आपल्या शरीरावर येतील. शेवटी थंड हवेचे झोत येतील व तुमच्या अंगावरील सर्व पाणी सुकून जाईल. तुमची पाठ कोण रगडेल अशी शंका तुम्हाला वाटते का? तशी शंका नको, कारण कॉम्प्युटर सर्व कामे क्रमाक्रमाने उत्तम रीतीने करतो. आपल्याला जर शांपूने स्नान करायचे असेल तर प्रथम डोक्याला शांपू लावून आंघोळ करून मग हौदात बसावे लागेल. जपानच्या पाच कंपन्यांनी एकत्र येऊन या 'बाथ-रोबोट' ची यांत्रिक मांडणी केली माहे. याची किंमत जाणून मात्र आश्चर्याने तोंडात बोट घालू नका. याची किंमत आहे फक्त चौदा लाख रुपये!

## इंग्लिश चॅनेल मधे फ्लॅट

देशाच्या संरक्षणासाठी एकोणिसाव्या शतकात इंग्लिश चॅनेल मधे एक किल्ला बांधण्यात आला. आता



तेथे आरामशीर निवास-गृहे बांधली जाणार आहेत. फ्रेंच सैनिकांना इंग्लंडवर आक्रमण करता येऊ नये म्हणून इंग्रजांनी सैनिकांसाठी इंग्लिश चॅनेल मधे किल्ला बांधला. पन्नास तोफा ठेवलेल्या या किल्ल्यावर नेहमी चारशे सैनिक रहात. या किल्ल्याचे निवाससंकुलात रूपांतर करण्यासाठी तो ६.२५ मिलियन अमेरिकन डॉलरला विकण्यात आला. यात, लाइट-हाऊस व हेलिकॉप्टर उतरण्याचे पॅड सुद्धा आहे.



# सामान्य व असामान्य

देशभर भ्रमण करत करत एक साधु लक्ष्मीपुर नावाच्या गावी पोचला. तलावाकिनारी असलेल्या वडाच्या झाडाखाली तो राहू लागला. गावातल्या लोकांसाठी तो रोज वेदान्तावर प्रवचन करू लागला. गावचे लोक आळीपाळीने त्याला जेवण देत असत.

एक दिवस साधु लक्ष्मणदास नावाच्या माणसाकडे जेवत असतानाच लक्ष्मणदासकडे गुरु नावाचा एक माणूस येऊन म्हणू लागला, "लक्ष्मणदास, ऐन वेळी माझी रक्कम हाती न आल्यामुळे मी आपलं वचन पाळू शकणार नाहीय. मला आणखी एका महिन्याची मुदत हवी."

यावर एकदम रागावून लक्ष्मणदास त्याला म्हणाला, "तुझ्यासारख्याला कर्ज देऊन मी मोठीच चूक केलीय." अन् राग न आवरून त्याने गुरुला खूप शिव्या देऊन पिटाळून लावले.

हे पाहून साधु लक्ष्मणदासला म्हणाला, "अरे बेटा, क्रोध हा अनर्थकारी असतो; त्यावर काबू ठेवायला हवा. शिव्या देऊन तुझे पैसे काही तुला लवकर नाही मिळाले ना?"

लक्ष्मणदास विनयाने साधूला प्रणाम करून अुत्तरला, "स्वामीमहाराज, माझा राग अगदी क्षणिक असतो. कुणाला शिव्या दिल्या तरी मी लगेच विसरूनही जातो. माझ्या मनात कधी सुडाची भावना नसते."

लक्ष्मणदासची याबद्दल प्रशंसा करत साधु त्याला म्हणाला, "क्रोध काबूत ठेवणं हा मोठाच गुण आहे. पण तो जर क्षणिकच असेल, तर ठीकच आहे. तुझा राग क्षणिक असतो, शाश्वत नव्हे; अन् त्यात सुडाची भावना नसते हे मोठेच वैशिष्ट्य होय." साधु लक्ष्मणदासशी असेच काही बोलत असताना लक्ष्मणदासचा मित्र प्रताप तेथे आला.

जेवत असलेल्या साधूला पाहून तो म्हणाला, "स्वतः जराही कष्ट न करता आयतं खाणाऱ्या आळशी लोकांचा मला भारी तिटकारा वाटतो. माझ्या दृष्टीनं अशी माणसं निरुपयोगीच. असल्या माणसाला जेवण देऊन तू काही अुचित काम करत नाहीयेस."

आपल्या मित्राच्या असल्या बोलण्याने लक्ष्मणदासला फार वाईट वाटले. तो यासाठी साधूची क्षमा मागू लागला. तेंव्हा साधु म्हणाला, "जाअू दे, प्रत्येकाचा आपला एक दृष्टिकोन असतो. तेंव्हा त्याला दोष नको देअूस." अन् हसतच साधु तेथून निघून गेला.

यानन्तर थोड्याच दिवसांनी लक्ष्मणदास साधूच्या दर्शनार्थ त्या वडाच्या झाडाकडे आला होता. तिथे त्याला त्याच गावातला भास्कर दिसला.

भास्कर दिसताच त्याचा खान्दा पकडून लक्ष्मणदासने विचारले, "कुठपर्यन्त माझ्या हातून वाचशील रे? आता बरा सापडलायस. तू जिवन्त रहातोस का मी याचाही निकाल लागेल आता!"

साधूने एकदम मधे येअून म्हटले, "शांत मुला, शांत. सांग बरं काय झालंय?"

भास्करच्या खांद्यावरची पकड सोडत लक्ष्मणदास म्हणाला, "स्वामीजी, एक महिन्यापूर्वी मी मन्दिरात पूजा करत असताना पुजाऱ्यानं माझ्या भक्तीची खूपशी स्तुती केली. तेंव्हा हा भास्कर माझी टर अुडवत म्हणाला—अरे वा! कुकर्म करणारांनाच हल्ली देवाची भक्ती जास्त करता येते हं!—अन् तो निघून गेला तिथून. नंतर तिथे हजर असणारी



भानुमती बारसोडे

सारीजणं खो खो हसू लागली. यानं सर्वांसमक्ष घोर अपमान केला माझा. त्यामुळं मला मान खाली घालावी लागली."

लक्ष्मणादासची समजूत घालत साधु म्हणाला, "दुसऱ्यांचं मन दुखेल असं बोलणं बरं नव्हे!"

इतक्यात प्रताप तिथे येऊन साधूला म्हणाला, "स्वामीमहाराज, साधूंची श्रेष्ठता अन् महत्ता न ओळखता काही दिवसांपूर्वी मी तुमचा अपमान केला होता. क्षमा करा मला."

यावर साधु हसत म्हणाला, "तुझ्याकडून माझा काय अपराध घडला हेच मला माहीत नाही. मग कशाबद्दल तुला क्षमा करायची? हं, आता तुला कसली अडचण असेल तर बोल. मला जमेल तितकी मदत करीन तुला."

खरी गोष्ट अशी होती की—प्रतापची बायको आजारी पडली. काही लोकांनी सांगितले की, हा काही सामान्य रोग नव्हे. काही दुष्टग्रहांमुळेच तिची अशी अवस्था झालेली आहे. आपले साधुमहाराजच फक्त तिला वाचवू शकतील. अन् म्हणूनच भास्कर साधुकडे आला होता.

प्रतापबरोबर साधु त्याच्या घरी गेला व त्याने काही मन्त्रोच्चार केला. त्याच्या बायकोला साधूने आशिर्वाद दिला, अन् दुसऱ्याच दिवशी ती चांगली बरी झाली. साधूचा हा चमत्कार पाहून लक्ष्मणदास साधूला म्हणाला, "स्वामी, प्रतापनं तुम्हाला अकारणच शिव्या दिल्या होत्या. तरीही तुम्ही त्याला क्षमा करून त्याचं भलं केलंत. तुम्ही खरोखरच महान आहात, असाधारण आहात."

हसून साधु म्हणाला, "अरे, मीही तुझ्यासारखाच आहे. तू दुसऱ्यांना शिव्या देतोस अन् विसरून जातोस. मला दुसऱ्यांनी शिव्या दिल्या तर मी त्या विसरून जातो. मला त्यांची आठवणही नाही रहात. अगीचच कुणाला शिव्या देण्यानं मला दुःख होतं अन् ते दुःख मी जीवनभर मनात बाळगतो. त्यामुळे कुणाला शिवी देऊच नये असा माझा प्रयत्न असतो."





# वीर हनुमान

राम-राज्यात सर्वांना एकसारखा न्याय दिला जाई. कोणी जवळचा, कोणी दूरचा असे कधी होत नसे. कोणता ही नागरिक निःसंकोचपणे राजाची भेट घेऊन न्याय मिळवू शके. एके दिवशी रात्री एक रक्तबंबाळ कुत्रा राजवाड्यासमोर येऊन जोरात भुंकू लागला. त्याचा मृत्यु जवळ येऊन ठेपला आहे असे वाटत होते.

रामचन्द्र झोपेतून जागे झाले आणि कुत्र्याजवळ येऊन त्याच्या डोक्यावर हात फिरवू लागले. कुत्र्याचे दुःख बरेच कमी झाले, आणि तो आवेशाने बोलू लागला—"हे राम, एका तरुणाने अत्यंत निर्दयपणे मला जखमी केले आहे. तो काही काम करीत नाही, नुसताच इकडे-तिकडे भटकत असतो. आपण त्याला एकाद्या मंदिरात चांगलंसं काम द्यावं अशी मी आपणास प्रार्थना करतो."

रामाला त्याची ही विनंती ऐकून मोठे आश्चर्य वाटले. तो म्हणाला—"त्या तरुणाने तर तुला दुःख दिलं. त्याला काही अत्यंत कठोर शिक्षा द्यावी अशी मागणी तू करायला हवी होतीस! अपकाराची फेड उपकाराने का करू चाहतोस?"

"मागच्या जन्मी मी एका मंदिराचा प्रमुख होतो. मंदिराच्या संपतीत मी खूप ढवळाढवळ केली. निरनिराळ्या प्रकारे पैसे खाल्ले. म्हणून मला हा कुत्र्याचा जन्म मिळाला. त्या तरुणाला सुद्धा पुढचा जन्म कुत्र्याचा मिळावा आणि त्याला अनेक हाल-अपेष्टा सहन कराव्या लागाव्यात अशी माझी इच्छा आहे.



त्याचा सूड उगवण्याची माझी इच्छा आहे. म्हणून मी आपणास तशी प्रार्थना केली. आपल्या पावन हस्त-स्पर्शाने माझी सर्व पापे धुवून गेली. माझा जन्म धन्य झाला. आपल्या हस्तस्पर्शामुळे मला उत्तम पुनर्जन्म मिळेल अशी मला खात्री आहे." असे निवेदन करून कुत्रा मेला.

त्या तरुणाला जेव्हा हे सर्व समजलं तेव्हा त्याला फार पश्चात्ताप झाला.

* * * *

अश्वमेध यज्ञ पूर्ण झाला. रामाचे राज्य सुरळीतपणे चालू होते. एक दिवशी ब्राह्मणाच्या वेशात यम रामाकडे येऊन म्हणाला—"रामा, मला एकांतात तुझ्याशी काही बोलायचंय. आपण जेव्हा बोलत असू तेव्हा मधे कोणी आलं तर त्याचा तू शिरच्छेद केला पाहिजे."

रामाने ब्राह्मणाचे हे म्हणणे मान्य केले आणि लक्ष्मणाला बोलावून त्याला सर्व समजावून सांगितले. लक्ष्मणाला दारावर उभे करून राम गुप्त बोलणी करण्यासाठी यमा बरोबर आपल्या महालाच्या अंतर्भागात गेला.

"रामा, तू तर महाविष्णु आहेस. जे कार्य करण्यासाठी तू अवतार घेतलास, ते आता पूर्ण झाले. सीता लक्ष्मी बनून आपल्या माहेरी क्षीरसागरात तुझी वाट पहात आहे. शंख-चक्र तुझे भाऊ आहेत. त्यांच्या सह आता तुला तेथे जायला हवे." यमाने निवेदन केले.

याच वेळी दुर्वास ऋषि धावत-पळत तेथे आले आणि लक्ष्मणाला म्हणाले—"मला ताबडतोब रामाला भेटायचंय. तू जर परवानगी न दिलीस जर 'रघुवंशाचा सर्वनाश होईल' असा शाप मी देऊन जाईन. समजलं?"

रघुवंशाचा सर्वनाश ओढवण्यापेक्षा आपला शिरच्छेद झालेला चालेल असा विचार करून लक्ष्मणाला वाटलं दुर्वासाला आत जाऊ दिलेलं बरं! म्हणून दुर्वासाच्या आगमनाची वार्ता देण्यासाठी लक्ष्मण स्वतः रामाकडे आला.

यम तत्क्षणी अदृश्य झाले.

रामाने आपल्या वचनानुसार लक्ष्मणाचं डोकं उडवण्याची आज्ञा दिली. वडीलधाऱ्या मंडळींनी आपापसात चर्चा केली आणि हद्दपारीची शिक्षा सुद्धा डोकं उडवण्यासारखीच आहे अशा निर्णयावर ते आले. म्हणून लक्ष्मणाला हद्दपारीची शिक्षा द्यावी असा आपला निर्णय त्यांनी रामाला कळवला. लक्ष्मणाला हा निर्णय कळला तेव्हा त्याने शरयू नदीत उडी मारली आणि आपल्या अवताराची समाप्ति केली.

लक्ष्मणाच्या आत्म-समर्पणानंतर रामाने आपल्या सर्व अन्य बंधूना सर्व परिस्थिति समजावून सांगितली आणि लव व कुश यांच्या राज्याभिषेकाची तयारी करण्याची आज्ञा दिली.

राजधानी अयोध्या-नगरी उत्तम प्रकारे अलंकृत करण्यात आली.

रामाने लव व कुश यांचा राजाभिषेक केला आणि हनुमानाला बोलावून म्हणाला—"हनुमान, मी दीर्घ काळ पर्यंत राज्य-संचालन करीत आलो. आता मला विश्रांतीची आवश्यकता आहे. मी असलो किंवा नसलो, तरी तू लव व कुश यांच्या बरोबर नित्य असावंस अशी माझी इच्छा आहे. त्यांची देखरेख कर, त्यांना मार्गदर्शन कर. राज्याच्या संरक्षणाची पूर्ण जबाबदारी मी तुझ्यावर आता सोपवतो. आजपर्यंत तू माझी सेवा केलीस, आता त्या दोघांची सेवा कर. त्यांना उत्तम शासक बनवण्याची जबाबदारी तुझी."

हनुमान हात जोडून नम्रपणे न बोलता उभा राहिला. शरयू नदीपर्यंत जाण्यासाठी रामाने एक उत्सव साजरा करायचा बेत आखला. तो एक महान पर्व-दिवस होता.





त्याचा सूड उगवण्याची माझी इच्छा आहे. म्हणून मी आपणास तशी प्रार्थना केली. आपल्या पावन हस्त-स्पर्शाने माझी सर्व पापे धुवून गेली. माझा जन्म धन्य झाला. आपल्या हस्तस्पर्शामुळे मला उत्तम पुनर्जन्म मिळेल अशी मला खात्री आहे." असे निवेदन करून कुत्रा मेला.

त्या तरुणाला जेव्हा हे सर्व समजलं तेव्हा त्याला फार पश्चात्ताप झाला.

* * * *

अश्वमेध यज्ञ पूर्ण झाला. रामाचे राज्य सुरळीतपणे चालू होते. एक दिवशी ब्राह्मणाच्या वेशात यम रामाकडे येऊन म्हणाला—"रामा, मला एकांतात तुझ्याशी काही बोलायचंय. आपण जेव्हा बोलत असू तेव्हा मधे कोणी आलं तर त्याचा तू शिरच्छेद केला पाहिजे."

रामाने ब्राह्मणाचे हे म्हणणे मान्य केले आणि लक्ष्मणाला बोलावून त्याला सर्व समजावून सांगितले. लक्ष्मणाला दारावर उभे करून राम गुप्त बोलणी करण्यासाठी यमा बरोबर आपल्या महालाच्या अंतर्भागात गेला.

"रामा, तू तर महाविष्णु आहेस. जे कार्य करण्यासाठी तू अवतार घेतलास, ते आता पूर्ण झाले. सीता लक्ष्मी बनून आपल्या माहेरी क्षीरसागरात तुझी वाट पहात आहे. शंख-चक्र तुझे भाऊ आहेत. त्यांच्या सह आता तुला तेथे जायला हवे." यमाने निवेदन केले.

याच वेळी दुर्वास ऋषि धावत-पळत तेथे आले आणि लक्ष्मणाला म्हणाले—"मला ताबडतोब रामाला भेटायचंय. तू जर परवानगी न दिलीस जर 'रघुवंशाचा सर्वनाश होईल' असा शाप मी देऊन जाईन. समजलं?"

रघुवंशाचा सर्वनाश ओढवण्यापेक्षा आपला शिरच्छेद झालेला चालेल असा विचार करून लक्ष्मणाला वाटलं दुर्वासाला आत जाऊ दिलेलं बरं! म्हणून दुर्वासाच्या आगमनाची वार्ता देण्यासाठी लक्ष्मण स्वतः रामाकडे आला.

यम तत्क्षणी अदृश्य झाले.

रामाने आपल्या वचनानुसार लक्ष्मणाचं डोकं उडवण्याची आज्ञा दिली. वडीलधाऱ्या मंडळींनी आपापसात चर्चा केली आणि हद्दपारीची शिक्षा सुद्धा डोकं उडवण्यासारखीच आहे अशा निर्णयावर ते आले. म्हणून लक्ष्मणाला हद्दपारीची शिक्षा द्यावी असा आपला निर्णय त्यांनी रामाला कळवला. लक्ष्मणाला हा निर्णय कळला तेव्हा त्याने शरयू नदीत उडी मारली आणि आपल्या अवताराची समाप्ति केली.

लक्ष्मणाच्या आत्म-समर्पणानंतर रामाने आपल्या सर्व अन्य बंधूंना सर्व परिस्थिति समजावून सांगितली आणि लव व कुश यांच्या राज्याभिषेकाची तयारी करण्याची आज्ञा दिली.

राजधानी अयोध्या-नगरी उत्तम प्रकारे अलंकृत करण्यात आली.

रामाने लव व कुश यांचा राजाभिषेक केला आणि हनुमानाला बोलावून म्हणाला—"हनुमान, मी दीर्घ काळ पर्यंत राज्य-संचालन करीत आलो. आता मला विश्रांतीची आवश्यकता आहे. मी असलो किंवा नसलो, तरी तू लव व कुश यांच्या बरोबर नित्य असावंस अशी माझी इच्छा आहे. त्यांची देखरेख कर, त्यांना मार्गदर्शन कर. राज्याच्या संरक्षणाची पूर्ण जबाबदारी मी तुझ्यावर आता सोपवतो. आजपर्यंत तू माझी सेवा केलीस, आता त्या दोघांची सेवा कर. त्यांना उत्तम शासक बनवण्याची जबाबदारी तुझी."

हनुमान हात जोडून नम्रपणे न बोलता उभा राहिला. शरयू नदीपर्यंत जाण्यासाठी रामाने एक उत्सव साजरा करायचा बेत आखला. तो एक महान पर्व-दिवस होता.





मंगल ध्वनींनी सर्व वातावरण दुमदुमून गेले. ब्राह्मणांनी वेद-पठण सुरू केले. राम पायीच शरयू नदीकडे चालू लागला. भरताने रामाच्या डोक्यावर छत्र धरले. उंच इमारतींतून सुवासिनी पुष्पवृष्टि करू लागल्या. हनुमान शांतपणे रामाच्या मागे चालू लागला. त्याची मुद्रा चिंताक्रान्त दिसत होती. आपण आपले सर्वस्व गमवल्याचा भाव त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता. त्याला काही सुचत नव्हते. राम शरयू नदीकडे कशासाठी निघाला आहे हे कोणाच्या लक्षात येईना. लोक निरनिराळे तर्क करू लागले. थोड्या वेळात सर्व जण शरयू नदीच्या किनाऱ्यावर पोचले.

रामाने शरयू नदीत प्रवेश केला. भरताने शंख फुंकला, शत्रुघ्नाने कापूर पेटवला आणि औक्षण केले. ब्राह्मणांनी खड्या सुरात सामवेदाचे पठण सुरू केले. मंगल वाद्यांचे ध्वनि सर्व दिशात दुमदुमू लागले. भरत आणि शत्रुघ्न ही नदीत उतरले आणि रामाच्या मागे मागे जाऊ लागले.

राम हळू हळू नदीच्या प्रवाहात पुढे जात राहिला. खोल पाण्यात गेल्यावर त्यांनी आपला उजवा हात वर केला. हाताने अभय-दान देत प्रजेला आशीर्वाद देऊन राम म्हणाला—"आता तुम्ही आनंदपूर्वक घरी जा. सुखासमाधानाने आपले जीवन सार्थक करा."

हनुमान लव-कुशाजवळ उभा राहिला. दुःखातिरेकाने गदगदलेल्या स्वरात म्हणाला—"रामा, थांबा! तुमच्या अगोदर मीच प्राणत्याग करतो. तुमच्या वाचून मी कशासाठी जिवंत राहू?" आणि हनुमानाने नदीत प्रवेश केला. आपल्या नाकावर बोट ठेवीत राम हनुमानाला म्हणाला—"तू चिरंजीव आहेस. लव-कुशांना तू परत घेऊन जा." रामाच्या आदेशानुसार हनुमान शांतपणे लव-कुशांसह राजभवनात आला.

राम शरयू नदीत खोल खोल जात राहिला. पुढे दिसलाच नाही. श्रीरामा बरोबर भरत नि शत्रुघ्न पण नदीच्या प्रवाहात विलीन होऊन गेले. रामावतार संपला. क्षीरसागरात लक्ष्मण अगोदरच आदिशेष बनून शैयेप्रमाणे विराजमान होता. सीता बसून रामाची वाट पहात होती. राम विष्णूच्या रूपात शेष-शैयेवर आरूढ झाला. भरत व शत्रुघ्न शंख-चक्र बनून त्याच्या हातांवर बसले. लक्ष्मी महाविष्णूची चरण-सेवा करू लागली.

एक दिवशी लव आणि कुश सिंहासनावर बसून आपल्या मातापित्यांचे स्मरण करीत रडू लागले, त्यांच्या डोळ्यांतून अखंड अश्रु-धारा वहात होत्या. त्यांना सांत्वन देत हनुमान म्हणाला—"तुम्ही दोघे जण रघुवंशाची ज्योति आहात. राज्य-संचालनाचा भार तुम्हा उभयतांच्या खांद्यावर आहे. असा विलाप करणे तुम्हाला शोभत नाही. तुम्हाला राम व सीता यांना जेव्हा पहावेसे वाटेल, तेव्हा मी तुम्हाला त्यांचे दर्शन घडवीन. बघा, माझ्या हृदयात ते कसे सुख-शांतिपूर्वक निवास करीत आहेत!" असे म्हणत हनुमानाने त्यांना आपले वक्ष-स्थळ फाडून राम व सीतेचे दर्शन घडवले.

हनुमानाच्या हृदयात विराजमान आपले माता-पिता हंसून आपणास आशीर्वाद देत आहेत असे दृश्य त्यांनी पाहिले. लव व कुश आई-वडिलांना पाहून संतुष्ट झाले.

मोठे होऊन लव-कुशांनी कुशलतेने राज्य-कारभार संभाळायला सुरुवात केली. पूर्व दिशेकडील मणिपुरी व पश्चिमेकडील मथुरा नगरी यांना त्यांनी आपल्या उपराजधान्या बनविल्या. कुश शुभा सह मणिपुरी राज्याचे व लव शोभा सह मथुरा राज्याचे संरक्षण करू लागले.



एवढ्यात देशावर एक महान् संकट येऊन कोसळले. राक्षसांहून ही क्रूर घोरकलि नावाच्या नरराक्षसाने देशावर आक्रमण केले. त्याच्या बरोबर शक, कुषाण, पाषाण नावाच्या डोंगरी जातींचा नीच सेनाधिपति पण होता. त्यांनी उत्तरे कडून देशावर आक्रमण केले. त्यांच्या सैन्यातील काही सैनिकांनी पश्चिमोत्तर बाजूने जनतेवर हल्ला चढवला व सर्वांना त्राहि त्राहि करून सोडले.

घोरकली बरोबरच कालकलि नावाच्या नरराक्षसाने हजारो नौकांसह कालकेय नावाच्या समुद्री राक्षसांसह समुद्राच्या बाजूने देशावर आक्रमण केले. कालकलीच्या आज्ञेनुसार कालकेय राज्यातील संपत्ति लुटून नेऊ लागले. ते ही सर्व लुटलेली संपत्ति



आपल्या कालकोटि द्वीपावर पाठवीत.

भयभीत प्रजा आपले प्राण व संपत्तीच्या रक्षणासाठी मार्ग शोधू लागली. हनुमान सर्व लोकांकडे जाऊन सांगू लागला—केवळ आपल्या संरक्षणासाठी प्रयत्न करणं योग्य नव्हे, देशाचं रक्षण करणे हे आपले पहिले कर्तव्य आहे. हनुमानाने जनतेला आपल्या कर्तव्याची जाणीव करून उत्तेजित केले. रामसेनेच्या नावावर त्याने सैनिक जमविले आणि त्यांना प्रशिक्षण दिले. त्यांच्यात धैर्य व साहस जागृत केले.

हनुमान सर्व प्रजेला उद्देशून सांगू लागला—"श्रीरामाच्या रामराज्यात सर्व देशवासी रामसेनेचे सैनिक झाले तर कोणत्या ही संकटाचा सामना करू शकतील, शत्रूंचा धुव्वा उडवू शकतील." हनुमानाच्या प्रोत्साहनामुळे जनतेच्या मनातील सर्व भय दूर झाले. त्यांच्यात नवीन स्फूर्ति संचारली. सर्व जण सैनिक बनू हनुमानाच्या नेतृत्वाखाली कालकलीशी युद्ध करायला निघाले. हनुमान स्वतः सर्व युद्धक्षेत्रात निरनिराळ्या रूपात लढू लागला. लोक त्याला सहस्त्र-आंजनेय म्हणू लागले.

कुशाने तुंबळ युद्ध केले आणि आपल्या अग्नि-अस्त्राने घोरकलीचा वध केला. रामसेनेने त्याचे अनेक योद्धे मारून टाकले व सर्व सैन्याला पळवून लावले.

लवाने कालकलीशी युद्ध सुरू केले आणि आपल्या वारुणास्त्राने त्याचा अंत केला. रामसेनेला जेथे जेथे कालकेय राक्षस दिसले तेथे तेथे त्यांना मृत्यु-सदनाला पाठविण्यात आले. हनुमानाने आपल्या शेपटीने सर्व नावा बांधून टाकल्या आणि त्यांना समुद्रात बुडवून टाकले. त्या नावांसह सर्व कालकेय ही बुडून मरण पावले.

या दोन महान् विजयानंतर हनुमान जनतेला म्हणाला—"राम-राज्यात सर्व जण लव व कुश यांचे बंधु आहेत. सर्वांना एकत्र रहावयाचे आहे. एकाचं दुःख सर्वांचं दुःख आहे. सुख-दुःखात आपण सर्वजण भागीदार आहोत." अशा रीतीने सर्व देशवासियांना संबोधित करून त्यांना प्रोत्साहित करून हनुमानाने धैर्य व धाडस वाढविले आणि आपल्या देशाचे रक्षण केले. आता शत्रु राम-राज्यावर आक्रमण करायला



धजेनासे झाले.

युद्ध संपल्यावर हनुमान लव-कुशांना म्हणाला—"मी आता गंधमादन पर्वतावर माझ्या तपश्चर्येसाठी निघालो." लव व कुश यांनी त्याला मान्यता दिली.

लव व कुश यांनी मोठ्या आदराने हनुमानला निरोप दिला आणि त्याला गंधमादन पर्वतापर्यंत पोंचवून आले.

हनुमानाने त्यांना आशीर्वाद देत म्हटले—"राघुवंशाची प्रतिष्ठा अबाधित राखा. सुखाने जगा. तुम्ही चिरंजीव आहात!" जनतेला उद्देशून तो म्हणाला—"तुम्ही सर्व रामसेनेचे सैनिक एका कुटुंबासारखे रहा. तुम्हाला अशक्य असे काही ही नाही. तुम्ही सर्व जण लव व कुशाचे बंधु आहात." आणि हनुमानाने सर्वांना अयोध्येला रवाना केले.

प्रजेने हात जोडून हनुमानाला प्रणाम केला. त्यांनी 'वीर हनुमान की जय' च्या घोषण केल्या. या घोषणा प्रतिध्वनित होत असतानाच हनुमान तपश्चर्या करण्यासाठी गंधमादन पर्वतावर चढून गेला.

लव-कुश व त्यांच्या मुलांनी राम-राज्याची प्रतिष्ठा कायम ठेवली. रामाच्या आदर्शांनुसार सर्व जण शासन करीत राहिले.

हनुमान गंधमादन पर्वतावर आपल्या तपश्चर्येत लीन झाला.

* * *

हनुमानाच्या तपश्चर्येत पुन्हा एकदा खंड पडला. डोळे उघडून त्याने पाहिले की सर्व पर्वत ठेंगणे झालेले आहेत. महावृक्ष झुडुपांसारखे दिसू लागले. हत्ती उंदरांप्रमाणे वाटू लागले. त्याने लक्षपूर्वक आकाशाकडे पाहिले. युगांतर होत असल्याचे त्याच्या ध्यानात आले.

त्याच वेळी त्रिकालज्ञ नारद तेथे आले आणि हनुमानाला म्हणाले—"हे द्वापर युग आहे. पहिला चरण सुरू होत आहे. हनुमा या द्वापर युगाच्या चौथ्या चरणात तुला पुन्हा रामाचे दर्शन घडेल." आणि नारद निघून गेले.

हनुमान पुन्हा आपल्या तपश्चर्येत लीन झाला.





# पट्टीचा पोहोणारा

खूप वर्षांपूर्वी केरळ समुद्र तटाच्या बाजूला असलेल्या लक्षद्वीप पासून थोड्या अंतरावर एक बेट होते. ते बेट दगडांनी भरलेले असल्याने शेती किंवा अन्य कामासाठी अुपयोगाचे नव्हते. त्यामुळे तेथील बहुतेक रहिवासी मासेमारी करत. त्यावरच त्यांची अुपजीविका चाले. याशिवाय ते जनावरे पाळत. काही मासेमार लोक जहाजांवर कामाला जात. काहीजण समुद्रतळाशी जाअून मोत्यांचे शिंपले अुचलून आणत. बेटावरील व्यापाऱ्यांना मोती विकून ते पोट भरत.

त्या बेटावरील एका मच्छीमाराला खूपशी मुले होती. त्यातले बरेच मुलगे मासे पकडून आणून म्हाताऱ्या बापाला मदत करत. त्यांचाही तोच पेशा बनला. एक-दोघांनी व्यापारी बोटींवर नोकऱ्या पत्करल्या. पण त्यांच्यातला सर्वात लहान मुलगा मात्र अगदी निराळ्या स्वभावाचा होता. मासे तडफडून मरताना त्याला पहावत नसे. लहानपणी त्याचे आईबाप टोपल्या भरभरून मासे पकडून आणत.त्यातले काही मासे जिवन्त आढळले तर हा ते उचलून पाण्यात टाकून देई. कधीकधी तर तो टोपलीतले निम्मेशिम्मे मासे वाचवून पाण्यात फेकत असे!

त्याच्या असल्या स्वभावामुळे मासेमारीचा अुद्योग तो करू शकला नाही. पण समुद्र व माशांची त्याला जबरदस्त ओढ होती. तो अगदीच निरुद्योगी, कुचकामाचा निघाल्याने आईबाप त्याला शिव्या देत. पण तो मात्र तासन्‌तास समुद्रकिनारी चुपचाप बसून रही. कधी समुद्रात पोहत राहून पाण्याच्या आतले कितीतरी विचित्र रंग आणि दृश्ये पहात राही. नन्तर त्याने पाण्यात समुद्रतळाशी जास्तीत जास्त वेळ रहायची

(२५ वर्षांपूर्वी चान्दोबात प्रकाशित झालेली गोष्ट)



सवय केली. समुद्राच्या आतच तो फिरत राही. तिथले रंगीबेरंगी मासे, झाडे-झुडपे अन् विचित्र रंग पाहून त्याला अपार आनन्द होई.

थोडा मोठा झाल्यावर तो पाण्यात खूप खोलवर जाऊन तिथेच जमेल तितका जास्त वेळ काढी. इतका वेळ त्याच्यासारखा पाण्यात रहाणारा त्या बेटावर दुसरा कोणीच नव्हता. त्यामुळे सर्वजण त्याला 'मानवमासा' असे म्हणू लागले. अगदी सकाळी सकाळी घराबाहेर पडून सारा दिवस तो समुद्रातच घालवी आणि रात्र पडल्यावर परत येई. मग त्या दिवशी पाहिलेल्या चमत्कारांचे वर्णन तो आपल्या भावांना ऐकवी. तो सांगे की, समुद्रतळाशी एक बुडालेलं जहाज आहे, तेथे उगवलेली अनेक झाडे-झुडपे आहेत, प्रवाळांना फुटलेल्या फांद्यांच्या डुहाळ्या लाल व सफेत रंगांच्या आहेत. याशिवाय पाण्यात मोतीवाले शिंपले, नक्षत्राच्या आकाराचे मासे, काचे सारखे पारदर्शक मासे आहेत अन् आणखीही कधी न पाहिलेल्या किंवा ऐकलेल्या अनेक गोष्टी तिथे पहायला मिळतात.

तो जेंव्हा रंगात येऊन हे सारे वर्णन करी, तेंव्हा त्याचे भाऊ मात्र समजत की हा खरोखरच वेडा झालेला आहे. आईला अशी भीती वाटे, की हा बहुतेक एकाद्या वाईट शक्तीच्या तावडीत सापडलेला आहे; म्हणून तिने त्याच्या दंडावर ताईत बांधला. पण इतके सगळे करूनही त्याच्या स्वभावात काहीच फरक पडला नाही. उलट त्याची प्रसिध्दी मात्र दिवसेंदिवस वाढत गेली. 'मानवमासा' या नावाने खूपचजण त्याला ओळखू लागले. ही बातमी त्या देशाच्या राजाच्याही कानी गेली. राजाच्या मनात त्याला पाहण्याची इच्छा जागृत झाली.

राजाने त्याला एकदा आपल्या महालात बोलावले. तो जेंव्हा तेथे गेला, तेंव्हा राजाची सतरा वर्षांची कन्याही तेथे होती.

"तू समुद्रात खूप खोलवर जाऊ शकतोस, आणि समुद्रात अवगाहन करणारा तुझ्यासारखा तरबेज जगातही कुठे शोधून सापडणार नाही असं ऐकलंय मी! काय, खरं आहे का हे?" राजाने विचारले.

"इतरांच्या बाबतीत मला कसं कळणार



सरकार?" तो म्हणाला.

"ठीक आहे, तुझ्यात किती सामर्थ्य आहे, ते पाह्यचंय मला." असे म्हणून मुलीलाही बरोबर घेऊन राजा त्याच्यासह नावेतून समुद्रात गेला. बरेच खोल पाण्यात पोचल्यावर राजाने एक सोन्याचे भांडे पाण्यात टाकले अन् म्हणाला, "जा, घेऊन ये ते पात्र."

तो लगेच उडी मारून समुद्रात बुडाला. तळाशी जाऊन त्याने ते पात्र उचलले अन् त्याबरोबर प्रवाळाची एक फांदीही घेऊन तो बाहेर आला. प्रवाळाची फान्दी राजकुमारीला बक्षिस देऊन ते पात्र तो राजाहाती देणार, इतक्यात राजा म्हणाला, "असू दे. घेऊन टाक ते तुलाच! आता मी तुला याहूनही कठीण असे काम सांगणार आहे. या बेटाच्या चारी बाजूच्या समुद्रतळाचं अवलोकन करून तुला विशेष असे आढळेल ते मला येऊन सांग."

"याला तर बरेच दिवस लागतील. आपण पुरेसा अवधि दिला तर मी हे काम करीन." तो म्हणाला.

"मला ठाऊक आहे ते. पाहिजे तितका वेळ घे. जरूर वाटली तर अधेमधे विश्रान्तीही घे. पण इथली वैशिष्ट्यं जाणून घेतल्यावाचून माझ्याकडे परत नको येऊ." राजा म्हणाला.

"ठीक आहे. मग आपण इथेच थांबा." असे राजकुमारीकडे पहात म्हणून तो लगेच समुद्रात बुडाला. त्याला परत यायला तीन महिने लागले.



"महाराज समुद्राच्या पोटात, आपल्या बेटाखाली तीन मोठे-मोठे पहाड आहेत. त्याचे दगड सर्वसाधारण दगडांपेक्षाही मजबूत आहेत. पण त्यातला एक पहाड मात्र नष्ट होत चालला आहे." तो म्हणाला.

"का बरं?" राजाने आश्चर्याने विचारले.

"त्याच्या खालच्या भागात प्रज्वलित असा अग्नि आहे, अन् तोच पहाडांचा नाश करत आहे. ज्या भागात हा अग्नि आहे, तिथे एकही समुद्री वनस्पती किंवा मासा वगैरे नाहीय." त्याने सांगितले.

"पाण्याखाली अग्नि कसा असेल?" राजाने शंका प्रदर्शित केली.

"महाराज, हा साधारण अग्नि नव्हे; त्याला वडवाग्नि म्हणतात. आपण तो थंड

करू शकणार नाही." तो अुत्तरला.

"होय्, वडवाग्नि हे नाव तर ऐकलंय मी, पण प्रत्यक्ष पाहिलेला मात्र नाही."

"अग्नि आणणं कसं शक्य होईल महाराज?" त्याने विचारले.

"ते मला काय विचारतोस? तुलाच माहीत असायला हवं ते." राजा म्हणाला.

तो पुन्हा समुद्रतळाशी गेला. अग्नीच्या जवळ जायचा त्याने प्रयत्न केला. पण त्याचे हातपाय खूपच भाजले. भाजलेल्या शरीराने तो नौकेजवळ आला. अन् राजाला म्हणाला, "महाराज, अग्नि आणणं मला अशक्य झालं. हा पहा त्याचा पुरावा." अन् त्याने आपले भाजलेले हातपाय दाखवले.

"हं, आता माझा विश्वास बसतोय तुझ्या सांगण्यावर. तू खरोखरच मोठा पट्टीचा पोहणारा आहेस." राजा बोलला.

"यावेळी मी अग्नि खूपच जवळून पाहयला आहे. महाराज, पहाडाचा खूपच मोठा भाग त्याने नष्ट करून टाकलाय. मला वाटतंय की निकट भविष्यात मोठंच संकट येणार आहे." तो म्हणाला.

राजाने त्याच्या सांगण्यावर पूर्ण विश्वास ठेवला आणि बेटावरील रहिवाशांना आज्ञा दिली की त्यांनी लवकरच बेट सोडून जावे. त्यांच्या अन्यत्र रहाण्याची सोयही राजाने केली. बेटावरची सर्व माणसे आणि जनावरे तेथून अन्यत्र निघून गेल्यानन्तर काही दिवसांनी खरोखरच तेथे मोठे वादळ आले आणि एक महिनाभरात बेटाचा एक एक भाग जात जात सर्वच्या सर्व 'समुद्रस्तुप्यन्तु' झाले.

त्या 'मानवमाशा'ला बोलावून राजा म्हणाला, "तुझ्या शक्ति सामर्थ्यामुळे हजारो प्राणी वाचले. बोल तुला कोणते बक्षिस हवे?"

त्याने राजकुमारीकडे पाहिले, पण अुत्तरादाखल तो काहीच बोलला नाही. त्याचे राजकुमारीवर मन आहे ही गोष्ट राजाने केंव्हाच ताडली होती. त्याने दोघांचा विवाह करून दिला अन् 'भावी राजा' म्हणून त्याला स्वत:जवळच ठेवून घेतले.





# सद्गुणी माधव

मालती नावाची एक तरूण मुलगी शिवापुरला रहात असे. फुले गोळा करण्यासाठी एके दिवशी ती गावाबाहेरील बगीचात गेली असता अचानकच एक चोर तिच्या समोर येअून सुरा दाखवत तिला म्हणाला, "तुझ्या अंगावरचे सगळे दागिने काढून मुकाट्याने माझ्या हवाली कर."

मालतीच्या गळ्यात सोन्याची एक साखळी, हातात सोन्याच्या चार बांगड्या अन् पायात चांदीचे पैंजण होते. काय करावे असा विचार ती करतेय, इतक्यात एक तरूण तेथे येअून चोराशी झटापट करू लागला. चोराच्या हातात सुरा होता. तरीही चोराशी मोठ्या धैर्याने अन् चापल्याने लढत देअून, त्याने चोराला पळवून लावले. त्याच्या साहसाचे मालतीला फार कौतुक वाटले. चोर पळून गेल्यावर तिने त्याची सारी माहिती विचारली.

युवक म्हणाला, "माझं नाव माधव. मला बऱ्याच विद्या अुत्तम प्रकारे अवगत आहेत. माझे वडील म्हातारे आहेत. घरात बसून मी सुतारकाम करावे अशी त्यांची इच्छा आहे. पण मी मात्र बाहेर जाअून तऱ्हेतऱ्हेची कामं करून खूप पैसेही मिळवतो. पण तरीही मी माझ्या बाबांची चांगली काळजी घेतो. मी जवळच माधवपुरमधे रहातो. हां! पण तू एक मुलगी असूनही गावाबाहेर अशी एकटी का आलीयस?"

"माझं नाव आहे मालती. वडिलांशिवाय माझंही आणखी कोणी नाहीं. पण बाबांना पैशांचा फार लोभ आहे. तऱ्हेतऱ्हेची अत्तरं बनवून विकत असतात ते. या अत्तरांसाठी लागणारी फुलं मलाच गोळा करून आणावी लागतात. अत्तरं विकायचं कामही मलाच करावं लागतं. ते स्वतः जास्त हिंडू फिरू शकत नाहीत. पण मी तरी किती फिरणार? मी आपली असमर्थता प्रकट केली, तर ते

शुभा जोशी



ऐकूनच घेत नाहीत. 'आपण पापड बनवून विकू' असं सुचवलं तरी ही नाही मानत. पण 'इतकी काय पैशांची गरज?' असं विचारलं, तर म्हणतात, 'तुझ्या लग्नासाठी नकोत का?' ते माझ्या लग्नासाठी काही प्रयत्नही करत नाहीत. बरं झालं आज तुम्ही वाचवलंत मला; नाहीतर दागिने गेले असते तर त्यांनी किन्नी शिव्या मोजल्या असत्या!" मालतीनं स्वतःच्या बाबतीत सारे काही सांगून टाकले.

तिची ही कहाणी ऐकून माधवलाही फार वाईट वाटले. तो म्हणाला, "तुझ्या बाबांनी फारसे प्रयत्न नाही केले, तरी तुझं लग्न नक्कीच होईल. सोनपुतळीसारखी दिसतेयस तू. मला तर फारच चांगली वाटतेयस. तुझी हरकत नसेल, तर मी करीन तुझ्याशी लग्न. अन् मी अशी व्यवस्था करीन की तुला घराबाहेर पडायचीही गरज पडणार नाही."

"हं, पण लग्न काही कोणा एकाच्याच इच्छेनं होत नसतं. त्यासाठी एकमेकांवर प्रेम असणं जरूरीचं असतं. मला तुम्ही मुळीच पसंत नाही." असे तट्कन् बोलून मालती निघून गेली.

त्या दिवसापासून माधव रोज मालतीसाठी त्या गावात येऊ लागला. तिची इच्छा नसली तरी मालतीला तो तिचे कुशल विचारी, तिच्यासाठी कधी अुंचावर चढून फुलं तोडून आणून देई. तिला लहानमोठ्या भेटवस्तुही देत असे तो. तरीही त्याच्यासाठी तिच्या मनात प्रेम अुपजेना.

कधी कधी एक म्हातारी फुलांसाठी मालतीकडे येत असे. ही गोष्ट तिच्या लक्षात आली, अन् तिने मालतीला विचारलेही. पण मालतीने स्पष्ट अुत्तर दिले की, "मला तो आवडत नाही." म्हातारीने माधवला हे सांगून म्हटले, "अरे बाळा, अुगाच कशाला तिच्या मागे मागे फिरतोस? तिचं तुझ्यावर मुळीही मन नाही. तेंव्हा तू इथून पुढे या गावात येअू नयेस हेच बरं."

"आजी, तुम्ही वयाने अन् गुणानेही मोठ्या आहात. पण मालतीला मी आवडेन यासाठी मी काय करावं?" माधवने विचारले.

"आता फक्त अेकच मार्ग आहे. कदाचित माहीत नसेल म्हणून सांगते तुला. दयेनंच प्रेम अुत्पन्न होतं. तेंव्हा असा काही अुपाय शोधून काढ, की ज्यामुळे तिला तुझ्याबद्दल



दया वाटेल." असे सुचवून म्हातारी निघून गेली.

माधवने म्हातारीचे सांगणे छान लक्षात ठेवले. दुसऱ्या दिवशी तो मालतीला म्हणाला, "माझ्या गावात मला भरपूर काम मिळत नाही. तुला पाहिल्यावाचून मला रहावतही नाही. पण त्यामुळे मला प्राप्तीही पुरेशी होत नाही. माझी अुपजीविका बरोबर चालत नाहीये."

"मग या गावात यायला सांगितलंय कुणी? सोडून द्यावं ना!" असे सडेतोड बोलून मालती निघून गेली.

माधवने आता नवीनच युक्ति योजली. फुलांसाठी तो झाडावर चढला आणि मुद्दामच खाली पडला. त्याला जखमा झाल्या. पण मालतीने "झाडावर चढता येत नाही, तर वर चढायचा नसता अुद्योग करायचा कशाला?" असे म्हणून धुडकावले.

यानन्तर काही दिवसांनी झाडीतून एक साप बाहेर आला अन् तो मालतीला डसणार, इतक्यात माधवने शेपूट धरून त्याला बाजूला खेचले. पण तेवढ्यात तो माधवलाच चावला. मालतीने धावपळ करून वैद्य बोलावून आणला नसता, तर माधवचा मृत्यु अटळ होता! पण त्याने जेंव्हा डोळे अुघडले, तेंव्हा मालती म्हणाली, "साप मला चावला असता तर असता. मला उगीचच वैद्यासाठी पळावं लागलं. मेले असते मी आपली इथेच!"

म्हातारीने तिचे हे बोलणे ऐकून तिला एका बाजूला बोलावून घेअून ती म्हणाली,



"अग, माधव बिचारा चांगला मुलगा आहे, स्वतःचा जीव पणाला लावून त्यानं वाचवलंय तुला. माझं ऐक, त्याच्याशी लग्न केलंस तर सुखी होशील."

"हं! पण मला तो जरा सुद्धा आवडत नाही." मालतीने अुदासीनपणा दाखवत म्हटले.

"पण कारण तर सांगशील!" म्हातारी अगदी खनपटीलाच बसली.

"माझे बाबा पहा; माझ्याकडून कित्ती तऱ्हेतऱ्हेची कामं करून घेतात ते. मी एक मुलगी आहे याचाही विचार नाही त्यांना! पण याचे हे बाबा पहा. ते म्हणतात की त्यानं घरातच राहून सुतारकाम करावं. आपल्या म्हाताऱ्या बापाची इच्छा पुरी न करता



गावोगाव भटकत रहाणाऱ्या या भटक्यावर प्रेम कसं करू मी?"

म्हातारी हसली. ती म्हणाली, "तू आपल्या वडिलांबद्दल अुगीचच चुकीचा विचार करतेस. त्यांनी जे काही कमवलं, ते तुझ्या हुंडा वगैरेसाठीच नं? तू जर घरातच डांबून राहिली असतीस, तर त्यांनी इतकं धन कसं जमवलं असतं? तू काम केलं नसतंस तर तुमची अुपजीविकाही कठीण झाली झाली असती नं? तुझ्या वडिलांची तर केवळ इतकीच इच्छा आहे की तुझं लग्न एकाद्या श्रीमन्त आणि चांगल्या मुलाशी व्हावं."

"ठीक आहे! मी कबूल करते की तू सगळं खरंच बोलत आहेस आजी. पण माधवसारख्या निर्धन माणसाशी लग्न केलं, तर माझ्या बाबांच्या मनाला दुःख नाही का होणार?" मालती म्हणाली.

दुसऱ्या दिवशी म्हातारीने माधवला मालतीच्या मनची गोष्ट सांगितली. तेंव्हा तो मालतीकडे जाअून म्हणाला, "तू अशा भ्रमात आहेस की मी माझ्या बाबांची नीट काळजी घेत नाहीय. पण एकदा भेटून तू त्यांच्याशी बोललीस की तुझ्या साऱ्या शंका दूर होतील."

मालती जरा वेळ विचार करून म्हणाली, "मी उद्याच तुमच्या गावी जाईन. पण त्यावेळी तुम्ही तिथे नसलं पाहिजे. अट कबूल?"

माधवने तिची अट कबूल केली.

मालतीने आपल्या वडिलांना सांगितले की शेजारच्या गावात अत्तराची मोठी मागणी आहे आणि ती म्हातारीला बरोबर घेअून माधवच्या गावी गेली. दोघी जेंव्हा तेथे पोचल्या तेंव्हा त्यांना दिसले की माधवचे घर तर अगदी इन्द्रभवनासारखे आहे. एकाद्या महाराजाच्या थाटात तिथे बसलेला वृद्ध माणूस दुसरा तिसरा कोणी नसून माधवचे बाबाच होते. घरातल्या अन्य कामांच्या सोयीसाठी एक स्वयंपाकीही तेथे होता.

ते वैभव पाहून मालती चकित झाली. त्या वृद्धाला तिने आपल्या अत्तरांचे वर्णन करून सांगितले अन् पुढे विचारले, "या घरात आणखी कुणी नसतं का?"

म्हातारबुवा नीरसपणे अुत्तरले, "हो, आहे की. माझा एकुलता एक मुलगा माधव इथेच असतो. मी त्याला 'इथेच सुतारकाम' कर असं कितीं वेळा सांगून पाहूयलं. पण तो ऐकतच नाही माझं! फिरत असतो सारखा. त्याच्या पायाला चक्रच लागलंय जणू! माझ्या सांगण्याची पर्वाच नाही करत तो!"

म्हातारी मधेच म्हणाली, "आपण तर चांगले श्रीमन्त दिसताय. आपला मुलगा समजा घरातच राहूयला, तर त्याला सुतारकाम करायची काय गरज? नुसताच लोळत राहू शकेल ना?"

तिच्या बोलण्यावर व्यंगाने हसत माधवचे वडील म्हणाले, "या, वा! काय पण सल्ला देताय! मी स्वतः असा विचार करूनच पूर्वजांकडून मिळवलेली संपत्ती घालवून बसलो. माझा माधव पंधरा वर्षांचा असताना आम्ही एका झोपडीत रहात होतो. अुपचार करण्यासाठी सुद्धा पैसा जवळ नसल्याने माझी बायको अकालीच मरून गेली. त्या काळजीत मी ही आजारी पडलो. तेंव्हा माधव स्वतः कमाअू लागला. अन् नंतरच्या या पाच वर्षांत आम्ही हा महाल खरेदी केलाय. नोकरही आहेत कामाला. मी प्रथम पासूनच चैनीत रहात असल्यानं या साऱ्या सोयी मला आवश्यकच होत्या."

"आपला मुलगा आमच्या गावात येत असतो. दिसायला तर तो अगदी गरीब दिसतो. हे कसलं वेड?" म्हातारीने विचारले.

हा प्रश्न ऐकताच माधवचे वडील जोराने हसले अन् म्हणाले, "हे कसलं वेडबीड मुळीच नाही. मीच त्याला असं रहायला सांगितलं आहे. लहानपासूनच चैनीत रहायला लागला तर त्यालाही



माझ्यासारख्याच आपत्ति सहन कराव्या लागतील. त्याचं तेवढं भाग्य असतं, तर मी आपली इस्टेट घालवली नसती. माझं भाग्य इतकंच, की तो हल्ली थोडीफार कमाई करतो आहे. पण त्याची कमाई फक्त माझ्या खर्चालाच पुरते. तो नालायक आहे, म्हणून स्वतःसाठी काही मिळवू शकत नाहीय."

मालतीने त्यांना अत्तरे दाखवली तेंव्हा त्यांनी ती सारीच खरेदी केली. "तू नशीबवान आहेस मुली, म्हणूनच त्यांच्या गैरहजेरीत आलीयस. तो इथे असता, तर मला त्यानं अत्तरं घेअू दिली नसती. म्हणाला असता की, हा वायफळ खर्च आहे. मी ताडी आणवून पितो, तर मला म्हणतो, अुगीच का आपली तब्येत बिघडवून घेता? मी त्याला

म्हणतो की, माझी तब्येत बिघडली तर लवकर मरेन मी, तुझाच खर्च वाचेल. पण तो काही केल्या ऐकत नाही."

मालती आणि म्हातारी आपल्या गावाकडे परतल्या. म्हातारी मालतीला म्हणाली, "माधवला आशा होती की, बाबा तुझ्यासमोर त्याची खूप स्तुति करतील. मला असं वाटतंय की तुमचं लग्न होणं अशक्य आहे."

मालतीने यावर म्हातारीला काही अुत्तर दिले नाही. गावात पोचता पोचता समोरून येणाऱ्या माधवला ती म्हणाली, "मी तुमच्या बाबांना भेटून आलेय."

माधव हसून म्हणाला, "अन् मी ही तुझ्या बाबांना भेटलोय. त्यांनी माझ्याबाबत सर्व ऐकून घेतलं अन् वचन दिलंय की, ते मला अत्तरं बनवायची कला शिकवून देतील. ते पुढे असं म्हणाले की, मी जमवलेलं सारं धन तुमचंच आहे. काही दिवस इथेच राहिलास तर मी तुझ्या वडलांकडे जाअून, सुनेला घरात कसं वागवावं ते शिकवून येईन. आपला विवाह पक्का झालाय"

"पण तुम्ही कसं गृहित धरून चाललाय, की मी या लग्नाला संमति देईन?" मालतीने आश्चर्याने विचारले.

"सांगू कसं गृहित धरलं? म्हातारीनं अुपाय सांगेपर्यन्त मी ही संदिग्धावस्थेतच होतो. माझ्या बाबांना माझे शत्रू भेटायला गेले, तरी ते माझ्याबद्दल कधी भले शब्द काढणार नाहीत. मग तुला माझी दया कशी बरं येणार नाही? म्हातारीने स्वानुभवावरूनच मला सांगितलं होतं की दयेमुळे प्रेम अुत्पन्न होतं." माधव अुत्तरला.

प्रत्यक्ष बाप असून आपल्या मुलाबद्दल शत्रूजवळही बरा शब्द न बोलणाऱ्या वडिलांच्या सुखसोयींची किती छान व्यवस्था केलीय माधवने! आता कुठे त्याचे सद्गुण, त्याचा भलेपणा मालतीच्या लक्षात आला! लग्नानन्तर आपल्या मुलीच्या सुखाचाच विचार करणाऱ्या आपल्या बाबांचे प्रेमही तिने ओळखले. आता तिला माधवची दयाही आली अन् त्याच्याबद्दल प्रेमही वाटू लागले.

इतके सगळे झाल्यावर दोन्ही पित्यांनी मालती आणि माधवचा विवाह फारशी टामटूम न करता साजरा केला.



## बहुरूपा वसुंधरा




### मुंडातुरै जंगल

तमिलनाडू मधील मुंडातुरै सुरक्षित वन-प्रांताने अलिकडे सर्वांचे लक्ष वेधून घेतले आहे. याची दोन प्रमुख कारणे आहेत. तेथील वाघांची वाढती संख्या हे पहिले कारण. दुसरे कारण म्हणजे सहा वर्षांपूर्वी तिथे दिसणारे डोक्यावर पुच्छ असणारे कूजन करणारे पक्षी (वारब्लर). गाणारे निरनिराळे पक्षी येतात नि जातात. पण डोक्यावर पुच्छ असणारा हा गाणारा पक्षी अलिकडे दिसत नाही. कॅलिफोर्निया विद्यापीठात शिकणारा एक भारतीय विद्यार्थी आहे मधुसूदन कट्टी. या पक्षांबाबत तो संशोधन करीत आहे. हे पक्षी आजकाल न दिसणं मोठं विचित्र आहे असं त्याला वाटतं. मद्रास जवळील वेडंतांगल मध्ये अनेक प्रकारचे पक्षी आश्रयाला येतात. रंगी-बेरंगी बगळे, निरनिराळे आवाज करणारे पक्षी, सैबेरियाची बदके इत्यादि इथे येतात, त्यांना पाहून पक्षी-प्रेमियांना मोठा आनंद होतो. वेडंतांगल आपल्या देशातील एक जुने पक्ष्यांचे आश्रयस्थान आहे.

### देवमाशांची आत्महत्या

न्युझीलंड मधील नेल्सनच्या 'फेरवेल स्पिट' समुद्रकिनाऱ्यावर एक विचित्र घटना घडली. साधारणपणे समुद्रातील खोल पाण्यात मुक्तपणे संचार करणारे ९९ देवमासे समुद्र-तटावर आले. एका शेजारी एक दाटी करून बसल्यामुळे श्वास घेण्यात अडचण आल्यामुळे काही मेले. काही लोकांनी त्यांचे रक्षण करण्यासाठी त्यांना पाण्यात ढकलले. तरी पण ४३ देवमाशांचा जीव वाचू शकला नाही. झुंडीच्या झुंडीने येऊन या देवमाशांनी आत्महत्या करण्याचा प्रयत्न का केला हे अजून ही वैज्ञानिकांच्या लक्षात येत नाही.



### पक्षांची गणती

तुम्हाला जेव्हां वेळ मिळेल तेव्हा आपल्या राज्यातील पक्षांची मोजदाद करू शकाल? ते तर अशक्य असेच तुम्ही म्हणणार. पण गेल्या १४ नोव्हेंबर रोजी आपल्या देशातील ५००० मंडळींनी पक्षांची गणती करायची योजना बनवली आहे. या मंडळींना पक्षांची एक यादी देण्यात आली. या यादीत आपल्या देशातील १७० पक्षांची नावे आहेत. प्रत्येकाने आपण पाहिलेल्या पक्षांची संख्या या सूचीत नोंदवायची आहे. हे काम एक दिवसातच झाले पाहिजे. पक्षांचे प्रमुख भारतीय शास्त्रज्ञ डॉ. अली यांच्या स्मृत्यर्थ ही योजना बनविली आहे. १२ नोव्हेंबर रोजी त्यांचा जन्म-दिन आहे. या दिवसाच्या जवळ-पासचा एक सुट्टीचा दिवस या कामासाठी निश्चित केला जाईल. भविष्य काळात दर वर्षी अशा गणतीची योजना बनेल अशी ही शक्यता आहे.



विशेष बातम्या

# सिंगापूरची मैत्री व मदत



बाग-बगीचे व उद्याने यांबाबत आपणा सर्वांना माहिती आहेच. संध्याकाळ होताच लहान मुले व म्हातारी माणसे तेथे जाऊन आपला वेळ आरामात घालवतात. परंतु विशेष म्हणजे ''टेक्नॉलॉजिकल इन्फर्मेशन पार्क'' या नावाने कर्नाटक प्रान्ताची राजधानी बेंगलोरच्या जवळच आता एक केन्द्र उघडले आहे. हे केन्द्र एक अत्यन्त आधुनिक असे औद्योगिक केन्द्र बनेल. या पार्कची स्थापना मागच्या २८ जानेवारीला बेंगलोरपासून अठरा किलोमीटर अंतरावर असलेल्या 'वॅक्फील्ड' नावाच्या जागी केली गेली आहे. अशा पार्कमधे विद्यार्थ्यांना किती आनन्द लुटता येईल याची तुम्हाला कल्पना असेल. या आयोजनाचा आरंभोत्सव सिंगापूरचे प्रधान मन्त्री गोचोक टॉंग यांनी केला.

या 'पार्क' बद्दल जाणून घेण्यापूर्वी आपले उत्तम मैत्रीचे संबंध असणाऱ्या सिंगापूरबद्दल माहिती मिळविणे अत्यावश्यक आहे. दुसऱ्या महायुद्धापूर्वी (१९३९-१९४५) बरेचसे भारतीय लोक उपजीविकेसाठी 'फेडरेटेड मले स्टेट्स्' (एफ्. एम्. एस्.) म्हणून ओळखल्या जाणाऱ्या सिंगापूर, मलाया आदि प्रान्तात गेले व नन्तर तेथेच स्थायिक झाले.

मद्रास किंवा तुतिकोरीन या बंदरात तिकीट खरेदी करून स्टीमरमधून हे लोक तिकडे जात असत. त्या काळात 'पासपोर्ट' किंवा 'व्हिसा' यांची कोणतीही आवश्यकता नसे. अशा प्रकारे सिंगापूर हे अनेक भारतीयांचे निवासस्थान बनले. तेथील चिनी व मलायातील निवासी लोकां बरोबर ते मिळूनमिसळून रहात असत व त्यांचे पारस्परिक संबंधही फार सलोख्याचे असत. सिंगापूर शहर दक्षिण-चीनच्या समुद्री मुखावर बसलेले आहे. या बेटाला 'सिंहपुरा' असेही म्हणतात. मलायी भाषेत याला, 'टेमासेक' (समुद्रीनगर) म्हणत असत. ब्रिटिश नाविक सर स्टॅम्फोर्ट रॉफिल्स हा १८१९ मधे जेंव्हा तेथे पोचला, तेंव्हा तेथे केवळ कोळी लोकांची वस्ती होती. तेथील अधिकाऱ्यांशी त्याने एक समझोता करून टाकला. ईस्ट इंडिया कंपनीने ते स्थान

एक 'व्यापारी केन्द्र' बनवण्याची परवानगी मिळवली, अन् हीच सिंगापूरच्या विकासाची पहिली पायरी होय.

१८५८ मधे शासनाची दोरी ब्रिटिशांच्या हाती आली. त्यानंतर सिंगापूरची सांपत्तिक भरभराटही झाली. 'स्टेट सेटलुमेण्ट्स्' अधिकार केन्द्र बनले. ब्रिटिश सेनेचा हा केन्द्रबिन्दु झाला. आशियातील एक प्रमुख बन्दर म्हणून ते ओळखले जाऊ लागले.

दुसऱ्या महायुद्धाच्या काळात थोडे दिवस ते जपानच्या हाती राहिले. परन्तु मित्रपक्षांनी पुन्हा हे आपल्या ताब्यात घेतले. ते जेंव्हा जपानच्या हाती होते, तेंव्हा सुभाषचन्द्र बोस यांनी जपानच्या साह्याने तेथे 'आझाद हिन्द सेने' ची स्थापना केली होती. त्यांचा अुद्देश 'इंग्रजांपासून भारत मुक्त करणे' हा होता. युद्धसमाप्तीनंतर तेथील लोकांची स्वतंत्र होण्याची इच्छा होती व त्यांनी तशी मागणीही केली. १९५९ मधे या बेटाला स्वतःच स्वतःचे शासन संभाळण्याचा अधिकार प्राप्त झाला. 'ली कुवान यू' हे प्रधान मन्त्री बनले. त्यानन्तर ते या देशाचे अध्यक्षही बनले. त्यांच्या नेतृत्वाखाली सिंगापूरची आर्थिक क्षेत्रात चांगली भरभराट झाली. आर्थिक क्षेत्रात 'एक विकसित देश' मानला जाअू लागला. १९९० मधे गो चोक टॉंग हे सिंगापूरचे प्रधान मन्त्री झाले.

१९९२ मधे इण्डोनेशियाची राजधानी जकार्ता येथे आशियाई देशांचे एक सम्मेलन झाले. त्यावेळी आपल्या देशाचे प्रधान मन्त्री श्री. पी. व्ही. नरसिंह राव व गो चोक टॉंग यांच्यात 'इन्फर्मेशन टेक्नॉलॉजिकल पार्क' च्याबाबत चर्चा झाली. एशिया-पॅसिफिक प्रान्तात बिझिनेस पार्क्स् स्थापित करायचा निर्णय सिंगापूरने घेतलेला होताच. त्या निर्णयानुसारच कर्नाटक अभिवृद्धि संस्था व टाटा औद्योगिक संस्था यांनी या औद्योगिक केन्द्राला एक रूप दिले.

पाचशे कोटी किंमतीची चोवीस हेक्टर इतकी जमीन कर्नाटक सरकारने यासाठी फुकट दिली. या 'इन्फर्मेशन पार्क' मधे अुद्योगांबाबत संशोधन होईल. विकास, प्रशिक्षण, व्यापार, निवास, मनोरंजन आदि सर्व सोयी इथे अुपलब्ध होतील असे प्रयत्न केले जात आहेत. लघु अुद्योग, कॉम्प्यूटर सॉफ्टवेअर यांबद्दल संशोधन व अभिवृद्धि यांना प्राधान्य दिले जात आहे. इलेक्ट्रॉनिक इंजिनियर्स, कॉम्प्यूटर व टेलीकम्युनिकेशन मधे प्रशिक्षित २०,००० टेक्नीशिअन्सना इथे नोकरी मिळू शकेल.




आपण आशा करू या की या आयोजनामुळे नोकऱ्यांच्या शोधात परदेशी जाण्याऱ्या बुद्धिजीवी लोकांच्या अशा जाण्याला (Brain Drain) आळा बसेल.



# जलतरणपटु

शृंगवेर एका मोठ्या नदीकाठी वसलेलं आहे. नरेन्द्र हा त्याच गावचा रहिवासी. तो एक पट्टीचा पोहोणारा होता. 'नरेन्द्रसारखा अट्टल पोहोणारा कोणी नाही' अशी लोकांनी आपली मुक्तकंठानं तारीफ करावी अशी त्याची इच्छा असे.

चंपा ही तरुणीही त्याच गावची. खूप श्रीमन्त घराण्यात तिचा जन्म झाला. तिचे आईबाप दोघेही मरून गेल्यामुळे तिचा मामाच तिच्या घरी रहायला आला होता. 'आपण तिच्या लालनपालनासाठीच तिथे रहात असल्याचं ' नाटक करून तो तिच्याकडून पैसे अुकळत असे. स्वतःच्या मनोरंजनासाठी तो ते पैसे अुडवत असे. या मामाचा सुधीर हा एकुलता एक दिवटा चिरंजीव! त्याला ना बुद्धी, ना सौन्दर्य, ना एकादा सद्गुणही! थोडक्यात म्हणजे, तो कोणत्याच दृष्टीने चंपासाठी योग्य वर नव्हता.

चंपा आपल्या मामा-मामींचा स्वभाव छानच ओळखून होती. मनोमन दोघांची काय इच्छा आहे आणि ते अशी वागणूक का करतात हेही ती जाणून होती. कधीकधी 'या दोघांना आपल्या घरातून हाकलून लावावं' असंही तिला वाटे. पण आपण बारा वर्षांची असतानाच ते आपल्याकडे येअून राहिले आहेत-हे आठवून ती गप्प राही.

आता चम्पा अठरा वर्षांची झाली होती. मामाला हाकलून दिलं तर आपलीच बदनामी होणार हे ती ओळखून चुकली होती. त्यामुळे तिनं एक अुपाय योजला. 'मामाशी दोस्तीचं नाटक करून त्याला हळूहळू नीट रस्त्यावर आणून अुभा करणाऱ्या एकाद्या सुयोग्य तरुणाशी आपण विवाह करावा.' त्या तरुणाच्या या अुपायाने केंव्हातरी एक दिवस मामाच्या परिवाराला आपल्या चुका

अशोक पवार



अुमगतील. ते न जमलं, तरी निदान असा प्रबळ प्रयत्न केला जावा, की ते सर्वजण आपण होअूनच हे घर सोडून जातील. पण पडद्यामागे अुभं राहून प्रत्यक्षात बाहुल्या खेळवण्याचं काम कोण करतंय हे मात्र गाववाल्यांना कळू नये. नाहीतर लोकांचा अुगाच आपल्याबद्दलच गैरसमज व्हायचा!"

चम्पा नरेन्द्रला अगदी लहानपणापासूनच ओळखत होती. तिला पूर्ण विश्वास होता की, 'आपल्याला मामाच्या तडाख्यातून सोडवायचं सामर्थ्य अन् योग्यता नरेन्द्रमधे नक्कीच आहे.' एके दिवशी चंपाने नरेन्द्रला एकान्तात गाठून आपली सारी परिस्थिती विशद करून सांगितली अनं त्याला विनन्ती केली की, "तू माझ्याशी लग्न कर."

नरेन्द्रच्या मनात चंपाबद्दल प्रेम तर होतंच, पण लग्न करून घेतलं तर 'पट्टीचा पोहोणारा' म्हणवून घेण्याचं आपलं स्वप्न अर्धंच राहून जाईल अशी त्याला भीती पडली. म्हणून प्रथम त्यानं ही सारी हकिकत आपला गुरू परमानन्द याला सांगितली, अन् त्याचा सल्ला विचारला.

परमानन्दला चम्पाबद्दल सर्वकाही ठाअूकच होतं.त्याने नरेन्द्रला पोहोण्याबद्दलचे काही अवघड प्रश्न विचारले. नरेन्द्रने सर्व प्रश्नांची बरोबर अुत्तरं दिली. गुरूने शिष्याची भरपूर प्रशंसा करून त्याला म्हटले, "तू पोहोण्याच्या विद्येत प्रवीण आहेस अन् तुझी पट्टीचा पोहोणारा— जलतरणपटु —म्हणून ख्याती मिळवण्याची इच्छा आहे. तेंव्हा तू रूपवरला जा. तिथे जाअून गणेश नावाच्या माणसाला भेटून सांग की तुला मी पाठवलंय.- तो तुला जलतरणविद्येतले आणखी काही बारकावे शिकवील. अशा प्रकारे या कलेत प्रवीण झालास की इथे परत येअून तू चम्पाशी लग्न कर."

गुरूच्या अुपदेशाप्रमाणे नरेन्द्र गेला. तो पोचला, त्यावेळी गणेश घरात नव्हता. वडील आजारी असल्याने वैद्याला भेटण्यासाठी गणेश जवळच्या गावी गेला होता.

तो त्या वस्तीत गेला आणि लोकांकडून त्यानं गणेशबद्दल माहिती गोळा केली. किराणा दुकानदारानं सांगितलं की गणेशकडे त्याची बरीच अुधारी थकलेली आहे; दूधवाला म्हणाला की, गणेश दूध तर घेतो माझ्याकडून, पण पैसे मात्र कधीच वेळेवर देत नाही. धोब्यानंही असलीच तक्रार केली. गावपाटील म्हणाला की गणेश फार खोटारडा आहे. अशा माणसाची आपण गुरू म्हणून निवड केल्याबद्दल नरेन्द्रला स्वतःचीच लाज वाटू लागली. तरीही त्यानं एवढं मात्र ठरवलं की, परमानन्दनं सांगितल्याप्रमाणे गणेशची प्रत्यक्ष भेट तर घ्यायचीच.

असेच काही विचार करत नरेन्द्र गावापलिकडे असलेल्या तलावाकडे गेला. इतक्यात, दुरून दोन माणसं त्याच्याच दिशेनं येत असलेली त्याला दिसली. ते दोघे जेंव्हा जवळ पोचले, तेंव्हा त्यांच्यापैकी एकजण त्याला म्हणाला, "महाराज, थोड्या अंतरावर आमची गाडी नादुरुस्त होअून थांबलीय. त्यात झाडाची एक मोठीशी फान्दी आहे. आम्ही दोघं तर अगदीच काडीपहिलवान आहोत. तुमची शरीरयष्टी मात्र चांगली भीमसेना सारखी दिसतेय. बळात तर आपण अगदी वायुनन्दनच दिसताय. तुम्ही ती झाडाची फान्दी माझ्या घरी आणून पोचवू शकलात तर मोठीच कृपा होईल माझ्यावरं जन्मभर तुमची सेवा करीन. ते औषध माझ्या बाबांना अमृतासारखं होणार आहे."

नरेन्द्रनं ओळखलं की हाच तो गणेश! त्याने ती फान्दी अुचलली. ती अगदीच हलकी लागल्यानं तो फार आश्चर्यचकित झाला! तिला मुळी वजनच नव्हतं! इतक्यात गणेशनं नरेन्द्रच्या शक्तीचं पुन्हा कौतुक केलं. ते सर्व मिळून जेंव्हा गावच्या रस्त्यातून जात होते,



तेंव्हा समोरून धोबी येताना दिसला. नरेन्द्रला वाटलं की आता या दोघांची चांगलीच जुंपणार!

पण त्याला पाहून गणेश म्हणाला, "मुलीला पाहयला लोक येणार आहेत, लक्षात आहे नं?"

मोठ्या विनयानं डोकं हलवत धोबी अुत्तरला, "हो जी! आजींनी सांगितलंय मला! अुद्या बाकी सगळी कामं सोडून तुमच्याच घरात थांबेन मी मदतीला!"

पुढे ते वाण्याच्या दुकानावरून जाअू लागले, तेंव्हा दुकानदाराने आपणहूनच गणेशला खुशाली विचारून म्हटले, "अुद्या मुलीला पहायला येणार आहेत असं कळलं. लागणारं सामान मी माझ्या माणसाकरवी



पाठवू की तुम्हीच काही कळवाल?"

यावर गणेश हसून म्हणाला, "अं? घरी जाऊन बायकोला विचारल्यावाचून कसं अन् काय सांगू शकणार मी?"

आणखी थोडं पुढं गेल्यावर समोरून खुद्द गावपाटीलच येताना दिसले. ते म्हणाले, "उद्या मुलगी पहायला येणार आहेत असं कळलं? तू तर अगदीच भोळाभाबडा आहेस बघ गणेश! व्यवहारज्ञान मुळी नाहीच तुला! असं म्हणतात की, हजार खोटं बोलून का होईना, पण कुणा एकाचाचं लग्न जमवून देण्यासारखं पुण्य नाही. दुसरं! बेधडक चार पाच खोट्या गोष्टी खुशाल बोलाव्या! मुलाकडचे जे मागतील ते सरळ कबूल करून टाक! मागणी पुरी करायची आपली ताकत आहे की नाही, याचा मुळीच विचार नको करूस! तुझ्या हो ला हो करायला, साथ द्यायला, मदत करायला आम्ही बसलोच आहोत. नाहीतर उपयोग तरी काय आमचा?" त्याच्या बोलण्यात ओतप्रोत प्रेम भरलेलं होतं.

नरेन्द्रला हे सर्व फारच विचित्र वाटत होतं. इतका वेळतर त्याची धारणा होती की गावात कुणालाच हा गणेश आवडत नाहीय! पण आपली धारणा चुकीची असल्याचं त्याच्या ध्यानात आलं. म्हणूनच बहुधा परमान्दनं त्याला गणेशकडे पाठवलं असावं. असे विचार करत करत सर्वजण घराशी पोचले. "तिथे नरेन्द्रला एक पहलवान दिसला. तो एकदम गणेशाला म्हणाला, "अरे! मुलीला पाहयला लोक येणार, अन् मला बोलला पण नाहीस? मागल्या कर्जामुळे मला हे सांगायला संकोच वाटला असेल तुला. पण आता ते सगळं विसरून जा. शेवटी आपण सगळे एकाच गावचे ना? अशा वेळी आपण एकमेकांच्या उपयोगी पडलो नाही, तर केंव्हा पडणार? आता आणखी काही पैशांची गरज असेल तर निःसंकोच मागून घे माझ्याकडून!"

घरात प्रवेश केल्याबरोबर नरेन्द्रने फान्दी एका बाजूला ठेवली. नन्तर गणेश नरेन्द्रला म्हणाला, "तुम्ही खूपच आदरणीय आहात. नुसतं म्हणायचा अवकाश, केवढी मदत केलीत मला! आपण इथले दिसत नाही! आता आज रात्री इथेच माझ्या घरी रहा अन् माझा पाहुणचार घेऊन थोडी कृतज्ञता व्यक्त करायची संधी द्या."

आता नरेन्द्रने गणेशला सांगितले की, "गुरू परमानदांनी मला तुमच्याकडे पाठवलंय." परन्तु परमानन्द कोण हे काही गणेशच्या लक्षात येईना. थोडा वेळ विचार करून तो म्हणाला, "मी ही कामात बराच व्यस्त आहे. तुम्हीही बरेच थकलेले आहात. आज इथे आराम करा. उद्या बोलू आपण."

दुसऱ्या दिवशी वरपक्षाकडील माणसं गणेशच्या मुलीला पहायला आली अन् तो समारंभ अगदी लग्नसमारंभासारखाच थाटामाटात पार पडला. आसपासच्या सर्वांनी अगदी घरच्यासारखीच मदत केली. धोब्याने दिवसभर तिथेच राहून, पडतील ती सारी कामं आनन्दाने केली. गावची सगळी प्रमुख माणसंही आली अन् गणेशनं सर्वांचं सारखंच स्वागत केले.

वरपक्षाकडल्यांना मुलगी पसन्त पडली. हुंडा आणि मानपानाची त्यांची मागणी काहीशी अधिकच वाटली; तरीही गणेशने मान हलवून संमती दिली.

सगळा समारंभ संपल्यावर गणेशची आई क्षुब्ध होऊन त्याला म्हणाली, "अरे एकटाच आहेस नं, हे सर्व काही कसं पार पाडशील? बहिणीच्या लग्नला घेतलेलं कर्ज तरी कुठे अजून चुकवू शकलायस? आता त्यांच्या सगळ्या मागण्या मान्य केल्यास, तर पोरीचं लग्न कसं पार पाडू शकशील? काही विकायचं म्हटलंस तर आपल्याकडे सारं खोटं सोनंच आहे. खरं सोनं तरी कुठे आहे विकायला?"



पण आईच्या बोलण्याने जरा सुद्धा विचलित न होता गणेश म्हणाला, "अग अडचणी काय सदाच्याच आहेत. मुलीचं लग्न ठरलंय, एवढ्याचा तरी संतोषच मान. मी सगळं संभाळून घेईन; तू नको काळजी करूस."

दुसऱ्या दिवशी गणेशला एकान्तात नरेन्द्र म्हणाला, "महाशय, तुमच्या समोर सर्वजण तुमची प्रशंसा करतात; त्यावर विश्वास ठेवून तुम्ही धैर्याने रहाता. पण तुमच्या मागे, ते तुमच्याबद्दल काय काय बोलतात हे कुठे माहीत आहे तुम्हाला?" अन् पहिल्याच दिवशी त्याच गणेशबद्दल जे जे ऐकलं अन् पाहयलं ते सविस्तर त्याला सांगितलं.

सर्व हकिकत ऐकून गणेश हसून म्हणाला, "मला सर्व काही माहीत आहे. मजजवळ

पैसा नाहीये. दुसऱ्यांच्या आधारावरच जगतो मी. ते मला दोषी ठरवून निन्दा करत असतील, तर त्यात त्यांची काय बरं चूक?"

"तसं असेल तर समोरासमोर ते तुम्हाला शिव्या देऊ शकनात न? पाठीमागे निन्दा करण्यात काय अर्थ? इकडे मदतही करतात, अनं तिकडे निन्दाही करतात, याला काय म्हणायचं?" नरेन्द्र बोलला.

"याचं कारण म्हणजे माझा चांगुलपणा! जरूर नसताना मी कुण्णाकडे मदत वगैरे मागत नाही. मला कसली वाईट सवय किंवा व्यसन वगैरे नाहीय. मी कुणाच्यामागे त्याची निन्दा करत नसतो. माझी कुणी निन्दा करत असेल तर मी तिकडे लक्ष देत नाही." गणेश जराही विचलित न होता अगदी शान्तपणे म्हणाला.

"तुमची जीवन-पद्धति मोठी विचित्रच दिसतेय. विशेष गोष्ट म्हणजे, इतक्या गंभीर अडचणी असतानाही तुम्ही पोहोण्याच्या कलेत प्रवीण आहात; अुत्कृष्ट जलतरणपटु आहात! मी तुमच्याकडे जलतरण विद्येतले बारकावे जाणून घेण्यासाठीच आलोय." नरेन्द्रने आपला येण्याचा अुद्देश सांगितला.

यावर आश्चर्य प्रकट करत करत गणेश म्हणाला, "लहानपणापासून माझं आयुष्य संसार-सागरात पोहोण्यातच पार पडलंय. पाण्यात पोहायची विद्या मी अवगत करूच शकलो नाही."

त्याच्या या अुत्तराने परमानन्दचा आपल्याला इकडे पाठवायचा अुद्देश नरेन्द्रच्या ध्यानात आला. हे जीवन म्हणजेच एक समुद्र आहे. जबाबदाऱ्या आणि कर्तव्यं ही हर क्षण आपल्याला त्यात बुडवायचीच वाट पहात असतात. त्यातून स्वतःचं रक्षण करत, भरती ओहोटीला तोंड देत, नुसतंच प्रवाहपतित न होता स्वतःला संभाळत किनाऱ्यावर सुरक्षित पोचू शकतो, तोच खरा जलतरणपटु!

आता नरेन्द्रने गणेशचा निरोप घेतला आणि तो आपल्या गावी पोचला. चंपाशी लग्न करून मोठ्या समर्थपणे त्याने आपल्या अडचणी सोडवल्या अन् या संसार-सागरात 'पट्टीचा पोहोणारा' म्हणून नाव मिळवले.





# अद्भुत फूल
## १२

(नागपुरीच्या राजवाड्यातून जी शताब्दी फुले नाहीशी झाली होती, ती समुद्रतटावरच्या एका नावेत सापडली. दलनायक नागसिंह आणि काही सैनिकांबरोबर अुत्तुंग शताब्दी फुले घेऊन राक्षसाच्या शोधाला निघाला. थोडे अंतर गेल्यावर नागसिंहने अुत्तुंगला समुद्रात ढकलून दिले आणि शताब्दी फुले हस्तगत केली. अुत्तुंग नावेत बसून किनाऱ्याकडे निघाला. —यानन्तर)

अुत्तुंगला जाअून एक आठवडा झाला तरी त्याच्याबाबत काही बातमी न कळल्याने त्याची बहीण रजनी आणि राजकुमारी प्रियंवदा फारच काळजीत पडल्या. राक्षसप्राण्याच्या आक्रमणामुळे आपापली घरे, गावे व संपत्ती सोडून पळून आलेले स्त्रीपुरुष शरणार्थी म्हणून राहू लागले, व त्यांच्या पालनाची जबाबदारी खुद्द राजकुमारीने स्वतःवर घेतली. त्यांचे खाणेपिणे व रहाणे यांची व्यवस्था तिच्या देखरेखीखाली होअू लागली. नंतर एक आठवडापर्यन्त कोणाला कसलाही त्रास वगैरे झाला नाही. पण आता मात्र रजनी आपला भाअू परत न आल्याने व्यथित होअू लागली. त्याच्या बाबत काहीच कसे कळत नाही? लहानपणा पासून ती आपल्या भावापासून



कधीही दूर राहिली नव्हती, त्यामुळे तिचे दुःख दिवसेंदिवस वाढू लागले. आपल्या भावाचाच विचार करत झोपलेली रजनी, 'भैया' म्हणत जोरात ओरडली अन् अुठून बसली. तिचा आवाज ऐकून राजकुमारी ही अुठून तिच्या खोलीत येअून विचारू लागली–"आला तुझा भाअू?"

"नाही राजकुमारी! स्वप्न पडलं मला. स्वप्नात अुत्तुंगला कोणी समुद्रात ढकलून दिलंय असं दिसलं मला!" रजनी थरथरत म्हणाली.

"स्वप्नच ग ते! घाबरतेस कशाला इतकी? तुझ्या भैयासारख्या बहादुर माणसाला नावेतून कोणी ढकलू शकणाराच नाही. तो राक्षसप्राण्याशी लढायला थोडाच गेलाय? त्याला केवळ दूर नेअून सोडायलाच तर गेलाय न तो? लवकरच विजयी होअून परतेल बघ तो! अगदी काळजी न करता झोपून जा बरं परत!" राजकुमारी तिला धीर देत बोलली.

* * *

अुत्तुंग नावेत बसून किनाऱ्याकडे निघाला. त्याबरोबरच नागसिंह आणि सैनिकांच्या नावा कुठे दिसत आहेत का, हे ही तो लक्षपूर्वक पहात होता. पण त्याला त्या कुठेच दिसेनात! थोड्याच वेळात तो समुद्रकिनाऱ्याजवळच्या अुंचअुंच खडकांजवळ पोचला. तेथे लाटाही फार अुंच अन् वेगात होत्या . अकस्मात एका लाटेने पुन्हा त्याची नाव अुलटली अन् किनाऱ्यावर फेकली गेली. अुत्तुंगही नावेपासून जरा दूर खाली पडला. पण भाग्याने त्याला कोठे जखम वगैरे झाली नाही. असं काही घडू शकेल याची त्याला कल्पना असल्याने तो सावध होताच नाव पकडून त्याने ती पाण्यापासून दूर ओढून सुरक्षित ठेवली अन् तो वस्तीकडे पळत सुटला. तेथे पोचल्यावर त्याने काबुईचा दरवाजा खटखटवला. काबुईच्या मुलीने-चित्राने दार अुघडले अन् आश्चर्याने विचारले, "तू? काय झालं?"

कोणीही हाच प्रश्न विचारणार याची अुत्तुंगला अपेक्षा होतीच. पण काय अुत्तर देणार तो? मोठ्या अुत्सुकतेने त्याने विचारले, "काबुई कुठं आहेत?" अर्थात् हे त्याने खुणेनेच विचारले.



"बाबा सेनापतींच्या घरी गेलेत." चित्रा अुत्तरली. "राजाकडे गेलेत?" अुत्तुंगने विचारले.

मान हलवून 'नाही' म्हणत तिने राजधानीकडे निर्देश करत सेनापतीचे नाव अुच्चारले.

अुत्तुंग तेथून राजधानीकडे धावत सुटला अन् सेनापतीच्या घराशी पोचला.

आत सेनापती अन् काबुई कसलीशी चर्चा करत होते. अुत्तुंगला पाहून ते गडबडीने अुठले अन् दोघांनी बरोबरच विचारले, "अरे काय झालं? नागसिंह कुठंय? तू गेला तर होतास नागसिंहा बरोबर. एकटाच परत आलास? त्याचं काय झालं?"

"मी समुद्रात पडलो! नागसिंहचं काय झालं, मला माहीत नाही." तो अुत्तरला.

काबुईने विचारले, "राक्षसीप्राण्यानं तुमच्यावर हल्ला केला की काय?"

"नाही, नागसिंहानंच केला हल्ला माझ्यावर!" असे म्हणून निघाल्यापासून जे जे घडले ते सारे अुत्तुंगने त्या दोघांना सविस्तर सांगितले.

सर्व ऐकून काबुई म्हणाला, "तुला काही अपघात वगैरे झाला नाही, हे भाग्यच म्हणायचं! फुलं घेअून जाअून नागसिंह त्यांचा कसा अुपयोग करणार हे काही समजत नाहीय मला."

सेनापती दुर्जय म्हणाला, "नागसिंहाची महत्वाकांक्षा तर आपल्याला ठाअूक आहेच. अुत्तुंगला त्यानं सांगितलं, त्याप्रमाणे



सिंहासन मिळवण्यासाठी तो काहीही करील. आपली नीच योजना अमलात आणण्यासाठी तो राक्षसप्राण्याला शताब्दी फुलांची लालूच दाखवील अन् त्याला नागपुरीवर हल्ला करायला प्रोत्साहन देईल. तसं घडलं की, माणिक्यपुरीची झाली तशी दुर्गत आपलीही होईल."

अुत्तुंग म्हणाला, "पण हं, एक गोष्ट तुम्हाला सांगायला हवीच. या नागसिंहने तो प्राणी अजून स्वतः पाहिलेलाच नाहीय. तो एकाद्या अुंच पहाडासारखा दिसतो. समुद्रतटावरच्या अुंच खडकाळ पहाडातून राज्यात येणारा रस्ता अगदीच वाकडा-तिकडा अनं फारच अरुन्द आहे. त्या वाटेनं त्याला राज्यात प्रवेश करणं अशक्य



होईल."

"मग तर काळजीचं काही कारणच नाही. आपण ताबडतोब महाराजांना हे सारं सांगू या. राजपरिवाराचं रक्षण करणं फार महत्वाचं आहे." असे म्हणत सेनापती तेथून निघाला.

त्यांना पहाताच राजाने विचारले, "हे काय अुत्तुंग, तू अजून निघालाच नाहीस?" अन् सेनापतीकडे पहात त्याने संशयाने विचारले, "की नागसिंह पळून गेला?"

"नाही महाराज, काही अघटित घडलंय!" असे म्हणून सेनापतीने राजाला संक्षेपाने सर्व सांगितले.

ते ऐकून राजा म्हणाला, "दुर्जय, आमच्या संरक्षणाचा विचार सोडून दे. आपलं राज्य अन् प्रजा यांच्यावर काही तोहमत यायला नको. आपण ताबडतोब समुद्रकिनारी जाअू या. क्षणभरही अुशीर नको! सैनिकांना आज्ञा देअून, प्रत्येकाने एक एक मशाल बरोबर घेअून तटावर यायला सांगा. अुत्तुंगनं सांगितलंय ना की राक्षसाला अग्नीची भीती वाटते? तेंव्हा आपल्या हातात जळत्या मशाली असेपर्यंत तो प्राणी इकडे यायचं दुस्साहस करणार नाही. अुत्तुंग, तू अन् काबुई असेच सरळ समुद्रकिनारी जा. सेनापती अन् मी सैनिकांना घेअून पाठोपाठ निघतोच; तिथे पोचल्यावर आपण आपला पुढचा कार्यक्रम ठरवू."

"जशी आज्ञा महाराज!" असे म्हणून तिघेही तेथून निघाले.

काबुई आणि अुत्तुंग जेंव्हा वस्तीवर पोचले, तेंव्हा तिथले सर्व स्त्रीपुरुष त्यांची मोठ्या आतुरतेने वाट पहात होते. काबुई घरात जाअून आपल्या पत्नीशी काहीतरी बोलून बाहेर आला. नन्तर अुत्तुंग व काबुई यांना मोठ्या वेगाने समुद्रकिनाऱ्याकडे जाताना पाहून सर्वचजण आश्चर्यात बुडाले.

दोघेही समुद्रतटी पोचले. तिथल्या अुंच अुंच खडकांना लाटा स्पर्श करत होत्या. त्यामुळे जो आवाज निघत होता, तो सोडला तर बाकी वातावरण अगदी शान्त असेच होते. दोघेही अुंच खडकावर चढून येणाऱ्या नावा कुठे दिसत आहेत का, हे लक्षपूर्वक पाहू लागले. सर्वत्र मिट्ट काळोख पसरला





होता, त्यामुळे त्यांना नीट काहीच दिसत नव्हते. थोड्या वेळाने समुद्रातून दुरून काही आवाज अस्पष्टसे ऐकू येअू लागले. तो आवाज हळूहळू स्पष्ट ऐकू येअू लागला.

काबुईने विचारलं, "हा आवाज नागसिंहचाच ना?" अुत्तुंगने यावर काहीच अुत्तर दिले नाही. तो एकटक समुद्राकडेच पहात राहिला. बराच वेळ पाहिल्यानन्तर तो एकदम म्हणाला, "काबुई, तो पहा राक्षसप्राणी!"

काबुई म्हणाला, "कुठंय! मला तर काहीच दिसत नाहीये?"

अुत्तुंगने एका दिशेला हात दाखवत म्हटले, "माझ्या बोटाच्या दिशेने सरळ रेषेत पहा. तो एखाद्या पहाडासारखा राक्षसप्राणी हळूहळू पुढे सरकत इकडे येतो आहे."

"हो, हो! तू बरोबर सांगतोयस. एक पहाड दिसतोय खरा! पण तो चालू कसा शकतोय?" काबुईने विचारले.

"तुम्ही खूपदा येता न इकडे? नीट विचार करून पहा. इथे कधी एखादा पहाड पाहिला होता कधी? मग आजच आत्ता अकस्मात असा डोंगर इथे कुठून अुपटला? विचार करा." अुत्तुंग म्हणाला.

"हो हो! तो पहाड नव्हेच. पण तसा दिसणारा कोणी प्राणीच पुढे पुढे येतोय. तुझं म्हणणं अगदी बरोबर!" त्या प्राण्याकडेच एकटक पहात काबुई म्हणाला.

"हाच तो राक्षसप्राणी! नावांच्या मागे मागे राहून पुढे सरकतो आहे. नीट निरखून पहा, त्याच्या पुढे दोन नावा इकडे येत आहेत. इतका मोठा प्राणी आपल्या अरुन्द रस्त्याने येअू शकणार नाही ना?" अुत्तुंगने विचारले.

"हाँ, नाहीच येअू शकणार! पाहू आता काय होतंय पुढं! इतक्यात महाराज आले तर बरं होईल." काबुई बोलला.

अुत्तुंग तेवढ्यात म्हणाला. "हे आलेच महाराज!"

काबुईने वळून पाहिले-हातात मशाली घेतलेले सैनिक येत होते! मशालींच्या प्रकाशात राजा व सेनापती यांचे चेहरे स्पष्ट



दिसत होते. थोड्याच वेळात ते सर्वजण अुत्तुंग व काबुई अुभ्या असलेल्या खडकावर पोचले. मशालींचा प्रकाश समुद्रात थोड्या दूरवर पसरला. त्या प्रकाशात सर्वांनी पाहिले की दोन नावा मोठ्या वेगाने तटाकडे येत आहेत. एका नावेत अुभा असलेला माणूस हात अुचलून काहीसं बोलत आहे, अन् नावांच्या मागे तो विशालकाय पुढेपुढे येत आहे!"

सेनापती एकदम ओरडला, "तो पहा राक्षस!" राजाही म्हणाला, "होय! मलाही दिसतोय तो!"

थोड्याच वेळात ते आणखी पुढे आले अन् त्यांची रूपे जास्त स्पष्ट दिसू लागली. तो प्राणी हात अुचलून नावा पकडायचा प्रयत्न करत होता. अन् हात लागण्यामुळे नावा डचमळू लागल्या, नावेत अुभा असलेला माणूस नाव जोराने हलल्यामुळे धडामूकन् पाण्यात कोसळला!

सेनापतीने सैनिकांना आज्ञा दिली, "हातातल्या मशाली राक्षसावर नेम धरून फेका!" सैनिकांनी भराभर आपापल्या मशालींचा बाणांप्रमाणे राक्षसावर वर्षाव करायला सुरुवात केली. जवळ अुभे असणारे अन्य सैनिक भराभर मशाली पेटवून त्यांच्या हातात देअू लागले.

काही मशाली समुद्रात पडल्या तर काही त्या दोन नावात पडल्या. राक्षसप्राणी मशालींचा प्रकाश सहन करू शकत नव्हता. त्यामुळे तो एक हात आपल्या डोळ्यांवर ठेवत होता. अन् दुसऱ्या हाताने नावा घट्ट पकडून ठेवत होता. दोन तीन जळत्या मशाली त्याच्या अंगावर पडल्याने तेथे ज्वाळा अुत्पन्न झाल्या. त्याबरोबर राक्षस त्या पातळीपर्यन्त पाण्यात बुडला अन् आग विझल्यावर लगेच खूप रागावून पुन्हा अुभा राहिला. त्याने नावा मोडून तोडून टाकल्या, अन् विखरून पडलेली शताब्दी फुले एकत्र करू लागला. त्या फुलांबरोबर नागसिंहचे काही सैनिकही त्याच्या हाती आले, ते जोरजोरात विव्हळू लागले. राक्षसाने फुले तेवढी घेतली अन् सैनिकांना दूर पाण्यात फेकून दिले. त्यांना 'त्राही भगवान' झाले!

तटावरून सैनिक जरी मशालींच्या



बाणांचा सतत वर्षाव करत राहिले तरी तो राक्षस आरामात फुले गोळा करत राहिला. फुले वेचल्यानन्तर तो हळूहळू माघारी वळला. परन्तु मशालींच्या वर्षावामुळे त्याचे सबंध शरीर अकस्मात् अग्निज्वाळांत वेढले गेले. त्यावेळी त्याचे मस्तक एकाद्या लाल तप्त गोळ्याप्रमाणे दिसू लागले. तो जोराने ओरडत पाण्यात बुडाला अन् मग त्याचा काहीच पत्ता लागला नाही.

ते भयानक दृश्य पाहून खोलवर श्वास घेत राजा म्हणाला, "तो राक्षसप्राणी बहुधा मेलाच असावा. नाहीतर आतापर्यंत फुलं हातात घेऊन तो वर आला असता. त्याच्यापासून आपली कायम सुटकाच झाली असावी असं वाटतंय."

थोड्या वेळाने काही सैनिक पोहोत तटाकडे येताना त्यांना दिसले. त्यांना पाहून सेनापती म्हणाला, "राक्षसप्राणी मरून गेला असावा असं जे आपण म्हणालात ते खरंच असावं. ते सैनिक वर आले की त्यांच्याकडून आपल्याला बाकीचं स्पष्टीकरणही मिळेल. आपल्या काही सैनिकांना इथे सोडून आपण राजधानीला परत जाऊ या."

काबुई म्हणाला, "नागसिंहवर काय गुदरलंय अन् तो कुठे आहे, काहीच कळत नाहीय."

"मी त्याचा पत्ता लावतो महाराज. आपण परवानगी दिलीत तर या सैनिकांसह मी आज रात्रभर इथेच राहीन अन् सर्व काही पूर्ण समजलं की उद्या सकाळी राजधानीत आपल्याला येऊन भेटेन. मी ज्या कामासाठी निघालो होतो, त्यातलं निम्मं तर आपल्या कृपेनं पूर्ण झाल्यासारखंच आहे. आता मी माणिक्यपुरीकडे परत केंव्हा निघायचं ते उद्या ठरवू या."

राजा खुशीने म्हणाला, "हो, तसंच करू या."

काही सैनिक उत्तुंगजवळ सोडून राजा, सेनापती व काबुई बाकीच्या सैनिकांना बरोबर घेऊन राजधानीकडे निघून गेले.

क्रमशः





# विवेकशील

दृढनिश्चयी विक्रमराजा पुन्हा त्या झाडाकडे गेला. झाडावरून प्रेत उतरवून त्याने आपल्या खांद्यावर टाकले, तेंव्हा त्या प्रेतात रहाणारा वेताळ म्हणाला, "राजा, आपलं निश्चित उद्दिष्ट साधण्यासाठी तू तल्लीनतेनं प्रयत्न करत आहेस. हं, हे सारं तू आपली पत्नी किंवा मुलांसाठी करत असशील, तर ठीकच आहे, नक्कीच प्रशंसा करावी तुझी! कारण अग्नीला साक्षी ठेऊन तू ज्या स्त्रीचा अर्धांगिनी म्हणून स्वीकार केलास, जी जन्मभर तुला साथ देईल, तिच्या बाबतीतलं आपलं कर्तव्य पार पाडून तू धर्ममार्गच आचरत आहेस. धर्मपत्नी बरोबर तू संतानवृध्दी अन् सुखमय भविष्यासाठी हे प्रयत्न करत असशील, तर तू कर्तव्यनिष्ठ, धर्मपरायण आणि सद्गुणी आहेस असंच म्हणायला हवं. पण तसं नसून आपल्या म्हाताऱ्या आईवडलांच्या अर्थहीन इच्छा पूर्ण करण्यासाठी तू आपल्या बायकोमुलांचा बळी देत असशील, तर याहून जास्त मूर्खपणा

**वेताळ कथा**



दुसरा कोणताही नव्हे. माझा सल्ला मान, अन् आपले हे प्रयत्न सोडून दे. कारण तू प्रयत्न चालू ठेवलेस तर कदाचित् तुझ्या पितृभक्तीचे पोवाडेही गायले जातील, मातृभक्त म्हणून तुझी 'वाहवा' होईल. पण लक्षात ठेव की ही स्तुती, ही वाहवा केवळ तात्कालिकच असेल. तुला कदाचित् या स्तुतीने आनन्द होईल; पण ही सारी आत्मवंचना आहे राजा! मी तर पुढे जाऊन असं म्हणेन की हा आत्मद्रोहच आहे. कारण आपल्या माता-पित्यांच्या इच्छापूर्तीसाठी आपल्या बायको मुलांना बाजूला सारणं हे महापाप आहे; त्यांच्यावर हा शुद्ध अन्याय आहे. आपल्या म्हाताऱ्या पित्याला दिलेलं वचन पूर्ण करण्यासाठी एका राजाने आपल्या गर्भवती राणीला प्राणसंकटात लोटले. अशा त्या अविवेकी राजाची गोष्ट मी तुला सांगतो. ऐक ती." अन् वेताळ गोष्ट सांगू लागला.

अंगदेशचा राजा मकरध्वज वृद्ध झाला. राज्य शासन संभाळायची त्याची शक्ती क्षीण झाली. त्याच्या असे लक्षात आले की—आता आपण काही दिवसांचेच सोबती आहोत; कोणत्याही क्षणी आपलं प्राणपाखरू अुडून जाण्याची शक्यता आहे.

अशा परिस्थितीत एक दिवस तो आपल्या पुत्राला म्हणाला "बाळा मलयसिंह, मी म्हातारा झालोय, पण इहलोकीच्या माझ्या काही इच्छा अजून पुऱ्या झालेल्या नाहीत. सुखोपभोगाची माझी लालसा अजून बाकी आहेच. मला अजून काही दिवस जगायची इच्छा आहे रे! परन्तु निसर्गनियमाप्रमाणे वृद्धापकाळ आला की मृत्यु हा अटळ असतो, मग तो माणूस कितीही महान् का असेना! तेव्हां आज ना अुद्या माझं मरण अगदी निश्चित आहे. पण मी मेल्यावर माझं शरीर जाळून टाकू नकोस. केवळ हाडांचा सापळा ना बनावं, यासाठी त्या शरीराला आवश्यक तो लेप लाव, अन् ते सुरक्षित ठेव. भविष्याबाबत कोण काय सांगू शकेल? भविष्यात कदाचित् वैद्यकशास्त्रात इतकी प्रगती होअू शकेल की शास्त्रज्ञ मृत शरीरातही प्राणसंचार करू शकतील! कदाचित् असंही घडू शकेल की एकादा दीर्घ तपस्वी, किंवा महोन्नत ऋषी माझ्या शरीरात प्राण फुंकू शकेल. काहीही असो, ही एका पित्याची अंतिम इच्छा समजून ती जरूर पुरी कर."

यानन्तर एका आठवड्याच्या आतच मकरध्वजाचे देहावसान झाले.

पित्याच्या इच्छेनुसार मलयसिंहने त्याच्या शरीराला अग्निसंस्कार न करता त्याला लेपन करवून चंदनाच्या एका विशिष्ट प्रकारच्या पेटीत शव सुरक्षित ठेवले.

यानन्तर मलयसिंह अंगराज्याच्या सिंहासनावर बसला. कलिंग राज्याची राजकुमारी विद्युल्लता हिच्याशी त्याचा विवाहही झाला. विद्युल्लता अत्यन्त लावण्यवती होती. अन् त्याचबरोबर ती मूर्तिमन्त सुशीलतेची प्रतिमाही होती.

पुढे योग्य समयी विद्युल्लतेला दिवस राहिले. राजज्योतिष्याने 'तिला मुलगाच होणार' असे भविष्यकथन केले. पण ते भविष्य सांगताना ज्योतिषाच्या चेहऱ्यावर सूक्ष्मसे भयाचे भाव अुमटलेले राजाच्या लक्षात आले. मलयसिंहने त्याला अभय देत सत्यकथन करायला विनवले. तेंव्हा ज्योतिषी म्हणाला, "महाराज, एक महिन्याच्या आत महाराणींचा सर्पदंशाने मृत्यु संभवतो!".

ज्योतिषाच्या या भविष्यकथनाने राजदम्पति दुःखाने व्याकुळ झाली. या क्षणापर्यन्त राज्याचा वारस जन्माला येणार, म्हणून दोघेही खूप आनन्दात होते. पण त्या आनन्दाची जागा या सर्पदंशाच्या भीतीने घेतली.

ज्योतिषी निघून गेल्यावर विद्युल्लतेला



मलयसिंह म्हणाला, "या ज्योतिषांचं भविष्यकथन नेहमी खरंच ठरतं, असं काही नाही. तेव्हा या सर्पदंशावर विश्वास ठेवून काळजीत पडणं, दुःख करणं अुचित नव्हे. आपल्या साऱ्या शक्ती एकवटून मी तुझं रक्षण करीन. तू मुळीच काळजी करू नकोस."

त्या दिवसापासून राजाने सैनिकांना राज्यात दिसेल ते ते वारूळ नष्ट करायचा आदेश दिला, त्याने अशीही घोषणा केली की राज्यातल्या प्रत्येक घरातील लोकांना घरटी एक एक मुंगुस पाळणे अनिवार्य आहे.

मलयसिंहाने स्वतः एक गरूड पक्षी पाळला. हा गरूड सदासर्वकाळ राजाच्या खांद्यावर आरूढ असे. या सर्व अुपायांमुळे

कोणतेही संकट न येता महाराणीने काही दिवस मुक्तपणे व्यतीत केले. नन्तर पौर्णिमेचा दिवस आला. सर्पदंशाच्या भयानक भीतीचा तो शेवटचा दिवस! तो दिवस टळला म्हणजे ज्योतिष खोटे ठरणार होते, त्यावर मात होणार होती.

रात्री विद्युल्लता राजाला म्हणाली, "या टिपूर चांदण्यात थोडा वेळ बगीच्यात हिंडावंसं वाटतंय मला. तुम्ही हो म्हणत असाल तर चलू या?"

मलयसिंह तिला नकार देऊ शकला नाही. चन्द्र आकाशात नुकताच वर आला होता. दोघे रमतगमत बागेत फिरू लागले. खुद्द विद्युल्लतेच्याच खांद्यावर बसलेला गरूड अकस्मात हवेत उडाला व जवळच्याच अशोकवृक्षावर सरपटणारा साप त्याने पंजात पकडला. सापाला घेऊन तो दूर जायच्या विचारात होता, पण गरुडाच्या नरड्यातून सुटून बरोबर विद्युल्लतेच्याच देहावर पडला!

या आकस्मिक प्रकाराने राणी विद्युल्लता घाबरून जोराने ओरडली. सर्पाने आपली फणा पसरली व राणीच्या खांद्यावर डंख मारला. राणी बेशुद्ध होऊन जमिनीवर कोसळली.

राजवैद्य लगेच धावतपळत हजर झाले, परन्तु तोपर्यन्त विषप्रभावाने राणीचे प्राणोत्क्रमणही झाले होते.

विद्युल्लतेच्या मृत्यूमुळे राजा दुःखाने वेडापिसा झाला. राणीच्या सुन्दर चेहऱ्याकडे पाहून तर असे वाटत होते, की या अद्भुत सौन्दर्यराशीची मालकीण शान्त झोपेत आहे. तो सुंदर देह जसाच्या तसा असलेला पाहून राजाला तो अग्निनारायणाला अर्पण करावेसे वाटेना; म्हणून तिच्या शवालाही लेप वगैरे लावून, चंदनाच्या पेटीत घालून त्याने तेही आपल्या पित्याच्या पेटीच्या खोलीतच ठेवून दिले.

कालौघात असेच काही महिने निघून गेले आणि एक दिवस हिमालयात तपस्या करत रहाणारे चैतन्य आनन्दस्वामी मलयसिंहच्या राज्यात आले. हास्यवदनाने त्यांनी राजाला आशिर्वाद देऊन म्हटले, "पुत्र! तू मला काही सांगायची गरज नाही. जे काही घडलं, ते सर्वकाही मला माहीत आहे. निसर्गाविरुद्ध जाऊन केलेली कामं विनाशकारीच सिद्ध होतात. आपल्या पित्याच्या शवाला अग्निसंस्कार न करता तू ते सुरक्षित ठेवलेस म्हणूनच अपघाताने तुझ्या धर्मपत्नीचा अकाली मृत्यु झाला! अजूनही काही बिघडलं नाही; आपल्या पित्याच्या शवाचे दहन कर, म्हणने तुझी पत्नी जिवन्त होईल."

मलयसिंह आता विचारात पडला. नन्तर हात जोडून तो विनयाने म्हणाला, "स्वामीमहाराज! आपण मृतकांना प्राणदान देऊ शकणार नाही?"

महर्षि हसून म्हणाले, "माझी तपोशक्ती सीमित आहे. मी केवळ एकच जीव वाचवू शकतो. बोल राजा, कोणाला वाचवू? पत्नीला, की पित्याला?"

मलयसिंह जराही विचारात न पडता पट्कन् उत्तरला, "माझे पिता मकरध्वज यांना प्राणदान द्यावं स्वामी!"

"राजा तू मोठा विवेकशील आहेस, म्हणूनच आपल्या तीनही प्रियजनांना





प्राणदान देऊ शकत आहेस तू राजा!'' महर्षी राजा मलयसिंहचे अभिनन्दन करत म्हणाले.

गोष्ट इथेच थांबवून वेताळ विक्रमराजाला म्हणाला, ''राजा, चैतन्यस्वामीचं बोलणं परस्परविरोधी वाटतं. प्रथम ते म्हणाले की आपण आपल्या तपोबळाने एकच माणूस वाचवू शकतो. पण, मलयसिंहाने आपल्या पित्यालाच वाचवायची विनन्ती करताच ते म्हणतात की तू आपल्या विवेकाने तीनही जीव वाचवले आहेस! त्या महर्षींच्या बाबत एक गोष्ट माझ्या बरोबर लक्षात येत नाहीये; आपल्याला मलयसिंहचे वडील आणि पत्नी यांच्याबद्दलच माहीत आहे. पण महर्षी तर तीन व्यक्तीच्या जीवदानाबद्दल बोललेत. हा तिसरा प्राणी कोण? माझ्या या साऱ्या प्रश्नांची अुत्तरं माहीत असूनही द्यायची टाळलीस, तर तुझ्या मस्तकाचे तुकडे-तुकडे होअून पडतील.''

वेताळाच्या संदेहांच्या अुत्तरादाखल राजा विक्रम म्हणाला, ''राजा मलयसिंहला केवळ 'पितृभक्त' समजण्यात चूक होईल. त्याला आपली धर्मपत्नी प्राणाहूनही प्रिय होती. म्हणूनच तिच्या मृत्युनन्तर त्याने दुसऱ्या विवाहाचा विचारही केला नाही. महर्षी तर म्हणाले की पित्याची दहनक्रिया न केल्याच्या दोषामुळेच विद्युल्लतेचा अकालमृत्यु ओढवला आहे. यावरून मलयसिंह समजून चुकला की महर्षींनी पित्याला प्राणदान दिले की दोषनिवारण होअून विद्युल्लताही पुन्हा सजीव होअून अुठेल! म्हणूनच त्याने महर्षींना आपल्या पित्याला प्राणदान देण्याची प्रार्थना केली. इतक्या बारीक ज्ञानाबद्दलच महर्षींनी 'महान् विवेकी' म्हणून मलयसिंहाचे अभिनन्दन केले. आता विद्युल्लता वाचली की तिच्या अुदरातला गर्भही वाचणारच ना? तो गर्भ म्हणजेच महर्षींना अभिप्रेत असणारा तिसरा प्राणी.''

आशा तऱ्हेने विक्रमाचे मौन भंग करून वेताळ पुन्हा एकदा त्या प्रेतासह अदृश्य होअून झाडावर जाअून बसला.





# लबाड गुरुनाथ

गुरुनाथ हा मोठा लबाड प्राणी! तो तरुण अन् चांगला धडधाकट असून शहरात जाअून रहायची त्याची तीव्र इच्छा होती. गावात त्याचं एक जुनंपुराणं घर होतं. बऱ्याच दिवसांपासून गुरुनाथ ते विकायच्या प्रयत्नात होता, पण ते घर कोणी पाचशेलाही विचारत नव्हतं.

गुरुनाथ असाच एकदा शहरात गेला असताना श्रीकान्त नावाच्या एका माणसाशी त्याचा परिचय झाला. बोलताबोलता श्रीकान्त म्हणाला, ''मी दम्यानं भारी हैराण झालोय. माझे डॉक्टर म्हणतात की हवाबदल करण्यासाठी मी दुसरीकडे कुठे जाअून रहावं.''

गुरुनाथला ही संधी छान वाटली. तो म्हणाला, ''म्हणजे मोकळ्या हवेत जाअून रहा, असंच ना?''

''हो, हो! तसंच. या शहराजवळच्या एकाद्या खेड्यात घर विकाअू असेल तर बघावं म्हणतोय मी. आहे असं एकादं घर?'' श्रीकान्तनं विचारलं.

गुरुनाथ जोराने हसत म्हणाला, ''मोठ्या भाग्यानंच आपली दोघांची गाठ पडली म्हणायची! मला आपलं घर विकायचंच आहे. किंमतही काही जास्त नाहीय. फक्त पंधराशे रुपये! घेअून टाका ना तुम्हीच ते.''

''घर खरीदणं मला काहीच अडचणीचं नाही. पण तुमच्या गावचं हवापाणी मला मानवेल की नाही हाच प्रश्न आहे.'' श्रीकान्तनं शंका व्यक्त केली.

''अरे, याबाबतीत अगदी निश्चिन्त रहा तुम्ही. मलाच पहा ना! कसा धडधाकट आहे मी! पंचवीस वर्षांपूर्वी मी जेंव्हा या गावात आलो, तेंव्हा मला चालताही येत नव्हतं, खाटेवरच पडून असे मी! पण आता पहा! हा सगळा आमच्या गावच्या हवापाण्याचाच तर प्रभाव.'' गुरुनाथ म्हणाला.

ज्योति यादव

श्रीकान्त गुरुनाथच्या गावी गेला, त्याचं घर पाहिलं, अन् शेवटी पंधराशे रुपये देऊन त्यानं ते विकतही घेतलं.

त्याच गावातला एक माणूस गुरुनाथचा कट्टर दुष्मन होता. गुरुनाथचं घर विकलं गेलेलं त्याला पहावलं नाही. श्रीकान्तकडे जाऊन तो इथे का राहायला आला वगैरे माहिती त्यानं काढली. तो श्रीकान्तला म्हणाला, "त्या लबाड गुरुनाथनं तुम्हाला चांगलंच फसवलंय. तो बोललेलं सगळं साफ खोटं आहे! तो तर याच गावात जन्मला अन् वाढला. चालता न येण्याइतका आजारीही तो कधी पडला नव्हता!"

गुरुनाथ आता लवकरच गाव सोडून शहरात रहायला जाईल, हे ओळखून श्रीकान्तनं त्याला शोधून काढून रागाने विचारलं, "मला वाटलं होते की तू एक सभ्य माणूस आहेस! कित्ती खोटं बोललास तू माझ्याशी!"

गुरुनाथ जराही विचलित न होता म्हणाला, "गैरसमज झालेला दिसतोय तुमचा!"

"तू तर म्हणाला होतास, की गावात आलास नेंव्हा तुला चालताही येत नव्हतं, पलंगावरच पडून रहात होतास. अन् आता मला कळलंय की तू कधी आजारी पडलाच नव्हतास."

"ओहो! तुमच्या रागाचं कारण हे आहे होय? मग ऐकाच तर. माफ करा, पण मी काय तुम्हाला असं म्हणालो होतो, की मी आजारी होतो? 'या गावात आलो' या शब्दांचा अर्थ इतकाच, की मी इथे जन्मलो; अन् जन्मलो तेंव्हा मला चालता येत नव्हतं, हे बरोबरच नव्हे का? मी तर तुम्हाला सांगत होतो की या गावचं हवापाणी अगदी उत्तम आहे, बरोबर नं? ते जर चांगलं नसतं, तर मी इतका निरोगी, धडधाकट असणं शक्य होतं का?" श्रीकान्तचा क्रोध थंड पाडत गुरुनाथ बोलला.

गुरुनाथच्या बोलण्यातलं सत्य श्रीकान्त समजून चुकला अन् केवळ डोकं हलवून गप्पच राहिला!



# चांदोबा पुरवणी-६५

**भारतातील पशु-पक्षी**

## शान्तिचिन्ह-कबुतर




**बा**यबलच्या गोष्टीनुसार, जेंव्हा जलप्रलय झाला, तेंव्हा नोहाच्या कुटुंबाने काही पक्षी व प्राणी बरोबर घेऊन नावेतून प्रवास केला. प्रवास करता करता नोहाने, आसपास कुठे भूमि आहे की काय, हे पहाण्यासाठी एक कबुतर सोडले. दोन वेळा उडून दोन्ही वेळा ते कबुतर तसेच परत आले. तिसऱ्या वेळी मात्र ते आपल्या चोचीतून 'ऑलिव्ह' ची एक कोवळी डहाळी घेऊन आले. कबुतर ज्या दिशेकडून आले, त्या दिशेकडे नोहाने आपली नौका हाकारली. आणि तो सुरक्षितपणे जमिनीवर उतरला. कबुतर हे शान्तिसूचक आहे, शांतिचिन्ह आहे. जेंव्हा जेंव्हा कबुतराचे चित्र काढले जाते, तेंव्हा तेंव्हा आजही त्याच्या चोचीत ही डहाळी दाखवली जाते. शान्तिदूत ज्याप्रमाणे आपसात कधी लढत नाहीत, त्याचप्रमाणे कबुतर आपल्या जातीतल्या किंवा अन्य कोणत्याही पक्ष्यांशी सहसा झगडत नाही.

कबुतरांसारखेच दिसणारे, पण आकाराने काहीसे लहान असे काही पक्षी आहेत. त्यांच्या पैकी ज्यांच्या मानेच्या खालील भागावर अंगठीसारखी रेष असते, त्यांना 'अंगठी कबुतर' असे म्हणतात. यांचे शरीर फिक्या खाकी रंगाचे असते. वांगणी रंगाची कबुतरे (यांना आपण 'पारवे' म्हणतो) या अंगठी कबुतरांपेक्षा मोठी असतात.

सर्व प्रकारच्या कबुतरात अंगठी व वांगणी कबुतरेच आकाराने मोठी असतात. त्यांच्या गळ्याच्या दोन्ही बाजूंना काळे डाग, निळ्या व खाकी रंगाच्या रेषा असतात. त्यांची लांबट शेपटी पांढरी किंवा खाकी असते. टिपकेवाली कबुतरे दिसायला फारच सुंदर असतात. खाकी कबुतरांच्या पोटाच्या खालच्या बाजूला पांढरे ठिपके असतात. या कबुतरांच्या गळ्यावर असणारे पांढरे व काळे ठिपके मुद्दाम रेखाटल्यासारखे वाटतात

# आधुनिक भारतातील चित्रकार

## रवीन्द्रनाथ टागोर



विश्वकवि रवीन्द्रनाथ टागोर एकदा जहाजाने पेरू देशाकडे जात होते. पण वाटेतच त्यांची प्रकृति बिघडली व जहाजाच्या डॉक्टरने त्यांना जहाजयात्रा मधेच थांबवून काही दिवस विश्रांती घेण्याचा सल्ला दिला. त्यांच्या हितचिंतकांनीही त्यांना आग्रह केला व तो मानून रवीन्द्रनाथ ब्यूनॉसएअर्सला अुतरले.



व्हिक्टोरिया ओकांपोच्या मनात रवीन्द्रनाथांबद्दल फार आदर होता. ब्यूनॉसएअर्समधे त्यांनी रवीन्द्रनाथांचे स्वागत करून शहराबाहेरील आपल्या स्वतःच्या घरात त्यांची रहाण्याची व्यवस्था केली. प्रकृति जसजशी सुधारू लागली तसतशी रवीन्द्रनाथांनी लगेच कविता लेखनाला सुरुवात केली.

एके दिवशी व्हिक्टोरिया ओकांपो



त्यांचा कवितांची वही चाळून पहात होत्या, तेंव्हा त्यांना असे आढळले की रवीन्द्रनाथांनी अधेमधे शाईनेच सुंदर चित्रेही रेखाटली आहेत! त्यातील मुख्यतः मानवी चित्रे पाहून त्या फारच आश्चर्यचकित झाल्या. ती चित्रकला त्यांना अगदी सजीव व स्फूर्तिदायक वाटली. खूपच प्रसन्नतेने त्यांनी रवीन्द्रजींना विचारले, "तुम्ही किती अुच्च दर्जाचे चित्रकार आहात, हे माहीत आहे तुम्हाला?"

हळूच हसून रवीन्द्रनाथ गप्पच राहिले. त्या महान कवीच्या अंतःकरणात जी अद्‌भुत चित्रकला स्फुरली होती, तिला या बोलण्याने प्रोत्साहन मिळाले.

ही घटना रवीन्द्रनाथ टागोर ६७ वर्षांचे असताना, १९२४ मधे घडली. त्यांची प्रतिभा तर नित्यनवीन असे, त्यामुळेच या वयांतले चित्र काढण्याचे काम त्यांनी अत्यंत अुत्साहाने आपल्या जीवनाच्या अंतापर्यन्त चालूच ठेवले.

रवीन्द्रजी बहुधा आपली चित्रे साध्या शाईनेच रेखाटत. माणसांचे चेहरे, पक्षांची व निसर्गाची दृश्ये हे त्यांचे आवडते विषय असत. त्यांच्या चित्रकलेवर पाश्चात्य कलेची छाप दिसत असली, तरी ती चित्रे एकदम निराळी व मौलिक असत. ते म्हणत की, "आपण जीवनातील विविध क्षेत्रात नाना प्रकारचे अनुभव घेत असतो. हे अनुभव अगदी स्वतन्त्र व मुक्त असतात. कुठल्याच विशेष अशा क्षेत्राशी ते बांधले गेलेले नसतात. अशा अनुभवांचेच सदैव मनन-चिंतन करत पुढे जाण्याची एकान्त यात्रा म्हणजेच कला होय."

रवीन्द्रनाथ टागोर यांना १९४१ मधे मृत्यु झाला. तोपर्यन्त त्यांनी २.४०० चित्रे रेखाटली होती. या चित्रांपासून आधुनिक भारतीय कलाकारांना खूपच स्फूर्ती व मार्गदर्शन मिळते.

# तुम्हाला माहीत आहे काय?

१. अमेरिकेच्या राष्ट्रीय ध्वजात किती पट्टे आहेत? ते काय सूचित करतात?
२. भरतमुनींनी 'नाट्यशास्त्र' लिहिले. भरत नामक शब्द भारतीय संगीताचे तीन अंश सूचित करतात असे मानले जाते. ते अंश कोणते?
३. इटलीत 'सोन्याचे सफरचन्द' कशाला म्हणतात?
४. 'कवींचा कवि' असे इंग्रजीत कोणाला म्हटले जाई?
५. 'काबूकी' हा नृत्यविशेष कोणत्या देशाचे वैशिष्ट्य आहे?
६. एक पुष्पवृक्ष एका देशातून आपल्या देशात आणला गेला. वृक्ष आजही इथे अस्तित्वात आहे, पण ज्या देशातून तो येथे आला, त्या देशातून मात्र तो नाहीसा झाला आहे. तो देश कोणता व ते झाड कोणते?
७. 'आइसलॅण्ड' १९१२ त कोणत्या देशापासून मुक्त होऊन स्वतन्त्र झाला?
८. इंग्लंड ते ऑस्ट्रेलिया हा प्रवास विमानाने एकटीनेच करणारी महिला कोण?
९. जगातले सर्वात मोठे चर्च कोणते?
१०. एक बेट रोमच्या हाती आले अन् तेंव्हाच एका नव्या राज्याचे बीजारोपण झाले. त्या बेटाचे नाव काय व ही घटना केंव्हा घडली?
११. राजा कुमारगुप्त व त्याचा पुत्र स्कंदगुप्त यांच्या समकालीन सुप्रसिद्ध गणित-शास्त्रज्ञ कोण होता?
१२. इंग्लंड व आयर्लंड एक झाले, तेंव्हा तेथे एका राणीचे शासन चालू होते. तिचे नाव काय?
१३. काळ्या जातीचे नेता मार्टिन लूथर किंग यांचा जन्म कोणत्या शहरी झाला?
१४. जस्त कोणत्या देशात सर्वात अधिक सापडते?
१५. आपल्या ध्वजात अशोक चक्र आहे. परन्तु आफ्रिकेतील एका ध्वजावर कसलेही चिन्ह नाही. त्या देशाचे नाव काय? तो कोणता ध्वज?

## उत्तरे

१. तेरा रेषा. स्वातंत्र्यपूर्वी ज्या तेरा वसाहती होत्या त्यांच्या निर्देशक अशा या रेषा आहेत.
२. भाव, राग, ताल.
३. टोमॅटो.
४. एडमंड स्पेन्सर (१५५२-९९).
५. जपान.
६. गुलमोहोर, मादागास्कर.
७. डेन्मार्क.
८. एमी जॉन्सन.
९. व्हॅटिकन नगरातील सेंट पीटर्स बॅसिलिका.
१०. सिसिली (ई.स.पू. २४१).
११. आर्यभट्ट.
१२. राणी ॲन.
१३. अमेरिकेतील ॲटलांटा.
१४. मलेशिया.
१५. लिबिया, हिरवा ध्वज.



# धर्मरक्षण

नीरजा शहरातच जन्मली आणि वाढली. प्रथमच तिला आत्याच्या मुलीच्या लग्नानिमित्त खेड्यात जायची संधी मिळाली. तिचे बाबा नीलकंठ याच शहरात हिऱ्यांचे मोठे व्यापारी होते. सख्या बहिणीच्या घरचे कार्य असल्याने कसातरी वेळ काढून ते लग्नाला गेले होते.

वधूवरांच्या डोक्यांवर अक्षता टाकून, त्यांना आशिर्वाद देऊन, नीलकंठ शहराकडे निघाला. तेंव्हा नीरजा म्हणाली, "बाबा, इथे एक आठवडाभर तरी रहावंसं वाटतंय मला. गावच्या चहू बाजूंना असलेले बगीचे, जंगलं अन् डोंगरांनी मला खूप भुरळ घातलीय."

नीलकंठ तिला नकार देणार, इतक्यात त्याची दुसरी भाची कमलाने मधे पडून म्हटले, "मामा, नीरजाला इथं जे जे पहाचंय ते ते दाखवून मी स्वतः शहरात येऊन घरी सोडीन तिला. आता 'हो' म्हणा ना मामा!"

नीलकंठची बहीणही म्हणाली, "नीरजाची इच्छा ठोकरू नकोस नीलकंठ, राहू दे काही दिवस तिला इथेच."

नीलकंठला त्यांची विनंती मानावीच लागली.

नीरजाला गावातील आमराया खूपच आवडल्या. टेकडीवर असणारे देवीचे मंदिरही तिला फार आवडले. गुलाबाच्या फुलांच्या बागांनी तिला वेड लावले. या बागेजवळच एक डोंगर होता. या डोंगरावरून सूर्योदयाचे दृश्य पहाणे म्हणजे डोळ्यांना एक मेजवानीच असे. ते पहाण्यासाठी ती रोज सकाळी खूप लवकर उठून स्नान करून कमलाबरोबर त्या फूलबागेत जाई.

त्या दिवशी तब्येत ठीक नसल्यामुळे कमला नीरजाबरोबर गेली नाही. नीरजा एकटीच बागेत गेली. ती जेंव्हा परत निघाली,

सुमति अभ्यंकर



तेंव्हा एका झाडावर तिला चांगले तळहाताएवढे पांढऱ्या गुलाबाचे फूल दिसले. ते तोडावे म्हणून तिने हात पुढे केला, इतक्यात तिच्या पायात एक काटा घुसला.

दुःखाने कळवळून, फुलाचा नाद सोडून, तिने आपल्या पायाकडे वाकून पाहिले. पण तिला आपल्या पावलावर शेजारी-शेजारी असलेले रक्ताचे दोन थेंब दिसले; अन् त्याबरोबरच एक काळा नाग झपाट्याने शेजारच्या झाडीत घुसत असलेलाही दिसला.

पायाला बोचलेला काटा नसून आपल्याला तो सापच डसला हे ध्यानात येऊन ती एकदम बेशुद्ध होऊन जमिनीवर कोसळली!

नीरजा जेंव्हा शुद्धीवर आली, तेंव्हा आपण एका झोपडीवजा घरात बाजेवर पडले आहोत, बाजूलाच एक तरूण बसलेला असून तो अगदी लक्षपूर्वक आपल्या चेहऱ्याकडे पहात आहे असे तिला आढळून आले. नीरजा सावध होत असलेली पाहून त्याला खूपच आनन्द झाला अन् मोठ्या समाधानाने तो तिला म्हणाला, "हं ! आता काही धोका नाही राहिला. आता कसं वाटंतय तुला? अजून चक्कर तर नाही येत ना?"

नीरजाने फक्त मान हलवून, तसे काही होत नसल्याचे सुचवले. तो तरूण तिला म्हणाला, "अजून थोडा वेळ अशीच पडून रहा. तुला गुलाबाच्या बागेत जमिनीवर पडलेली पाहिली अन् तुझ्या घरी निरोप पाठवून मी तुला तशीच उचलून इथे घेऊन आलो अन् उपचार केला."

इतक्यात नीरजाची आत्या अन् तिचे यजमान तिथे येऊन पोचले.

आत्याने त्या तरूणाचे दोन्ही हात पकडत म्हटले, "राजेश, पोरा तू आमच्या नीरजाला पुनर्जन्म दिलास."

आत्या नीरजाला घरी घेऊन जाऊ इच्छित होती. पण 'औषधाचा कसा परिणाम होत आहे, हे पहाण्यासाठी आज नीरजाने इथेच रहावे' असा राजेशने आग्रह धरला.

दुसऱ्या दिवशी नीरजा खडखडीत बरी होऊन आत्याच्या घरी निघून गेली. नंतर आत्याने तिला राजेशबद्दलची सर्व माहिती सांगितली.

राजेशचे वडील त्या गावातच रहात असत. जी काही थोडीबहुत जमीन होती,



तीत ते शेतीवाडी करीत आणि त्या व शेजार गावच्या लोकांना झाडपाल्यांची व मुळ्यांची औषधे देऊन फुकट उपचार करीत असत. एक वर्षापूर्वी त्यांचा अकस्मात मृत्यु झाला. तेंव्हापासून त्यांची गादी चालवून राजेशनेही ती मुफ्तसेवा चालू ठेवली होती.

राजेशच्या रुबाबदारपणाने नीरजाला आकर्षित केले. त्याने आपल्याला प्राणदान दिल्यामुळे त्याच्या बाबतीत तिला कृतज्ञताही वाटत होती.

एक आठवडाभर ती त्या गावात राहिली. या सगळ्या दिवसात ती राजेशला भेटून त्याच्याशी गप्पागोष्टी करत असे. त्याच्याशी बोलताना तिला वाटे की आपण इथे याच गावात राजेशबरोबर रहावे. ज्या दिवशी ती आपल्या शहराकडे निघाली त्यादिवशी तिने आपले मन राजेशसमोर उघडे केले. ती त्याला म्हणाली, "तू मला नवीन जीवन दिलं आहेस. तुझ्याशी विवाह करणं हा माझा धर्म आहे, कारण माझं जीवन तुझंच आहे. माझ्याशी विवाह करायला तुझी काही हरकत आहे का?"

जरासा विचार करून राजेश म्हणाला, "मी तुझ्या कुटुंबाची सारी माहिती मिळवलीय. तुझ्या अन् माझ्या आर्थिक परिस्थितीत फार फरक आहे, एक खोल दरीच मधे आहे असं समज ना! मग हे कसं शक्य आहे?"

त्याच्या या उत्तराने नीरजाचा चेहरा कोमेजला, स्वतःला संभाळून घेत ती





म्हणाली, "इथे या फरकाचा प्रश्नच कुठे येतो? मी अगदी मनापासून तुझ्यावर प्रेम करतेय. तू फक्त इतकंच सांग की मी तुला हवी आहे की नको!"

"ती जबाबदारी माझ्यावर सोड तू." असे म्हणत नीरजा तेथून निघाली अन् शहरात आपल्या घरी परतली. घरी पोचल्याबरोबर तिने गावात काय घडले ते सारे सविस्तर आपल्या आईवडलांना सांगितले, अन् पुढे ती म्हणाली, "राजेश माझा प्राणदाता आहे. माझा भावी पती आहे तो." तिच्या बोलण्यातून तिचा निश्चय प्रतीत होत होता.

एकुलत्या एका मुलीची इच्छा डावलण्याइतके तिचे आईबाप अनुदार तर नव्हतेच. राजेशशी बोलण्याकरता दुसऱ्याच



दिवशी नीलकंठ त्याच्या गावी गेला.

त्याच दिवशी रात्र होण्यापूर्वी नीलकण्ठ परत आला आणि बायको व मुलीला म्हणाला, "हे लग्न होणार नाही."

पित्याचे हे बोलणे ऐकून नीरजा अवाक् झाली. 'असं का?' हे विचारायला सुध्दा तिचे तोंड उघडेना! पण पित्यानेच कारण सांगितले, "तो म्हणतोय की —लग्नानन्तर मी शहरात येऊन घरजावई बनून रहाणार नाही. आपल्या वडलांची वेद्यकीच इथे राहून चालू ठेवणं हा माझा धर्म आहे. पण आपल्या घरचाही तो जावई अन् मुलगाही बनतो ना? माझ्या व्यापार पुढे चालू ठेवणं हा ही त्याचा धर्म नाही बनत का? मी त्याला खूप समजावून पाहिलं, पण तो आपला हेका सोडायला मुळीच तयार नाही." नीरजालाही असे वाटले की या मामल्यात दोष राजेशचाच आहे. तिने स्वतःच राजेशला भेटून विचारायचा निश्चय केला. दुसऱ्याच दिवशी गावी पोचून सरळ राजेशकडेच गेली.

दुपारची वेळ होती. भोजन संपवून हात धुताधुताच दुरून येत असलेली नीरजा राजेशला दिसली. तो तिला म्हणाला, "इतक्या कडक उन्हातून कशी काय आलीस? बस जरा, तुझ्यासाठी जेवायला काहीतरी बनवतो."

आपला राग न दिसू देता नीरजा म्हणाली, "आपल्या आत्याकडे पोटभर खाऊनच आलेय मी. तुझ्याशी काही महत्वाचं बोलायचं आहे."

"ठीक आहे, बोल. काय एवढं महत्त्वाचं आहे?" राजेशने विचारले.

नीरजा काहीशा कटु आवाजात बोलू लागली, "हं! धर्माबाबत लंबंचौडं व्याख्यान देऊन माझ्या बाबांना परत पाठवलंस तू! मुलगा म्हणून आपल्या वडलांचा धंदा पुढे चालवणं तुझं कर्तव्य आहे,तर मीही आपल्या बाबांची एकटी एक मुलगी म्हणून त्यांचा धन्दा चालू राहील असं पहाणं, हे माझं कर्तव्य नाही काय? ते न्यायसंगत नव्हे? धर्मपालनात स्त्री असो वा पुरुष, दोन्ही सारखेच ना? त्यात फरक कसा होऊ शकतो?"

तिचा आवेश पाहून राजेशला हसू आले अन् जवळच थाळीत ठेवलेल्या आंब्याच्या फोडींकडे निर्देश करत तो म्हणाला, "अगोदर या आंब्याच्या फोडी खा अन् आपला राग शान्त कर बरं!"

"सांगितलं ना, की मी पोटभर जेवून आलेय? अगोदर मला आपल्या प्रश्नाचं उत्तर हवंय." नीरजा म्हणाली.

इतक्यात बोळाच्या दरवाजातून एक भिकारी ओरडत पुढे गेला, "अरे या भुकेनं तडफडणाऱ्या पोटाला गोळाभर अन्न देऊन वाचवा हो कोणी तरी!"

आंब्याच्या फोडी ताबडतोब भिकाऱ्याच्या झोळीत घालून परत येऊन राजेश म्हणाला, "तू तर पोटभर खाल्लं आहेस म्हणतेस. मग त्या बिचाऱ्या भिकाऱ्याला त्या फोडी देऊन टाकणं, हा माझा धर्म बनतो. इथे एक न्यायधर्म्य आहे. ते किती मर्यादेपर्यन्त बरोबर आहे, हे मला नाही ठाऊक. पण ऐक. शहरात तर कित्येक व्यापारी आहेत. तुझ्या वडलांचा व्यापार समज बन्द झाला, तर त्यात कुणाचंच नुकसान होणार नाही, लोक दुसऱ्या दुकानात माल खरीदू शकतील. पण मी या गावातल्या गरीब जनते वर फुकट उपचार केले नाहीत, तर ते लोक मात्र बिचारे मरून जातील, त्यांचं फार नुकसान होईल. या गावात दुसरा कोणी वैद्य येणार नाही, कारण इथल्या प्राप्तीला मर्यादा आहेत. तेंव्हा स्वतःच्या गरजेकरता, लाभाकरता करायच्या कामापेक्षा इतरांची सेवा करणं अधिक श्रेयकर नव्हे का? मी तर तोच मूळ धर्म समजतो. म्हणूनच यात स्त्री किंवा पुरुष यातला फरक संभवतच नाही."

राजेशच्या या बोलण्याने 'आज आपल्याला जीवनातलं एक नवीन सत्य उमगलं' असे नीरजाला वाटले. ती एकदम घरी जाण्यासाठी उठून उभी राहिली.

राजेशने आश्चर्याने विचारले, "हे काय? काही न बोलताच निघालीस?"

"हं, तुझा हा धर्मोपदेश ऐकल्यावर, माझ्या बाबांशी तू काय बोलला असशील याबद्दल तर्क करणं मूर्खपणाच आहे. घरी खूप कामं पडली आहेत. आम्ही वधूपक्षाचे ना!" असे म्हणत नीरजाने लाजून मान खाली घातली.





# बोलणारा पोपट

राजाराम हा गावातला एक मोठा शेतकरी. त्याला घमेंड होती की, संपत्ती व बुद्धि या दोहोत आपल्या बरोबरीचा कोणी माणूस आसपास कुठे अस्तित्वात असणे शक्य नाही.

शहरात गेला की दिसेल ती नवीन वस्तु खरेदी करून तो गावात आणी अन् गाववाल्यांशी तिचं गुणवर्णन करीत राही. या बोलण्यात त्याचा असाही भाव असे, की अशी वस्तु फक्त आपणच खरेदी करू शकतो, इतर कोणाची तितकी ऐपतच नाही! तो पैज लावून सांगे, की आपल्या घरात असलेल्या साऱ्या मौल्यवान वस्तु मोठमोठ्या जमीनदारांच्या घरीं किंवा दरबारातही असणे अशक्य!

एके दिवशी एकजण त्याला सांगू लागला, "तुम्हाला माहीत आहे? आपल्या गावातल्या गोविंदाकडे एक 'बोलणारा पोपट' आहे."

राजाराम आश्चर्यचकित होत म्हणाला, "बोलणारा पोपट अन् गाणारं-घुबड असल्या गोष्टी फार जुन्या झाल्या! असल्या भाकडकथांवर आता कोणी विश्वासच नाही ठेवणार; समजलास तू?"

"अरे पण! एकदा गोविन्दाकडे जाऊन तर बघा!" तिथे बसलेल्या दुसऱ्या एकाने सल्ला दिला.

राजाराम तावडतोब सरळ गोविन्दाच्या घराकडे गेला. तो जेंव्हा तिथे पोचला, तेंव्हा गोविन्दा परसात काही काम करत होता. त्यामुळे राजारामच्या हाका त्याला ऐकूच गेल्या नाहीत.

आता काय करावे अशा विचारात असतानाच राजारामच्या कानी शब्द पडले, "याहो, आत या ना! बसा, गोविन्दा घरातच आहे. आता येईल तो."

माणूस तर कोणीच दिसत नव्हते, पण बोलणे मात्र ऐकू येत होते; म्हणून राजाराम इकडेतिकडे पाहू लागला. तेंव्हा त्याला दिसले की भिंतीशी ठेवलेल्या पिंजऱ्यात एक पोपट आहे. राजारामला समोर पाहिल्यावर पोपट पुन्हा एकदा सारे काही तेच बोलला. आपले इतक्या आदरपूर्वक स्वागत करणारा कोणी माणूस नसून पोपटच हे लक्षात आल्यावर राजाराम भलताच आश्चर्यात पडला!

इतक्यात गोविन्दा आतून तेथे आला अन् राजारामला समोर पाहून त्याने विचारले, "गरीबाकडे कसं काय येणं झाल?"

आपल्या येण्याचा उद्देश सरळसरळ न सांगता राजाराम म्हणाला, "आपल्या शेताकडे जात होतो. पण तुझ्या घरातून एक निराळाच आवाज ऐकू आला. आत येऊन पहातो, तो पोपटाचा आवाज! कुठून आणलास हा पोपट?"

"नुकताच एक डोंगरी मुलगा याला आपल्या खांद्यावरून नेत असलेला दिसला मला. मग पाच रुपये देऊन मी हा त्याच्याजवळून विकत घेतला. पक्षांना शिकवणं अवगत आहे मला. मी त्याला नंतर गाणं अन् आदरानं बोलणं वगैरे शिकवलं."

"ओ हो! असं आहे होय? इतक्या आदरानं बोलणारे पोपट क्वचित आढळतात. हा पोपट मला देऊन टाक ना! मी एक हजार रुपये देईन तुला! तू तर नव्या एखाद्या पोपटालाही पुन्हा शिकवू शकशील! एका पोपटाची इतकी किंमत तरी कोण देईल तुला?" त्याला



लालूच दाखवत राजाराम बोलला.

गोविन्दाने खूप आढेवेढे घेतले, पण राजारामही काही कच्च्या गुरूचा चेला नव्हता! त्याने गोविन्दाची खूप मनधरणी केली, लालूच दाखवली, अन् शेवटी एक हजार रुपये देऊन तो खरेदी केलाच!

परन्तु एका आठवड्याच्या आत राजाराम काहीसा रागावूनच गोविन्दाकडे परत येऊन ओरडू लागला, "हा कसला पोपट गळ्यात बांधलास माझ्या? दोन तीन दिवसच तो फक्त सगळं छान बोलत होता, अन् नंतर त्याचं सगळं तन्त्रच बदललं! तो तर सर्व प्रकारचं अपमानकारक बोलू लागला. तोंडातून येणारा प्रत्येक शब्द घाणेरडा, असभ्य असतो त्याच्या! एखादी बाई पाहिली की "अे

वर्षा दामले

नखरेवाली' असं ओरडून तिची नक्कल करतो. माझ्या मित्रांना 'शनिग्रह' नाव दिलंय त्यानं! कोणी नातेवाईक आला, तर "तुझी तिरडी केंव्हा अुठणार?" असं विचारतो. आणखी किती सांगू त्याच्याबद्दल?" असे म्हणून राजाराम शिव्या मोजू लागला.

"जे घडलं, त्याबद्दल माझ्यावर रागावून काय अुपयोग? आता मी काय करावं असं म्हणणं आहे तुमचं?" गोविन्दाने थंडपणे विचारले.

"आपला पोपट परत घे अन् हजार रुपये काढ माझे!" राजाराम गरजला.

"मी जबरदस्तीनं थोडाच दिला पोपट तुम्हाला? म्हणच आहे की, 'ज्या घरात पोपट रहातो, त्या घरातल्या सारखंच बोलतो.' तुम्हाला नको असेल तर द्या त्याला हवेत सोडून!" गोविन्दा स्पष्ट बोलला.

राजाराम यावर काय बोलणार? फटकन पिंजऱ्याचे दार अुघडून त्याने पोपटाला बाहेर अुडवून लावले, पिंजराही तिथेच जमिनीवर आपटून तो पाय आपटत निघून गेला.

राजाराम निघून गेल्यावर थोड्याच वेळात गोविन्दाची बायको तणतणत बाहेर आली अन् म्हणू लागली, "तो निलाजरा मागच्या दारातून सरळ आपल्याच घरात घुसलाय अन् कसल्या घाणेरड्या शिव्या देतोय. कित्ती हाकलायचा प्रयत्न केला, तरी हलतच नाही मेला! शिव्या मात्र चालूच!"

गोविन्दा हसत तिला म्हणाला, "अग त्याला अुगाच शिव्या नको देअू. तो तर आपला भगवान! दर दोन तीन दिवसांनी त्याला फुटाणे खायला घालायला राजारामला सांगायचं विसरलोच मी! त्या डोंगरी मुलानं त्याची आवड सांगितली होती मला. घरात असतील ते फुटाणे जरा प्रेमानं बोलत घाल खायला त्याला!"

"ते ठीक हो, पण त्याचं तोंड कसं बन्द करू मी?" बायकोने पुन्हा विचारले.

"त्याला अगोदर गोड गोड फुटाणे घाल. मग बघ तोही कसा नीट बोलेल ते. पोपट काय घरात बोलली जाते तीच भाषा शिकतात!" असे म्हणून गोविन्दा घराबाहेर पडला.





# वीर हनुमान

कृष्णाचा जन्म द्वापर युगात यदुवंशात झाला. भू-लोकावरील कंसासारख्या अत्याचारी दुष्टांना त्याने मारून टाकले. सर्व प्रजा-जनांना संकटमुक्त केले. द्वारकानगरीत सर्व लोक सुखा-समाधानाने राहू लागले. कृष्णाचा मोठा भाऊ बलराम यादवांचा नेता बनून राज्य-कारभार उत्तम रीतीने संभाळू लागला.

सत्यभामेला आपल्या बरोबर घेऊन कृष्णाने नरकासुराचा वध केला. युद्धात सत्यभामेने ही कृष्णाला मदत केली. तेव्हा पासून सत्यभामेला असा गर्व झाला की कृष्णाच्या आठ पत्नींमध्ये तिचे स्थान सर्वोपरि आहे. ती इतरांहून श्रेष्ठ आहे.

एके दिवशी नारदाने देवलोकातून पारिजातकाची फुले आणली व ती रुक्मिणीला दिली. सत्यभामा रागाने जळफळू लागली. तिने विचार केला—मी तर कृष्णाची प्रिय पत्नी आहे ही सुंदर पारिजातकाची फुले मला मिळायला पाहिजे होती. ती माझ्या सवतीला देऊन नारदाने माझा अपमान केला आहे!

रुसलेल्या सत्यभामेला संतुष्ट करण्यासाठी श्रीकृष्ण तिला गरुडावर बसवून देवलोकी घेऊन गेले व पारिजात वृक्षच उपटून घेऊन येऊ लागले. इंद्राने आपले वज्रायुध गरुडावर फेकले, पण गरुडाने आपल्या पंखावर ते झेलून फेकून दिले.

आता गरुडाला ही आपल्या ताकदीबद्दल गर्व वाटू लागला. सत्यभामेने आपल्या



घराच्या परसात तो पारिजात वृक्ष लावला आणि आता तिच्या गर्वाला पारावार उरला नाही. कारण नारद आणि सवत रूक्मिणी यांना आपण खाली पहायला लावलं असं तिला वाटलं. याशिवाय तिला असा विश्वास वाटू लागला कीं कृष्णाचे आपल्या वरच सर्वात अधिक प्रेम आहे आणि आपण त्याच्यावर अधिकार गाजवू शकतो.

बलरामाने ही अनेक शक्तिशाली दुष्टांचा संहार केला. नरकासुराचा प्रिय मित्र भयंकर नरवानर (ह्याला शेपूट नसते) याला त्याने आपल्या हलायुधाने ठार केले. त्याला ही आपल्या शक्ति व पराक्रमाबाबत गर्व वाटू लागला. आपल्या यशामुळे त्याला सर्व जण दुबळे, पराक्रमहीन व तुच्छ दिसू लागले.

सत्यभामा, गरुड नि बलराम यांचा गर्व दिवसें दिवस वाढू लागला. ते अजेय आहेत, सर्वाधिकारी आहेत असं त्यांना वाटू लागलं. या तिघांची मनोभावना कृष्णाच्या चांगली लक्षात आली. सत्य सिद्ध करण्यासाठी आणि यांना चांगला धडा शिकविण्यासाठी कृष्ण योग्य संधीची वाट पाहू लागले. पण आपला हा विचार त्यांनी कधी कुणाला सांगितला नाही.

एकदा गरुड नागिणीच्या पिल्लाला गिळायला निघाला, तेव्हा त्याची आई कांचनहेला धावत-पळत आली नि आपल्या बाळाला घेऊन गेली. गरुड तिचा पाठलाग करू लागला. 'वाचवा, मला वाचवा' असे ओरडत नागीण धापा टाकीत असताना तिला नारद भेटले नि म्हणाले—"रामनामाचा जप करीत हनुमानाला शरण जा. हनुमानच तुम्हां दोघांचे रक्षण करील. हनुमान गंधमादन पर्वतावर तपश्चर्येत मग्न आहे. उशीर करू नकोस. तावडतोब जा."

कांचनहेला तत्क्षण गंधमादन पर्वतावर पोंचली. तिने आपल्या बालकाला हनुमानाच्या पायांवर ठेवले आणि रडत रडत म्हणाली—"माझं रक्षण करा, राम, राम!" आणि ती तिथेच बेशुद्ध झाली.

हनुमानाने डोळे उघडले नि अभय-दान दिले. तो म्हणाला—"इथे माझ्या आश्रमात निर्भयपणे रहा."

गरुड हनुमानावर झडप घालण्यासाठी येत आहे हे पाहून हनुमान म्हणाला—"हे



पक्षीश्रेष्ठ! तुला भूक लागली असेल तर मला खाऊन टाक."

हनुमानाची पर्वा न करता हुंकार भरीत गरुड म्हणाला—"मला खायला पाहिजे नाग. तू तर वानर आहेस. तुझा मला काही उपयोग नाही." आणि आश्रमात लपलेल्या नाग-शिशूला पकडण्यासाठी तो सरसावला. हनुमानाने आपल्या शेपटीने गरुडाचे पंख बांधले आणि त्याला वर उचलून गरगरा फिरवून धडामदिशी फेकून दिले. आता गरुड द्वारका नगरीत बलरामा पुढे घायाळ होऊन येऊन पडला. कांचनहेलाने नम्रपणे हनुमानाला नमस्कार केला आणि आपल्या बालका सह ती पाताळलोकातील नागलोकी वासुकीपाशी पोचली.

गरुडाच्या अपमानाची गोष्ट ऐकून बलराम म्हणाला—"गरुडा, तू काळजी करू नकोस. मी त्या माकडाची खबर घेतो. तू त्या वानराकडे जा आणि त्याला सांग की तुला तावडतोब बलरामाने बोलवले आहे."

गरूड भीत भीत संदेश-वाहकाप्रमाणे हनुमानाकडे गेला आणि बलरामाची आज्ञा त्याला ऐकवली. त्याला वाटलं आता परत जाऊन बलरामाला हनुमानाने केलेल्या आज्ञा-भंगाची बातमी द्यावी.

कृष्ण अशा संधीची वाटच पहात होते. बलरामाशी काही राजनैतिक सल्ला-मसलत करण्याचे निमित्त करून ते द्वारकेत आले. त्यांनी गरुडाकडून सर्व हकिकत जाणली आणि त्याला म्हणाले—"जा, हनुमानाला



सांग की रामाने तुला बोलावले आहे. गरुड पुन्हा गंधमादन-पर्वतावर पोचला.

हनुमान गरुडा सह द्वारकेत आला नि 'राम, राम, रा.......' पुकारू लागला. गर्वाने भरलेला बलराम हनुमानाजवळ जाऊन म्हणाला—"इथं राम नाही, मी बलराम आहे!"

हनुमानाला फारच राग आला. आपले दात दाखवीत थट्टेच्या स्वरात हनुमान म्हणाला—"तू बलराम होय? की अबलराम?"

बलरामाने आपले हत्यार नांगर उचलले आणि हनुमाना वर फेकायला निघाला. हनुमानाने नांगराला आपल्या शेपटीचा वेढा घातला नि तो दूर फेकून दिला. हनुमानाला



मारण्यासाठी बलराम त्याच्यावर तुटून पडणार, एवढ्यात हनुमानाने बलरामाला आपल्या दोन्ही हातात पकडून वर उचलले. बलराम तडफडू लागला आणि बेशुद्ध झाला. त्या मूर्च्छित अवस्थेत स्वप्नवत् सारा मागील वृत्तांत त्याच्या डोळ्यां समोर नाचू लागला.

श्रीरामाचा राज्याभिषेक संपल्यावर लगेचच लक्ष्मण हंसू लागला. माझ्याकडे पाहूनच लक्ष्मण हसत आहे असे सर्वांना वाटले. लाजून सर्वांनी आपल्या माना खाली घातल्या. रामाने शांतपणे लक्ष्मणावर आपकी तलवार उगारली. रागावलेल्या रामाला हनुमानाने आवरले आणि लक्ष्मणाला विचारले 'तू का हंसतो आहेस?' कारण जाणून हनुमानाने सर्वांना समजावले.

वनवासाच्या काळात लक्ष्मणाने निश्चय केला होता की चोवीस तास राम व सीता यांचे रक्षण करायचे. त्याने निद्रा-देवीला ही प्रार्थना केली की रामराज्याभिषेकानंतर तिने आपल्या जवळ यावे. चौदा वर्षे तो झोपला नाही, की त्याने अन्नग्रहण केले नाही. चौदा वर्षे ज्याला झोप नाही व ज्याने उपवास केला, त्याच्या हातून इंद्रजीतचा मत्यु ओढवणार हे निश्चित होतें. आणि लक्ष्मणाने ते काम केले ही! रामाचा राज्याभिषेक संपल्यावर लगेचच आपल्या वचनानुसार निद्रा देवी लक्ष्मणाकडे आली. तिच्याकडे पाहून लक्ष्मणाला हंसू आले.

हनुमानाची सर्व कथा ऐकून रामाने विचारले—"एके दिवशी मी लक्ष्मणाला एक केळे दिले होते. त्याचे काय झाले?"

लक्ष्मणाने तावडतोब आपली मांडी कापली आणि त्यातून केळे काढून दाखवले. ते केळे हात लक्ष्मण रामाला म्हणाला—"दादा, आपण प्रेमाने केळे दिले, ते प्रसाद समजून मी सुरक्षित ठेवले होते."

रामाने लक्ष्मणाला आलिंगन दिले आणि म्हणाला—"लक्ष्मणा, पुढील जन्मी मी तुझा धाकटा भाऊ होईन आणि तुझे हे ऋण चुकवीन!"

बलरामाचा स्वप्नभंग झाला. आता त्याला आठवू लागले की तो स्वतःच लक्ष्मण आहे. आणि या जन्मात तो बलराम म्हणून जन्माला आला आहे. तेव्हा तो हनुमानाला म्हणाला—"संजीवी, त्या वेळी संजीवनी आणून तू मला शुद्धी वर आणलेस. मला पुनर्जन्म दिलास तू! आज मला मूर्च्छित करून 'मी कोण आहे?' याची जाणीव तू मला करून दिलीस. आता आपल्या रामाला भेटणार नाहीस?" असे म्हणत बलराम हनुमानाला कृष्णाकडे घेऊन गेला. हनुमानाला पाहताच कृष्णाने आपली मूठ आवळून हात वर करीत म्हटले—"आमच्या वडील भावाची आज्ञा पाळणार नाहीस?" आणि हनुमानाला मुष्टि-युद्धासाठी आव्हान दिले.

कृष्ण व हनुमान यांचे युद्ध बराच वेळ चालू राहिले. हनुमानाने आपली संपूर्ण शक्ति पणाला लावून तो लढू लागला. हनुमानाने आपली सर्व शक्ति एकवटून कृष्णाच्या पाठीवर एक गुद्दा मारला आणि त्याला खाली पाडले. दमलेल्या कृष्णाने धापा टाकीत सिंहाप्रमाणे हनुमाना वर उडी मारली आणि त्याच्या छातीवर मुठीने जोरदार प्रहार केला. या झटापटीत कृष्णाचा पाय हनुमानाला लागला.

रामच कृष्णाचा अवतार घेऊन जन्मलेले आहेत हे या पद-स्पर्शामुळे हनुमानाच्या लक्षात आले. आपले पातिव्रत्य सिद्ध करण्यासाठी रामाने लंकेत सीतेला अग्नि-प्रवेशाची आज्ञा दिली होती. आपल्या पतीची कठोरता पाहून सीता दुःखावेगाने रडत होती. सीता-मातेचा हा विलाप हनुमान पाहू शकला नाही. तो रामावर अतिशय रागावला आणि मुठी आवळून त्याने रामाला युद्धासाठी ललकारले.

राम हंसून म्हणाला—"हनुमान, माझ्याशी युद्ध करण्याची तुझी इच्छा असेल





तर ती भविष्य काळात नक्कीच पुरी होईल!"

आता हनुमानाला ती घटना आठवली. कृष्णाला नमस्कार करीत हनुमान म्हणाला—"कृपा करून रामाच्या रूपात येऊन मला दर्शन द्या."

"हनुमान, थोडा थांब. लक्ष्मण तर इथेच आहे. सीता अजून यायची आहे." असे म्हणत कृष्णाने सत्यभामेला येण्याबाबत निरोप पाठवला.

अनेक जन्म आपणच कृष्णाची पत्नी आहोत याचा सत्यभामेला मोठा गर्व चढला होता. आपल्या जागी कोणी येऊच शकणार नाही असे तिला वाटायचे! कृष्णाचा निरोप मिळाल्यावर तिने उत्तम वस्त्राभूषणें परिधान केली. पारिजात फुलांचा गजरा आपल्या डोक्यात घातला आणि कृष्णाच्या बाजूला येऊन उभी राहिली. ती एकटीच या स्थानासाठी योग्य आहे हा तिचा विचार तिच्या हावभावावरून स्पष्ट दिसत होता.

सत्यभामेला पाहताच हनुमान म्हणाला—"तू चंद्रसेना ना? आठवतंय तुला-रामाने त्या अवतारात तुला वचन दिलं होतं की कृष्णावतारात त्याच्या आठ पत्नीं पैकी तू एक पत्नी होशील? त्यांनी आपल्या वचनाची पूर्ति केलीय असं दिसतंय! चंद्रसेने, तू धन्य आहेस."

हनुमानाच्या बोलण्यावरून सत्यभामेला रामावतारा मधील घटना आठवल्या. आता तिचा गर्व नाहीसा झाला. ती रुक्मिणीला म्हणाली—"ताई, तू सीता आहेस. आपल्या या हनुमानाला आशिर्वाद दे."

रुक्मिणीने सीतेचे रूप धारण केले. कृष्ण कोदंडरामाच्या रूपात प्रकट झाला आणि त्यांनी हनुमानाला आशिर्वाद दिला. बलराम लक्ष्मण बनून रामाच्या मागे उभा राहिला. हनुमान रामाच्या पायांकडे टक लावून पाहू लागला. भक्तिभावाने रामाला वंदन करून ब्रह्मानंदात बुडून गेला.

रामावताराच्या या रूपाचा उपसंहार करून कृष्णाने भक्तिरसात रमलेल्या हनुमानाला शाबासकी दिली आणि म्हणाला—"हनुमान, तू आता हिमालयातील कदली-वनात जाऊन रहा. तुझा भाऊ वायुकुमार भीम तेथे येईल. त्याला गदा-युद्ध व मल्ल--युद्धातील बारकावे शिकव.



सत्यभामा हनुमाना समोर येऊन म्हणाली—"तेव्हा रामाकडे मला तूच घेऊन गेला होतास. आजचं हे माझं महाभाग्य तुझ्यामुळेच आहे. मी मनःपूर्वक तुझे आभार मानते."

तिला पुन्हा नमस्कार करीत हनुमान म्हणाला—"देवी, तू सत्यभामा आहेस. याचा अर्थ असा की भगवान नेहमी सत्याच्या अधीन असतात. कृष्णाने तुझ्याशी विवाह करून तुझ्या सर्व इच्छा पूर्ण केल्या आणि स्वतःला सत्यपति बनवलं. तू धन्य स्त्री आहेस. मला सीतेसमान आहेस."

सत्यभामा हनुमानावर खूप खुश झाली आणि म्हणाली—"इतक्या दीर्घ काळानंतर हनुमानामुळे मी सत्य समजू शकले. आता माझ्यातील गर्व निघून गेला. याचे सर्व श्रेय या हनुमानालाच."

रुक्मिणी व कृष्ण यांना प्रणाम करून हनुमान निघणारच होता एवढ्यात बलरामाने हनुमानाला मोठ्या प्रेमाने आलिंगन दिले आणि म्हणाला—"संजीवराम, तुझ्यामुळेच मी स्वतःला जाणू शकलो. आता माझ्यातील अहंकार संपला. तुला अनेकानेक धन्यवाद!"

गरुड हनुमानाला हात जोडून म्हणाला—"वीर हनुमान, महाविष्णु मला म्हणाले होते की क्षीरसागरात माझ्या बरोबर तू ही राहशील. आता मला ते सर्व स्मरत आहे." गरुड हनुमाना सह कदली-वनापर्यंत गेला.

कदली-बनात केळीची उंच उंच झाडे होती. निरनिराळ्या फल-वृक्षांनी ते रमणीय बनून गेले होते. हिमशिखरांवरील बर्फ वितळून खाली येणारे पाण्याचे धबधबे चांदीसारखे चमकत होते.

हनुमानाने कदली-बनात प्रवेश केला. वृद्ध वानराप्रमाणे केळाच्या झाडात पाय पसरून बसला. त्याची शेपूट लांब वर पसरलेली होती. जवळच त्याची गदा ही होती.

डोळे मिटून हनुमान रामाचे ध्यान करू लागला आणि भक्तिपूर्वक राम-नामाचा जप त्याने सुरू केला.





# आजार

कुबेरपूरचा नागराज चांगलाच गब्बर होता. कित्येक पिढ्या पुरेल इतके धन होते त्याच्याजवळ. पण काय उपयोग? त्याची तब्येतच ठीक रहात नसे. मोठ्यात मोठे वैद्यही केले पण त्याच्या आजाराचे कारणच कोणाला कळेना!

नेमक्या त्याच वेळी कुबेरपुरात स्वामी योगानन्द नावाचा एक साधू आला. शहराबाहेरच्या आश्रमात त्याने आपला मुक्काम ठेवला. नागराजला असे कळले की या साधूला योगविद्येतल्या अनेक शक्ति अवगत आहेत अन् दीर्घ आजारांवर तो यशस्वी उपचार करू शकतो. आपल्या बायकोसह तो आश्रमात साधूला भेटायला गेला.

स्वामी योगानन्दने नागराजचे बोलणे लक्षपूर्वक ऐकून घेतल्यावर विचारले, "या शहरात तुमचे कोणी शत्रु आहेत का?"

नागराज म्हणाला—"तुम्हाला असं तर नाही म्हणायचं ना, की त्यांच्यातल्या कुणीतरी माझ्यावर 'करणी' केलीय?"

यावर थोडसे हसून साधू गप्प राहिला.

नागराजच्या बायकोला वाटले की साधुने विचारल्या प्रश्नाचे उत्तर न देता आपला नवरा उगीचच काहीतरी बोलतो आहे; म्हणून ती म्हणाली, "अलिकडे घाईघाईनं कामं करायची प्रवृत्ति यांच्यात फार वाढली आहे महाराज!"

"काय सांगू स्वामीजी! एकजात सगळेजण दुष्ट आहेत! काही काळापूर्वी माझा वाडाच कुबेरपुरात सर्वात मोठा वाडा होता. पण नुकताच वराहशेठ नावाच्या कपड्यांच्या व्यापाऱ्याने माझ्या वाड्यापेक्षाही मोठा वाडा बांधलाय, अन् मजेनं रहातोय त्यात!" नागराजने वराहशेठवर जळत सांगितले.

"बरं, तुमचे कोणी जवळचे नातेवाईक

मुरली राव



आहेत?" साधूने विचारले.

"हं:! त्यांच्याबद्दल न बोलाल तर बरं महाराज! इथे जवळच्याच गावात माझा एक भाऊ आहे. तो तर जसा वाटच पहात असतो की आम्ही नवराबायको केव्हा मरून जातो, अन् कधी आपण आमची सगळी इस्टेट हडप करतो!" नागराज म्हणाला.

साधू नागराजला काही प्रश्न न विचारता डोळे मिटून शांत बसला व नंतर म्हणाला, "तुम्ही दोघंही काही महिने तीर्थयात्रेला जा. तेवढ्यात तुमची तब्येत बरी झाली नाही, तर मला येऊन भेटा, मी औषध देईन."

"स्वामीजी मी तर आजारी माणूस. यात्रा तरी कशी करू?" नागराजने नाराजीने विचारले.

साधूने काही औषधाच्या पुड्या देत म्हटले, "रोज रात्री झोपण्यापूर्वी एका पुडीतली पावडर पाण्यात मिसळून घ्या. तसं केलंत की पुढे यात्रा करायची गरज उरणार नाही. अंगात शक्तीही आलेली असेल तोवर. हं, जा आता."

नागराज दाम्पत्य काशी, रामेश्वर इत्यादि पुण्यक्षेत्रांचे दर्शन करून सहा महिन्यांनी कुबेरपूरला परतले. त्या सहा महिन्यात नागराजची तब्येत एकदम छान राहिली. आपण आजारी आहोत, याची आठवणही झाली नाही त्याला. या अवधीत साधू योगानन्दही दक्षिण भारताची यात्रा करून परत आले.

यात्रेहून येऊन एक महिनाही लोटला नाही, तोच नागराज पुन्हा आजारी पडला. साधूने दिलेल्या पुड्याही संपून गेल्या. अन् नंतरच साधू परत आला. त्याच दिवशी नागराज बायकोसह त्याच्या दर्शनाला गेला.

"कशी झाली यात्रा? आता तब्येत कशी काय आहे तुमची?" साधूने खुशाली विचारली.

"काय सांगू स्वामीजी! यात्रा करत राहिलो, तोवर कसलाही आजार जाणवला नाही. दिवस अगदी मजेत गेले! कसलीही तक्रार नव्हती, पण गावात परत काय आलो, जे रोग पळून गेले असं मी समजत होतो, ते सारे पुन्हा भुतासारखे येऊन माझ्या मानगुटी बसलेत. तुम्ही दिलेल्या पुड्याही गेल्या संपून. आता वर्षभराच्या पुड्या दिल्यात तर बरं होईल स्वामीजी!" नागराज काकुळतीने म्हणाला.

"ते औषध तर तुम्ही आपल्या घरीही बनवू शकाल. औषधं बनवायची पद्धत मी तुमच्या पत्नीला सांगेन. आता तुम्ही जरा ध्यानमन्दिरात जाऊन बसा." साधू नागराजला म्हणाला.

तो गेल्याबरोबर साधू त्याच्या बायकोला म्हणाला, "तुमच्या यजमानांना कसलाही रोग नाहीये. गावात तेच सर्वात श्रीमन्त असल्याने त्यांचं त्यांनाच असं वाटत रहातं की बाकी सर्वजण आपले शत्रू आहेत! यामुळे त्यांचं मन व्याकुल रहातं नेहमी, अन् ते भयच त्यांच्या शरीरालाही पिडत रहातं. या शहरात नव्यानेच येऊन श्रीमन्त बनलेल्या वराहशेठचं त्यांना भय वाटतं. तो आपला प्रतिद्वंद्वी बनणार हीच भीती. त्याच्याबद्दल यांच्या मनात इतका हेवा वाढलाय की त्यामुळे त्यांच्या मनाची शान्तताच नाहीशी झालीय! एखाद्या स्वप्नासारखा तो वराहशेठ मागं लागलाय त्यांच्या! झोपेत, जागेपणी फक्त त्याचेच विचार! आप्तेष्टांबद्दलही त्यांच्या मनात घृणा आहे! कारण ते आपली संपत्ती हडपतील ही भीती! संदेह, हेवा, द्वेष, भय हेच रोगांचं मूळ कारण आहे. यातनं सुटका करून घेतल्याशिवाय त्यांची तब्येत बरी रहाणार नाही. अन् औषधांचाही काही प्रभाव पडणार नाही."

"स्वामीजी, हे सारं तर आपण त्यांना स्वत:लाच सांगू शकला असतात! त्यांना दूर पाठवून मला हे सांगायचं कारण?" नागराजच्या बायकोने शंका व्यक्त केली.





साधू हसत म्हणाला, "समोर समोर कोणी कुणाच्या दोषाबद्दल बोललं किंवा बोट अुचलून दाखवलं तर कोणाला ते सहज सहन होत नाहीं. मुख्यतः तुमच्या नवऱ्यासारखा शंकाखोर माणूस विश्वास नाही ठेवणार; म्हणूनच मी तुम्हाला हे समजावून सांगत आहे."

"माफ करा महाराज, आपण औषधाबद्दल काही सांगणार होता? सांगा बरं!" नागराजच्या बायकोने विनयाने विचारले.

"औषधाबद्दल? हाँ, आठवलं! मी तुमच्या यजमानांना ज्या पुड्या दिल्या होत्या, त्यात फक्त साखर आणि मिठाची पूड होती! माझ्यावर तुमचा विश्वास रहावा, म्हणूनच केवळ मी त्या दिल्या होत्या! यात्रेच्या काळात नागराज ईर्ष्या, द्वेष या भावनांपासून दूर राहिले. त्यामुळेच त्यांची तब्येत बरी राहिली. शहरात आल्याबरोबर पुन्हा त्या रोगांच्या तावडीत सापडले ते!" साधूने नागराजच्या बायकोचे शंकानिरसन केले.

तिने मोठ्या दीनतेने विचारले, "मग तुम्हीच सांगा न मी काय करावं?"

थोडा वेळ गंभीरपणे विचार करून साधू म्हणाला, "हे तर अगदी स्पष्टच आहे की नागराज वराहशेठबद्दल अुगीचच द्वेष करत असतात, आपल्या आप्तेष्टांचाही अुगीच द्वेष करून त्यांच्यावर निरर्थक आरोप करत रहातात. मोठ्या हुशारीने तुम्ही त्यांना हेवादाव्यातून मुक्त करायला हवं. तुम्ही त्या लोकांच्यातले सद्गुण नागराजना सांगायला हवे. अशा प्रकारे त्यांच्या बाबतीतल्या शंका दूर झाल्या, की त्यांचे सद्गुणही नागराजना दिसू लागतील. मग हळूहळू त्यांच्या बाबतीतला द्वेष नाहीसा होअून तुमच्या नवऱ्याची तब्येत एकदम ठणठणीत होईल."

घरी गेल्यावर वेळ पाहून नागराजची बायको त्याला म्हणाली, "अहो, गावात तर सर्वजण म्हणत असतात की वराहशेठ मोठे सज्जन अन् दयाशील आहेत! मला वाटतं, तुम्ही अुगीचच त्यांना शिव्या देत रहाता. तुम्हाला वाटतं की त्यांच्यात सद्गुण कसा नावालाही नाही. पण खरं सांगा बरं, त्यांनी तुमचं काय बिघडवलंय? त्यांनी तुमच्यावर असा काय अन्याय केलाय की तुम्ही त्यांना आपला शत्रु मानता?"

बायकोच्या प्रश्नाला योग्य अुत्तर नागराज लगेच देअू शकला नाही. थोड्या वेळाने तो म्हणाला, "त्यानं माझ्यावर अन्याय केलाय? तसं तर काही नाहीच! तो जेंव्हा या शहरात आला, तेंव्हा सर्वांत अगोदर मलाच येअून भेटला होता. स्वतःच आपली ओळख करून देत म्हणाला—"मी इथे कपड्यांच्या व्यापाराची सुरुवात करणार आहे आपण अशिर्वाद द्यावा! आताही कधी कुठे भेटला, तर मोठ्या नम्रपणे नमस्कार करून म्हणतो—आपल्या कृपेनं व्यापार चांगला चालला आहे माझा!"

"मग साधूमहाराजांना का सांगितलंत की, 'वराहशेठ माझा द्वेष करतो' म्हणून? नीट विचार करा बरं! तुम्हालाच कळून चुकेल की तो मुळीच तुमचा द्वेषबीष करत नाहीय. अुलट तुम्हीच मनातल्या मनात त्याच्याबद्दल द्वेष वाढवताय." बायकोने नागराजला समजावण्याचा प्रयत्न करत म्हटले.

जरा विचार करून नागराज म्हणाला, "हो! तुझं म्हणणं खरं वाटतंय."

नागराजच्या बायकोने एक पुडी अुघडून, 'साधूने दिली' असे सांगून त्यातली पूड पाण्यातून नागराजला प्यायला दिली. नंतर ती म्हणाली, "त्या वराहशेठ प्रमाणेच आपल्या नातेवाईकांबद्दलही तुम्ही अुगीच गैरसमज करून घेतलाय. त्यांच्यापैकी कुणाकुणात कायकाय सद्गुण आहेत, यांचा विचार करून अुद्या सांगा मला. आता झोपा, अनं झोपता झोपता हा विचार करा."

नागराजच्या बायकोने अशा प्रकारे साधूच्या सल्ल्याप्रमाणे आपल्या नवऱ्याला समजावले. त्याच्यात हा विश्वास अुत्पन्न केला की, आपला कोणीच शत्रु असा नाहीये. अुलट आपणच अुगीच द्वेष, हेवा करून आजारी पडत राहिलो. आता नागराजला आपलाच दोष समजून चुकला. द्वेषाची जागा हळूहळू प्रेम, विश्वास इत्यादि सद्भावनांनी घेतली. त्याला आजारी पाडणाऱ्या दुर्गुणांपासून नागराजाच्या बायकोने मोठ्या युक्तीने त्याची सुटका केली.



## चान्दोबाच्या बातम्या



### संगीतातील शक्ति

शेतात संगीत ऐकवल्यामुळे पीक जास्त आल्याची बातमी ऐकली. असेही सांगितले जाते की संगीत ऐकवल्यामुळें गुरे दूध अधिक देतात. ऑफिसमधे काम करणारांना संगीत ऐकवले तर त्यांची कार्यशक्ति वाढते. कानात 'वॉकमॅन' लावून वाचणारे व गणितं करणारे विद्यार्थीही आढळतात. आता नुकताच 'ऑपरेशन थिएटर्स' मधेह संगीताचा पगडा बसलेला आहे. जर्मनीत मोनस्टन विश्वद्यालयाच्या हॉस्पिटल मधे ऑपरेशन करताना डॉक्टर संगीत ऐकत असतात. ऑपरेशन करताना डॉक्टरांना येणारा अुद्वेग कमी करून एकाग्रता वाढवण्यासाठी संगीत अुपयुक्त ठरत आहे. असा अंदाज आहे की अॅनेस्थेशिया न देताच केवळ संगीताच्या गुंगीत यशस्वीपणं ऑपरेशन करता येईल, असा दिवस दूर नाही.

### उडत्या तबकड्या

अुडत्या तबकड्यांबाबत अलिकडे बरेच संशोधन चालू आहे. अमेरिकेतील रिचर्ड थॉम्सन हे काही दिवसांपासून अुडत्या तबकड्यांबाबत माहिती गोळा करत आहेत. या तबकड्या क्षणभर दिसतात अन् क्षणभरात अदृश्यही होतात. १९७६ मधे इराणची राजधानी तेहरानमधे एक अुडती तबकडी दिसली व एका अमेरिकन विमानचालकाने तिचा पाठलाग केला. वाटेतच विमानाची 'इलेक्ट्रॉनिक सिस्टिम' बन्द पडली. वैमानिकाने जेंव्हा आपली दिशा बदलली तेंव्हा ती पुन्हा चालू झाली! असे समजते की प्रकाशमान असलेल्या त्या तबकडीचे चाक जमिनीवर पडले. अशा प्रकारच्या चर्चा चालू असतानाच थॉम्सन असेही सांगतात की आपल्या पुराणात वर्णन केलेल्या विमानांचे या तबकड्यांशी बरेच साम्य आहे. ते असेही म्हणाले की श्रीकृष्णाने धारण केलेले सुदर्शन चक्रही या प्रकारातच मोडते.





# विचित्र बासरी

आनन्द हा एका गरीब बापाचा मुलगा होता. त्याच्यात बरा असा एकही गुण नव्हता. अुलट तो एक नंबरचा आळशी मात्र होता. त्याच्या बापाने बराच काळपर्यन्त खूप कष्ट करून त्याचे पालनपोषण केले. पण असे कुठवर चालणार? शेवटी शेवटी तर ते दोघे घासभर अन्नालाही महाग झाले! आता त्याच्या बापाला वाटले की आनन्दला कुठेतरी कामाला चिकटवावे! आनन्दला बरोबर घेअून तो नोकरीच्या शोधात फिरू लागला.

पण आनन्दला कामाला ठेवून घेण्यास कोणीच तयार होईना. शेवटी बाप त्याला गावपाटलाकडे घेऊन गेला. खरे पहाता, हा गावपाटील मोठ्या कठोर स्वभावाचा असल्याने त्याच्याकडे कामाला कोणीच टिकत नसे. पण कुठेच नाही, तर त्याच्याकडे तरी का होईना, म्हणून आनन्दला त्याच्या बापाने पाटलाकडे कामाला ठेवले. काहीही न मिळाले तरी त्याला काहीतरी खायला तरी मिळेल असा त्याचा विचार होता.म्हणून पगार, कपडालत्ता याविषयी काहीही न बोलता त्याने आनन्दला पाटलाकडे नोकरीला ठेवले आणि तो आपल्या जबाबदारीतून मुक्त झाला.

तीन वर्षे काम केल्यानन्तर आनन्दने पाटलाजवळ 'काम सोडून जाण्याची' इच्छा प्रकट केली.

पाटलाने त्याच्या हातावर चांदीचे तीन रुपये ठेवून म्हटले, "दर वर्षी एक रुपया, या हिशोबाने तुला हे पैसे दिले आहेत मी. नीट मोजून पहा. आता आपल्या वाटेनं चालू लाग!"

"तीन वर्षांपूर्वी जे कपडे मी घालून आलो, तेच अंगावर घालून जाऊ काय?" आनन्दने विचारले.

(चान्दोबात २५ वर्षांपूर्वी प्रकाशित गोष्ट)



"कपड्यांबद्दल काही ठरलेलंच नव्हतं. पैसे दिलेत, तेच जास्त समज. तुझ्या वर अन्याय करण्याची माझी मुळिच इच्छा नाहीं." पाटील बोलला.

ते तीन रुपये घेऊन आनन्द शहराकडे निघाला. शहरात जाण्यासाठी रस्ता डोंगरांमधील अरुन्द अशा वाटेतून जात होता. थोडे अन्तर चालून गेल्यावर आनन्दला अचानक एक भिकारी भेटला. तो फारच अुंच होता.त्याला पाहून घाबरलेला आनन्द एकदम मोठ्याने ओरडला.

भिकारी त्याला म्हणाला, "भिअू नकोस, मी काहीही करणार नाही तुला! मला तुझ्याजवळचा फक्त एक रुपया दे."

"माझ्याकडे तर फक्त तीनच रुपये आहेत. त्यातून मला कपडे विकत घ्यायचे आहेत." आनन्द म्हणाला.

"पण तुझ्याकडे तीन रुपये आहेत ना; मला एक दिलास तर तुझ्याकडे दोन तरी रहातील ना! माझ्या कपड्यांची दशा तर तुझ्याहूनही खराब आहे!" भिकारी बोलला.

काही अुपाय नसल्याने त्याला एक रुपया देअून आनन्द पुढे निघाला.

आणखी थोडे पुढे गेल्यावर एका वळणावर आणखी एक भिकारी समोरून आला. हा तर पहिल्या भिकाऱ्याहूनही अुंच होता! त्याने पण पहिल्या भिकाऱ्याप्रमाणे आनन्दकडून एक रुपया वसूल केला.

वाटेच्या शेवटालाच आनन्दला आणखी तिसरा, या दोघांहूनही अुंच असणारा भिकारी भेटला! आनन्दने अुरलेला रुपया देईपर्यंत भिकाऱ्याने त्याची वाट सोडली नाही. भिकाऱ्याची दैन्यावस्था पाहून आनन्दनेही दयाबुद्धीने त्याला तो देअून टाकला.

रुपया घेतल्यावर हा तिसरा भिकारी म्हणाला, "तू आपल्याजवळचे तीन्ही रुपये भिकाऱ्यांना देअून टाकलेस. आता एकेका रुपयाचा एकएक, याप्रमाणे तीन वर माग. बोल, तुला सर्वात अधिक काय आवडतं?"

जरासा विचार करून आनन्द म्हणाला, "कृष्ण जेंव्हा बासरी वाजवी, तेंव्हा गोपी तन्मय होअून नाचत असत असं ऐकलंय मी! मला एक अशी बासरी हवी, की ती ऐकून लोक तन्मयतेनं नाचू लागतील."

बरं, पण आता जरा अधिक चांगला वर माग." भिकारी म्हणाला.

"अंतर कितीही असलं तरी माझा बाण बरोबर लक्ष्यावर लागावा, हा दुसरा वर द्या." अन् तिसरा, "मी ज्याच्याकडे जे मागेन, ते त्याने तावडतोब मला द्यावे. आजपर्यंतच्या जीवनात मला हवं ते कधीच नाही मिळालं!" आनन्द बोलला.

"छान! तू मागितलेला तिसरा वर तर पहिल्या दोनांहून खूपच चांगला आहे. तुझ्या तीन्ही इच्छा पूर्ण होतील." असे म्हणत भिकारी निघून गेला.

नन्तर दमल्यामुळे आनन्द डोंगरातच एके ठिकाणी झोपून गेला. जागा होअून पहातो, तो त्याला जवळ एक बासरी व एक धनुष्यबाण आढळला! ते सारे घेअून मोठ्या आनन्दाने तो शहरात पोचला.

तेथे दुकानात जाअून त्याने जे कपडे मागितले, ते दुकानदाराने त्याला देअून टाकले. आणखी एकाकडून त्याने घोडा मागून घेतला. त्याने काही मागण्याचाच अवकाश, की अगदी कंजूषातला कंजूस ही त्याने मागितलेली वस्तु देअून टाकू लागला. आवश्यक त्या वस्तु मिळवून घोड्यावर बसून आनन्द घोड्यावरून आपल्या गावी परतला.

पाटील दिसल्यावर आपला घोडा थांबवून आनन्द म्हणाला, "नमस्कार मालक, नमस्कार!"

त्याला पाहून चकित झालेला पाटील म्हणाला, "अरे, इतक्याशा वेळात इतका 'बडा माणूस' बनून आलास की काय?"

"सारा भाग्याचा खेळ आहे मालक!"



आनन्द अुत्तरला.

"ओहो! हातात बासरी पण दिसतेय! कामधाम सोडून संगीतविद्वान बनायचा विचार आहे काय?" पाटलाने व्यंगाने विचारले.

"बनायचंच असेल तर बनेन की! त्याला काय वेळ लागतोय!" आनन्द बेफिरीने म्हणाला, "पण हा धनुष्यबाण तर त्याहूनही महत्वाचा! दूरच्या वस्तूचाही बरोब्बर वेध घेअू शकतो मी! दूर तो तालवृक्ष आहे ना, त्यावरचा पक्षीही मारू शकेन मी!"

"डोस्कं तुझं! मोठा आलाय बाण मारणारा!" पाटलाने त्याची टर अुडवली.

"पैज लावून पहा ना!" आनन्द म्हणाला.

"तू पक्षी मारलास तर आपली सारी शेतं मी तुझ्या नावे करून देईन. माझ्या जवळचे सारे पैसेही तुझेच होतील! कबूल करायला काय जातंय माझं! तुझ्या हातून थोडंच होणार आहे हे काम? चल, चल, चालू लाग आपल्या वाटेनं!" पाटलाने तुच्छता दाखवली.

आनन्दनेही लगेच धनुष्य ताणून बाण मारला. पक्षी खालच्या काटेरी झाडात पडला. वायद्याप्रमाणे पाटलालाच तिथे जाअून पक्षी अुचलून आणावा लागला. काटे बोचून रक्त निघू लागले. तशातच आनन्द बासरी वाजवू लागला अन् पक्षी हातात घेअून, रक्ताळलेल्या पायांनीच पाटील नाचू लागला! अंगाला टोचलेले काटे काढता न आल्याने अन् तसेच नाचावे लागल्याने त्याच्या साऱ्याच अंगातून रक्त ओघळू लागले. अंगावरचे कपडे त्यामुळे फाटून त्यांच्या चिंध्या लोंबू लागल्या. आता आनन्दने आपले बासरीवादन थांबवले अन् त्याच्याजवळ जाअून तो बोलला, "मी नोकरी सोडली ना, तेंव्हा माझ्या कपड्यांचीही अशीच स्थिती होती."

पाटील पैज हरला होता, त्यामुळे आपल्याजवळची सारी इस्टेट त्याला आनन्दला द्यावी लागली. मिळालेल्या पैशातून आनन्द शहरात मोठ्या आरामात राहू लागला.



# बहुरूपा वसुन्धरा

## पंख न हलवता उडणारा पक्षी

सर्वसाधारणपणे कोणताही पक्षी अुडताना आपले पंख हलवत रहातो. पण 'अलबाटोस' नावाचा बगळ्यासारखा पक्षी पंख न हलवताच अवकाशात तरंगत रहातो. ते सुद्धा एक-दोन तास नव्हे, तर तो मनात आणलं तर सहा-सहा दिवसही असा अुडत राहू शकतो! आपल्याला वाटेल की या दिवसात तो झोपत नसेल. परन्तु तसं काही नव्हे. अवकाशात असे तरंगत असताना तो मधे मधे झोपही घेतो!





## फुले झोपतात कशी?

फुले झोपलेली तुम्ही कधी पाहिलीत? पण इतके तर पाहिलेच असेल की काही प्रकारची फुले आपल्या पाकळ्या मिटून घेतात म्हणजेच ती झोपतात. पण आपण याला झोप नाही म्हणू शकत. काही फुले फार कोमल असतात, त्यामुळे वातावरणात होणाऱ्या परिवर्तनापासून त्यांचे रक्षण करणाची साधनेही निसर्गच निर्माण करतो. रात्री अुष्णता कमी झाल्यावर किंवा वातावरण थंड पडत जाअून जेंव्हा अंधार पसरतो तेंव्हा काही फुले पाहून आपल्याला वाटते, की ती निद्रावस्थेत आहेत. आणखी काही निराळ्या प्रकारची फुले दिवसा वाढत्या अुष्णतेपासून आपले रक्षण करण्याकरता पाकळ्या बन्द करून घेतात!

## जागा बदलणाऱ्या रेतीच्या टेकड्या

वाळवंटातल्या रेतीच्या टेकड्या आज दिसतात, तर अुद्या नाहीशा झालेल्या आढळतात! वाळवंटात वेगाने वहाणाऱ्या वाऱ्यामुळे असे घडते. असल्या वाऱ्यामुळे रेतीची टेकाडे क्षणाक्षणाला आकार बदलत रहातात. त्यामुळे वाळवंटातून प्रवास करताना आपण कोणीकडून आलो व कोठे जात आहोत हे कळणे मुश्किल होते. तेथे जागा ओळखणे, खुणा लक्षात ठेवणे यामुळे फारच कठीण होते.










## शेतकऱ्यांना राजनैतिक मान्यता




नव-वर्षाच्या स्वागतार्थ लोक एकमेकांचे शुभ-चिंतन करण्यात मग्न होते. अशाच एका दिवशी मेक्सिको मधील शेतकऱ्यांनी निरंकुश सत्तेविरुद्ध निःशस्त्र प्रतिकाराची चळवळ सुरू केली. या चळवळीत खूपच हिंसाचार झाला असे निरीक्षकांचे म्हणणे आहे.

आंदोलनाचे नेतृत्व करणारे गोरिला नेता कमांडट मार्कोस यांनी आपली भूमिका स्पष्ट करताना सांगितले- "आमच्या जवळ काहीच शिल्लक उरले नाही. रहायला घर नाही, कसायला जमीन नाही, करायला काही काम नाहीं, आम्ही काही शिक्षण घेतलेले नाही. आजारी पडलो तर औषध-पाण्याची काही सोय नाही. अशा परिस्थितीत सरकार विरुद्ध बंड करण्याशिवाय आमच्यापाशी दुसरा काही मार्गच उरला नाही. आम्ही तरी काम करणार?'' ई.स. १९१० मध्ये शेती संबंधी जी क्रांति झाली तिचे नेता होते एमिलियान जपाटा! कमांडट मार्कोस म्हणतात-जपाटा यांच्या प्रोत्साहनानेच आम्ही 'जपाटिस्टा नैशनल लिबरेशन आर्मी' ची स्थापना केली. दक्षिण मेक्सिकोमधील बहुसंख्य लोक गरीब शेतकरी आहेत. हा प्रांत अत्यंत मागासलेला आहे. इन्स्टिट्यूशनल रेव्होल्यूशनरी पार्टीच्या जुल्मी राजवटीत येथील जनता त्रासून गेली. येथील शासकांनी स्थानिक इस्टेटींच्या मालकांशी संगनमत केले. या मालक-मंडळींनी अधिकाऱ्यांच्या मदतीने कट रचला आणि शेतकऱ्यांच्या जमिनी गिळंकृत केल्या. शेतकऱ्यांनी पिकवलेल्या मालाची वाजवी किंमत ही त्यांना मिळेना. ज्या शेतकऱ्यांनी याला विरोध केला, त्यांना निर्दयपणे मारले गेले. सरकारी अधिकाऱ्यांच्या मदतीने या मालक-लोकांनी हजारों एकर जमिनीवर ताबा मिळवला. जे बंड करून उठले त्यांना तुरुंगात डांबण्यात आले. अधिकारी-वर्गाने राजरोस श्रीमंतांना मदद केली. अशी परिस्थिति निर्माण झाली की

शोषित शेतकऱ्यांपुढे बंडखोरीशिवाय अन्य काही मार्गच राहिला नाही.

१ जानेवारी रोजी अमेरिका, कॅनडा व मेक्सिको यांच्यात नाफ्टा (नॉर्थ अमेरिकन फ्री-ट्रेड ॲग्रीमेंट) नावाचा एक करार झाला. या कराराने आगीत तेल ओतण्याचे काम केले. शोषित जनता यामुळे अधिकच संतापली. या करारानुसार अमेरिकेतील निरुपयोगी वस्तु व हिणकस धान्य आपल्या देशात येईल व ते आपल्यावर लादले जाईल असे भय शेतकऱ्यांना वाटू लागले. म्हणून लोकांनी बंड उभारले व आपला विरोध प्रकट केला. सुमारे दोन हजार शेतकरी गोरिलांनी सर क्रिस्टबाल, डेलास कासस, ओकासिंगे, मार्गरिट्टास, अल्ट्रा मारिनो वगैरे डोंगरी प्रदेशातील शहरे तीन दिवस आपल्या ताब्यात ठेवली. तीनशे गोरिलांनी क्रिस्टबाल नगरपालिकेवर ताबा मिळविला आणि तेथील फाइली, संगणक, खुर्च्या, टेबले यांची खूब मोडतोड केली. आणखी काही ठिकाणी सरकारी कार्यालयांची होळी करण्यात आली. १२० गोरिलांची तुरुंगातून सुटका करण्यात आली.

मेक्सिकन सैन्याने जमिनीवरून व आकाश मार्गाने गोरिलांना वेढले आणि एक आठवडा भरात त्यांना जंगलात पिटाळून लावले. या धुमश्चक्रीत सुमारे तीनशे गोरिला मृत्युमुखी पडले. गोरिलांच्या दहशतीमुळे हजारो लोक आपले गाव सोडून गेले.

रोमन कॉथॉलिक बिशप सॅम्युएल रुइस हे या कांडाला जबाबदार आहेत असा सरकारने त्यांच्यावर आरोप केला. त्यांनी या आरोपाचे खंडन केले आणि सरकारला सावधगिरीची सूचना दिली की गरीब शेतकऱ्यांच्या बाबतीतील धोरणात बदल होणे आवश्यक आहे. गरीब शेतकऱ्यांबाबतची नीति बदलण्याचे त्यांनी जोरदार समर्थन केले. त्यांनी असे ही प्रतिपादन केले की जे सरकार गरीब शेतकऱ्यांना सुखाने राहू देत नाही ते सरकार कधी ही कायम टिकणार नाही. शेतकऱ्यांचे मूलभूत अधिकार हिरावून घेण्याचा प्रयत्न कोणत्याही सरकारने करू नये.

सत्तर वर्षे सत्तारूढ असलेल्या सरकारला आता समजून चुकले की शेतकऱ्यांच्या समस्यांबाबत उदासीन राहून चालणार नाही. गोरिलांना दडपून टाकण्याचे धोरण सरकारने बदलले. 'जपाटिस्टा आर्मी' ला एक राजनैतिक पक्ष म्हणून सरकारने मान्यता दिली. त्यांच्याशी चर्चा करायला सरकार तयार झाले. निरीक्षक म्हणतात की लवकरच होणाऱ्या निवडणुकीत गोरिलांचे उमेदवार ही भाग घेतील.

### मेक्सिको : काही ऐतिहासिक माहिती

- बहुसंख्य लोक स्पॅनिश भाषा बोलतात.
- सोळाव्या शतकापर्यंत मायाइंडियन राज्ये असत.
- १५२० ते १८२० पर्यंत स्पेनचे शासन असे.
- १८२१ मध्ये स्पेन पासून स्वातंत्र्य मिळाले.
- १८४६ ते ४८ - अमेरिकेशी युद्ध.
- १८४८ माया इंडियनांची बंडखोरी दडपून टाकली.
- १९१० - जपाटा यांच्या नेतृत्वाखाली शेतकऱ्यांचे आंदोलन.
- १९१७ - नवीन घटना बनवली गेली आणि आधुनिक युगाचा प्रारंभ.
- १९२० - 'इन्स्टिट्यूशनल रेव्होल्यूशनरी पार्टी' च्या हाती सर्व अधिकारसूत्रे.



# नावांची विक्री

विजयपुरीच्या बाजारातल्या एका कोपऱ्यात बसलेला म्हातारा जोरजोरात ओरडत होता, "नावं घ्या नावं!"

या म्हाताऱ्याचे नाव होते प्रताप. त्याची बायको अलिकडे आजारीच असे; अन् त्याला एक उपवर मुलगीही होती. एका युद्धात त्याचा एक पाय तुटून तो पांगळा बनला अन् आणखी दुर्भाग्य म्हणजे कुठल्याशा कारणाने राजाची त्याच्यावर खप्पा मर्जी झाली.

नाव विकायला बसलेल्या प्रतापला पाहून, लोकांना वाटले की 'म्हाताऱ्याला वेड लागलेय.' जोगी नावाचा एक लहानमोठ्या चोऱ्या करणारा माणूस त्याच वेळी संधी साधण्या साठी बाजारात फिरत होता. त्याने प्रतापला विचारले, "अरे बाबा, पैसे देऊन नावं खरीदणारा कोणी तरी असेल का या जगात?"

"तुमचे म्हणणे खरेच! पण मी जी नावं विकायला बसलोय, ती अशी तशी नावं नव्हेत, फार बहुमूल्य आहेत ती! त्यातले सत्य अन् महत्व जाणणारा एकादा माणूस लाखो रुपये द्यायला ही तयार होईल!" प्रताप म्हणाला.

जोगी म्हणाला, "तुझ्या नावात असं काय खास आहे, ते सांग तर खरं!"

"अंहं! फुकट नाही सांगणार! प्रत्येक नावा साठी पंचवीस हजार रुपये आगाऊ द्यायला हवेत. मगच सांगेन." म्हातारा म्हणाला.

त्याच्या या बोलण्यावर हसून जोगी म्हणाला, "अरे पण तुझी नावं खरंच मूल्यवान आहेत, असं कळेपर्यन्त तुला कोणी फुटकी कवडी ही नाही देणार. एक नाव सांग. मला लाभ झाला, तर अगदी इथेच येऊन तू मागशील ती किंमत देईन मी."

त्याच्याकडे नीट न्याहाळून पाहून प्रतापने मनात एक निर्णय घेतला. तो म्हणाला, "तुझ्यावर विश्वासून एक नाव सांगतो तुला. व प्रामाणिकपणे माझे पैसे आणून दिलेस, तर तुला

विद्याधर पंडित



दुसरंही एक नाव सांगेन मी.'' नन्तर तो सांगू लागला, ''काही वर्षांपूर्वी विजयपुरीच्या सरहद्दीवरील काही गावांत एका वाघाने खूपच धुमाकूळ घातला. राजाने शेवटी त्याने दवंडी पिटवली की, जो कोणी हा वाघ मारील त्याला एक लाख रुपये इनाम दिले जाईल. यानन्तर काही दिवसांनी एका गावच्या सीमेवर त्या वाघाचं प्रेत दिसून आलं. पण इतकंच कळलं की शिकाऱ्याचं नाव चक्रधर आहे, माणूस सापडला मात्र नाही. आता तू या नावायोग्य वेष करून राजाला भेट. ते बक्षिस नक्की मिळेल तुला.''

जराही वेळ न लावता जोगी वेष पालटून राजाकडे गेला अन् 'काही दिवसांपूर्वी वाघ मारणारा चक्रधर तो मीच.' असे राजाला सांगू लागला.

शंका येऊन राजाने त्याला विचारले, ''अरे मग बक्षिस घ्यायला इतके दिवस का लावलेस?''

''म्हाताऱ्या आईबापांना काशीयात्रेला न्यायचं होतं. त्यांची सेवा घडत नसेल, तर पैसे काय करायचेत? यात्रेला गेल्यामुळेच उशीर झाला मला!'' जोगी मोठ्या नम्रतेने बोलला.

राजाची शंका दूर झाली. त्याने जोगीचा सन्मान करून त्याला एक लाख रुपये दिले.

दुसऱ्या दिवशी प्रतापला भेटून तो म्हणाला, ''तु बरोबरच सांगितलंस हं! आता तू दुसरं नावही सांगितलं तर पंचवीस हजार रुपयेच काय, पण मिळणाऱ्या रकमेतला अर्धा हिस्साही देईन मी तुला.''

''केलेल्या वायद्या प्रमाणे तू जे पैसे देशील, त्यातनंच मी आपल्या रुग्ण बायकोची शश्रूषा, अन् मुलीचं लग्न करू शकेन. तू जर मला बनवलंस, तर मी मातीला मिळेन.'' म्हातारा काकुळतीने म्हणाला.

''कित्ती भोळा रे तू! मला इतकी मदत करतोयस, अन् मी फसवीन तुला? तुझी मुलगी ही माझीही मुलगीच नव्हे का? आजपासून मला परका नको समजूस तू!'' मोठ्या गोड शब्दात जोगीने म्हाताऱ्याला विश्वास दिला.

आता प्रताप सांगू लागला-''पाच पिढ्यांपूर्वी महापात्र नावाचा एक महामुनी हिमालयातून इकडे आला होता. तो विजयपुरीच्या राजाला भेटला. राजाला आशिर्वाद देत तो म्हणाला होता, ''तुझा वंश पाच पिढ्यांपर्यन्त राज्यशासन करत राहील. तुझ्या शासनकाळात तू व प्रजा सुरक्षित व सुखी जीवन व्यतीत कराल. नंतर जाता जाता मुनी असंही म्हणाला की, पाच पिढ्यांनन्तर मी स्वतः पुन्हा इथे येऊन भेटेन. आपले मूर्ख महाराज समजत आहेत की, त्या महापात्र मुनींमुळेच आपलं राज्य सुस्थिर आणि प्रजा सुखी आहे. त्यांना असंही कळतंय की महामुनी आपल्या याच पिढीत पुन्हा येऊन दर्शन देतील. मोठ्या आतुरतेनं ते मुनीची पाट पहात असतील. तू वेष पालटून राजाला भेटलास तर राजा तुला अगणित मूल्यवान वस्तु भेट देईल.''

जोगीने जराही उशीर न करता आपले केस पांढरे केले आणि शरीरभर भस्म फासले. गळ्यात रुद्राक्षमाळा धारण करून तो राजाकडे गेला. 'आपण महापात्र नावाचे मुनि असून हिमालयातून आलो आहोत'-असे त्याने सांगताच राजाने आनन्दाने आठवडाभर उत्सव साजरा केला आणि खूपशा मौल्यवान वस्तु देऊन जोगीला रवाना केले.

पुरस्कारार्थ मिळालेल्या वस्तूंच्या धनातून जोगीने शहरात एक वैभवशाली महाल उभा केला. प्रतापचे नाव विसरून जाऊन स्वतः खूप आरामात राहू लागला.

काही दिवसांनी 'प्रताप सध्या काय करतोय' हे पहाण्यासाठी जोगी त्याला भेटायला गेला.

प्रताप खरे तर त्याचीच मोठ्या आतुरतेने





वाट पहात होता. परन्तु तो समोर आल्यावरही 'आपण जणू त्याला ओळखतही नाही' असे नाटक त्याने केले. अन् नेहमी प्रमाणे 'नावं घ्या नावं!' असे ओरडत राहिला.

जोगी त्याच्या अगदी जवळ जाऊन रागाने म्हणाला, "खोटारडा कुठला! आपल्याजवळ फक्त दोनंच नावं आहेत, असं म्हणाला होतास नं!"

प्रताप हसतच उत्तरला, "तू तर मला कित्ती फसवलं आहेस! त्याच्यासमोर माझ्या खोट्याची काय किंमत?"

"मग आता पण मला एक नाव सांग. देवाशप्पथ, यावेळी मी फसवणार नाही तुला." जोगी त्याला काकुळतीने म्हणाला.

"मी इतका वेडा आहे की काय? पुन्हा तुला नाव सांगू?" प्रताप अजून रागातच म्हणाला.

"ठीक आहे, मग एक काम कर. तू मला नाव सांग अन् माझ्याबरोबरच राजाकडे चल. जे बक्षिस मिळेल ते तू स्वतःच आपल्या हाती घे." प्रतापचा विश्वास संपादण्यासाठी जोगी म्हणाला. पण मनात पुन्हा त्याला फसवायचाच त्याचा विचार होता.

हा प्रस्ताव प्रतापने मानला. तो म्हणाला, "यावेळी 'मी बलभद्र आहे' असं राजाला सांग. वेष बदलायची ही काही आवश्यकता नाही. कारण हे नाव राजाल फक्त ऐकूनच माहीत आहे. बलभद्र हा महापराक्रमी आणि शूर वीर आहे. त्यांच नाव ऐकूनच राजा थरथर कापू लागेल. त्यामुळे तू त्याला मैत्रीचा प्रस्ताव केलास की लगेच तो तुला भरभरून बक्षिसं देईल."

भरल्या दरबारात जाऊन जोगी राजाला भेटला आणि म्हणाला, "राजा, मीच तो महापराक्रमी बलभद्र!"

ते ऐकून क्षणभरच राजा अवाक झाला. त्याला डोळ्यासमोर अंधारी आल्यासारखे वाटले. पण लगेच स्वतःला सावरून त्याने मन्त्र्याला हळूच म्हटले, "युद्धाबद्दलच्या गुप्त बातम्या शत्रूला सांगितल्याबद्दल आपण बलभद्रला हद्दपार केलं होतं. मग पुन्हा इथे यायं धाडस कसं केलं यानं?"

जोगीला आपादमस्तक न्याहाळत मन्त्री म्हणाला, "महाराज, हा माणूस बलभद्र



नव्हेच. आपण त्याला पाहिलं नसलं तरी मी चांगलं पाह्यलाय त्याला. आपण हद्दपार केल्यानन्तरही पुन्हा हद्दीत शिरल्यानन्तर सीमेवरच्या शिपायांनी त्याचा वध केला होता. तेव्हा तो जिवन्त असायची शक्यताच नाही." नंतर जोगीकडे नाराजीने पहात मन्त्री म्हणाला, "चोरीच्या अपराधासाठी तुरुंगात पाठवलेला माणूस, तो तूच ना? शिक्षा भोगून नुकतीच तुझी सुटका झाली. तू जोगीच नां? खरं बोल!".

हा प्रश्न ऐकताच भयाने थरथर कापत जोगी म्हणाला, "क्षमा करा महाराज! हे सगळं त्या लंगड्याचं कारस्थान आहे महाराज."

"कोण आहे तो लंगडा? महाराजांना फसवायचा प्रयत्न केल्याबद्दल सुळावर चढावं लागेल, हे माहीत नाही त्याला?" मन्त्र्याने विचारले.

लाठीच्या आधाराने कोपऱ्यात उभा असलेला प्रताप आता पुढे आला अन् प्रणाम करून म्हणाला, "क्षमा असावी महाराज! मी आपल्या सैन्यात एक सैनिक होतो. युद्धात जखमी होऊन लंगडा झालो मी." अन् नंतर त्याने महाराजांना आपली व आपल्या कुटुंबाची दैन्यावस्था वर्णन करून सांगितली. तो म्हणाला, "माझ्यासमोर कुठलाच उपाय न राहिल्यामुळे मी या जोगीला आपणाकडे चक्रधर व महापात्र यांच्या वेषात पाठवलं. पण त्यानं मला फसवलं. आपणासमोर हजर होण्याचा हा एकच मार्ग मला आढळल्याने मी याला शेवटी 'बलभद्र' बनवून आपणाकडे पाठवला. माझ्या या उपायानेच तो आपल्या हाती सापडला अन् मलाही आपणाला प्रत्यक्ष भेटायची संधी मिळाली."

प्रतापचे बोलणे राजाने लक्षपूर्वक ऐकले. त्याच्या लक्षात येऊन चुकले की, युद्धात असे कितीतरी सैनिक जन्माचे पांगळे झालेले असतील! त्याने तावडतोब फरमान काढून अशा पांगळ्या सैनिकांना दरमहा काही विशिष्ट रक्कम देण्याची व्यवस्था केली.

एकदा तुरुंगवास भोगूनही जोगीने आपल्या सवयी सोडल्या नाहीत. जोगीला व स्वतःला फसवल्याच्या अपराधासाठी त्याला पुन्हा सहा वर्षांची सश्रम कारावासाची शिक्षा मिळाली.



# विश्वासपात्र

**सी**ताराम एक शेतकरी होता. जनावारांना चरायला घेऊन जाण्यासाठी त्याला एका गुराख्याची आवश्यकता होती. जो जेव्हा गुराख्याच्या शोधात होता, तेव्हा एक तरुण त्याच्याकडे आला नि म्हणाला- "मला नोकरी पाहिजे."

"तू जर विश्वासपात्र माणूस असशील आणि मेहनत करायची जर तुझी तयारी असेल तर मी तुला तोकरी देऊ शकतो. माझ्या गुरांच्या देखरेखीचं काम तू करायचं. अगोदर जो माणूस हे काम करायचा त्याने मला चांगलंच फसवलं. गाई आणि वासरांना चरायला गावाबाहेर घेऊन गेला, एक वासरू विकून टाकलं आणि मला खोटंच सांगितलं की वाघाने वासरू खाऊन टाकलं! आसपासच्या जंगलात वाघ असल्याचं मी कधी ऐकलं नाही. त्याच्या बोलण्यावर मी कसा विश्वास ठेवूं?" तो बोलत राहिला आणि संशयी नजरेने तरुणाकडे पहात राहिला.

तरुण म्हणाला- "साहेब, मी तसला माणूस नाही. माझं नाव आहे सत्यवान!"

सीताराम त्याच्यां या उत्तरावर हसला आणि म्हणाला- "ठीक आहे. सकाळीच मी जंगलात जनावरांना चरायला सोडून आलो आहे. तू जा नि त्यांना परत घेऊन ये. तुला नोकरीवर ठेवायचं की नाही याचा निर्णय मी मग घेईना."

सत्यवान जंगलात गेला आणि सूर्य मावळण्याच्या वेळेला गुरांना घेऊन परत आला. तो सीतारामला म्हणाला- "मालक, सगळी जनावरं घेऊन आलोय. पण त्या काळ्या गायीने मला फार सतावलं. ती मुळि यायलाच तयार नव्हती."

सीतारामच्या गायीत काळी गाय नव्हतीच. त्याला मोठं आश्चर्य वाटलं आणि तो बाहेर आला. सत्यवान ज्या काळ्या गायीबाबत बोलत होता, तो होता एक जंगली रेडा!

गाय नि रेडा यातील फरक नाही कळला तर कुठं बिघडलं? हा विश्वासपात्र तर आहे. सीतारामला वाटलं हा मेहनती पण दिसतो आहे. त्याने आनंदाने त्या तरुणाला नोकरीवर ठेवलं.





# अद्भुत् फूल

## १३

(राक्षसी प्राण्याला शोधायला आलेल्या अुत्तुंगबरोबर पाठवलेल्या दलनायक नागसिंहने त्याला समुद्रात ढकलून दिले. अुत्तुंगने सुरक्षितपणे परत येअून ही बातमी राजाच्या कानी घातली. स्वत: राजा सेनापती व काही सैनिक बरोबर घेअून समुद्रकिनारी आला. नावांच्या मागे मागे येणारा राक्षस प्राणी त्यांना दिसला. राजा व अत्तुंग यांच्या आज्ञेवरून सैनिकानी जळत्या मशाली बाणांप्रमाणे राक्षसावर फेकल्या. राक्षस आगीत जळून समुद्रात बुडाला. राजा नागपुरीला परत गेला. - त्यानन्तर - )

**अु**त्तुंग व तीन सैनिक खडकांवरून खाली अुतरले व काही सैनिकाना बरोबर घेअून ते समुद्री-द्वाराजवळ पोचले. हातात मशाली घेअून ते सर्वजण बराच वेळ तेथे अुभे राहिले, परन्तु समुद्रातून कोणीच बाहेर आले नाही. थोड्या वेळाने त्यांना असे दिसले की कोणीतरी मोठ्या कष्टाने बाहेर येण्याचा प्रयत्न करत आहे. अुत्तुंगने त्याला अगोदर खाली बसवले. तो सैनिक अतिशय थकला होता व कोणत्याही क्षणी त्याची शुद्ध जाईल असे वाटत होते. त्याच्या शरीरात अूब आणण्यासाठी अुत्तुंगने त्याच्या हातांचे तळवे व पाय खूप चोळले. थोड्या वेळाने त्या सैनिकाने डोळे अुघडून विचारले, "राक्षस प्राणी आला होता किनाऱ्यावर?" हे विचारताना तो खूप घाबरलेला दिसत होता.

अुत्तुंगने नुसत्या इशाऱ्यानेच 'नाही' असे सांगितल्यावार तो सैनिक सांगू लागला, "हो हो, बरोबरच आहे. तो येईलच कसा इकडे? तो



तर समुद्रातच जळून गेला. अन् आपला दलनायक पण गेला मरून! बरं झालं, लेकाचा मरून गेला. काय पाताळयंत्री माणूस! आपल्या राजा बनायची इच्छा होती. म्हणून त्याने त्या राक्षस प्राण्याशी संगनमत केले. असला दुष्ट माणूस आपण जन्मात कधी पाहिला नव्हता. तो दुष्ट आम्हाला धमक्या देत होता, की आम्ही राक्षस प्राण्याला किनाऱ्यावर पोचवलं नाही, तर आमचा मृत्यु निश्चित होता... पण स्वतःच मरून गेला. आम्हाला लालूच दाखवत होता की, तो राजा झाला की आम्हाला खूपसं धन देईल अन् उच्च स्थान पण देईल! हे बोलत असतानाच अचानक तो राक्षस पाण्यातून वर आला अन् आम्ही तर गर्भगळित झालो! दलनायकाने ती शताब्दी फुलं त्याच्या समोर फेकली, पण तो राक्षस आपल्या विशाल हातांनी आमच्या नावा पकडू लागला. पण नेमक्या त्याच वेळी किनाऱ्यावरून जळत्या मशाली त्याच्या अंगावर पडू लागल्या, अन् त्यानं समुद्रात बुडी मारली. थोड्या वेळानं आमच्या नावा खालून वर अुचलल्या जाअू लागल्या. त्याने सगळ्या नावा अुलट्या-पालट्या केल्या अन् तो फुलं गोळा करू लागला. पण मशालींची आग त्याला सहन होईना. तो अेकदम पेटला अन् पाण्यात बुडून गेला. बाकीच्या दिशाहीन शिपायांवर काय परिस्थिती ओढवली कुणास ठाअूक! सर्वच जण भयंकर घाबरून गेले होते. आता या राक्षस प्राण्यापुढे काय करावे हे कोणासच समजेना. त्याचे आक्राळ-विक्राळ स्वरूप पाहून सर्वांची घाबरगुंडी उडाली. त्याच्याशी युद्ध करणे कोणाला ही शक्य नव्हते. मी आपला कसाबसा किनाऱ्याकडे आलो.''

''दलनायक नागसिंहने मला नावेतून ढकलून दिलं. तू परत आल्यामुळेच नन्तर कायकाय घडलं, ते आम्हाला कळू शकलं.'' अुत्तुंग म्हणाला. ''चला, आता सेनापतींना भेटून त्यांना सारं काही सांगू या.'' तो सैनिक म्हणाला, ''मी पण येतो तुमच्याबरोबर.''

आता सूर्योदय होत होता. समुद्र किनाऱ्याला स्पर्श करत असलेले एक प्रेत त्यांना दिसले. जवळ जाअून पाहिले, तेव्हा असे दिसले की प्रेताचा चेहरा व शरीर जळून गेलेले आहे! दिसायला ते शरीर भयानक दिसत होते! ते नीट पाहिल्यावर अुत्तुंग म्हणाला की, ''ते बहुधा त्या राक्षसाचेच शरीर असावे! इथे दोन सैनिकांनी थांबावे. मी राजधानीत जाऊन ही बातमी सेनापति व राजाला सांगतो.''

अुत्तुंग जेव्हा सेनापतीकडे पोचला, तेंव्हा काबुईही त्याच्याजवळ बसलेला होता. त्याला पहाताच सेनापतीने विचारले, ''सैनिक सुरक्षितपणे किनाऱ्यावर आले का? दलनायकाचे काय झाले?''

''दलनायकाचा काहीच पत्ता नाही! तेथे काय घडलं ते आपण स्वतःच ऐका.'' अन् त्याने सैनिकाकडे इशारा केला.

सैनिकाकडून सारी हकिकत ऐकल्यावर सेनापती म्हणाला, ''दलनायक नागसिंहला नक्कीच जलसमाधी मिळाली असली पाहिजे. आणि त्या दुष्टाला अशीच शिक्षा मिळाली पाहिजे. त्याच्या कारवाया आम्ही जाणून होतो. फारच भयंकर माणूस! पण अशी दुष्ट कामे माणूस किती दिवस करीत राहणार? शेवटी त्याचेच भाग्य त्याच्या आड आले. पण त्याच्या मृत्यूच्या बातमीनं महाराजांना आनन्द मात्र नक्कीच होणार नाही. त्यांचा मेव्हणाच आहे नं तो!'' असे म्हणत तो राजाकडे गेला. बाकी सर्वजण ही त्याच्या बरोबरच गेले.

अुत्तुंग व सैनिकाने दिलेली वार्ता सेनापतीने राजाला सांगितली. राजा अुत्तुंगला म्हणाला, ''माणिक्यपुरी बरोबरच तू आमच्या राज्याचंही



रक्षण केलं आहेस. नाहीतर आमच्या राज्यावर ही त्या राक्षस प्राण्याची धाड आली असती. त्याच्याशी लढणं आमच्या सैन्याला कधीच शक्य झालं नसतं. आमचा सर्वनाश झाला असता! तुझं धाडस स्तुत्य आहे. युवकांना हा एक आदर्श आहे. तुला कबूल असेल तर आमच्या सेनेत मी तुला दलनायक बनवतो. बोल, आहे कबूल?''

इतक्यानत सेनापती म्हणाला, ''आपला विचार अत्यन्त चांगला आहे महाराज! आपल्या पहाडी जमातीचे लोग सैन्यात यायला राजी नसतात. अुत्तुंगने हे स्थान घेतलं, तर तेही सर्वजण अुपयोगी पडतील. उत्तुंग सारखा उमदा पराक्रमी योद्धा आपल्याला शोधून ही सापडणार नाही. केवळ भाग्याननेच हा आपल्या राज्यात ये



ऊन पोचलेला आहे.

काबुईही आनन्दाने म्हणाला, "अत्तुंग दलनायक झाला, तर तो आम्हा सर्वांचाही नाईक बनेल."

क्षणभर विचार करून अत्तुंग म्हणाला, "आपणा सर्वांच्या प्रेमाबद्दल आभारी आहे मी! पण मी माणिक्यपुरीहून इथे का आलो, हे ही तुम्हा सर्वांना माहीतच आहे. माझी माणसं माझ्या परतण्याची वाट पहात असतील. आपण मला परत जायला परवानगी द्या. मला माझ्या कामगिरीवर निघून बरेच दिवस झाले आहेत. माझ्याविषयी काहीच बातमी त्यांना तिकडे कळलेली नसावी. त्या सर्वांना मोठी चिंता लागून राहिली असेल. तेव्हा प्रथम त्यांच्याकडे जाऊन त्यांना सर्व वर्तमान कळविणे हे माझे प्रथम कर्तव्य आहे. आपलं सर्वांचं प्रेम, दया, सहयोग आणि मार्गदर्शन मी कधीच विसरणं शक्य नाही. तुमचे सहकार्य मिळाले नसते तर मला हे यश कधीच मिळाले नसते. मी तुमचा उतराई कसा होऊ हेच मला कळत नाही."

अत्तुंगचा हात प्रेमाने दाबत राजा म्हणाला, "शाब्बास! तुझं देशप्रेम प्रशंसनीय आहे! जशी तुझी इच्छा! आपल्या देशी परत जा. पण आजच नको. आणखी एकच दिवस इथे राहिलास, तर तुझा सत्कार करून पाठवणी करीन मी."

अत्तुंगने मान हलवून आपली संमती दर्शवली.

काबुई म्हणाला, "महाराज, आपण 'हो' म्हणत असाल, तर मी याला आमच्या वस्तीत नेऊन सर्वांना भेटवून आणीन."

"जरूर! पण तुम्ही दोघांनीही उद्या इथे यायला हवं." राजा म्हणाला. काबूई अत्तुंगला घेऊन आपल्या वस्तीकडे गेला.

ते वस्तीत पोचल्याबरोबर त्यांची वाट पहात बसलेल्या स्त्री-पुरुषांनी त्यांचे स्वागत केले अन् हातातल्या डफल्या वाजवत ते त्यांच्याभोवती नाचू लागले. अत्तुंगच्या यात्रेच्या यशाचे वर्णन काबूईने सर्वांना सांगितले अन् नंतर आपल्या घरी नेऊन काबूईने त्याला खास मेजवानी दिली.

रात्री अत्तुंगने तिथेच राहून विश्रान्ती घेतली. सकाळी उठला, तेव्हा त्याला चित्रा झाडांना पाणी घालत असलेली दिसली. त्याच्या लक्षात आले की ज्या रोपाला ती पाणी घालीत होती ते त्याने दिलेले रोपच आहे. तो हळूच तिच्याजवळ पोचला.

त्याला पाहून चित्राने विचारले, "तुझं माणिक्यपुरीला जाणं पुढे ढकलता नाही येणार का?"

"नाही. मला गेलंच पाहिजे. तिथे माझी माणसं आतुरतेनं वाट पहात असतील." अत्तुंग उत्तरला.

चित्रा पुन्हा म्हणाली, "पण मग पुन्हा इथे येऊन इथला दलनायक बनशील नं?"

तिच्या 'दलनायक' शब्दामागचा अर्थ त्याच्या लक्षात आला. पण त्याने नकारात्मक मान हलवली. चित्रा बिचारी अश्रू पुसत आत गेली. अत्तुंगने हात जोडून सर्वांना नमस्कार केला अन् काबुई बरोबर राजधानीकडे निघून गेला.

राजभवनाजवळ राजा व त्याचा परिवार त्याचीच वाट पहात होता. अत्तुंग व काबुईने राजाला प्रणाम केला. राजा दोघांना आदराने आत घेऊन गेला. बरेच लोक दरबारात हजर होते. राजाने अत्तुंगला आसन देऊन त्याचा सर्वांशी परिचय करून दिला. सर्वचजण त्याच्याकडे आदराने पाहू लागले. अत्तुंगने उभे राहून सर्वांना प्रणाम करताच सारा दरबार टाळ्यांच्या कडकडाटाने दुमदुमून उठला.

अत्तुंगजवळ जाऊन राजा त्याला म्हणाला, "अत्तुंग, तुझं साहस अन् देशप्रेम प्रशंसात्मक आहे. मी मनापासून तुझं शुभचिन्तन करतो." अन् असे म्हणतच राजाने गळ्यातून आपला कंठहार काढत त्याच्या गळ्यात घातला अन् प्रेमाने त्याला आलिंगन दिले.



राजा राणीला नमस्कार करून अत्तुंग जेंव्हा राजकुमारी मल्लिकाच्या समोर गेला, तेव्हा 'तू आमचं राज्य राक्षसापासून वाचवालंस' असे म्हणत तिने त्याला धन्यवाद दिले.

सेनापतीला ही नमस्कार करून अत्तुंगने जाण्याची परवानगी विचारली, तेव्हा सेनापती म्हणाला, "राक्षसी प्राण्याला आम्ही समुद्राजवळ पुरून टाकलंय. आमचे सैनिक दोन नावा घेऊन तुझ्याबरोबर माणिक्यपुरीपर्यन्त येतील. ते समुद्रकिनाऱ्यावर तुझी वाटच पहात



आहेत. काबुई किनाऱ्यापर्यन्त येऊन तुला निरोप देईल. आपल्या राजाला आमच्या शुभेच्छा पोचव."

पुन्हा सर्वांना प्रणाम करून अुत्तुंग काबुईबरोबर निघाला. सर्वजण आदराने अुभे राहिले. काबुईने प्रेमाने अुत्तुंगचा हात आपल्या हातात घेतला अन् दोघे समुद्रकिनाऱ्याकडे निघाले.

किनाऱ्यावर पोचताच त्यांना दिसले की, अुत्तुंगची नाव विविध फुलांनी सजवलेली आहे अन् त्यात विविध भेटवस्तु व फळांनी ती भरून ठेवलेली आहे.

काबुईची कन्या चित्रा आपल्या मैत्रिणींबरोबर किनाऱ्यावर आली होती. हातातली 'शताब्दी फुलं' दाखवत ती म्हणाली की, "लाटांबरोबर फुलं किनाऱ्यावर वाहून आली अन् आम्हाला ती पुन्हा त्याच पहिल्या जागेवर सापडली." सर्वजणी हसू लागल्या.

"फारच छान! यातली काही फुलं माझ्यातर्फे राजकुमारी मल्लिकाकडे पाठवा." असे हसत म्हणून अुत्तुंग आपल्या नावेकडे वळला.

काबुईने त्याला एकदा शेवटचे आलिंगन दिले. अुत्तुंग आपल्या नावेत बसल्याबरोबर ती चालू लागली अन् पाठोपाट सैनिकांच्या दोन नावाही निघाल्या. संध्याकाळपर्यन्त नावा माणिक्यपुरीच्या तटाला लागल्या. तटवर्ती शिपायांनी ताबडतोब ही वार्ता सेनापती गंभीरवर्माला पोचवली. त्याने राजाला कळवण्यासाठी आपला शिपाई पाठवून तो स्वतः ताबडतोब समुद्राकडे निघाला. तो किनाऱ्यावर पोचतापोचताच अुत्तुंग नावेतून अुतरला अन् पुढे होत सेनापतीला म्हणाला, "राक्षस प्राणी मरून गेलाय." सेनापतीचा कानावर विश्वास न बसल्याने त्याने पुन्हां विचारले, "काय मेला? तू मारलास त्याला?"

"नाही, पण सर्व वर्णन मी मागाहून सांगेन. मला अगोदर असं सांगा, कि सर्वजण खुशाल आहेत ना? राजा, राजकुमारी अन् माझी बहीण सर्वजण ठीक?" अुत्तुंगने अुत्सुकतेने विचारले.

"हो, सर्वजण खुशाल आहेत." सर्वजण माणिक्यपुरीकडे निघाले. वाटेत अुत्तुंगने राक्षस प्राण्याचा मृत्यु कसा झाला, त्याची हकिकत



सेनापतीला सांगितली. ते राजभवनासमोर पोचले तेव्हा राजा प्रतापवर्मा, राजकुमारी प्रियंवदा आणि बहीण रजनी हे सर्वजण त्याच्याच स्वागताला समोर उभे होते.

"वैरंगीमाता तुझं रक्षण करो." असे म्हणत राजाने अुत्तुंगचा हात आपल्या हातात घेतला अन् त्याला तो भवनात घेअून गेला.

"राक्षस प्राण्याच्या पीडेतून आपली मुक्तता कशी झाली, हे वर्णन मला तुझ्या तोंडून अैकायचंय." मागेमागे येणारी राजकुमारी म्हणाली.

राजा म्हणाला, "शंभूकडे निरोप पाठवलाय. तो आता केव्हाही येईल." राजाने अुत्तुंगला स्वतः आसनावर बसवत म्हटले.

दुसऱ्या दिवशी राजगुरु गौरीनाथ ही तेथे आले. अुत्तुंगकडून सारी हकिकत अैकल्यावर ते म्हणाले, "राक्षसाच्या मरणा बरोबर आता 'शताब्दि फुल' ही नक्कीच शापमुक्त झालीत. आता ती दरवर्षी फुलतील."

राजकुमारी हर्षाने मधेच म्हणाली, "मग आता ती आपल्या बागेत लावता येतील ना?"

गौरीनाथ हसत म्हणाले, "होय! नक्कीच."

"तुझी इच्छा असेल तसे होईल! त्या अद्‌भुत फुलांबरोबरच मी एक मौल्यवान बक्षिस तुझ्या स्वाधीन करतोय बाळ!" राजा म्हणाला.

प्रियंवदा आश्चर्याने पित्याकडे पाहू लागताच राजा म्हणाला, "तुझा विवाह अुत्तुंगशी करून द्यायची इच्छा आहे माझी. प्रजेसाठी त्यानं आपल्या प्राणांचीही बाजी लावली. त्याचं देशप्रेम निःस्वार्थ आहे, साहस असामान्य, चरित्र निष्कलंक अन् व्यक्तित्व महान् आहे. त्याच्याशी तुझा विवाह करून देअून मी आपलं कर्तव्य निभावणार आहे. तुला मान्य आहे नं?"

लाजेने आपले मस्तक राजकुमारीने झुकवले अन् पटकन रजनीचा हात पकडला. रजनीने मोठ्या प्रसन्नतेने तो आपल्या भावाच्या हाती दिला.

(समाप्त)





# स्वाभिमान

दृढनिश्चयी राजा विक्रमादित्याने झाडावरून प्रेत खाली उतरवले आणि ते आपल्या खांद्यावर टाकून नेहमी प्रमाणे तो स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हा प्रेतातील वेताळ बोलू लागला- "राजा, आपल्या ध्येय-सिद्धीसाठी कुठल्याही संकटाशी झुंजण्याचे धैर्य तुझ्यात आहे. पण लक्षात ठेव, जे ध्येय गाठण्यासाठी तू इतक्या चिकाटीने प्रयत्न करीत आहेस, त्या ध्येयाबाबत तू पूर्ण चिंतन केलेले असले पाहिजे. असं केलं नाही तर हाती आलेली सुवर्ण-संधि गमावून बसशील. वंशीकृष्णाचंच उदाहरण पहा न? त्याचीच त्याची गोष्ट आज मी तुला सांगतो." आणि वेताळाने गोष्ट सांगायला सुरुवात केली.

चंद्रशिला नगरीची राजकुमारी देवदत्ता आपल्या मैत्रिणींसह रथात बसून वन-विहारासाठी बाहेर पडली. थोड्याच वेळात तिने जंगलात प्रवेश केला. निरनिराळ्या

## वेताळ कथा



पक्षांचा कलरव व कूजन ऐकून ती फार आनंदित झाली. इतक्यात एका बाजूने बासरीचे गोडस्वर तिच्या कानांवर पडू लागले. ते ऐकून ती आश्चर्यचकित झाली. ती ताबडतोब रथातून खाली उतरली आणि ज्या दिशेने हे बासरीचे मधुर सूर येत होते, त्या दिशेला आपल्या मैत्रिणींसह गेली.

वडाच्या झाडाखाली एक युवक डोळे मिटून मोठ्या तन्मयतेने आपली बासरी वाजवीत बसला होता. काही अंतरावर गायी चरत होत्या. राजकुमारी आपल्या सख्यांसह युवकामागे जाऊन उभी राहिली. काही वेळाने त्या तरुणाने बासरी-वादन संपवले.

त्याच्या या अपूर्व कलेची प्रशंसा करीत राजकुमारीने जोर-जोरात टाळ्या वाजविल्या. त्या तरुणाला मोठं आश्चर्य वाटलं आणि मागे उभ्या असलेल्या स्त्रियांना पाहून तो घाबरून गेला.

नंतर राजकुमारी त्या युवकाला म्हणाली- "तुझं बासरी-वादन मला खूप आवडलं.कुठं शिकलास इतकी सुरेख मुरली वाजवायला? तुझे गुरू कोण? तुझं नाव काय ते तर सांगशील!"

युवकाने सांगितले- "माझे नाव वंशीकृष्ण. या जंगला जवळच्या गावात मी राहतो. गायींना चरण्यासाठी इथं घेऊन येतो. मला बासरी वाजवायला कुणी शिकवलं नाही. माझी मीच वाजवतो."

थोडा वेळ गप्प बसून नंतर राजकुमारी म्हणाली- "हे बघ, वंशीकृष्ण, मी या देशाची राजकुमारी आहे. आमच्या राजवाड्यावर चल. तुझ्या राहण्याची उत्तम व्यवस्था करीन. तुला चांगला पगार ही मिळेल. रोज मुरली वाजवून मला आनंद द्याचा एवढंच तुझं काम! नीट विचार करून आपला निर्णय घे नि मला सांग. हे एक बक्षिस मी तुला देऊ इच्छिते. स्वीकारलंस तर मला आनंद होईल." असे म्हणत राजकुमारीने एक हिऱ्यांचा हार त्याला दिला.

आता सूर्यास्ताची वेळ झाली होती. वंशीकृष्णाने आपल्या गायी गावाकडे वळवल्या.

वंशीकृष्णाला त्या रात्री झोप आली नाहीं. राजकुमारी बाबतचे विचार त्याच्या डोक्यात घुमत होते. शेवटी गाव सोडून राजवाड्यावर रहायला जाण्याचा त्याने निश्चय केला.

आपल्या म्हाताऱ्या वडिलांसह वंशीकृष्ण जेव्हा राजवाड्यावर आला तेव्हा राजकुमारीने आदरपूर्वक त्यांचे स्वागत केले. राजभवनातील एक खोली त्याला रहायला देण्यात आली. त्या दिवसापासून त्याची सर्व जीवन-पद्धति एकदम बदलून गेली. त्याला फक्त एवढंच काम होतं की राजकुमारीच्या इच्छेनुसार तिला बासरी ऐकवायची. एवढ्यासाठी त्याला एक हजार अशर्फ्या वेतन मिळू लागले. आता वंशीकृष्णाला कसली काळजीच राहिली नाही. त्याने आपले संगीताचे ज्ञान वाढवायला सुरुवात केली.

एक दिवशी एक अन्य प्रांतीय माणूस रविचन्द्र महाराजांना भेटायला आला. तो म्हणाला- "मुरली वाजविण्यात माझा हात धरणारा कोणी नाहीं." त्या वेळी देवदत्ता पण राजाजवळच हजर होती. तिने रविचन्द्राला बासरी वाजवायला सांगितले. जवळ जवळ अर्धा तास सुरेख बासरी वाजवून रविचन्द्राने श्रोत्यांना थक्क करून सोडले. सर्वांनी वाहवा करीत जोर-जोरात टाळ्या वाजविल्या. राजाने चांगले मूल्यवान बक्षिस देऊन त्याचा सन्मान केला.

रविचन्द्रच्या मुरली-वादनापुढे वंशीकृष्णाचे वादन देवदत्ताला फिके वाटले. रविचन्द्राच्या मुरलीतून निघणारे सूर ऐकून राजकुमारी म्हणाली- "तू उत्तम संगीतज्ञ आहेस. तू इथंच राहिलास तर आमच्या





दरबाराची शोभा वाढेल. तुझ्या इथे असण्याचा आम्हाला अभिमान वाटेल.'' नंतर तिने महाराजांना विचारले- ''पिताजी, तुमचं काय मत आहे?''

राजा लगेच रविचन्द्राला म्हणाला- ''आजपासून तुझी दरबारी संगीतपटु म्हणून नियुक्ति करण्यात येत आहे. तुला दरमहा चार हजार अशर्फ्या देण्यात येतील. राजधानीत एक संगीत-पाठशाळा ही तू तालवावीस. तुझे संगीताचे कार्यक्रम रसिकांना नित्य रिझवीत राहतील. आमचा हा प्रस्ताव तुला मान्य आहे ना?''

रविचन्द्र आपल्या नव्या नेमणुकीवर बेहद्द खुश झाला. यामुळे दिवसें दिवस वंशीकृष्णाचं महत्त्व कमी होत गेलं. आता वंशीकृष्णाच बासरी वादन ऐकण्यात देवदत्ताला स्वारस्य राहिलं नाही.

अशा वेळी सूर्यशिला नगरीची राजकुमारी पद्मरजनी आपल्या विवाहाची निमंत्रणपत्रिका घेऊन स्वत: देवदत्ताकडे आली. पद्मरजनी देवदत्तेची मावस बहीण होती. त्यांनी आपापसात एकमेकींचे कुशल-क्षेम विचारले आणि खूप गप्पा-गोष्टी केल्या.

पद्मरजनी आपल्या मैत्रिणीच्या हातातून पोपटाचा पिंजरा आपल्या हाती घेऊन म्हणाली- ''ताई, हा पोपट नुसता बोलतो असं नाही, तो गातो सुद्धा!'' याशिवाय पोपटाच्या अन्य विशेषता ही तिने देवदत्तेला सांगितल्या.

पोपट काही वेळ बोलत राहिला. आणि नंतर त्याने गाऊन दाखवले. देवदत्ता पोपटाच्या हुशारी वर खुश झाली आणि तिने त्याचे चुंबन घेतले. तेव्हा पोपट म्हणाला- ''वाहवा! तुमचा १पापा किती गोड आहे हो!'' त्याच्या या बोलण्यावर बहिणी हसत राहिल्या.

बहिणीचे मनोरंजन करण्यासाठी देवदत्ताने संध्याकाळी वंशीकृष्णाच्या बासरी-वादनाचा कार्यक्रम आयोजित केला. रविचन्द्र काही महत्त्वाच्या कामासाठी बाहेरगावी गेल्यामुळे वंशीला ही संधि मिळाली होती.

पद्मरजनीला वंशीकृष्णाचे बासरी-वादन फार आवडले. तिला माहीत होतं की दरबारात एक आणखी संगीतज्ञ ही आहे, आणि सर्व जण त्याची खूप प्रशंसा करतात. म्हणून ती देवदत्ताला म्हणाली- ''ताई, अशी सुंदर मुरली वाजवणारे कलाकार दुर्मिळच! तुझी काही हरकत नसेल तर वंशीकृष्णाला माझ्या बरोबर पाठवशील? तो माझे खूप मनोरंजन करील.''

देवदत्ता हसत म्हणाली- ''जरूर घेऊन जा तू रजनी त्याला. पण एक अट- तुझा पोपट तू मला देऊन टाक.''

''जरूर, मी पण त्याच्या गोष्टी नि गाणी ऐकून आता कंटाळले आहे.'' पद्मरजनीने अट मान्य केली.

वंशीकृष्ण दोघींचा संवाद शांतपणे ऐकत होता. मधेच दखल देत तो म्हणाला- ''क्षमा करा मला राजकुमारी, मी उद्या आपल्या गावी जाण्याचा निर्णय घेतला आहे.''

''तुला आपल्या वेतनाबाबत चिंता असेल, तर त्याबाबत मुळिच काळजी करू नकोस. इथे तुला जे वेतन मिळते, त्याच्या दुप्पट मी तुला देईन. मग तर येशील?'' वंशीकृष्णाचे मन वळविण्याच्या उद्देशाने पद्मरजनी म्हणाली.

पण वंशीकृष्ण दृढपणे म्हणाला- ''राजकुमारीजी, मला क्षमा करा. आपण किती ही अधिक वेतन दिलं, तरी मी आपल्या बरोबर येणार नाही. माझा हा पक्का निर्णय आहे.''

राजा विक्रमादित्याला एवढी गोष्ट ऐकवून वेताळ म्हणाला- ''राजा, राजकुमारी पद्मरजनीने वंशीकृष्णाला उत्तम संधि दिली होती. पण त्याने तिचा उपयोग केला नाही. हा वंशीचा अडाणीपणा नि मूर्खताच नाही का?



खरी गोष्ट अशी की त्याच्याहून अधिक शास्त्रशुद्ध बासरी-वादन करणाऱ्या रविचन्द्राला त्याला फार हेवा वाटत होता. ज्या राजकुमारी देवदत्ताने त्याला आपल्या दरबारात स्थान दिले, प्रगतीचा मार्ग सुकर करून दिला, तिच्याबद्दला या वंशीकृष्णाच्या मनात कृतज्ञता नाही असे दिसते. जर असे असेल तर तो मुकाट्याने पद्मरजनी बरोबर गेला असता. मला वाटते की हा वंशीकृष्ण हेवेखोर, मूर्ख आणि कृतघ्न आहे. दुसऱ्यांबद्दल त्याच्या मनात जे गैरसमज आहेत, त्यांनुसार तो आपला निर्णय घेतो. आणि मग हे निर्णय चुकीचे ठरतात. माहीत असून ही माझ्या या शंकांचे समाधान जर तू केले नाहीस तर तुझ्या डोक्याचे तुकडे-तुकडे होऊन पडतील.''

उत्तरादाखल राजा विक्रमादित्याने निवेदन केलें- ''वंशीकृष्णाने पद्मरजनीची इच्छा डावलली याचे कारण काही दुसरेच आहे. आपल्या गावी परत जाण्याचा जो निर्णय त्याने घेतला तो कुणाच्या हेव्यामुळे घेतला असे म्हणणे मूर्खपणाचे आहे. देवदत्ताने वंशीशी सल्ला-मसलत न करता त्याला पद्मरजनी बरोबर पाठविण्याचा निर्णय घेतला. या तिच्या निर्णयामुळे वंशीकृष्णाचे अंत:करण व्यथित झाले. त्याची भावना दुखावली गेली. गुलामांची खरेदी-विक्री करणारे लोक सौदा करताना त्यांच्या इच्छेचा विचार करीत नाहीत. देवदत्ताने पद्मरजनीला सांगितले की तिने आपला पोपट द्यावा, आणि वंशीकृष्णाला घेऊन जावे. ही तिची मनोवृत्ति पाहून वंशीला विषाद वाटला. आपला स्वाभिमान जिवंत ठेऊन त्याने राजकुमारीचा प्रस्ताव नामंजूर केला. म्हणून वंशीकृष्ण कृतघ्न व मूर्ख होता असा आरोप त्याच्यावर करता येणार नाही.''

अशा रीतीने शंका-समाधान झाल्यावर वेताळ शवासह अदृश्य झाला आणि झाडाच्या फांदीवर जाऊन बसला.

**-आर्. पट्टाभि यांच्या एका कथेच्या आधारे.**





# काशीचा पंडित

गौरीपुर मध्ये अवधानी नावाचा एक पंडित रहात असे. काशीतील काही पंडितांकडे राहून त्याने शास्त्रांचे अध्ययन केले आणि चार वर्षांनी घरी परत आला. काशीत विद्याध्ययन केल्यामुळे लोक त्याला काशी-पंडित म्हणू लागले. सर्व जण त्याचा आदर करीत. यामुळे अन्य पंडितांची थट्टा करून त्यांची तो अवहेलना करू लागला.

आपल्या बहिणीला भेटण्यासाठी तो एकदा हरिहरपुरला गेला. रात्रीचे जेवण झाल्यावर बहीण भावाला म्हणाली- ''दादा, आज रात्री आमच्या येथील देवळात कल्याण-महोत्सव साजरा होणार आहे. या प्रसंगी सीता-राम कल्याण नावाचा बाहुल्यांचा नाच होणार आहे. तुझ्या मेहुण्यांनी हा कार्यक्रम बसवला आहे. तु-झ्या सारख्या काशीच्या पंडितांनी हा कार्यक्रम पाहून त्याची प्रशंसा केली, तर ह्यांच्या अंगावर मुठ भर मांस चढेल!''

यावर अवधानी हसत गप्प राहिला. रात्री मंदिरात बाहुल्यांच्या नाचाचा कार्यक्रम सुरू झाला. कार्यक्रम सुरू करण्यापूर्वी कलाकारांनी अवधानीच्या उपस्थितीचा उल्लेख करून त्याचे अभिनंदन केले. निवेदन करण्यात आले- ''आदरणीय पंडितजी, आमचे ज्ञान स्वल्प आहे. आपणा सारख्या महा-पंडितांच्या आगमनामुळे आमचा उत्साह द्विगुणित झाला आहे, आम्हाला प्रोत्साहन मिळाले आहे. जनतेला आमचे कार्यक्रम खूप आवडतात. आमच्या कलेत जे दोष असतील, त्यांबद्दल क्षमा करावी.''

अवधानी आपल्या अहंकाराने भाषणात म्हणाला-''तुम्ही उदर-भरणासाठी आपली कला राबवीत आहात. माझ्या मेहुण्यांनी दया करून तुमच्यासाठी हा कार्यक्रम लिहून दिला आहे. लेखक माझे मेहुणे असल्यामुळे काही बदल व सुधारणा मी त्यांना सुचवीन''

कार्यक्रम सुरू झाला. दशरथाकडून पुत्र-

सुरेश जोशी

प्राप्तीसाठी यज्ञ-स्थळी एकवीस प्रकारच्या वृक्षांच्या लाकडांनी बनवलेले स्तंभ उभारण्यात आले होते-असं सूत्रधाराने सांगितलं.

बस, अवधानी एकदम उठून उभा राहिला नि म्हणाला- "काय म्हणता? एकवीस प्रकारच्या वृक्षांच्या लाकडांनी बनवलेले खांब यज्ञ-मंडपात उभे केले होते? ठीक आहे, तुम्ही एकवीस वृक्षांची नावं नका सांगू. निदान दहा झाडांची नावं तरी सांगाल?"

हे ऐकून सूत्रधाराला चांगलाच राग आला. तो आवेशाने अवधानीला म्हणाला- "महाराज, आमच्या निवेदनात काही अतिशयोक्ति झाली असणं शक्य आहे. आपणा सारख्या पंडितांनी ती आम्हाला सांगितली तर पुढच्या प्रयोगाच्या वेळी आम्ही ती सर्व नावं आपल्या श्रोत्यांना ऐकवूं." आता अवधानी बुचकळ्यात पडला. त्याच्या तोंडून शब्द बाहेर फुटेना. इतक्या झाडांची नावं त्याला तरी कुठे माहीत होती?

मेहुण्यांनी अवधानीची अवस्था ओळखली. ते सूत्रधाराला म्हणाले- "माझे मेहुणे सुप्रसिद्ध काशी-पंडित आहेत. त्यांना माहीत नाही असा विषय नाही. यज्ञ-मंडपातील स्तंभांची नावं त्यांनीच तर मला सांगितली होती. आणि मी ती तुम्हाला सांगितली आहेत. तुम्ही झाडांची नावं सांगून आपलं ज्ञान दाखवावं अशी त्यांची इच्छा होती. म्हणून त्यांनी तुम्हाला तसा प्रश्न विचारला!"

आता सूत्रधाराने टाळ्यांच्या कडकडाटात एक एक करीत एकवीस वृक्षांची नावं सांगितली.

या घटने नंतर अवधानीच्या गर्वाचा पारा उतरला. त्यानंतर अवधानी अन्य पंडितांशी नम्रपणे बोलू लागला, आणि सर्व लोकांशी आदरपूर्वक वागू लागला. त्याच्या स्वभावात आमूलाग्र बदल झाला.

सर्व लोक त्याला आपापल्या गावी व्याख्यान देण्यासाठी बोलवू लागले. त्याच्या नम्र स्वभावाची सर्वांवर छाप पडे. अवधानी सुप्रसिद्ध पंडित झाला.



## चान्दोबा पुरवणी-६६

आपल्या देशातील वृक्षसंपदा

# आंबा



एप्रिल महिन्यात आंब्याचा सीझन सुरु होतो. एप्रिल अन् ऑगस्ट या दरम्यानच आपल्याला आंबे मिळू शकतात. दिल्ली व मुंबई यांसारख्या महानगरात या काळात आंब्यांसाठी खास बाजार लागतो. आंब्यांचे जवळजवळ पाचशे प्रकार आहेत. सुवर्णरसा, मालगोवा, बेगमपल्ली नीलम आदि प्रकार आन्ध्र प्रदेशातच नव्हे तर दक्षिण भारतभर सर्वत्र प्रसिद्ध आहेत. लंगडा, चौसा, दशेरी वगैरे अुत्तर भारतात, तर गुलाब खास बिहारमधे मिळतो. हे आंबे मुंबई व बंगलोरमधेही भरपूर मिळतात. परंतु महाराष्ट्रातला हापुस मात्र खास प्रकार आहे. हा बराच महागही असतो. आन्ध्र प्रदेशातील 'सेन्नेक' नावाच्या आंब्याचे वजन १.६ किलो इतके असते व लांबीला तो २३ सें.मी. इतका असतो. त्याला जरी 'राजाधिराज' म्हणत असले, तरी गोडीला तो कमीच असतो.

लिम्ने नावाचा एक वृक्षशास्त्रवेत्ता अठराव्या शतकात आपल्या देशात आला अन् त्याने आपल्या देशातील आंब्यांचे नाव ठेवले 'मँगिफेरा अिण्डिका.'

आंब्याचे झाड जवळ जवळ १५ मीटर अुंचीपर्यन्त वाढते. त्याच्या फांद्या चांगल्या जाड व लांब असतात. एकूण झाड डेरेदार दिसते. दोन्ही बाजूकडून टोकदार असलेल्या पानांची रुंदी ६ से.मी. अन् लांबी १५ सें.मी. पर्यन्त असते. पिवळ्या रंगाची छोटी-छोटी फुले (मोहोर) गुच्छाने येतात. या फळाची बी मोठीशी असते. तिला आपण 'कोय' म्हणतो. कोयीच्या चारी बाजूंना गर भरलेला असतो. फळ दिसायला माणसाच्या हृदया सारखे दिसते. १४ व्या शतकातील सुप्रसिद्ध कवि अमीर खुसरो याने आंब्याला 'राजफळ' म्हणून त्याचे मोठे बहारदार वर्णन केलेले आहे. यापूर्वीच याचा अुल्लेख रामायण व महाभारतातही आलेला आहे.



# सुप्रसिद्ध धर्मग्रन्थ

(जगातील प्रत्येक धर्माचे मूलस्थान म्हणून कोणता ना कोणता तरी धर्मग्रंथ असतोच. काही काही धर्मांचे धर्मग्रन्थ एकापेक्षा अधिक ही आहेत. या सदरात आम्ही प्रत्येक धर्माच्या सुप्रसिद्ध धर्मग्रन्थांचा छोडक्यात परिचय देणार आहोत.)

## वेद

''ऋग्वेदाच्या रूपाने भारतीय चिंतनाने अत्युच्च शिखर गाठले आहे. ऋग्वेद हा केवळ आपल्या देशाचाच नव्हे, तर समस्त जगाचा आदिग्रन्थ होय. मानवी प्रतिभेची परिणती येथे आढळते.'' असे मान्यवर भारतीय विद्वान डॉ. राधाकुमुद मुखर्जी म्हणतात.

प्राचीन काळापासूनच जगातील विविध प्रदेशात विविध संस्कृती अुदयाला आल्या. परन्तु जवळजवळ चार हजार वर्षांपूर्वीच वेदकालीन संस्कृति अस्तित्वात आली होती. वेदांसारख्या ग्रन्थांची रचना तेव्हाच झाली. हे निश्चितपणे सांगता येईल की दुसऱ्या कोणत्या ही संस्कृतीने वेदांसारख्या महान् ग्रंथांची रचना केलेली नाही. 'वेद' या शब्दाचा अर्थ आहे 'ज्ञान.' सनातन ऋषि ध्यानमग्न असताना त्यांच्या मनात विकसित झालेल्या भावना ते श्लोकरूपात अुच्चारत असत. म्हणूनच त्यांना 'श्रुति' असे म्हणतात. वेद चार आहेत. ते म्हणजे-ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, व अथर्ववेद. या वेदांची भाषा



प्राचीन संस्कृत आहे.

काही शतकांपूर्वीपर्यन्त वेद लिपिबद्ध केले गेले नव्हते. गुरु जेव्हा शिकवत, तेव्हा शिष्य ते श्रद्धापूर्वक ऐकून मुखोद्गत करत असत. अशा प्रकारे गुरुशिष्यपरंपरेने खूप कठोर शिस्तीत वेद मौखिक रूपात सुरक्षित राहिले.

वारा, प्रकाश, पाअूस आदि नैसर्गिक शक्ति आहेत. या शक्तींच्या अधिदेवता आहेत वायुदेव, अग्निदेव व वरुण. वेदमन्त्र याच देवांबद्दल कृतज्ञता प्रकट करतात व त्यांची प्रार्थनाही करतात. प्राणीसृष्टीत मानवप्राणी हाच सर्वश्रेष्ठ आहे, हे श्लोक ही गोष्ट कशी सार्थ आहे, हेच दाखवतात. मानवजीवन हे दिव्य व सर्वश्रेष्ठ आहे. मानवाने आचरणात आणावा अशा अुत्तम धर्माचा बोध वेदात मिळतो.

जीवन म्हणजे काय? त्याचा मुख्य अर्थ काय? मनुष्य का जन्माला येतो? मृत्यु का येतो? मरणानन्तर आत्म्याचे काय होते? देव कोण? आदि गुंतागुंतीच्या व मौलिक तात्विक प्रश्नांची अुत्तरे वेदांच्या सूत्रात स्पष्टपणे सांगितलेली आहेत.

ऋषीं सारख्या महान बुद्धिमान व्यक्तीच या सर्वांचे स्पष्टीकरण देअू शकतात. जिज्ञासू व शुद्ध प्रवृत्तीच्या शिष्यांना ते ही रहस्ये अुकलून सांगतात.

अुत्तरोत्तर ज्या सनातन धर्माचे नाव 'हिन्दूधर्म' असे पडले, त्या धर्माचे आधार-ग्रन्थ म्हणजेच वेद.



# तुम्हाला माहीत आहे काय?

**प्रश्न**

१) हिन्दू पुराणांच्या अनुसार प्रथम मेलेला मानव कोण होता?
२) रशिया व जपान यांच्यात झालेले युद्ध समाप्त करण्यासाठी एका अमेरिकन अध्यक्षाने खूप प्रयत्न केले. या महान् कार्यासाठी त्याला नोबेल शांतिपुरस्कार ही मिळाला. त्या अध्यक्षाचे नाव काय?
३) फिलिपाईन्स हा किती बेटांचा समुदाय आहे?
४) सर्वात अधिक काळपर्यन्त इंग्लंडवर राज्य कोणी केले? किती वर्षे?
५) मुंबईची 'गेटवे ऑफ इंडिया' ही इमारत कोणत्या ब्रिटिश राजाच्या सन्मानार्थ बांधली गेली?
६) अमेरिकेतील अतिप्राचीन विश्वविद्यालय कोणते?
७) प्लॅस्टिकचा शोध कोणी लावला?
८) अंकारा ही तुर्कस्तानची सध्याची राजधानी आहे. यापूर्वीच्या राजधानीचे नाव काय होते?
९) दोन हजार वर्षांपूर्वी आशियातील एका देशाचे नाव 'आराम' असे होते. आता त्याचे नाव काय आहे?
१०) अमेरिकेतील सर्वात विशाल सरोवर कोणते?
११) प्राचीन बॅबिलोनिया व इजिप्तमध्ये बँकिंगची पद्धत अस्तित्वात होती. आधुनिक 'बँकिंग' पद्धत कोठे सुरू झाली?
१२) ख्रिश्चन मतप्रणाली स्वीकारणारा रोमचा प्रथम सम्राट कोण?
१३) अंतरिक्षयानातून अुतरून अंतराळात चालणारा पहिला मानव कोण?
१४) 'चंदीगड' ला आधुनिक रूप देणारा वास्तुविद् कोण?
१५) सध्याच्या 'इंडस' नदीचे संस्कृत नाव काय आहे?

## अुत्तरे

१) यम.
२) थिओडोर रुझवेल्ट.
३) सात हजार बेटे.
४) राणी व्हिक्टोरिया. ६३ वर्षे (१८३८ ते १९०१)
५) पाचवा किंग जॉर्ज.
६) हार्वर्ड विश्वविद्यालय. (१६३६)
७) अलेक्झांडर पार्क.
७) इस्तंबूल.
९) सीरिया.
१०) व्हिक्टोरिया सरोवर.
११) इटली.
१२) कॉन्स्टंटाइन सम्राट.
१३) अलेक्सी लियोनोव (१९६५ मध्ये).
१४) फ्रेंच वास्तुविद् ले कार्बूनिअर.
१५) सिंधु नदी.



# निरर्थक अुपाय

सदानन्दने निरनिराळ्या विद्या शिकून घेतल्या. परन्तु तो कशातच प्रवीण होअू शकला नाही. शेवटी वडलांकडून वारसाहक्काने मिळालेल्या जमीनीवर तो शेती करून कसातरी आपला अुदरनिर्वाह चालवू लागला.

सदानन्दचे गुरुजी एकदा त्याला भेटायला आले. तो शेती करत असल्याचे पाहून त्यांनी आपला संतोष प्रकट केला.

परन्तु आपले असमाधान व्यक्त करत सदानन्द म्हणाला, "गुरुजी, आपण शिकवलेल्या सर्व विद्या माझ्यासाठी मात्र निरर्थक ठरल्या! शेती करायची माझी मुळीच इच्छा नाहीय, पण काय करू? दुसरा अुपायच नाही मला!"

त्याच्या बोलण्यावर हसून गुरुजी म्हणाले, "तुझं म्हणणं अगदी निराधार आहे. तू मुळातच अगदी विसरभोळा आहेस. दुसरा काहीअुद्योग करू पहाशील तर नुकसानच पदरात पडेल तुझ्या. शेती हाच पेशा तुला योग्य आहे."

"नाही गुरुजी, माझी स्मरणशक्ती चांगली आहे. मला तर वाटतं, की माझ्यात जर काही दोष असेल तर ती माझी चूक नसून तुमच्या शिकवणुकीतलाच दोष आहे." सदानन्दने तक्रार केली.

"मी दिलेल्या विद्यांचा सारांश अेका पुस्तकात नोंदवून ते तुला दिलं होतं. आण पाहू ते पुस्तक." गुरुजी म्हणाले.

"मला त्या पुस्तकाचा काही अुपयोग नाही, असं वाटून मी ते माझ्या मित्राला दिलंय." सदानन्द- ने सांगितले.

"बापरे! ते पुस्तक असतं, तर मी तुला खूप मदत करू शकलो असतो. आता काही ते पुस्तक तुला परत मिळवणं शक्य होणार नाही. 'पुस्तकं, वनिता, वित्तं, परहस्तं गतं गतः ।' विसरलास का ही गोष्ट?" गुरुजींनी विचारले.

पण सदानन्द गर्वाने हसून अुत्तरला,

किशोर जाधव



"लक्षात आहे गुरुजी! कुणाला पुस्तक दिलं, तर ते परत मिळवायचे चार अुपाय आपणच शिकवले होते. छान लक्षात आहेत ते माझ्या! मी ते परत मिळवून दाखवीन."

"ठीक आहे. मी चार दिवसात परत येईन इथे. तेवढ्या अवधीत पुस्तक मिळवून नीट ठेव आपल्याजवळ." असे म्हणून गुरुजी निघून गेले.

सदानन्द त्याच दिवशी आपला मित्र श्रीधर याच्याकडे जाअून त्याला म्हणाला, "माझ्या साऱ्या विद्यांचे सार एका पुस्तकात लिहिलेलं आहे. ते पुस्तक मी तुला दिलं होतं मला ते जरा हवं आहे. थोडे दिवस ठेवून परत देईन मी ते तुला. तुझंच पुस्तक म्हणून अुसनं दे मला, ते परत करणं हे माझं कर्तव्य समजतो मी."

विचार करत श्रीधर म्हणाला, "मी आहे विसराळू. तुझ्याकडून मी असलं काही पुस्तक घेतल्याचं मला मुळीच आठवत नाहीय. आज दिवस भर मी ते शोधीन. सापडलं तर आणून देईन तुझ्या घरी."

"असं नको म्हणू बाबा! नीट आठवून पहा तू आणखी कोणाला दिलं असशील! त्या पुस्तकात असं एक रहस्य आहे, की त्याद्वारे एक खजिना मिळू शकेल. तू मला पुस्तक दिलंस, तर त्या धनातला हिस्सा तुला देईन मी." सदानन्दने लालूच दाखवली.

श्रीधरच्या बायकोने त्यांचे बोलणे ऐकले. तिनेही ते पुस्तक खूप शोधले अन् 'पुस्तक कुणाला दिलं असावं' हे आठवायला नवऱ्याला मदत ही ती करत राहिली. पण पुस्तक काही सापडले नाही; कुणाला दिले, तेही आठवले नाही.

आपला दुसरा अुपायही फुकट गेलेला पाहिल्यावर सदानन्दने दुसरा अुपाय अमलात आणायचे ठरवले. श्रीधरकडे काम करणारी मोलकरीण सीता हिला गाठून त्याने तिच्या कानात काहीसे सांगितले.

सीता श्रीधरच्या बायकोला म्हणाली, "मालकीणबाई, साहेबांनी पुस्तक गावाबाहेर रहाणाऱ्या कांतालाच दिलंय नक्की. तुम्हाला सांगायला भीत आहेत ते. काहीही करून ते कांताकडून आणून सदानन्दना दिलं, तर मिळकतीतला भाग तुम्हालाही मिळेल." हे सारं, जणू काही मालकिणीच्या कल्याणासाठीच आपण सांगत आहोत असा आव सीतेने आणला होता.

कांताला जादूटोणाही अवगत असून, लोकांना आपल्या नादी लावण्यासाठी ती मन्त्रतन्त्रांचा वापर करते, असा जनतेत समज होता. असल्या बाईला आपल्या नवऱ्याने पुस्तक देणं श्रीधरच्या बायकोला आवडले नाही. ती नवऱ्यावर रुसून बसली. 'मी असलं काही केलेलं नाही, मी तर कधी कान्ताला भेटलोही नाही,' असे श्रीधरने कितीही समजावले तरी तिची समजूत पटेना.

व्याकूळ झालेला श्रीधर निरुपाय होअून सदानन्दकडे जाअून म्हणाला, "तुझ्या पुस्तकानं आम्हा नवराबायकोत अुगीचच वितुष्ट आणलंय. तूच आता काही करून आमचा समेट करून दे."

आता रागावून सदानन्द म्हणाला, "माझं पुस्तक मला जास्त महत्वाचं आहे. तुझं कुटुंब मोडलं, त्याची वाताहत झाली, तरी मला काय त्याची पर्वा? सूर्यास्तापूर्वी माझं पुस्तक आज परत नाही केलंस तर आपल्या भीमसेनाला पाठवीन तुझ्याकडे."

भीमसेन नावाप्रमाणे खरोखरीच पहिलवान होता. त्याचे बलिष्ट शरीर अन् भरघोस मिशा पाहूनच सर्वांना धडकी भरे! सदानन्दचा तो चांगला मित्र होता. त्याचे नाव ऐकताच श्रीधर थरथर कापू लागला. कोणत्याही क्षणी भीमसेन



आपल्यावार हल्ला करायला येईल, या कल्पनेने तो चुपचाप शेजारच्या गावातल्या आपल्या मित्राकडे जाअून लपून बसला.

चार दिवस असेच निघून गेले अन् सदानन्दचे गुरुजी परत येअून त्याच्याकडे पुस्तकाबद्दल विचारू लागले.

"गुरुजी, शक्य तितके सगळे प्रयत्न करूनही पुस्तक नाहीच मिळालं मला." सदानन्द अुदास आवाजात म्हणाला.

"मी तर तुला प्रथमच सांगितलं होतं की, 'पुस्तकं, वनिता, वित्तं, परहस्तं गतं गतः' म्हणजेच आपलं पुस्तक, बायको अन् धन दुसऱ्याच्या हाती दिलं, की परत मिळणार नाही हे धरून चालावं. पण तू शिकवलेलं

विसरलास!'' गुरुजी तीव्र स्वरात म्हणाले.

''दरवेळी मी विसरलेल्या गोष्टींची आठवण देत असता तुम्ही गुरुजी! तुम्ही शिकवलेले चार अुपाय मी कसे ध्यानात ठेवले?'' असे म्हणून आपण केलेल्या प्रयत्नांबद्दल सदानन्दने सविस्तर सांगितले.

''प्रयत्नांचं फळ मिळालं नाही, तर विद्येचा प्रयोग ही निरर्थकच ना?'' दीर्घ श्वास घेत गुरुजी बोलले.

''मी निरर्थकच आहे, माझं जगात काही प्रयोजनच नाही, असं नका म्हणू गुरुजी! दोष असेल, तर तो आपण शिकवलेल्या विद्येचाच!'' आक्रोशभरल्या आवाजात सदानन्द अुद्गारला.

त्याच्या या ओरडण्यावर हसत गुरुजी म्हणाले, ''अरे सदानन्द! हे चार दिवस मी जवळच्या गावातच राहिलो होतो. माझ्या विद्येपासून ज्यानं खूपसं काही मिळवलं, असा माणूस त्या गावातच रहातो. फार सुखी आहे तो! त्यानं माझं खूपच चांगलं आगतस्वागत केलं. तू निरर्थक अन् विसराळू आहेस, याचंच जिवन्त अुदाहरण आहे तो. तो माझा शिष्य नव्हे. पण त्याची स्मरणशक्ती तीव्र आहे. काय वाचावं, कोणत्या पुस्तकातून काय बोध घ्यावा हे चांगलं कळतं त्याला!''

चकित होत सदानन्दने विचारले, ''ते कसं काय?''

''ज्या पुस्तकातून तू काहीच मिळवलं नाहीस, त्यातूनच त्यानं सर्व काही मिळवलंय! तो काही माझा शिष्य वगैरे नाहीय! तूच ते पुस्तक त्याला दिलंस. तुझा मित्रच आहे तो. त्याचं नाव आहे श्रीकर. पुस्तक दिलंस श्रीकरला अन् परत मिळवायच्या विद्येचा प्रयोग केलास श्रीधरवर! मग आता तूच सांग, अशा परिस्थितीत पुस्तक तुला परत मिळेलच कसं?'' आपला राग व्यक्त करत गुरुजींनी सदानन्दला विचारले.

सदानन्दने शरमेने मान खाली घातली. त्याने आपले गुरुजी व श्रीधर यांची क्षमा मागितली व समाधानाने शेती करतच आपले आयुष्य कंठायला सुरुवात केली.





# बैल गेला अन्...

विजय दुपारच्या वेळी आपल्या विशाल अंगणातल्या ओट्यावर आरामात बसला होता. असे म्हणतात की जेव्हा फारच रिकामपण असते, तेव्हा माणसाच्या मनात सैतान संचार करू लागतो. तो निरनिराळ्या प्रकारची स्वप्नं पाही. स्वप्नांत तो कधी शिकारी होई तर कधी राजा! कधी कधी त्याला आपल्या पूर्व-जन्मीचे मित्र भेटत.

इतक्यात एक अनोळखी माणूस त्याच्या समोर येअून अुभा राहिला. तो खूपच दुरून आला असावा असे दिसत होते. विजयजवळ येअून त्याने मोठ्या विनयाने विचारले, ''हेच विजयचे घर आहे काय?''

त्याला काही अुत्तर देण्यापूर्वी, आपल्या डोक्यात घोळणाऱ्या कल्पनांपैकी एका कल्पनेचा प्रयोग करायचे विजयच्या मनात आले, अन् तो अुत्तरला, ''नाही.'' त्या पाहुण्याने मोठ्या निष्पापपणे पुन्हा विचारले, ''नाही?''

''नाही, विजय नावाच्या माणसाचं घर गावाच्या अुत्तरेकडे जे शिवालय आहे त्याच्या जवळपास असावं.'' विजयने सुचवले.

''ठीक आहे.'' असे म्हणून तो माणूस लगबगीने अुत्तरेकडे निघून गेला. एका तासाने तो पुन्हा धापा टाकत विजयकडे आला अन् म्हणाला, ''तुम्ही सांगितल्या प्रमाणे शिवालयाकडे जाअून आलो. पण तिकडे विजय नावाचा कोणीही माणूस नाही. त्या लोकांनी अुलट सांगितलं की, विजयचं घर हेच.''

''त्यांच्यावर काय विश्वास ठेवायचा? पण एवढं मात्र खरं की हे विजयचं घर नव्हे. तुम्ही असं करा. असे सरळ जा. एक तलाव दिसेल. तिथे जाअून विचारा.'' स्वतःशी हसत विजयने सुचवले.

पाहुणा सरळ तलावापर्यन्त गेला. पण पुन्हा थोड्या वेळात परत येअून म्हणाला,

वत्सला पवार



''तलावाच्या आसपास तर विजय नावाचा कोणीच माणूस नाही. ज्याला विचारावं, तो म्हणतो की विजयचं घर हेच.''

विजय हसत म्हणाला, ''तुम्ही लोकांना खरोखर काय विचारताय अन् ते काय सांगताहेत तेच कळत नाहीय! पण एवढं मात्र नक्कीच, की हे विजयचं घर नाही. हं, मला असं आठवतं आहे, की तलावाजवळचा विजय घर बदलणार होता. आता तुम्ही पश्चिमेकडे जा. तिथे गावची धर्मशाळा आहे. तिथे नक्कीच कोणीतरी पत्ता सांगेल.''

धर्मशाळेकडे गेलेला तो अनोळखी इसम बिचारा पुन्हा धापा टाकत परत येऊन म्हणाला, ''त्याही बाजूला विजयचं घर नाही. सर्वचजण असं म्हणतात की, विजयचं घर हेच.''

''फारच विचित्र आहे सगळं. पण हे विजयचं घर नक्कीच नाही. धर्मशाळेजवळच्या विजयला घर बदलायचं आहे, असं कोणीतरी म्हणत होतं खरं! म्हणजे तो तिथूनही हलला असावा. आता दक्षिणेकडे जा, तिथं आसपास विचारा.

विजयचे घर शोधत दक्षिणेकडे जाऊनही तो माणूस पुन्हा परत आला. आता मात्र बिचाऱ्याचे पाय अगदी अडखळत होते! तो विजयला म्हणाला, ''भुतांचाच संचार असावा. तिथं शेतात काम करणारांना विचारलं, तर तेही म्हणाले की विजयचं घर हेच. पण तुम्ही तर पुनःपुन्हा 'नाही'च म्हणताय. हिंडून हिंडून आता अगदी मोडून गेलोय मी! आता नाही फिरवत. ज्या कामासाठी आलो होतो,ते तर आता जमणार नाहीच! काय करू, विजयचं घर शोधणं शक्य नाही आता मला. परत आपल्या गावाकडे जाण्यावाचून गत्यंतर नाही.'' असे म्हणत तो तेथून निघाला.

विजयलाही 'आता हा खेळ थांबवावा' असे वाटले. ''गावच्या चारी दिशा फिरून आलात तुम्ही. सगळ्यांनी असंच सांगितलं का, कि हेच विजयचं घर आहे? होय, त्यांचं म्हणणं खरंच आहे. मीच विजय! आता सांगा, तुमचं काय काम होतं माझ्याकडे?'' त्याने विचारले.

हे ऐकताच पाहुण्याचा चेहरा रागाने लाल झाला. पण स्वतःवर ताबा ठेवत त्याने विचारले, ''मग साहेब, तुम्हीच विजय आहात तर मी इतक्या वेळ विचारून सुद्धा 'नाही' का म्हणालात? मला उगीच गावभर का फिरवलंत?''

बिचाऱ्याच्या बोलण्याची काहीच पर्वा न करता विजय उत्तरला, ''माझ्या मनात एक गंमतीचा विचार आला होता. मला असं वाटलं, की या गावात मला अन् माझं घर ओळखणारी किती माणसं असावीत? -तुम्ही अगदी वेळेवर आलात. तुमच्या आधारे मला कळून चुकलं की गावातले सगळेच लोक ओळखतात मला. गावात माझं केवढं नाव आहे, माझा मान आहे हे जाणून मला किती अभिमान वाटतोय हे कसं कळणार तुम्हाला? अच्छा, आता तुमचं काम तर सांगा.''

उभ्याउभ्याच शरीराला हेलकावे देत जोराने ओरडत पाहुणा सांगू लागला, ''साहेब, मी जनार्दनपुरहून आलोय. तुमच्यासाठी एक अत्यन्त महत्वाची बातमी होती. तुमचे करोडपती बंधु नीलकंठ यांना आज सकाळीच हृदयविकाराचा झटका आला. तुम्हाला माहीतच असणार की त्यांना मुलंबाळं नाहीत. मरणापूर्वी तुम्हाला अन् तुमच्या आणखी दोन भावांना त्यांनी कळवायला सांगितलं की, आपण मेल्यावर तुमच्यापैकी सर्वात अगोदर तिथे पोचून जो त्यांचा अग्निसंस्कार करील, त्यालाच त्यांची सर्व इस्टेट मिळेल. अन् लगेच त्यांचा मृत्यु ओढवला! मी त्यांच्याकडे काम करतो. तुम्हाला लवकरात लवकर ही खबर पोचवून सर्वांअगोदर तिकडे घेऊन जावं म्हणून धावतपळत आलो मी इथे. तुमच्याकडून याबद्दल काही बक्षिस मिळेल अशी आशा होती मला. पण 'सगळंच मुसळ केरात!' आता ताबडतोब निघूनही काही फायदा नाही. एव्हाना बाकीच्या भावांपैकी कोणी जाऊन अग्निसंस्कार केलाही असेल.'' तो माणूस हे बोलताबोलता हसत होता!

रिकाम्या वेळी मनात आलेल्या विचाराचा प्रयोग करायचे ठरवले खरे विजयने. पण केवढी किंमत द्यावी लागली त्याला! पण आता बैल गेल्यावर झोपा करून काय उपयोग!



# चांदोबाच्या बातम्या

## माता-पित्यांनो सावध

अुच्च शिक्षण पूर्ण न करता मुलांनी मधेच शाळा सोडली तर मुलांना नव्हे, तर त्यांच्या माता-पित्यांना दंड भरावा लागेल, अशी तरतूद चीनमधे केली जात आहे. चीनमधे अुच्च स्तरापर्यन्तचे शिक्षण सक्तीचे व मोफत आहे. मुलांनी मधेच शिक्षण सोडले, तर शिक्षणाच्या स्तराप्रमाणे माता-पित्यांना १०० रु. पासून १,७०,००० रु. पर्यन्त दंड भरावा लागेल. सहा सरकारी शाळेत सहा वर्षांच्या मुलाला प्रवेश दिला जातो, अन् पुढे नअू वर्षे पर्यन्त शिकून त्याचे अुच्च शिक्षण पूर्ण होते. राजधानी बिजिंगमधे ९९.९२ टक्के मुले शाळेत शिकत आहेत.

## छोट्या मुलीचे संरक्षणात्मक प्रसंगावधान

अुत्तर जपानमधे सप्पोरे नावच्या शहरात ही घटना घडली. कोणीतरी खटखटवल्यावरून मालकिणीने दरवाजा



अुघडला, अन् एकदम एक चोर आत शिरला. 'घरात जे काही असेल ते आणून दे, नाहीतर तुला मारून टाकतो' अशी धमकी ऐकून तिची वाचाच बन्द झाली. तिथेच अुभ्या असलेल्या तिच्या नअू वर्षाच्या मुलीने मात्र धीटपणे चोराला विनन्ती केली की, "आम्हाला मारू बिरू नकोस, घरात काय आहे ते मी तुम्हाला आणून देते." घरात जाअून तिने जमा करून ठेवलेली १७,००० येन (४,५०० रु.) ची रक्कम चोरासमोर ओतली. ती घेअून चोर निघून गेला.

## अति लठ्ठपणा

अमेरिकेतील फ्लोरिडा फोर्टलेकमधील एका स्त्रीच्या पायाला जखम झाली. त्या जखमेचे रुपान्तर गळवात झाले अन् तिच्या प्राणावर बेतले. अुपचारासाठी तिला हॉस्पिटलमधे हलवणेही अशाकरता महाकठीण झाले, की ती अतिशयच लठ्ठ होती! तिचे वजन होते ३२० किलो! तिला दरवाज्यातून बाहेर काढणेच अशक्य होते. शेवटी दरवाजा तोडूनच तिला बाहेर काढले गेले!

## तीस वर्षांची बाहुली

१९४५ साली अमेरिकेने हिरोशिमा व नागासाकीवर अणूबॉंब टाकले अन् द्वितीय महायुद्ध संपुष्टात आले. तेथे अमेरिकन सैनिकांना 'जी.ए.जो.' असे संबोधले जात असे. १९६४मधे बाहुल्या बनवणाऱ्या एका संस्थेने सैनिकांची एक बाहुली बनवून तिचे नाव ठेवले 'जी.ए.जो.' मुले त्या बाहुलीकडे फारच आकर्षित झाली. गेली तीस वर्षे या बाहुल्या बनवल्या जात आहेत. आत्तापर्यन्त २२०,००,००,००० इतक्या बाहुल्या विकल्या गेल्या. गेल्या ७ फेब्रवारीला बाहुल्या बनवणाऱ्या त्या कंपनीने या बाहुलीचा तिसावा वाढदिवस मोठ्या धुमधडाक्यात साजरा केला. जे लोक या समारंभासाठी आले, त्या सर्वांचे स्वागत १८मीटर (६० फूट) अुंचीच्या, गंभीर दिसणाऱ्या 'जी.ए.जो.' नेच केले.





# वीर हनुमान

कौरव व पांडव द्यूत खेळले. पांडव हारले आणि त्यांना वनवासाला जावे लागले. द्रौपदी भीमासह वन-विहार करीत होती. अत्यन्त मनमोहक अशा एक स्थानी बसून दूर दिसणारी हिमालयाची शिखरे पाहण्यात ती मग्न होती. एकदम जोराचा वारा सुटला आणि त्या वाऱ्याच्या झोतात एक टपोरं अद्भुत फूल द्रौपदीच्या पुढ्यात येअून पडलं. त्याच्या सुगंधाचा दरवळ आसमंतात पसरला. त्या फुलाच्या पाकळ्यांनील काही चुरगळलेल्या दिसत होत्या.

ते एक सुगंधित कमळ होतं. कुबेराच्या अलंकापुरी नगरीतील एका सरोवरात रोज हे एकच कमळ फुलतं. कुबेर रोज आपल्या पुष्पक विमानात बसून हे फूल घेअून शिवाकडे जातो व त्याची पूजा करतो. आदल्या दिवशी ज्या फुलाने पूजा केली ते फूल कुबेर दुसऱ्या दिवशी आपल्या नगरीला घेअून जातो. आज परत नेत असलेले फूल पुष्पक विमानातून पडले व वाऱ्यावर उडत उडत येअून द्रौपदीच्या मांडीवर पडले.

द्रौपदी मोठ्या आश्चर्याने त्या फुलाकडे पाहून मोहित झाली. ती प्रेमाने भीमाला म्हणाली- "तुम्ही असलं एक नवीन फूल मला आणून द्यावं." भीमाने आपली गदा खांद्यावर टाकली आणि निघाला. फुलाच्या शोधात निघालेला भीम हिमालयातील कदलीवनाच्या बाजूने जाऊ लागला. या वनात श्रीकृष्णाच्या आज्ञेनुसार हनुमान वृद्धावस्थेत पाय पसरून बसला होता. तो राम-नामाचा जप करीत होता. त्याची शेपुट रस्त्यावर अडथळा बनून राहिली होती. भीमाने शेपुट पाहिली, नि त्याला वाटलं- ही एखाद्या माकडाची शेपुट असावी. शेपुट ओलांडून तो जाऊ शकला असता, पण त्याचा अहंकार आडवा आला. त्याने लक्षपूर्वक इकडे-तिकडे पाहिले. राम-नामाचा जप करीत बसलेल्या हनुमानाला त्याने पाहिले. ताबडतोब भीमाने गंभीर गर्जन केले. त्याला वाटलं,



आपल्या या गर्जनेमुळे हनुमान भयभीत होईल.

हनुमान शांतपणे म्हणाला- ''हे पुत्र, मी आता म्हातारा झालो आहे. शरीरात त्राण राहिले नाही. मला उठणं कठीण होत चाललं आहे, म्हणून माझी शेपुट तुलाच बाजूला केली पाहिजे. माझ्यावर कृपा करून एवढी कृपा करशील?''

भीमाने गदा खाली ठेवली आणि एकदा शेपटीकडे पाहिलं. त्याने शेपुट बाजूला सारण्याचा प्रयत्न केला, पण ती तो जराही हलवू शकला नाही. खाली वाकून हातांनी शेपुट ढकलण्याचा उद्योग करू लागला. दोन्ही हातांचे सर्व बळ लावून ही त्याला आपल्या प्रयत्नात थोडे ही यश मिळाले नाहीं.

रागावून हनुमान म्हणाला- ''अरे मुला, आपल्या बळकट हातांनी माझी शेपुट पकडून माझ्या वेदना का वाढवीत आहेस? माझ्या सारख्या म्हाताऱ्याची शेपुट तुला बाजूला करता येईना! खांद्यावर गदा टाकून एकादं महत्कार्य करायला निघाला आहेस असं दिसतंय. तुम्हा तरुणात आवेश खूप आहे, पण विचार करण्याची शक्ति बेताचीच. सुंदर व प्रिय स्त्रीचे मनोरथ पूर्ण करायची आतुरता तुम्हाला फार, असल्या कामासाठी कोठून तुम्हाला उत्साह मिळतो कोण जाणे? तू अशाच काही कामगिरीवर तर निघाला नाहीस ना?''

रागाने लाल होत भीम म्हणाला- ''उगाच वाह्यात बडबडू नकोस.'' आणि हनुमानाला आपल्या गदेने मारायला धावला.

हनुमान हसत म्हणाला- ''तर गदा-युद्धासाठी मला आव्हान देत आहेस? आज पर्यंत युद्ध-विद्या शिकलास, आणि आज कोपऱ्यात बसलेल्या एका वृद्धाशी लढायला निघालास? तुझ्या सारखा छोटा भाऊ मिळाला, तर मोठ्या भावाला वनवास पत्करण्याशिवाय कोठला मार्ग शिल्लक आहे रे? बघ, माझ्या जवळ पण एक गदा आहे, पण ती ही माझ्याच सारखी म्हातारी झाली आहे! दूर पडलेली गदा उचलण्यासाठी हात तेथपर्यंत पोंचत नाही. तेव्हा तूच मला मदत कर ना? जी गदा तेवढी माझ्या हातात दे. काय करूं? तू मला गदा-युद्धासाठी बोलवतो आहेस, तेव्हा लढलं तर पाहिजेच! होय ना?''

भीमाच्याने काही हनुमानाची गदा पेलवेना. तो दमून गेला, तेव्हा हनुमान म्हणाला- ''आमच्या वेळेला अशाच गदा



असत. पूर्वी तर आम्ही दगडी गदांचा वापर करीत असूं. अलीकडे फार हलक्या गदा निघाल्या आहेत.'' असे म्हणत हनुमानाने अगदी सहजपणे आपली गदा उचलली. भीमाच्या डोक्याला ती अशी नाजुकपणे टेकवली की जणू आशीर्वाद देत आहे. भीम व्याकुळ होऊन हनुमानाला मारू लागला.

हनुमानाने गदा उचलली आणि तो हुंकारला. त्याच्या हुंकारण्याचा प्रतिध्वनि कदलीवनात सर्वत्र दुमदुमला.

बराच वेळ दोघांचे गदा-युद्ध चालले. भीमाच्या हातून गदा सुटली नि ती दूर जाऊन पडली. हनुमानाने आपली गदा फेकून दिली आणि तो मल्ल-युद्धासाठी तयार झाला.

दोघांचे मल्ल-युद्ध चालू असताना एक गोष्ट भीमाच्या लक्षात आली. हनुमानाला वाटलं तर तो एका क्षणात आपल्याला जमिनीवर लोळवील, पण तो तसं करीत नाहींये. गदा आणि मल्ल-युद्धातील बारकावे गुरु ज्याप्रमाणे शिष्याला शिकवतो त्याप्रमाणे जणू तो भीमाला शिकवीत होता.

भीमाने जेव्हा हे सत्य जाणलं, तेव्हा हनुमानासमोर गुडघे टेकून तो म्हणाला- ''महाराज, आता मला कळलं. आपण हनुमान आहात. मी वायुदेवाचा वर-प्रसाद, कुंतीचा मुलगा आहे, धर्मराजाचा भाऊ मी भीम! आपण माझ्यावर कृपा करावी.'' हनुमानाने वत्सलतापूर्वक दोन्हीं हातांनी भीमाला उचललं आणि म्हणाला- ''होय, बंधुराज, आपण दोघे



ही वायु-पुत्र आहोत!''

भीम म्हणाला- ''आपलं विराट रूप पाहण्याची इच्छा आहे!''

हनुमान म्हणाला- ''सहोदर, हे द्वापर युग आहे. माझं विराट रूप तुझ्याच्याने पाहवणार नाही. तरी पण तुझ्या समाधानासाठीं दाखवतो बघ!'' असं म्हणत हनुमानाने आपले विशाल रूप धारण करायला सुरुवात केली. तो मेघ-मण्डळ भेदून पार झाला. त्याने आपली शेपुट उचलली आणि आकाशाला गवसणी घातली. भीमाने घाबरून गर्जना केली.

त्याचे हे विशाल रूप पाहून भीम थरथरा कापू लागला. त्याने प्रार्थना केली की हनुमानाने हे आपले विश्वरूप आतां संपुष्टात आणावे.

हनुमानाने आपले लघु रूप धारण केले आणि



मग विचारले- ''तू सांगितलंच नाहीस की तू कुठल्या कामगिरी वर निघाला आहेस?''

भीमाने आपला उद्देश सांगितला.

''भीमसेन! केशिकी नावाची एक यक्षिणी दलसरोवराचे रक्षण करते आहे. ती मोठी कर्तृत्वशालिनी आहे. तिच्या पुढे तुझा सर्व पराक्रम व्यर्थ आहे. तिच्या मायाजाळात न फसणारा कोणी विरळाच!

मी ज्या राम-नामाचा जप करतो, तेच तुझ्या उपयोगी पडेल. तिच्यापासून तू जागरूक रहा. ती यक्षिणी उत्तम प्रकारची शिव-भक्त आहे. जाताना माझ्या शरीरावरील एक मूठ भर रोम घेऊन जा. ती यक्षिणी तुझ्या अंगीकृत कार्यात जेव्हा बाधक बनेल तेव्हा माझा एकेक रोम तिच्या पुढ्यात टाक. माझा रोम जेथे पडेल तेथे एक शिवलिंग निर्माण होईल. यक्षिणी सहस्र नामांनी त्याची पूजा करील. एवढ्यात तू आपले काम साधून परत ये.'' असे सांगत हनुमानाने आपल्या शेपटीवरील मूठ भर रोम काढून भीमाच्या हाती दिले. आणि त्याला दलसरोवराचा मार्ग दाखवला.

केशिकीने भीमाला दुरूनच पाहिले. तिने ताबडतोब एका अपूर्व सुंदरीचे रूप धारण केले. तिच्या या रूपावर कोणी ही सहज भाळेल! तिचा दास बनून जाईल. ती नृत्य-गान करू लागली. भीम जवळ आला आणि तिच्या मनमोहक रूपावर फिदा झाला. तेव्हा राम-नामाचा स्वर त्याला ऐकू येऊ लागला. त्याने आपल्याला सावरले आणि तो पुढे निघाला. केशिकीने निरनिराळ्या प्रकारे भीमाला आपल्या प्रेमपाशात पाडण्याचा प्रयत्न केला, पण ते सर्व व्यर्थ. सर्व प्रयत्न करून थकल्यावर ती चिडली आणि आपले भयंकर रूप धारण करून भीमाच्या वाटेत उभी ठाकली.

भीमाने हनुमानाचा एक रोम तिच्या पुढे टाकला आणि तिथे लगेच एक शिवलिंग दिसू लागले. शिवलिंग पाहून केशिकी थांबली, आपली चूक तिच्या लक्षात आली. लगेच भक्तिभावाने ती शिवलिंगाची पूजा करू लागली. ती शिवलिंगाची पूजा करीत असताना भीम सरोवरात उतरला. त्यातील सुगंधित कमळ त्याने मुळातून उपटले आणि ते घेऊन पळू लागला. पूजा संपवून केशिकी प्रचंड वेगाने भीमाचा पाठलाग करू लागली. अग्नीच्या





ज्वाळांप्रमाणे तिचे केस वाऱ्यावर उडू लागले आणि त्यांनी भीमाला घेरले.

हनुमानाच्या सूचनेनुसार भीमाने आवश्यकते-प्रमाणे हनुमानाचे रोम फेकले आणि अशा रीतीने यक्षिणीला भक्तीच्या आवेशात मग्न ठेवले. आपले रक्षण करीत भीम शेवटी कदलीवनात हनुमानापाशी पोचला.

हनुमानाला कमल-पुष्प दाखवीत भीम म्हणाला- ''आपल्या कृपेने मी विजय मिळवून परत आलो आहे. भविष्य काळी कौरव व पांडव यांच्यात जे युद्ध होणार आहे, त्यावेळी आपण मदत करावी अशी मी स्वतः व आपल्या भावांतर्फे आपणास नम्र प्रार्थना करतो.'' आणि भीमाने भक्तिपूर्वक हात जोडले.

हनुमान भीमाला म्हणाला- ''भीमा, त्या काळी युद्ध कारण्यासारखी माझी अवस्था नसेल. तुझ्या आग्रहा खातर मी युद्धात तुम्हा भावांना मदत करण्यासाठी एक गोष्ट करीन. युद्धात तुझा भाऊ अर्जुन ज्या रथावर आरूढ झालेला असेल, त्याच्या ध्वजाचे संरक्षण मी करीन. तुम्हा भावांना विजयश्री निश्चित मिळणारच! आता तू निश्चिंतपणे जाऊन हे फूल आपल्या बायकोला दे आणि तिची मनोकामना पुरी कर. मायावी हरणाच्या मोहात पडल्यामुळे त्या काळी सीतेला केवढ्या यातना सहन कराव्या लागल्या. आपल्या पत्नीला तू समजाऊन सांग की असले मनोरथ योग्य नव्हेत. हा माझा उपदेश तू तिला सांग. या सुगंधित कमळाने तिने शिवाचे पूजन करावे. शिवाची पूजा-अर्चा केल्याने तुम्हा सर्वांचे कल्याण होईल. तुम्हाला सुख-संपत्ति मिळेल. हे फूल कधी ही सुकत नाही हे लक्षात ठेव.'' असे निवेदन करून हनुमानाने भीमाला आशीर्वाद दिला आणि त्याचा निरोप घेतला.

भीमाने द्रौपदीच्या हाती फूल दिले आणि तिच्या हस्ते शिवाची पूजा करवली. हनुमानाने सांगितलेल्या सर्व गोष्टी भीमाने द्रौपदीला ऐकवल्या.

द्रौपदीने सगळं ऐकून घेतलं आणि लाजून हसत म्हणाली- ''मी सुगंधित कमळाची इच्छा प्रदर्शित केली, म्हणूनच तर तुम्हाला हनुमानाचं दर्शन घडलं नि त्यांच्याकडून आपल्याला अभय-दान मिळालं! आपला तर फायदाच झाला. नाही का?''

भीमासह सर्व पांडवांनी होकारार्थी मान हलवली. हनुमानाची कृपा-दृष्टि प्राप्त झाल्यामुळे सर्वांना आनंद झाला.

आपल्या प्रतिज्ञेप्रमाणे पांडवांनी बारा वर्षांचा वनवास संपविला आणि आणखी एक वर्ष अज्ञातवास ही निर्विघ्नपणे पार पाडला. त्यांनी राज्यातील आपल्या हिश्श्याची मागणी करण्यासाठी श्रीकृष्णाला कौरवांकडे आपला राजदूत म्हणून पाठवले.

श्रीकृष्णाचा न्यायोचित प्रस्ताव दुर्योधनाला पसंत पडला नाही. श्रीकृष्ण व त्याचे संदेश त्याने धुडकावून लावले. यानंतर पांडव व कौरव यांचा समझोता कधी होऊच शकला नाही. दोन्ही पक्षात युद्ध अनिवार्य झाले. कुरुक्षेत्रावर रणवाद्यांची गर्जना झाली.

अर्जुनाच्या रथावर फडफडणाऱ्या ध्वजावर सूक्ष्म रूपात हनुमान विराजित झाला. श्रीकृष्ण अर्जुनाच्या रथाचा सारथी झाला. रणभूमीवर दोन्ही बाजूंच्या सैन्यांच्या मध्यभागी विजय-ध्वज दिमाखाने फडकत राहिला.

कुरुक्षेत्रावर महाभारताचा रण-संग्राम झाला. श्रीकृष्णाने सारथी बनून अर्जुनाला मार्गदर्शन केले, त्याला स्फूर्ति दिली, प्रेरणा दिली आणि त्याच्याकडून अद्भुत युद्ध करविले. अर्जुनाने शत्रूंचा संहार केला आणि युद्धात विजय मिळवला. श्रीकृष्णाला विजयसारथी अशी संज्ञा मिळाली.

दुःशासनाने द्रौपदीचे केस पकडून तिला फरपटत भर सभेत आणले. आपली बायको व आपला परिवार यांच्या अपमानाने क्रुद्ध होऊन भीमाने सर्वांसमक्ष प्रतिज्ञा केली की



दुःशासनाच्या रक्ताने द्रौपदीचे केस माखल्यावरच तिचा अंबाडा बांधीन. आपल्या प्रतिज्ञेनुसार भीमाने दुःशासनाची छाती फाडून त्याच्या रक्ताने द्रौपदीचे केस माखले नि मग तिचा अंबाडा बांधला. हनुमानाच्या सूचनेनुसार द्रौपदीने आता सुगंधित कमळ आपल्या अंबाड्यात घातले. आणि श्रद्धा व भक्तिभावपूर्वक हनुमानाला नमस्कार केला.

गदा-युद्धात भीमाने दुर्योधनाला चांगलेच जखमी केले होते. आता भीमाच्या सर्व प्रतिज्ञा पूर्ण झाल्या. अधर्माच्या मार्गाने जाऊन कौरवांनी आपण होऊनच आपले नुकसान करून घेतले होते. त्यांचा सर्वनाश झाला. धर्म-मार्गाचे अनुसरण करून पांडवांनी विजयश्री प्राप्त केली.

श्रीकृष्ण हनुमानाची प्रशंसा करीत म्हणाला- ''हनुमान, सतत सत्कार्य करावे असे तुला नित्य वाटते. ही तुझी श्रद्धा गौरवास्पद आहे. म्हणूनच त्या काळी तू रावणाचा संहार करण्यासाठी रामाला मदत केलीस आणि आपल्या धर्माचे पालन केलेस. आपल्या आदर्शाचे पालन करून तू कृतकृत्य झालास. आता या कुरुक्षेत्रावरील महासंग्रामात विजयध्वजाच्या रूपात फडकून तू धर्मराजाच्या विजयाचे कारण बनलास!''

तेव्हा हनुमान नम्रतापूर्वक म्हणाला- ''महारथी अर्जुनाला आपल्यासारखे सारथी मिळाल्यावर जय अन्यत्र कुठे जाणार? तिन्ही लोकात क्रिया-सिद्धीहून अधिक महत्त्वाची शक्ति कोणती? मी तर केवळ एक चिन्ह बनून राहिलो!''

श्रीकृष्णाने शाश्वत सत्य सांगितले- ''होय, तू नित्य कार्य-सिद्धीचे चिन्ह बनून राहशील! सर्व काळीं, सर्व युद्धात ज्या ध्वजावर तुझे चिन्ह असेल, त्याला निश्चित विजय मिळणार. विजय-ध्वजाच्या रूपात त्याचा नित्य आदर केला जाईल व त्याला अमर्याद कीर्ति प्राप्त होईल.''

पांडवांनी हनुमानाला नम्रतापूर्वक नमस्कार केला व हनुमानाने अंतःकरणपूर्वक त्यांना आशीर्वाद दिला. श्रीकृष्णाचा आशीर्वाद घेऊन हनुमान गंधमादन पर्वतावर उडत गेला. तेथील प्रशांत वातावरणात राम-नामाचा जप करीत आपले जीवन सार्थक करू लागला.





# नवा जावई

विवाहानन्तर तीनच महिन्यांनी नवीन जावई प्रभाकर सासुरवाडीला आला अन् सासू गौरी हिला त्याचे येणे म्हणजे एक डोकेदुखीच बनून राहिली. दसऱ्याला जेंव्हा प्रथम तो आला, तेव्हा गौरीने कौतुकाने बनवलेली पक्वान्ने त्याने पोटभर खाल्ली अन् खूप प्रशंसाही केली. त्यावेळी आपली प्रशंसा ऐकून गौरीला फारच आनन्द वाटला. प्रभाकर बोटे चाटचाटून खात राहिला अन् तोंडाने स्तुतीही करत राहिला.

''अग आई, तुझ्या जावयाला रसगुल्ले फारच आवडतात हं! त्यांची आजी अगदी मरेपर्यन्त त्याना रसगुल्ले करून खायला घालत असे. ती जिवन्त असेपर्यन्त अगदी रोज रात्री झोपायच्या वेळी ते रसगुल्ले खाल्ल्यावाचून झोपतच नसत म्हणे!'' लाडकी लेक सुधाही नवऱ्याचे कौतुक सांगू लागली.

''पण सुधा, तुला माहीतच आहे की मला बाकी सगळी पक्वान्नं बनवता येत असली तरी रसगुल्ले करायला नाही येत! कधी रसगुल्ले करायची वेळच नाही आली. तुला येतात का करता? नवऱ्याला आवडतात म्हणून तू करायला शिकलीच असशील! त्यासाठी तर सुभद्राचेच पाय धरायला हवेत.'' गौरी दुःख प्रकट करत म्हणाली.

लेक अन् जावई ज्या दिवशी घरी जायला निघाले, त्या दिवशी गौरीने सुभद्राकडून रसगुल्ले बनवून घेतले; अन् डबा हाती देऊन त्यांना रवाना केले.

तीन दिवसातच प्रभाकरने रसगुल्ल्यांचा डबा रिकामा केला. चौथ्या दिवशी सासुरवाडीला जाण्यासाठी गाडी घेऊन आलेल्या प्रभाकरला सुधा म्हणाली, ''आपण तीन दिवसांपूर्वीच दसऱ्याला आईकडे गेलो होतो ना? मग लगेच इतक्या लवकर जाणं बरं दिसेल का? काही झालं तरी तुम्ही जावई आहात.'' नवऱ्याच्या उतावळेपणाचे तिला आश्चर्यच



वाटले.

"अुगीच काहीतरी बोलू नकोस. आज अश्वयुज पौर्णिमा आहे. सुभद्राकडून रसगुल्ले करवून घेअून खाल्ल्याशिवाय माझा आत्मा शान्त नाही होणार. अग, परवा तुझ्या आईने दिलेले रसगुल्ले इतके झकास होते की मी खातच राहिलो. अन् सासूने प्रेमाने दिले तर बिघडले कोठे? मी जितके अधिक रसगुल्ले खाईन तेवढे सासूचे प्रेम वाढेल जावयावर! कळले?" प्रभाकर म्हणाला.

प्रथम आज पौर्णिमा आहे. नंतर काय, तर एकादशी आहे; तर कधी शिवरात्र आहे-असे बहाणे करत लग्नानंतरच्या तीन चार महिन्यात प्रभाकर एकसारखा सासुरवाडीला जाअून सुभद्राच्या हातचे रसगुल्ले खात राहिला; अन् दर वेळी बरेचसे घरीही नेत राहिला.

यावेळी त्रयोदशीचे कारण पुढे करून प्रभाकर सासुरवाडीला पोचला.

"याच्या तावडीतून आता आपली सुटकाच नाही का? जन्मभर काय याचा असा त्रासच सहन करत रहावा लागणार आहे की काय? कौतुकाने एकदा, दोनदा, तीनदा दिले रसगुल्ले! आता काय जन्मभर देत राहू की काय? अन् जावयाला तरी हे शोभतं का? तारतम्य आहे की नाही?" असे स्वत:शीच बडबडत राहिली गौरी.

त्या दिवशी आपले दुकान बन्द करून सुधाचे बाबा दुपारी घरी जेवायला आले, अन् गौरीला म्हणाले, "लेक अन् जावई आज संध्याकाळी परतणार आहेत ना घरी?"

"रसगुल्ले बनवले तरच जावई घराबाहेर पाअूल काढील. जरूर ते सामान देअून नोकराला पाठवायला हवं सुभद्राकडे! म्हणजेच संध्याकाळपर्यन्त तयार करून पाठवेल ती. ती जर उद्या करीन म्हणाली तर जावई-बापूंचा मुक्काम वाढलाच एक दिवस. म्हणून ताबडतोब सगळं सामान आणून द्या. म्हणजे स्वारी आजच रवाना होईल आपल्या घरी." गौरी काहीशा नाराजीने म्हणाली.

"पण आपला रंगा तर अुत्सव पहाण्यासाठी सुट्टी मागून गेलाय." सुधाचे बाबा म्हणाले.

"तुम्ही पण कमालच केलीत! आता



कोणाला तरी पाठवून त्याला ताबडतोब बोलावून घ्या." गौरी म्हणाली.

रंगाला निरोप मिळाल्यावर तो घाबरूनच गेला. त्याने आपल्या बायकोला अुत्सव पहायला न्यायचे कबूल केले होते. निरोप ऐकून तीही खूप चिडली. डोक्यातली फुलं काढून तिने चुरगाळून टाकली. नेसलेली नवी साडी सोडून, जुनी नेसून दरवाजाजवळच चटई पसरून ती त्यावर फुरंगटून बसली.

रंगा तरी बिचारा काय करणार? मालकाचा हुकूम कसा टाळणार? तो आपल्या घरून निघून मालकाकडे गेला. आवश्यक वस्तु त्याच्या हाती देत गौरी म्हणाली, "नीट सावध रहा. सुभद्राचे रसगुल्ले तयार होईपर्यन्त नीट लक्ष ठेव, इकडेतिकडे कुठे जाअू नकोस. रसगुल्ले तयार झाले की लगेच घरी घेऊन ये. म्हणजे जावअूबुवा घराकडे कूच करतील. समजलं ना?"

रंगा सुभद्राकडे गेला, तेव्हा घरात मुलांची गर्दी जमलेली होती. सुभद्रा रंगाला म्हणाली, "तुझ्या मालकिणीला मी दर आठवड्याला रसगुल्ले बनवून देते. पण काय अुपयोग? बदल्यात ती कधी एक फुटकी कवडीही देत नाही. फुकटच मेहनत माझी! आज तर माझ्या बहिणीची मुलंही आलीयत माझ्याकडे. आज नाही जमणार बाबा रसगुल्ले करायला! त्यांना जाऊन सांग की उद्या वेळ मिळाला तर देईन करून."



तिचे बोलणे ऐकून रंगाही नाराज झाला. आता अुत्सवाला जायची वेळही टळून गेली. रसगुल्ल्यांचे काम दुसऱ्या दिवसावर गेलं, तर अुद्याही अुत्सवाला जाता येणार नाही! बायको तर माहेरीच जाईल पळून! रसगुल्ल्यांच्या कटकटीतून स्वत:ला कसे सोडवावे याचा विचारात पडला तो.

अचानक त्याला एक अुपाय सुचला. सुभद्राला आपला विचार सांगून तो म्हणाला, "इतक्या वेळा तू रसगुल्ले बनवलेस! या अुपायानं तुला मेहनतीचे पैसे ही मिळतील अन् प्रत्येक वेळच्या या फुकटच्या कामातूनही सुटशील तू."

सुभद्रा खुशीने कबूल झाली.



रंगाने जेव्हा 'आज रसगुल्ले बनत नाहीत' असे सांगितले, तेंव्हा प्रभाकरने घरी जाण्याचा बेत पुढे ढकलला. प्रभाकर घरामागच्या आंब्याच्या झाडाखाली बसलेला आहे, असे पाहून रंगा त्याच्याजवळ जाऊन म्हणाला, "छोटे मालक, सुभद्रानं तुमच्यासाठी रसगुल्ले बनवायला नकार दिला. पण आपल्या भाचरांसाठी तिनं बनवलेत रसगुल्ले."

रंगाचे बोलणे ऐकूनच प्रभाकरच्या तोंडाला पाणी सुटले. तो म्हणाला, "पण ते रसगुल्ले आपल्याला कसे मिळतील?"

"आपण जाऊ या तिच्या घरी. मुलं सारखीच खात आहेत, म्हणून सुभद्रानं ते एका हंडीत घालून लपवून ठेवलेत. अंधारात जाऊन आपण ती हंडी घेऊन आलो, तर आपलं काम साधून जाईल." रंगाने उपाय सुचवला.

"असं कसं होईल? मी नवीन जावई आहे. असं उगीच कुणाकडे तरी जाणं बरं नाही दिसणार." संकोचत प्रभाकर म्हणाला.

"रसगुल्ल्यांची गोष्ट आहे ना! त्यासाठी इतका संकोच कशाला? मला असं कळलंय की रसगुल्ले बनवून घ्यायच्या बदल्यात तुमची सासू सुभद्राला काहीच देत नाही. अन्याय नव्हे का हा? निदान पंचवीस रूपये तरी द्यायला हवेत आतापर्यंतचे, तेंव्हा पैसे द्यायच्या निमित्ताने जा तिच्याकडे. बाकीचं मी पाहून घेईन." रंगा धीर देत म्हणाला.

प्रभाकर त्याच्याबरोबर निघाला तर खरा, पण त्याच्यात तितका उत्साह नव्हता. त्यांना सुभद्राच्या घरी पोचतापोचता अंधार झाला. सुभद्रा तेंव्हा घरात एकटीच होती.

"आँ? तुम्ही, अन् माझ्या घरी? मी तर निरोप दिला होता, की रसगुल्ले उद्या करून देईन." प्रभाकरला पहाताच सुभद्रा म्हणाली.

"मला असं समजलं की, इतक्या वेळा तू रसगुल्ले बनवून दिलेस, अन् पैसे नाही घेतलेस अजून. तुला हे पंचवीस रुपये देण्यासाठी आलोय मी." असे म्हणत प्रभाकरने तिला पैसे दिले.

इतक्यात रंगा तिला म्हणाला, "सुभद्रा, तुझा नवरा कुठे निघून गेला कळलंच नाही ना? चार दिवसांपूर्वी माझ्या मेव्हण्यानं पाहिलं त्याला शहरात. सांगत होता की तो खूप जाड झालाय अन् चेहऱ्यावर चांगलं तेजही आलंय."

सुभद्राने चेहरा असा केला, की जणु काही जावयासमोर पळून गेलेल्या नवऱ्याबद्दल बोललेलं तिला आवडलं नाही. ती रंगाला गव्हीच्या तोंडाशी घेऊन गेली. त्याच्याशी एकट्याशी काही बोलायचा बहाणा दाखवला.

बाहेर जाण्यापूर्वी रंगाने प्रभाकरला डोळ्यांनी खुणावले. तो लगेच स्वयंपाकघरात घुसला अन् हंडीत जे काय होतं ते बरोबरच्या प्लॅस्टिक पिशवीत ओतलं. हंडीत काही राहिले नाही याची खात्री करण्यासाठी त्याने आत हात घातला. हाताला लागल्या त्या गोळ्या तो खाऊ लागला.

बस! प्रभाकरच्या तोंडाची एकदम आग आग होऊ लागली. लाल मुंग्या त्याच्या चेहऱ्याला अन् हाताला डसू लागल्या! हंडीत रसगुल्ले नसून जनावरासाठी बनवलेल्या कसल्याशा औषधी गोळ्या होत्या! त्याचा सारा चेहरा मुंग्यांनी चावल्यामुळे सुजून आला अन् लालही झाला! हळूहळू कण्हत सर्वांचा डोळा चुकवून मागची भिंत ओलांडून तो रस्त्यावर आला.

रंगा बरोबर तिथेच उभा होता-त्याची वाट पहात. प्रभाकरजवळ येत तो म्हणाला, "काय झालं छोटे मालक? सुभद्राशी काही न बोलताच असं भिंत ओलांडून येणं बरं दिसतं का?" नाराजीचे नाटक करत तो म्हणाला.

प्रभाकर हळूच म्हणाला, "ओरडू नको रंगा. घरी पोचतापोचता सर्व सांगतो तुला, पण हे रहस्यच राहू दे हं! घे, अगोदर हे दहा रुपये घे तुला बक्षीस!" त्याने रंगाला पैसेही दिले.

घरी पोचल्यावर अर्ध्या तासाने प्रभाकर गौरीला म्हणाला, "सासूबाई, अलिकडे गोडाचा त्रास होतो मला! आज दुपारी तुम्ही वाढलेलं पक्वान्न खाऊन माझा चेहराही सुजला पहा. आता यापुढे गोड न खायचं पक्कं ठरवलंय मी. सकाळीच सुधाला घेऊन आपल्या गावी जायचं मी ठरवलंय."

जावयाच्या या बोलण्याने गौरी आणि रंगाही खूश झाले.






# महाभाग्य

एका गावात श्रीपती यादव नावाचा एक गुराखी रहात असे. तो तरूण असून चांगला साहसीही होता. त्यामुळे देशात निरनिराळ्या ठिकाणी भ्रमण करावे, हिमालयातील निरनिराळ्या ठिकाणी जाऊन तेथील सुंदर निसर्ग-दृश्ये पहावीत, गंगा-स्नान करावे, जंगलातील विविध पशु-पक्षी जवळून पहावेत, युद्धात भाग घ्यावा अशा तऱ्हेचे विचार वारंवार त्याच्या मनात येत.

एक दिवशी असलेच काही विचार करत तो एका झाडाखाली आडवा झाला. थोड्याच वेळात त्याला गाढ झोप लागून गेली. झोपेत त्याला एक विचित्र स्वप्न पडले.

स्वप्नात त्याने पाहिले की आपण एका उंच डोंगरावर चढत आहोत. चढून झाल्यावर तो तिथल्या सिंहासनावर बसला. शेजारी एक सुंदरशी राणीही बसली होती. आश्चर्यचकित होऊन त्याने आपल्या डोक्याकडे हात नेला, तर त्याच्या हाताला एक रत्नजडित मुकुट लागला. त्याला वाटले की मी आता राजा झालो. आता आपण मनात येईल ते करू शकू. आपल्याला कोणाची भीति नाही.

'मी राजा आहे राजा!' असे ओरडतच तो जागा झाला. श्रीपतीला कळून चुकले की 'हे सारे स्वप्नच आहे!' समोर तर गुरे चरत होती अन् स्वतः तो त्या झाडाखालीच झोपलेला होता. 'काय छान स्वप्न पडलं आपल्याला!' असा विचार करता करता तो पुन्हा आपल्या विचारात गढला.

दुसऱ्या दिवशीही त्याला पुन्हा तेच स्वप्न पडले. त्याला वाटले की पुन्हा कदाचित् ते खरे ही होईल! 'उद्या पुन्हा जर तेच स्वप्न पडलं तर आपण डोंगर चढायचाच' असा त्याने निश्चय केला. 'कदाचित डोंगरापलिकडच्या बालापुर राज्याचा मी राजाच बनेन!' असेही त्याला वाटले.

भाग्यश्री जाधव

तिसऱ्याही दिवशी पुन्हा तेच स्वप्न पडल्यावर मात्र गुराख्याच्या कामाला रामराम ठोकून श्रीपती लगेच डोंगराकडे निघाला. मोठ्या कष्टाने संध्याकाळपर्यन्त तो डोंगरमाथ्यावर पोचला. पण तेथे त्याला सिंहासन आढळले नाही. तरीही निराश न होता अंधार होता होता तो बालापुर राज्यात पोचला.

श्रीपतीला आता भूक लागली होती. पण अजून आसपास कोठे गाव दिसत नव्हते. त्यामुळे जेवण कोठे मिळण्याची शक्यता नव्हती. प्यायला पाणी नव्हते. क्षणोक्षणी भूक वाढू लागली. सीमेवर फक्त दाट जंगलच होते. रात्र एखाद्या झाडाखाली काढायचे त्याने ठरवले.

हातपाय दुमडून तो एका झाडाखाली आडवा झाला. न अंगाखाली घोंगडी, न डोक्याखाली उशी! पण भुकेमुळे त्याला झोप येईना. इतक्यात चार-पाच घोडेस्वार आपसात बोलत येत असल्याची त्याला चाहूल लागली.

श्रीपती लक्षपूर्वक त्यांचे बोलणे ऐकू लागला. त्याला असे समजून आले की इथेच थोड्या अंतरावर झाडांच्यामागे एक ओसाड पडलेले घर आहे, अन् रात्र त्याच घरात घालवायचा या घोडेस्वारांचा इरादा आहे. श्रीपती लपतछपत त्यांच्या मागे गेला. थोड्याच वेळात सारेजण त्या उजाड घराशी पोचले. घोड्यांवरून उतरून ते स्वार चादर पसरून त्यावर आडवे झाले. 'आता पुढे काय?' अशा विचारात श्रीपती घराच्या भिंतीला चिकटून उभा राहिला. त्याला वाटले की, हे कोणी चोर असावेत. थोड्याच वेळात त्याचा संशय खराही





ठरला. त्यांच्यातल्या एकाने गंभीर आवाजात दुसऱ्याला विचारले, "धारू, आज तुला काय प्राप्ती झाली? तू तर मोठा चतुर चोर! तुला रोज काही तरी नवी वस्तु लाभते! आज ही काही तरी छान माल मिळाला असला पाहिजे तुला! काय मिळालं ते तरी सांग."

धारू नावाचा तो चोर म्हणाला, "नाईक, आज मला अशी वस्तु लाभलीय की स्वप्नातही आपण तिची कल्पना करू शकणार नाही. माणूस नक्कीच मोठा करोडपती असला पाहिजे. मी त्याचा कमीज चोरलाय आज. जेव्हां लागेल, तेंव्हा त्याचा खिसा हलवला, की त्यातून मोहोरा सांडू लागतात! आता आपल्याला कशाची ददात नाही. हा पैशांचा जिवंत झरा आहे झरा! इथून पुढे चोरी करायचं काम बंद. ही खाण जवळ असली की चोरी करून पैसे मिळवायचं कारणच काय? आज आपण आगदी खूश आहोत!"

नाइकाने त्याला शाबासकी देऊन दुसऱ्याला विचारले, "काय कोल्होबा? तुम्ही कशावर हात मारलात आज? का आलात नुसतेच हात हालवीत? कालही काही आणलं नाही तुम्ही, निदान आज तरी छान पैकी काही?"

कोल्होबा नावाचा चोर उत्तरला, "आज माझंही भाग्य उजळलं नाईक! प्राण संकटात पडलेला एक सेनापती दिसला मला. त्याचा मुकुट चोरलाय मी. असातसा नव्हे! तो डोक्यावर असला की मनात आणू तेव्हां एकाच वेळी तीन दिशांना बाणांचा वर्षाव सुरू होतो त्यातून! हा मुकुट डोक्यावर घातला की काय वाटेल त्याच्याशी युद्ध करावे. आपला जय निश्चित! अशी वस्तु अलम दुनियेत मिळायची नाहीं."

"वा, वा! तू खरोखरचा कोल्हाच आहेस! अरे अस्वलमामा, तुझी काय कमाई रे आजची?" नाइकाने तिसऱ्याला विचारले.

"मालक, मला आज एक तलवार मिळालीय. हवी तेंव्हा ती जमिनीत खोसकली की त्यातून हजार सैनिक बाहेर पडतात. कितीही वेळा खुपसा; दरवेळी हजार नवे सैनिक तयार! आहे की नाही अत्यंत अद्‌भुत शस्त्र? आपण कधी ऐकले नव्हते, कधी पाहिले नव्हते! या तलवारीच्या साह्याने शत्रूचा पराभव करणे म्हणजे हातचा मळ!" अस्वलमामा बोलला.



"झकास! आजचा दिवस छानच म्हणायचा. बरं चला, आता आपापल्या वस्तु भिंतीला टांगून ठेवा अन् झोपा लवकर. उद्या लवकर उठून खूप कामं आहेत आपल्याला." नाइकाने सुचवल्या बरोबर थोड्याच वेळात सर्वजण घोरू लागले.

श्रीपतीने सर्व काही ऐकलेच होते. ते सगळे झोपल्याची खात्री करून भिंतीवर लटकवलेला कमीज, मुकुट अन् तलवार काढून घेऊन त्याने मांजराच्या पावलांनी तिथून पलायन केले. आता त्याच्या हाती तीन मूल्यवान वस्तु आलेल्या होत्या. त्यांचा उपयोग करून तो अनेक सहसाची कामे करू शकत होता.

दोन दिवसात तो बालापुर राजधानीत पोचला. राजवाड्यावर जाऊन त्याने राजाला भेटायची परवानगी दरवानाकडे मागितली.

दरवान म्हणाला, "कोण आहेस एवढा तू? राजाची भेट काय इतकी सोपी असते होय?"

"ओहो तू माझं नाव ऐकलं नसावंस असं वाटतंय. महावीर श्रीपती माहीत नाही तुला? तू नुसतं राजे साहेबांना सांग. ते आदरपूर्वक मला बोलवून घेतील." श्रीपती रुबाबात म्हणाला.

"आपण महावीर श्रीपती? यावं यावं महाराज!" असे म्हणत एक सैनिक श्रीपतीला आत राजाकडे घेऊन गेला.

त्यावेळी सिंहासनाजवळ राजकुमारीही बसलेली होती. तिला पाहताच त्याला वाटले की, आपले स्वप्न खरेच होणार. कारण त्याने



स्वप्नात जी राणी पाहिली ती अगदी राजकुमारी सारखीच होती दिसायला.

श्रीपतीला पाहून राजाने विचारले, "काय पाहिजे तुला? हे काय काय बरोबर घेऊन आला आहेस? अन् कशासाठी?"

श्रीपतीने राजाला अगोदर फक्त आपल्याजवळच्या मुकुट आणि तलवारीबद्दलच सांगितले; अन् तो म्हणाला की, "मी या दोन वस्तुंच्या साह्याने खूप लढाया जिंकल्या आहेत. मी एक सिद्धहस्त योद्धा आहे." पुढे तो असे ही म्हणाला की, "मनात आणीन तर मी सगळं जग जिंकू शकेन."

त्याच्या आत्मविश्वासयुक्त बोलण्याने राजा प्रसन्न झाला. तो म्हणाला, "ठीक आहे, जग

नंतर जिंक. आधी मला गांधार राज्य जिंकून दाखव.''

''तो तर माझ्या डाव्या हातचा मळ! पण मला एक मागणं मागायचंय. मी गान्धार जिंकून दिला, तर राजकुमारीचा विवाह माझ्याशी करून द्याल?'' श्रीपतीने निर्भीडपणे मागणी केली.

हसत हसत राजाने ते मान्य केले. त्याला असे वाटले की गांधारच्या निमित्ताने आपल्या राज्यावरचे संकट टळले, तर या तरुणाला जावई बनवायला काय हरकत आहे? असा चांगला पराक्रमी जावई मिळणे गौरवास्पदच होईल.

काही सैनिक बरोबर घेअून श्रीपतीने गांधारवर हल्ला चढवला. निकराची लढाई झाली. दोन्ही बाजूंचे बरेच सैनिक कामी आले. पण सैनिकांची गरज भासताच श्रीपती तलवार जमिनीत खुपसून नवीन सैनिक मिळवत राहिला, आणि मुकुटाच्या मदतीने तुफान वेगाने बाणांचा वर्षावही करत राहिला. त्याने शत्रुसैन्याचा पार धुव्वा अुडवला!

संध्याकाळपर्यन्त अुरलेले सैनिक बरोबर घेअून गांधार राजा पळून केला आणि आपल्या सैनिकांच्या जयजयकार ध्वनीत श्रीपती बालापुरमधे परत आला. तो सरळ राजाकडे गेला.

राजाने मोठ्या प्रेमाने श्रीपतीचे अभिनन्दन केले. तो म्हणाला, ''श्रीपती, तुझ्यापेक्षा अधिक लायक जावई मला मिळणं अशक्यच आहे. मी तर आता म्हातारा झालोय. तुलाच माझ्या राज्याचा 'राजा' घोषित करून राज्याभिषेकही अुरकून घेतो लगेच.''

राजकुमारीशी श्रीपतीचा विवाह थाटामाटात साजरा झाला अन् नंतर तो सिंहासनाधीन झाला. तो सिंहासनावर बसला तेंव्हा मुकुट घालून राजकुमारीही त्याच्याशेजारी बसली. स्वप्न खरे झाल्याचे पाहून श्रीपतीला फारच आनन्द झाला. अन् इतका पराक्रमी पति मिळाल्यामुळे राजकुमारी ही खूष झाली!



# बहुरूपा वसुन्धरा

## प्राचीन पक्षी

असा अंदाज आहे की जगात ९,६०० प्रकारचे पक्षी आहेत. परन्तु त्यातल्या ६,००० प्रकारच्या पक्ष्यांची संख्या दिवसेंदिवस कमी होत चालली आहे. अन् त्यातही मोठ्या दुःखाची गोष्ट ही की १०० प्रकार तर नामशेष होण्याच्या मार्गावर आहेत. याचे कारण काय बरे असू शकेल? आपल्या घरांच्या आसपास झाडे असतील तरच त्यांवर पक्षी येअून बसतील ना? झाडेच नसतील तर ते येतीलच कसे? मानवाने आपल्या सोयीसाठी बेसुमार जंगलतोड केली आहे. त्याचे फळ म्हणूनच ही पक्ष्यांची संख्या घटत आहे. युरोपमधील पांढरेशुभ्र बगळे व अमेरिकेतील पिवळ्या चोचीची कोकिळा तर आज अस्तित्वातच नाही! त्यांना आता 'प्राचीन पक्षी' या सदरात घालायला हवे.



## अंडी अुबवण्यातील कुशलता

थंडी वाजली तर आपण चादर लपेटून घेतो, लाकडे वगैरे जाळून अुष्णता निर्माण करतो किंवा इलेक्ट्रिक हीटर चालू करतो. पण खुल्या हवेतले पक्षी या थंडीला कसे तोंड देत असतील? मुख्यतः अंडी अुबवण्यासाठी आवश्यक ती अुष्णता कशी निर्माण करतात? नैसर्गिक अुपायातच ही शक्ती सामावलेली आहे. अंडी अुबवण्यात कुशल असणाऱ्या, ऑस्ट्रेलियातल्या 'मल्लीफॉल' पक्षाचेच अुदाहरण पहा. मादी अंडी घालायला सुरुवात करण्यापूर्वीच नरपक्षी तीन फूट लांब व एक फूट रुन्द असा खड्डा खोदतो अन् तो पानांनी भरून काढतो. पाने पिकू लागली की त्यात अुष्णता अुत्पन्न होते. नन्तर नर आपल्या चोचीने त्यात एक भोक पाडून आवश्यक तितकी अुष्णता आहे की नाही, याचा अंदाज घेतो. जरूर वाटली, तर रेती कमी करतो. मादी आठवड्याला एक, या प्रमाणे सहा महिने अंडी घालत जाते. नंतर दर आठवड्याला एक, या प्रमाणे अंड्यातून पिल्ले बाहेर पडू लागतात.



## भारतात राक्षसी पाली

आपल्या देशातही डायनोसोर्स नावाच्या राक्षसी पाली होत्या, यावर विश्वास ठेवणे भाग पडत आहे. गुजरायेतल्या खेरे जिल्ह्यात अश्मावशेषात परिवर्तित झालेली सुमारे १००० अंडी गेल्या दहा वर्षात सापडली आहेत. १२ से.मी. अुंच व ७ से.मी. लांबीची ही अंडी अश्मात रुपान्तरित झाल्यामुळे चांगलीच वजनदार आहेत. ही अंडी डायनोसोर्सचीच असल्याचा शास्त्रज्ञांचा अन्दाज आहे. पंजाब विश्वविद्यालयातील संशोधकांच्या मते ती ६५,०००,००० वर्षापूर्वीची असावीत.



विशेष बातम्या

# इटली-नवीन गणराज्य



एकूण असे दिसत आहे की, गेली चाळीस वर्षे राज्याची धुरा संभाळणाऱ्या ख्रिश्चयन डेमोक्रॅटिक पक्ष व वामपंथी मित्रांना विसरून जायचा इटलीने निश्चय केला आहे; आणि म्हणूनच यावेळी वामपंथी पक्षांचे नेतृत्व धुडकावून देऊन त्यांनी इतर पक्षांना संधी दिली आहे. गेल्या मार्चच्या २७,२८ तारखांना ज्या प्रमुख निवडणुकी झाल्या त्यात ख्रिश्चन डेमोक्रॅटिक पक्ष अन् त्यांच्या इतर वामपंथी पक्षांपेक्षा संसदेत राइटविंग पार्टीचेच जास्त अुमेदवार निवडून आले. 'फौजी इटालिया'चे अध्यक्ष सिल्व्हिया बेर्लुस्कोनी हे युद्धानंतरचे ५३ वे सरकार लवकरच बनवणार आहेत. असे मानले जात आहे की, या सरकारद्वारा देश पुन्हा 'फेडरल रिपब्लिक' च्या रूपात परिवर्तित होण्याची शक्यता आहे.

'फौजी इटालिया' पक्षाला १५५, फ्राकोफेनीच्या नेतृत्वाखाली असलेल्या 'नॉर्दर्न अलायन्स' पक्षाला १०५ जागा मिळाल्या. अंबर्टी बोस्सीच्या 'नॉर्दर्न लीग' ला १०६ जागा प्राप्त झाल्या. हे तिन्ही पक्ष राइटिस्ट होते. या तीन पक्षांच्या एकत्र येण्याने त्यांना शेकडा ५८ टक्के मते मिळाली. कम्यूनिस्ट पार्टी व तिचे मित्र-पक्ष यांना फक्त ३४टक्केच मते मिळाली. फेडरल पद्धति पुन्हा स्थापित करून घटनेत आवश्यक ते बदल करण्याचा निर्णय या दोन पक्षांनी मिळून घेतला. घटनेतील बदलाबाबतचे प्रस्ताव आम जनतेपुढे मांडून तिची स्वीकृति मिळविण्याची या पक्षांची योजना आहे. या फेडरल पद्धतीनुसार आम जनता अध्यक्षाची निवड करील. लोकसभा प्रधान मंत्र्याची निवड करील.

इटलीच्या एका बाजूला ॲड्रियाटिक समुद्र आहे, दुसऱ्या बाजूला अयोनियन समुद्र असून तिसऱ्या बाजूला भूमध्य समुद्र आहे. इटली एक द्वीप-समूह आहे. या समुद्रात सिसिली, सार्डीनिया इत्यादि बेटे असून ती इटलीतच मोडतात. इसवी सन पूर्व ५१० ते २७ पर्यंत या देशावर रोमन रिपब्लिकचे राज्य होते असे इतिहास सांगतो. इसवी सन पूर्व २७ ते ४७६ पर्यंत जे रोमन साम्राज्य स्थापित झाले त्याचा पाया ज्यूलियस सीझरने घातला.

रोमन साम्राज्याचे पतन झाल्यावर इटलीवर अनेकांनी आक्रमणे केली. इटलीचा खूप मोठा भूभाग १६

व्या १७ व्या शतकात स्पेनच्या ताब्यात होता. नंतर ऑस्ट्रियाने इथे शासन केले, व त्यानंतर फ्रान्सने. जेव्हा फ्रान्सचा सम्राट नेपोलियन सन १८१५ मध्ये वाटरलूच्या लढाईत पराभूत झाला, तेव्हा स्वतंत्रता व ऐक्यासाठी इटलीत आंदोलन सुरू झाले. ते १८७० मध्ये सफल झाले.

पहिल्या विश्व युद्धानंतर (१९१४ते १८) मुसोलिनीने 'फॅसिझम' नावाचे आंदोलन सुरू केले व केवळ तीन वर्षात तो प्रधान मंत्री बनला. तो हुकुमशहा बनला आणि जर्मनीच्या हुकुमशहा हिटलरशी त्याने हात-मिळवणी केली. तो दुसऱ्या विश्व-युद्धाचे कारण बनला. १९४३ मध्ये त्याला प्रधान-मंत्री पदावरून हटविण्यात आले. तो आपला देश सोडून चालला होता तेव्हा त्याला मारून टाकण्यात आले.

१९४६ मध्ये इटली स्वतंत्र गणराज्य बनला. परंतु आर्थिक अडचणींमुळे राजनैतिक क्षेत्रात खूप अस्थिरता निर्माण झाली. ४५ वर्षात ५२ वेळा सरकारे बनली. काही सरकारे तर काही दिवसच सत्तारूढ राहिली.

अलीकडे शासक पक्षांशी हातमिळवणी केली, त्यांना ही शासनात सहभागी केले. त्यामुळे परिस्थिति फार बिकट झाली. लाचलुचपत व अनीति खूप वाढली. प्रजेने याचा जबरदस्त विरोध केला.




या पार्श्वभूमीवर लोकांना काही क्रांतिकारी बदल व्हावा असे वाटू लागले. त्यांनी रायटिस्ट पक्षाकडे सर्व अधिकार-सूत्रे सोपविली. मुख्य पार्टी 'फौजी इटालिया' स्थापन झाल्याला तीनच महिने झाले आहेत. ५७ वर्षांचा त्या पार्टीचा नेता बर्लुस्कानी टी.व्ही. नेटवर्क वरील उच्चाधिकारी आहे. युरोप मधील एक संपन्न प्रकाशन-संस्था याच्या मालकीची आहे. बर्लुस्कानी जगातील एक अति-श्रीमंत माणूस आहे. लोकांनी त्याला आधुनिक सीझर म्हटले तर त्यात आश्चर्य ते काय?



# शिष्य जगन्नाथ

सीतापुरच्या विश्वनाथना तीन मुलगे. पैकी थोरला शेती करीत असे, अन् मधला व्यापार. पण तिसरा मुलगा जगन्नाथ याच्याबद्दल मात्र त्यांना काळजी लागून राहिली होती. कारण त्याचा पाय मुळी घरात टिकतच नसे.

जगन्नाथ नोकरी किंवा अन्य कसलाच उद्योग करीत नसला तरी गावात कोणाकडे काही शुभकार्य वगैरे असले की तेथे सगळा पुढाकार घेऊन सारी कामे पार पाडी. दहा माणसं हाता-खाली मिळवून तो त्यांच्याकडून कामे करवून घेई. पण असे करताना तो कधी कोणाला दुखवत मात्र नसे. त्यांच्याकडून अधिकाधिक कामे करवून घेऊन, जरा कंजूषीनेच का होईना, त्यांना मेहनतानाही मिळवून देत असे. सर्वजण म्हणत की जगन्नाथ हा एक 'व्यवहारी तरुण' आहे.

त्याच गावातील एका नातेवाईकाने आपली मुलगी कमलनयना हिच्यासाठी विश्वनाथकडे जगन्नाथ बद्दल प्रस्ताव आणला. पण विश्वनाथ म्हणाले, "माझा मुलगा जोपर्यन्त काही कमावण्यायोग्य होत नाही, तोपर्यन्त कशाच्या आधारावर त्याचं लग्न करून देऊ? ते करून देऊन त्याच्या बायकोचीही जबाबदारी मी काय स्वत:च्या अंगावर घेऊ?"

"आपला जगन्नाथ खूपच व्यवहारी आहे. त्याला वेदवनातल्या श्रद्धानंदाकडे पाठवा. तिथे त्याला योग्य शिक्षण मिळेल अन् माझी खात्री आहे की त्याला दरबारात नोकरी मिळेल." तो नातेवाईक म्हणाला.

श्रद्धानन्दचे नाव विश्वनाथांनीही खूप ऐकले होते. श्रद्धानन्द उगाच कुणाला ही आपला शिष्य बनवीत नाही, हे ही त्यांना माहीत होते. त्यांना शुल्क म्हणून खूप पैसे द्यावे लागतात.

मयूर तांबट



अन् अशा शिष्यांनाच राजदरबारात नौकरी मिळते. त्यांच्याकडे असेही काही शिष्य आहेत, की जे त्यांच्याकडे दहा-दहा वर्षे शिकतच आहेत.

नातेवाईकाची सूचना विश्वनाथांना खूपच आवडली, अन् आपल्या मुलाला वेदवनात पाठवायचा निश्चय त्यांनी केला. स्वतःच श्रद्धानन्दांना भेटून त्यांनी जगन्नाथ बद्दल सर्व काही त्यांना सांगितले.

"तुम्ही जे सांगितलेत त्यावरून तुमच्या मुलाला व्यवहारज्ञान बऱ्यापैकी आहे, असं वाटतंय. माझ्या परीक्षेला तो अुतरला, तर ठीक आहे, नाहीतर दरवर्षी तुम्हाला मला दोन हजार मोहोरा द्याव्या लागतील. शिक्षण पुरं व्हायला किती वर्षं लागतील, हे तुमच्या मुलाच्या बुद्धिमत्तेवर अवलंबून राहील." श्रद्धानन्द म्हणाले.

विश्वनाथने ताबडतोब दोन हजार मोहोरा पुढे ठेवून म्हटले, "तुम्ही माझ्या मुलाला कसल्या ही परीक्षेशिवायच प्रवेश द्या. मी दर वर्षी दोन हजार मोहोरा नक्की देईन." सीतापुरला पोचल्या बरोबर त्यांनी जगन्नाथला सर्व काही सांगितले.

जगन्नाथच्या मुळीच मनात नव्हते. तरीही पित्याच्या इच्छेखातर तो वेदवनात जाअून श्रद्धानन्दना भेटला. तो म्हणाला, "गुरुजी, मला माझ्या बाबांच्या पैशांच्या जोरावर नव्हे, तर स्वतःच्या लायकीच्या बळावर शिष्य बनायचंय. आपण माझी परीक्षा घेअू शकता."

"तुझी परीक्षा घ्यायला माझी काही हरकत नाहीय. पण तुझा पिता अन् मी बोलणी करून सर्व काही ठरवून चुकलोत. माझ्या परीक्षेस अुतरलास, तरी आमच्या बोलण्याच्या अटी तुला पाळाव्याच लागतील." श्रद्धानन्द म्हणाले.

जगन्नाथ कबूल झाला. श्रद्धानन्दांनी त्याला अनेक प्रश्न विचारले. त्याच्या अुत्तरांवर खूश होअून ते म्हणाले, "माझा शिष्य बनून तू नक्कीच माझी कीर्ती वाढवशील. मोठा माणूस बनायला तुला फार दिवसही लागणार नाहीत."

गुरूजींच्या बोलण्याचा जगन्नाथलाही आनन्द वाटला अन् त्यांचा शिष्य म्हणून तो त्यांच्याजवळ राहू लागला.

सहा महिने निघून गेले. वेदवनात श्रद्धानन्दला आणखी ही खूपसे विद्यार्थी मिळाले. जगन्नाथ लवकरच त्या सर्वांनाही प्रिय वाटू लागला. त्यांच्यातल्या मदन नावाच्या शिष्याशी त्याची विशेष मैत्री जमली.

मदनला जगन्नाथच्या बुद्धिमत्तेबद्दल आश्चर्य वाटे. तो त्याला विचारी, "तुला तर खूपशा विषयांचं पूर्ण ज्ञान आहे. गुरुजी तुला हे सर्व सर्व कसं काय शिकवू शकतात?"

"माझं जे ज्ञान आहे,ते सर्व सांसारिक विषयांचंच आहे. मी हे सारं गुरुजींकडून नाही शिकलो." जगन्नाथने सांगितले; पण मदनचा यावर विश्वास बसत नव्हता.

मदनचे वडील अन् श्रद्धानन्द यांच्यात ठरलेल्या अटींप्रमाणे त्यांना गुरुजींना वर्षाला फक्त पाचशे मोहोरा द्यायच्या होत्या. त्यामुळे त्याला शंका होती की, आपली फी कमी असल्यामुळेच गुरुजी आपल्याबाबत फारशी रुचि दाखवत नाहीत."

जगन्नाथच्या लक्षात आले की, येथील बऱ्याचशा शिष्याच्या मनात अशाच प्रकारच्या निरनिराळ्या शंका आहेत. जे काहीच शुल्क देत नसत, किंवा जे खूपच कमी देत असत, त्यांच्या मनात तर अशा शंका जास्तच आहेत.

श्रद्धानन्द जे शिकवत असत, त्यात व्यावहारिक ज्ञानाचा जराही अन्तर्भाव नसे;



त्यामुळे त्यांच्या शंका जास्तच दृढ होत गेल्या.

गुरु आपल्या आसनावर बसून पर्वत कसा चढावा, मल्लयुद्ध कसे करावे, पाण्यात पोहावे कसे इ. अगदी सविस्तर सांगत. पर्वताचे स्वरूप अन् स्वभाव कसा असतो, मानवी शरीराची रचना कशी आहे, जलप्रवाहाची लक्षणे काय असतात यांबद्दल त्यांना खडा न् खडा माहिती होती. श्रद्धानन्द स्वतः आश्रम सोडून कोठेच जात नसत. ते म्हणत की, पायी जास्त चालून आपले पाय दुखतात.

शारीरिक कष्ट केल्याने ते दुखू लागते, म्हणून मल्लयुद्धाबद्दलच्या बोलण्यात ते सूक्ष्मतेने सारे वर्णन करीत, पण स्वतः कुस्ती करून ते कधीच दाखवत नसत. स्वतः नदीवर पोहायला ते



कधीच जात नसत, कारण 'पाण्यात बुडून मरायचा धोका असल्याबद्दल' त्यांना एका ज्योतिषाने सांगितले होते. शिष्य विहिरीचे पाणी आणून देत, त्यानेच ते स्नान करीत.

जगन्नाथ मनातल्या मनात खूपदा असा विचार करी की, असल्या गुरूकडून शिकायचं तरी काय? गुरुजींनी त्यांना पाककला शिकवायला सुरुवात केली. कोणकोणत्या पदार्थाचे कायकाय वैशिष्ट्य असते, अन् त्यातली कोणती सामग्री वापरून एकादा पदार्थ जास्त रुचकर बनवता येईल वगैरे माहिती ते सांगत, तेंव्हा विद्यार्थ्यांच्या तोंडाला पाणी सुटे. पण आश्रमात पक्वान्ने खाणे निषिद्ध असून कन्दमुळेच खाणे सक्तीचे असे. एक वर्षभर शिकवून झाल्यावर श्रद्धानन्दांनी पुन्हा तेच पाठ शिकवले.

राजधानीतून प्रदीप नावाचा एक माणूस एकदा श्रद्धानन्दना भेटून निमन्त्रण देण्यासाठी आला.

हा प्रदीप एक वर्ष श्रद्धानन्दचा शिष्य बनून आश्रमात राहिला होता. वर्षभर शिकल्यानन्तर त्याला राजदरबारात नोकरी मिळाली व तिथे त्याला चांगली कीर्ती ही प्राप्त झाली. त्याच्या कामाबद्दल संतुष्ट होऊन राजा त्याचा सत्कार करणार होता. या सत्कार समारंभाचे आपल्या गुरुजींना आमंत्रण देण्यासाठीच तो आश्रमात आला होता. शिष्याच्या आग्रहावरून श्रद्धानन्द आपल्या अन्य शिष्यांसह राजधानीला गेले. तेथे मोठाच समारंभ आयोजित केलेला होता. समारंभात राजाने प्रदीपला दहा हजार मोहोरा भेट दिल्या. त्याच्या सन्मानार्थ राजाने कवींकडून खास कवने रचून घेतली होती. अन् राजाने राजनर्तकीच्या नृत्याचा कार्यक्रम ठेवून सर्वांचे मनोरंजनही केले.

या सत्कारसमारंभात प्रदीपने गुरुजी श्रद्धानन्दांना मंचावर बोलावून त्यांचे पदवंदन केले. त्याने जाहीर केले की, ''आज मी ज्या स्थितीत आहे, त्याचे श्रेय सर्वस्वी माझ्या गुरुजींचेच आहे.''

आपल्या भाषणात श्रद्धानन्द म्हणाले, ''मी माझ्या या शिष्योत्तमाला पहिल्याच दिवशी म्हटलं होतं की-तू चांगल्या उच्च स्थानी पोचशील, अन् माझं नाव सर्वतोमुखी करशील. हे असंच होणार हे मी प्रथमच ओळखलं होतं. मी या बद्दल अतिप्रसन्न आहे.''

आपल्या गुरुजींच्या भाषणाने जगन्नाथला आनन्द झाला. जवळ बसलेल्या मदनला तो म्हणाला, ''मी ज्या दिवशी शिष्य बनलो ना, त्या दिवशी गुरुजी मलाही अगदी असंच म्हणाले होते. शिष्य बनून मला आता सहा वर्षें झाली, अन् अजून किती दिवस हा विद्याभ्यास चालणार आहे कुणास ठाऊक! हा प्रदीप मोठा धोरणी म्हणायला हवा. त्यानं एका वर्षातच ओळखलं की, 'या गुरुजीं जवळ शिकण्यासारखं आहेच काय मुळी?' तो आश्रमातून निघून गेला, अन् आता पहा कसा उच्च स्थानी बसलाय! मी काही असं करू शकलो नाही.'' असले विचार डोक्यात थैमान घालत राहिल्याने त्या रात्री जगन्नाथला झोप येईना.

दुसऱ्या दिवशी राजा श्रद्धानन्दांना भेटून म्हणाला, ''माझ्या दरबारात कोषाध्यक्षांचं स्थान रिकामं आहे. आपल्या एकाद्या सुयोग्य शिष्याचं नाव सुचवावं मला!''

श्रद्धानन्द आपल्या शिष्यांकडे पाहू लागले. पट्कन उभा राहून जगन्नाथ म्हणाला, ''मला असं वाटतं की माझा विद्याभ्यास आता पूर्ण झालाय. गुरुजी अनुमति देत असतील तर हे काम करायची माझी तयारी आहे.''

त्याला अनुमति देत गुरुजी म्हणाले, ''तुझाही लवकरच असा सन्मान होईल. त्यावेळी या गुरूला विसरू नकोस हं!'' जगन्नाथ गुरुजींच्या पाया पडला.

आता जगन्नाथला बाजूला घेऊन मदन



म्हणाला, "पाहिलीस आपल्या गुरुजींची पक्षपाती वृत्ती? तुझ्या बाबांनी दोन हजार मोहोरा दिल्यामुळे गुरुजींनी तुला नोकरी देववली, अन् त्यासाठी तू कृतज्ञ होऊन जन्मभर त्यांची आठवण ठेवणार. अशा तऱ्हेनं ते श्रेष्ठ गुरु मानले जाणार अन् आमच्यासारखे निष्पाप शिष्य मात्र कायम त्यांच्याजवळच रहाणार."

मदनच्या पाठीवर थोपटत जगन्नाथ म्हणाला, "तुझा गैरसमज होतो आहे. कारण ते तर साऱ्या शिष्यांना सारखंच शिकवतात ना? पण ते जे काही शिकवतात त्यात एक खोल रहस्य आहे. फक्त पुस्तकातूनच आपण जे शिकतो ते व्यर्थ असतं. अनुभवाशिवाय आपण पर्वत चढू शकणार नाही, युद्ध करू शकणार नाही, पाण्यात पोहू शकणार नाही, की अुत्तम स्वयंपाक ही करू शकणार नाही. जीवनात अनुभव हाच प्रमुख! हे रहस्य आपण जोवर समजू शकत नाही, तोपर्यन्त आपलं शिक्षण अर्धवट आहे, असंच आपण समजायला हवं. प्रदीपनं ते रहस्य लवकर जाणलं, म्हणून वर्षभरातच आपलं शिक्षण संपवून निघून गेला. त्यानं जीवनात अनुभवाला योग्य महत्त्व दिलं. एक वर्ष संपल्यावर गुरुजी जेव्हा जुनेच पाठ पुन्हा शिकवू लागले, तेव्हा आपल्याला ही वास्तविकता कळायला हवी होती. गुरुजींनी अप्रत्यक्षपणे ते आपल्याला दाखवून दिलं. न बोलताच आपलं शिक्षण संपल्याचं त्यांनी सुचवलं. खरी व्यावहारिक माणसं समजावून सांगत नसतात हे सारं! फक्त अप्रत्यक्ष सूचना करतात."

जगन्नाथच्या तीक्ष्ण बुद्धीची प्रशंसा करत मदन म्हणाला, "आत्ता मला कळलं की दोष गुरुजींचा नव्हे. आता या ज्ञानाचा फायदा घेऊन काही दिवस गुरुजींची सेवा करीन अन् नन्तर मी ही बाहेरच्या जगात पाय ठेवीन."

जगन्नाथ राजदरबाराची नोकरी करू लागला. नन्तर कमलनयनाशी विवाह करून आपली योग्यता व अनुभवाच्या बळावर तो अुच्चपदी पोचला. त्याच्यामुळे त्याच्या गुरुजींची ही कीर्ती वाढली.





# कीर्तिसिंह

कोसलराज्यावर राजा सुषेण राज्य करीत असे. जयसेन हा त्याचा निकटतम मित्र होता. तो केवळ मित्रच नव्हे, तर राजाचा सल्लागारही होता. बुद्धिबळाचा खेळ खेळण्याचे वेड असलेला राजा सुषेण स्वतः इतकाच प्रवीण असलेल्या जयसेनशी नेहमी बुद्धिबळेही खेळत असे. दोघे जण खेळायला लागले की त्यांना वेळेचे भान रहात नसे, खाण्या-पिण्याची शुद्ध रहात नसे.

जयसेनने एके दिवशी राजाला खेळात हरवले अन् हसतहसत म्हणाला, "जगाची ही रीत कशी आहे कळत नाही मला! तुम्हाला हरवण्यात मला आत्ता जितका आनन्द झालाय त्याहीपेक्षा जास्त मला आपल्या मुलीकडून मात खाण्यात होतो! तो आनन्द वर्णनातीत आहे!"

राजा यापूर्वीही ऐकून होता की जयसेनची एकुलती एक कन्या शक्तिसेना ही केवळ सौन्दर्यवतीच नव्हे, तर चांगली गुणी अन् बुद्धिशालीही आहे. पण जसे काही आपण काहीच जाणत नसल्याचा आव आणत राजाने विचारले "अं? इतकी प्रवीण आहे मुलगी तुझी?"

"हो तर! वाटलं तर परीक्षाच घेऊन पहा तिची!" अशा मुलीचा पिता असल्याबद्दलचा अभिमान जयसेनच्या अुद्गारात पुरेपूर दिसत होता.

"नक्कीच! अुद्याच रात्री येतो मी तुझ्याकडे. तुझा पाहुणचार घेईन अन् बरोबरच तुझ्या शक्तिसेनाचं बुद्धिबळातलं कौशल्यही पाहीन.



तुला बुद्धिबळात हरवणारी ही तुझी मुलगी एकदा पाहिलीच पाहिजे. टाकू एक-दोन डाव तिच्या बरोबर.'' राजाही हसत म्हणाला.

''हो, हो! जरूर या!'' जयसेनने दुजोरा दिला.

म्हटल्या प्रमाणे दुसऱ्या दिवशी राजा सुषेण जयसेनकडे जाअून शक्तिसेनाशी बुद्धिबळे खेळला. मोठ्या चपलतेने आपली प्यादी हलवत शक्तिसेनाने राजाला तीन वेळा मात दिली.

शक्तिसेनाचे चातुर्य, बुद्धिमत्ता व सौन्दर्य यांवर राजा मुग्ध झाला. बुद्धि व सौंदर्य यांचा असा सुरेख संगम आजपर्यंत राजाने पाहिला नव्हता.

जयसेनचा पाहुणचार स्वीकारत राजा म्हणाला, ''शक्तिसेना सारख्या मुलीचा पिता असल्याबद्दल मी तुझं अभिनन्दन करतो जयसेन! पण ही मुलगी नसून, मुलगा असता, तर आणखीच छान झालं असतं. पण ते तुझ्या भाग्यात नाही.''

''तुमचं म्हणणं नाकारणं माझ्या जिवावर येतंय. माझी मुलगी शस्त्र अन् शास्त्रातही चांगलीच प्रवीण आहे. तिच्यापुढे एकाद्या पुरुषाची ही काय मातब्बरी! पराक्रमी म्हणवल्या जाणाऱ्या कित्येक पुरुषांपेक्षा माझी शक्तिसेना अुत्तम आहे. खरोखरच अशा मुलीचा बाप म्हणवायला मला फार अभिमान वाटतो, असीम आनन्द वाटतो!'' जयसेन अभिमानाने म्हणाला.

त्याच्या या गर्वोक्तिने राजाच्या अभिमानाला धक्का पोचला. तो म्हणाला, ''म्हणजे तुला असं म्हणायचंय, की माझा मुलगा कीर्तिसिंह याच्यापेक्षाही तुझी शक्तिसेना अधिक योग्य अन् सक्षम आहे; असंच ना?''

राजाकडून अशा प्रकारच्या प्रश्नाची जयसेनला अपेक्षा नव्हती! तो एकदम घाबरूनच गेला. तो काही म्हणणार, इतक्यात त्याला टोकत राजा म्हणाला, ''घाबरू नकोस. मी तुझ्या मुलीची एक परीक्षा घेईन. त्यात ती अुत्तीर्ण झाली, तर सून बनवीन तिला मी आपली, अन् अनुत्तीर्ण झाली, तर आपलीच मुलगी मानून तिला सासरी पाठवायची



जबाबदारी अुचलीन. कबूल माझी अट? जरा नीट विचार करून सांग.''

अन्य काही अुपायच नसल्याने जयसेनने 'हो' म्हटले.

''मग ऐक तर. तुला माहीतच आहे, की माझा कीर्तिसिंह सध्या अुत्तरेकडील अरवली पर्वत प्रदेशातल्या कृष्णचन्द्र यांच्या गुरुकुलात शिकत आहे. कुलगुरु त्याची खूपच तारीफ करत असतात. येत्या पौर्णिमेला आपला तिथला विद्याभ्यास संपवून तो एकटाच राजधानीकडे येणार आहे. तुझ्या मुलीने शक्तिसेनाने त्याला वाटेतच अडवून पूर्वेकडील जंगलाकडे वळवायचं काम करायचं आहे. त्या जंगलात शक्तिदेवीचं एक प्राचीन मंदिर असल्याचं तुला माहीतच आहे. शक्तिसेनानं कीर्तिसिंहला या मंदिरात तीन दिवस कैद करून ठेवलं पाहिजे. हे काम तिनं एकटीनंच करायचं आहे, कुणाचीही मदत वगैरे घ्यायची नाही. तिनं अन्यत्र कुठेही नव्हे, तर या मंदिरातच त्याला ठेवलं पाहिजे. ती हे सारं करू शकली,तर मी तिला आपली सून करून घेईन.''

राजाच्या या अटी ऐकून जयसेन घाबरून गेला. अवाकच झाला तो. त्याची बुद्धी चालेनाशी झाली. एकदोन मिनिटे अशी गेल्यावर त्याने एकदम राजाचे हात पकडले अन् तो म्हणाला, ''महाराज, पितृगर्वाच्या नशेत येअून जे जे बकलो, ते सारं परत घेतो मी! क्षमा करा मला! पण एका स्त्रीची अशी कठोर



परीक्षा घेणं तुम्हालाही शोभत नाही.''

राजा सुषेण एकदम गंभीर झाला. ''असं आहे होय? जरा आपल्या मुलीला समोर तर बोलाव.''

जयसेनने शक्तिसेनेला बोलावून घेतले. सर्व काही नीट समजावून सांगून राजा तिला म्हणाला, ''मुली, तुझ्या पित्याच्या मनात केवळ पितृगर्वच नव्हे, तर पितृभीतीही आहे. म्हणून मी तुलाच विचारतो, की तुला हे सारं मान्य आहे? मान्य नसेल तर तसं ही सांगायला भिऊ नकोस मुली!''

शक्तिसेनाने तावडतोब मस्तक झुकवून म्हटले, ''मान्य आहे मला काका!'' तिचे अुत्तर ऐकून जयसेनला मात्र धक्काच बसला.



मन्दपणे हसत राजा सुषेणने त्याची पाठ थोपटली अन् तो आपल्या राजवाड्याकडे निघून गेला.

राजा गेल्यावर शक्तिसेना जयसेनजवळ येअून बसली आणि म्हणाली, ''इतकं काही भ्यायचं कारण नाही बाबा! माझ्या कर्तृत्वाबाबत जरा ही शंका नको आपल्या मनात.''

तिचे बोलणे ऐकून जयसेन म्हणाला, ''अग, एकदा मान्य केल्यावर भिअून अुपयोगही काय म्हणा! पण शेवटी मी एक बाप आहे, हे तुलाही माहीतच आहे. तो राजकुमार कृष्णचन्द्रसारख्या गुरूचा प्रिय शिष्य आहे. राजनीती, युद्धकला आणि व्यवहारज्ञानात त्याच्या बरोबरीचं कोणी नाहीच. अशा माणसाला फसवून कैद करणं सोपं नव्हे. अन् शिवाय हे काम तू एकटीनंच करायचंय. तू हे कठीण काम कसं करू शकशील. याचंच भय आहे मला! काही झालं तरी तू स्त्री आहेस हे विसरून कसं चालेल?''

पण शक्तिसेनाने निर्भयपणे पित्याला विचारले, ''पण महाराजांना सुद्धा हे सगळं माहीत आहे नं? तरीही, मला असं सांगा बाबा, ते आपली अशी कठोर परीक्षा का घेत आहेत?''

जयसेन एकदम आवेशात येअून म्हणाला, ''आणखी कशासाठी? मला तुझ्या योग्यते बद्दल जो गर्व आहे, तो मोडायचा आहे त्यांना. म्हणूनच त्यांनी ही वाट शोधलीय. माझा गर्व हरण करण्याची नामी संधी त्यांना भिळाला आहे.''

शक्तिसेनाला एकदम हसू आले. ती म्हणाली, ''प्रेमामुळे माणूस बलहीन बनतो. ते माणसाची दिशाभूल करतं. तुम्ही स्वतःच याचं अुदाहरण आहात. बाबा, प्रत्येक निकृष्ट अशा भावनेची एक अुत्तम स्थिति असते. एक विद्यार्थी, दुसऱ्या समर्थ विद्यार्थ्याचा मनोमन द्वेष करतो, त्याच्याशी स्पर्धा करायचा प्रयत्न करतो. द्वेष ही निकृष्ट भावनांची अुत्तम स्थिती आहे. त्याचप्रमाणे पितृगर्व हीही गर्वभावनेची अुत्तम स्थिती होय. अशा अुत्तम स्थितीचा विनाश करू पहाणं, अधमपणाचं होईल. मला असं वाटतंय की, आपले महाराज काही अधम नव्हेत. त्यांच्या या प्रस्तावामागे नक्कीच काहीतरी गूढ अर्थ असला पाहिजे. माझ्या म्हणण्याचा नीट विचार केलात, तर तुम्हालाही सत्य काय आहे, ते कळून चुकेल बाबा. जरा शांतपणे विचार करावा आपण.''

मुलीच्या बोलण्याने लज्जित होअून जयसेन म्हणाला, ''होय, तुझं म्हणणं खरं आहे. महाराज अशा अधम लोकांपैकी नव्हेत.'' जयसेन असंच काहीतरी नंतर स्वतःशी बडबडत, विचार करीत राहिला. त्याला पाहून असे वाटत होते की, आत्ता आत्ताच त्याची नशा अुतरत चालली आहे.

थोड्या वेळाने मस्तक अुचलून प्रेमभराने आपल्या मुलीकडे पहात, लांब श्वास सोडत जयसेन म्हणाला, ''बाळ, मला एका गैरसमजातून वाचवलंस तू. आपली कल्पना बरोबर असेल, -देव करो, ती बरोबरच असो- तर तुला बरंच काही सांगायचंय मला! नीट लक्ष देअून ऐक.''

''राजा सुषेण अन् माझी मैत्री खूप पूर्वीपासूनची आहे. खूप पिढ्यांपासून आपल्या घरण्यातल्या लोकांवर कोसल राजघराण्यातल्या राजांचं प्रेम आहे. आपले पूर्वज नेहमीच या राजांचे खास सल्लागार म्हणून राहिलेले आहेत. हे बंधुत्व माझ्या आजोबांच्या पणजोबांपासून सुरू झालंय. त्यांचं अन् माझं नाव एकच. ते बहुमुखी प्रतिभाशाली होते. मुख्यतः तंत्रमंत्र विद्येत त्यांचा हात धरू शकणारा देश-विदेशातही दुसरा कोणी नव्हता.





त्या वेळचे महाराज विचित्रवर्मा यांना तान्त्रिक विद्येत चांगली रुचि होती. त्या विषयाचं त्यांना थोडं फार ज्ञानही होतं. या विद्येत पारंगत असलेल्या आपल्या पूर्वज जयसेनाबद्दल त्यांच्या कानी आलं. त्या दोघांच्या भेटीचं रूपान्तर मैत्रीत झालं. आपले 'खास सल्लागार' असे पद देऊन महाराजांनी त्यांचा सत्कार केला. सर्वशास्त्रपारंगत, उदार आणि उत्तम अशा राजाच्या मैत्रीमुळे जयसेन प्रसन्न झाले. काही काळातच दोघं जिवाभावाचे मित्र बनले. महाराजांसाठी आपले प्राणही द्यायची जयसेनांची तयारी असे.

जयसेनांच्या तान्त्रिक विद्येच्या ज्ञानाच्या सहाय्याने ते दोघे आपल्या राज्यात अदृश्य रूपाने हिंडत असत; प्रजेची सुखदुःखं समजून घेत असत, चोरबदमाशांना पकडून शिक्षा करत अन् दीनदुःखी लोकांचं दुःख दूर करत.

अशा प्रकारे त्यांच्या राज्यकाळात प्रजा सुखी, शान्त असे. तिला कसलीही कमतरता भासत नसे. त्यांचं जीवन निष्कंटक चालू असे. चोर-दरोडेखोर महाराजांच्या नावानेच चळचळा कापत.

महाराजांच्या एका वाढदिवशी जयसेनांनी त्यांना एक मोत्यांचा हार भेट दिला. हार काही साधासुधा नव्हता. अद्भुत अशा मांत्रिक शक्ती त्यात होत्या. शुद्ध मोत्यांच्या त्या हारात नवरत्नंही जडवलेली होती.

सर्वसाधारण हारांसारख्याच दिसणाऱ्या त्या हारात आपल्या सर्व शक्तींचा वापर करून जयसेनांनी त्यात तीन अद्भुत शक्तींची स्थापना केली होती. तो हार गळ्यात घातला, की त्या व्यक्तीला अदृश्य रूपात हवे तिथे जाता येईल; समोरचा माणूस खरं बोलतोय का खोटं, हे ताबडतोब समजून येईल आणि तिसरी सर्वात महत्वाची शक्ती म्हणजे जमिनीच्या आत असणाऱ्या खजिन्याचा पत्ता लागेल. महाराजांबद्दलचा जो अपार आदर आणि प्रेम जयसेनांच्या मनात होतं, त्यांचं फळ म्हणजेच तो हार!

त्या हाराची वैशिष्ट्यं कळल्यावर महाराज अवाक् झाले! त्यांचं हृदय कृतज्ञतेनं भरून आलं. जयसेनचं प्रेम, विश्वास आणि मैत्रीच्या



स्मरणाने त्यांच्या डोळ्यात अश्रू तराळून आले.

असेच दिवस जात राहिले; आणि एकदा जयसेनने दिलेला हार घालून महाराज विचित्रवर्मा परिवारासह शिकारीला गेले. प्रकृति बरोबर नसल्यामुळे जयसेन त्यावेळी महाराजांबरोबर जंगलाकडे जाऊ शकले नाहीत. ते राजधानीतच राहिले.

दिवसभर शिकार केल्यानन्तर महाराज आणि बाकी सर्वजण शिबिरात परतले.

पहारेकरी सोडून बाकी सर्वचजण झोपून गेले. पण महाराजांना झोप येईना. अशान्त होऊन ते शिबिराबाहेर आले अन् निरुद्देश्य इकडेतिकडे फिरू लागले. पहारेकरी महाराजांची विचित्र चर्या पाहून त्यांच्या मागेमागे जात राहिले.

अचानक एका ठिकाणी महाराज थांबले अन् ताबडतोब तिथली जमीन खोदायची आज्ञा त्यांनी दिली. थोड्याच वेळात ते स्थान मशालींच्या उजेडातच झगमगू लागले. रात्री सुरू केलेलं खोदकाम दुसऱ्या दिवशी दुपारपर्यन्त चालूच राहिलं.

दुपारी भूगर्भात त्यांना शक्ति देवीची एक काळी मूर्ति सापडली. तिच्या नाकात हिऱ्याची एक चमकी होती. ती मूर्ति पहाताच महाराजांना अपार आनन्द झाला. आनन्दावर काबू मिळवत त्यांनी ती मूर्ती ताबडतोब राजधानीत घेऊन जायची आज्ञा दिली.

भाग्य की दुर्भाग्य कुणास ठाऊक, पण मन्त्री प्रल्हाद याने महाराजांना आटकाव केला. तो म्हणाला की आगमशास्त्रज्ञ आणि तान्त्रिक यांनी परवानगी देईपर्यन्त मूर्ती इथून हलवू नये. तसं केल्याने कदाचित् काही अशुभही घडेल. असे सांगून त्याने महाराजांना सावधान केले.''

मोठ्या अनिच्छेनेच महाराज गप्प राहिले अन् रक्षणासाठी काही सैनिकांना तेथे ठेवून बाकीच्या परिवारासह महाराज राजधानीला परतले.

क्रमशः





# वेताळ कथा

## राजा- एक मोठा, एक छोटा

दृढनिश्चयी विक्रमराजा पुन्हा त्या झाडाकडे गेला. प्रेत आपल्या खांद्यावर लादून तो स्मशानाकडे चालू लागला. तेंव्हा त्या प्रेतात निवास करणारा वेताळ बोलू लागला, ''राजा, कुठलं तरी महान् ध्येय गाठण्यासाठीच तू हे कठोर श्रम करतो आहेस असं वाटतंय. पण कार्य पुरं व्हायची वेळ जवळ आली की नेमक्या त्याच वेळी काहीजण आपलं ध्येय, उद्देश विसरून अगदी विरुद्ध वर्तणुक करतात, अन् त्यांचं कार्य फसतं. कमलाकर नावाच्या एका बुद्धिमान माणसाची गोष्ट मी तुला सांगतो.''

अन् वेताळ गोष्ट सांगू लागला:-

त्रिपुर राज्याचा राजा होता सुमन्त. त्याच्या शासनकाळात राजकर्मचाऱ्यांत लाचलुचपत फारच वाढली.प्रजा जे कर देई, ते सारे या लाचखोरांच्या खिशात जात. त्यामुळे खजिना रिकामा होई. तो रिकामा झाला की राजा करवाढ करी. कराच्या रूपानं आलेलं धन



काही दिवस पुरे. अन् पुन्हा करवाढ डोक्यावर बसे.

त्रिपुरदेशच्या चन्द्रावती नगरात कमलाकर हा बुद्धिमान माणूस रहात असे. कोणती ही अडचण तो चुटकीसरशी सोडवून दाखवी. कित्येक लोक त्याचा सल्ला मागायला येत. पुढे देशात दुष्काळ पडल्याने त्याच्याकडे लोकांचं येणं जाणं बन्द झालं. प्रजेला काही मिळकतच राहिली नाही. करही पुन्हापुन्हा वाढत राहिले. ही परिस्थिति कमलाकरच्याने पहावेना. तो थेट राजधानीत पोचला.

राजाला भेटू इच्छिणाऱ्या प्रत्येकाला समीर नावाच्या राजकर्मचाऱ्याची परवानगी घ्यावी लागत असे. समीरला भेटणं म्हणजे सोपी गोष्ट नव्हती. त्याच्या घराच्या पहाऱ्यावर असणाऱ्या नोकराला अगोदर दोन मोहोरा देऊ कराव्या लागल्या, तेंव्हाच कमलाकरची समीरशी भेट होऊ शकली.

समीरने प्रथम विचारल, "राजाशी तुमचं काय काम आहे?"

"प्रजेला जेंव्हा हरतऱ्हेचे कष्ट सहन करावे लागतात, तेंव्हा राजाचं कर्तव्य असतं की राजाने जनतेला मदत करावी. पण आपले महाराज तसं न करता, उलट लोकांवर नवनवे कर लादत आहेत. मी या गोष्टीकडे त्यांचं लक्ष वेधून त्यांना त्यांची चूक समजावून देऊ इच्छित आहे." कमलाकर उत्तरला.

"महाराजांना सगळं काही कळतं आहे. पण खजिनाच रिकामा असेल, तर ते तरी बिचारे काय करतील?" समीर बोलला.

"ती अडचण सोडवायचा मार्ग जाणणाऱ्यालाच राजा व्हायचा हक्क असतो. त्यांना जर तो मार्ग माहीत नसेल, तर मी त्यांना तो सांगू शकेन." कमलाकरने सांगितले.

"हं:! महाराजांना भेटायला कित्येक लुंगी-सुंगी माणसंही येतात. त्यांना अडवण्यासाठीच तर माझी नेमणुक झालीय. तुम्ही मला शंभर मोहोरा द्या; मी तुम्हाला कनिष्ठ मन्त्र्यांकडे पाठवीन. ते तुम्हाला मधल्यांकडे पाठवतील. नंतर मधले तुम्हाला वरिष्ठ मन्त्र्यांकडे रवाना करतील. या साऱ्यांना संतुष्ट केलंत, तरच तुम्हाला महाराजांना भेटता येईल. मीच या सर्वांच्यात कमी पैसे घेणारा आहे." समीरने अगदी नि:संकोचपणे सांगून टाकलं.

कमलाकरला कळून चुकलं की राजाचं दर्शन अशक्य आहे, अन् तो फारच निराश झाला. राजधानीतून निघून तो जंगलाकडे निघाला. तिथे त्याला एक मुनि भेटला. त्याला पाहून मुनि म्हणाला, "बरं झालं तू अगदी योग्य वेळी भेटलास मला. मी हिमालयाकडे निघून चाललोय. माझ्याजवळ एक फार शक्तिशाली अंगठी आहे.

या अंगठीला एक पांढरा खडा जडवलेला आहे. वाईट माणसाशी गाठ पडली तर तो पांढरा खडा निळा होतो. बोटावर ती अंगठी घालणाराने पंचाक्षरी मन्त्राचा उच्चार केला, तर मनात असेल, ते त्याला मिळतं."

मुनीनं कमलाकरच्या बोटावर अंगठी चढवली अन् मुनीला प्रणाम करून कमलाकर पुढे निघाला. अंगठीच्या प्रभावाच्या सहाय्याने तो लगेच आपल्या घरी जाऊन आपल्या कुटुंबियांना म्हणाला की, "आपण सर्वजण आता राजाधानीत रहायला जाऊ."

अंगठीच्या महात्म्यामुळेच एका संपन्न व्यक्तीने कमलाकरला आपलं घर फुकट रहायला दिलं.

राजाधानीचं शहर खूपच विशाल होतं. तिथे सामान्य माणसांना भेटून कमलाकर लाचखाऊ माणसांची माहिती काढत राहिला. असे लोक तिथे एक दोन नव्हते, तर हजारोंनी होते! तो प्रथम नगरातल्या प्रमुख व्यापाऱ्याकडे गेला. त्याच्यासमोर पोचताच अंगठीतला पांढरा





खडा निळा झाला. हा माणूस अनैतिक असल्याचे त्याला तावडतोब कळून चुकले. कमलाकर त्याला म्हणाला, ''तू एक थोर पापी माणूस आहेस. तू मला दरमहिना दहा हजार मोहोरा देत रहा, म्हणजे तुझी पापं धुवून जातील, माझं ऐकलं नाहीस, तर तुझे हातपाय लुळे पडून जातील.''

व्यापारी कमलाकरच्या धमकीला मुळीच घाबरला नाही. कमलाकरने पंचाक्षरी मन्त्र मनातल्या मनात तीनदा उच्चारला, अन् काय! तो व्यापारी तिथल्या तिथे खाली कोसळला. त्याचे हातपायच कामातून गेले! घाबरून जाऊन त्याने कमलाकरला रक्कम देण्याची व्यवस्था केली. अशा प्रकारे कमलाकर अनेक अनैतिक लोकांना भेटला अन् त्यांना धमक्या देऊन त्याने त्यांच्या त्यांच्या आर्थिक स्थितीप्रमाणे धन उकळले. त्याने अशीही व्यवस्था करून ठेवली, की त्याला दरमहिना धन मिळत राहील.

कमलाकर आता एका सुन्दरशा महालात राहू लागला. आपण गरीबांना मदत करू इच्छित असल्याची घोषणा त्याने देववली. मोठ्या संख्येने लोक त्याच्याकडे येऊ लागले.

सामान्य जनतेत कमलाकरची खूप कीर्ती झाली. नीतिभ्रष्ट अधिकारी प्रथम राजाकडे कमलाकर विरुद्ध तक्रार करायला धजावले नाहीत. पण हळूहळू धैर्य एकवटून त्यांनी राजाच्या कानी तक्रार नोंदवली. राजाने ती वरिष्ठ मन्त्र्याला सांगितली. वरिष्ठाकडून कनिष्ठापर्यन्त पोचून शेवटी ती समीरच्याही कानी आली. दहा सैनिक बरोबर घेऊन तो कमलाकरच्या घरी धडकला.

कमलाकर म्हणाला, ''प्रथम स्वतःच्या पापांची कैफियत दे.''

''माझ्याकडे कैफियत मागायची हिंमत झाली तुला? मग तर तुला तुरुंगातच डांबायला हवं. मी सैनिकही आणलेत बरोबर.'' समीर खेकसलाच.

''वा! छान केलंस. प्रथम तुझे ते शेंदाडशिपाई घरी पाठवून आणखी पाच हजार मोहोरा मागवून घे अन् दर महिन्याला अशीच रक्कम पाठवत रहा माझ्याकडे. म्हणजे तुझी आपल्या पापांतून मुक्तता होईल, अन् पुण्य कमवू लागशील, समजलं?'' असं म्हणून कमलाकरने मनात तीनदा पंचाक्षरी मंत्राचा जप केला. बास! समीर तिथल्या तिथे खाली कोसळला. घरून पाच हजार मोहोरा मागवून दिल्यावरच तो ठीक झाला.

मधल्या आणि वरिष्ठ मन्त्र्यांचीही अशीच गत झाली. ते ही कमलाकरला मोठमोठ्या रकमा देऊ लागले.

राजाला हे सर्व समजले. कमलाकर कोणी सर्वसामान्य माणूस नसून तो एक असाधारण व खास व्यक्ति आहे हे कळायला त्याला वेळ लागला नाही. राजा स्वतःच कमलाकरला भेटायला निघाला.

कमलाकरने राजाला चरणस्पर्श करून वन्दन केलं. चकित होऊन राजा म्हणाला, ''तुझ्या बाबतीत मी बरंच काही ऐकलंय, पण माझ्याबद्दल तुझ्या मनात इतका आदर असेलसं नव्हतं वाटलं मला?''

''मी तर आपल्यापेक्षाही मोठा राजा आहे. तरीही अनीतीला नीतीचे पाय धरायला हवेतच ना.'' कमलाकर म्हणाला.

''म्हणजे असा अर्थ होतो की तू अनैतिक आहेस! तू हे मान्यही करतोस! मग जाणून बुजून अनीतीचा मार्ग का स्वीकारलास?'' राजाने त्याला विचारलं.

''मी म्हणालो ना, की मी मोठा राजा आहे, पण आपण काही हरकत घेतली नाहीत. म्हणजेच आपण मान्य करता की, आपण ते मान्य करता?'' कमलाकर बोलला.



''मी एक सर्वसामान्य राजा आहे, पण तुझ्याजवळ तर मन्त्रशक्ती आहे. तेव्हा मानलंच पाहिजे की तूंच मोठा राजा आहेस.'' राजाने कबुली देत म्हटले.

कमलाकर हसत म्हणाला, ''आपण राजावंशात जन्मलात, अन् म्हणून आपण राजा बनलात. ज्या सिंहासनावर बसता त्या सिंहासनाने आपणाला काही विशेष अधिकारही दिले आहेत, त्यामुळेच प्रजा आपल्यावर लादलेले कर आपणाला देते. मग आपणच सांगा बरं, आपल्या दोघांच्यात काय फरक आहे?''

''खजिना रिकामा झाला, तर कर वाढवणं हे अनुचित तर नक्कीच नव्हे ना? राजाला



प्रजेसाठी काही करायचं असेल, तर प्रजेनं त्याला पैसा तर द्यायला हवा नं?'' राजाने आपली बाजू मांडली.

''पण खजिना रिकामा होतो कसा? राजाकर्मचारीच त्या धनाचा दुरुपयोग करतात, हा विचार कधी केलाय आपण? आपले अधिकारी आणि व्यापारी यांनी अनीतीच्या सीमाच ओलांडल्या आहेत!'' कमलाकरने सांगितले.

''अगदी खोटं आहे हे! माझ्या राज्यात अनीति मुळीच नाहीये. तूच एकटा असा माणूस आहेस की जो अनीतिकारक मार्ग अनुसरत आहेस!'' राजा रागाने बोलला.

''मी कसा काय अनैतिक ठरू शकतो? प्रजेवर अवलंबून असणारे एक लहान राजे आहात आपण! अन् मी अवलंबून आहे भारी अनैतिक व्यक्तींच्या पैशांवर! म्हणूनच मी मोठा राजा. आपणच जरा नीट विचार करून पहा!'' कमलाकर म्हणाला.

कमलाकरच्या बोलण्याने राजाच्या डोक्यात चांगलाच प्रकाश पडला. कमलाकरला त्याने वचन दिले की-''इथून पुढे मी कोणत्याही प्रकारची अनीति होऊन देणार नाही. स्वार्थी अन् अनैतिक लोकांना अगदी कडक शिक्षा ठोठावीन. न्यायाने राज्यकारभार चालवीन.''

कमलाकरने आता राजाला अंगठीचं रहस्य सांगितलं. राजाने त्याच्याकडे ती अंगठी मागितली. पण नकार देत कमलाकर म्हणाला, ''नाही महाराज, या जन्मात अंगठी माझ्या-जवळच राहील अन् नन्तर ती माझ्या वारसांकडे जाईल. पण आपण मात्र आपलं वचन विसरू नये हं!'' अशा तऱ्हेनं राजाला रावध करून कमलाकर आपल्या गावाकडे परत निघाला. वाटेत त्याने ती अंगठी एका सरोवरात फेकून दिली.

अशी पूर्ण गोष्ट सांगून वेताळ म्हणाला, ''राजा, कमलाकर बुद्धिमान आहे, जनकल्याणाची इच्छा करणारा आहे. पण तुला नाही वाटत, की त्याचं वागणं अविवेकी आहे? राजा असमर्थ अन् प्रजेबाबत उदासीन आहे. सुचारुपणे राज्य चालवण्याचं सामर्थ्य त्याच्या अंगी नाहीय. मग कमलाकरनं स्वतः राजा बनून शासनाच्या नाड्या आपल्या हाती घ्यायला हव्या होत्या. पण त्यानं तर ती सुवर्णसंधी हातून घालवली. राजाला त्यानं सांगितलं की अंगठी माझ्याचजवळ राहील आणि माझ्यानन्तर ती माझ्या वारसांकडे जाईल. पण त्यानं तर ती वाटेत एका सरोवरात टाकून दिली. वेडेपणाच नव्हे का हा त्याचा? राजाला दिली असती तर त्या अंगठीच्या साह्यानं स्वार्थी अधिकाऱ्यांना ताब्यात ठेवू शकला असता तो. माझ्या या शंकांचं अुत्तर माहीत असूनही सांगायचं टाळलंस, तर तुला माहीतच आहे राजा, तुझ्या मस्तकाची छकलं होऊन पडतील.''

वेताळाचे शंकानिरसन करत राजा म्हणाला, ''कमलाकर राजधानीतून बाहेर पडला अन् त्याला मुनीकडून एक शक्तिशाली अंगठी प्राप्त झाली. स्वतः राजा बनायचं त्याच्या कधीच मनात आलं नाही. त्यामुळे 'कमलाकर ने संधी घालवली' हे म्हणणं निराधार आहे. राजानं अंगठी मागूनही ती न देण्यात त्याने आपली बुद्धिमत्ताच सिद्ध केली, कारण राजाने आपलं शासन चातुर्य आणि अधिकाराच्या बळावर चालवणं योग्य असतं. मन्त्रतंत्राच्या बळावर चालवायचा प्रयत्न केल्यास दुष्परिणाम होण्याची शक्यता असते, हे सत्यच कमलाकर राजाला सुचवू इच्छित होता. 'अंगठी माझ्या-कडे अन् माझ्या वारसांकडेच राहील' असं म्हणण्यातला त्याचा अुद्देश-राजाने चुकीची कामं करू नयेत इतकाच होता. गावी जाता जाता अंगठी त्यानं पाण्यात टाकून दिली, हे तर त्याच्या तार्किक दृष्टीचं ज्वलन्त अुदाहरणच आहे. अंगठी त्याच्या वारसांकडे गेल्यावर त्यांच्यापैकी कोणी स्वार्थीपणानं तिचा दुरुपयोग केला, तर सारं राज्य नष्टभ्रष्ट होईल. बिचारी प्रजा अुगीचच संकटात सापडेल. म्हणूनच कमलाकरनं ती महिमामयी अंगठी सरोवरात फेकली.''

अशा प्रकारे राजाचे मौनभंग करण्यात या वेळीही वेताळ सफल झाला अन् लगेच त्याच्या खांद्यावरून अदृश्य होऊन झाडाकडे गेला.



# चतुर राजकन्या

अवन्ती देशची राजाकन्या अुमा तारुण्यात पदार्पण करताकरता केवळ युद्धकलेतच नव्हे, तर शासनासंबंधीच्या विषयातही चांगलीच पारंगत झाली. तिचा आता विवाह करून द्यावा असे राजाला वाटले. योग्य वरासाठी त्याने आसपासच्या सर्व राजपुत्रांना बोलावणे केले आणि त्यांच्या आपापसात निरनिराळ्या स्पर्धा आयोजित केल्या. त्यात पुष्पवन्त आणि विक्रमार्क हे दोघे सर्वच विद्यात सारखेच पारंगत असल्याचे सिद्ध झाले. आता राजापुढे समस्या अुभी राहिली.

तो आपल्या कन्येला म्हणाला, ''आपण ठेवलेल्या चढाओढींचा परिणाम तुला कळलाच आहे. तेव्हा अुद्या सकाळी दोन कागदांवर या दोघांची नावं लिहून त्यांच्या घड्या मी तुझ्या समोर ठेवीन. आपल्या साऱ्या कुटुंबियांसमोर तू त्यातली एक चिठ्ठी अुचलायचीस. त्यात ज्याचं नाव असेल, तोच तुझा भावी पती असेल.''

त्या दोन्ही राजपुत्रात तिला विक्रमार्क जास्त पसन्त होता, पण पुष्पवन्त आपल्या मित्राचा पुत्र असल्याने राजाच्या मनात तोच जावई व्हावा असे होते. आपल्या सखीकडून राजकुमारीला कळले की राजाने दोन्ही चिठ्ठ्यांवर पुष्पवन्तचेच नाव लिहिले आहे.

दुसऱ्या दिवशी राजाने सर्वांच्या अुपस्थितीत चिठ्ठ्या ठेवलेले सुवर्णपात्र राजकन्येसमोर धरले. राजकन्येने त्यातला एक कागद अुचलला अन् तो अुघडून म्हणाली - ''नाव अुच्चारायला मला लाज वाटतेय. तेव्हा दुसरी शिल्लक चिठ्ठी तुम्हीच अुघडून वाचा नं! म्हणजे माझ्या हातातल्या कागदावरचं दुसरं नाव माझ्या पतीचं असेल - बरोबर ना?''

दोन्ही कागदांवर पुष्पवन्तचेच नाव असल्याने आपल्या हातातल्या कागदावरचे त्याचे नाव राजाला अुच्चारावेच लागले. अन् राजकन्येला आपोआपच हव्या असलेल्या पतीची प्राप्ती झाली! तिच्या बुद्धिमत्तेची मनातल्या मनात तारीफ करून राजाने विक्रमार्क बरोबर तिचा विवाह थाटामाटाने करून दिला.



## चान्दोबा पुरवणी-६७

### आपल्या देशाची वृक्षसंपदा

### बोधिवृक्ष



सिद्धार्थ अनेक वर्षे बोधिवृक्षाखाली बसून राहिला आणि नन्तरच त्याला ज्ञानप्राप्ती झाली; म्हणूनच त्याचे नाव 'बुद्ध' असे पडले. हा वृक्ष ज्या ठिकाणी आहे, त्या ठिकाणाचे नाव पडले बुद्धगया. हे स्थान चांगले प्रसिद्ध झाले. सम्राट अशोकाने बौद्ध धर्म ग्रहण केला. त्याने आपली कन्या संघमित्रा हिला बौद्ध धर्माच्या प्रसारासाठी श्रीलंकेत पाठवले. तिने आपल्याबरोबर या बोधिवृक्षाची फान्दी नेली होती. इ.स. पू. २८८ मधे श्रीलंकेतील अनुराधापुर येथे या फान्दीचे वृक्षारोपण करण्यात आले. जवळजवळ २,५०० वर्षांपूर्वी लावलेला हा वृक्ष आजही तेथे अस्तित्वात आहे.

संस्कृतमधे या वृक्षाला 'अश्वत्थ वृक्ष' असे म्हणतात, लैटिनमधे याला 'फेकस रिलिजियेसलिन' म्हणतात. हा वृक्ष पवित्र मानला जातो. साधारणतः देवळे व गावांमधोमध भोवती पार बांधून हे वृक्ष लावलेले आढळतात. हा वृक्ष लावणाऱ्याला पुण्य प्राप्त होते, असे मानले जाते. या वृक्षाची मुळे जमिनीत खूप दूरवर पसरतात. सहसा कोणी हे वृक्ष किंवा त्याच्या फांद्या तोडत नाहीत.

बोधिवृक्षाची पाने हृदयाच्या आकाराची असून चकचकीत व चिवट असतात. पानाचे टोक शेपटीसारखे असते. पाने नेहमी खाली लोंबत्या स्थितीत असल्यामुळे थोड्याशा वाऱ्यानेही सळसळ आवाज करत ती हलू लागतात. मराठीत आपण याला 'पिंपळ' असे म्हणतो. याची फळे पक्षी मोठ्या आवडीने खातात अन् बिया कुठेही टाकून देतात. त्यामुळे ओसाड इमारतींच्या भितीतून किंवा चबूतऱ्यांना पडलेल्या भेगेतून ही रोपे अुगवलेली आढळतात.




## त्रिपीटिका

**गौ**तम बुद्धाचा जन्म, बोधिवृक्षाखाली त्याला झालेली ज्ञानप्राप्ती अन् त्याचा भौतिक देहाचा त्याग- या तीन्ही घटना वैशाख पौर्णिमेलाच घडल्या. त्यामुळे वैशाख पौर्णिमेला बौद्ध-पौर्णिमा असेही म्हणतात.

'मानवजीवन हे दु:खांनी भरलेले असते; म्हणून ज्ञानी लोकांनी 'निर्वाणप्राप्ती' साठी प्रयत्न करावा. त्यामुळे माणसाला जन्ममरणाच्या फेऱ्यातून मुक्ती मिळून 'मोक्षप्राप्ती' होते'. असा अुपदेश बुद्धाने ई.स.पू. ५६६ या काळात दिला. त्यांनी आपल्या शिष्यांना असा अुपदेश दिला की, दु:खाचे मूळ 'इच्छा' हीच होय. तेंव्हा या इच्छांचा त्याग केल्याने कर्मबन्धनातून मुक्ती मिळून 'निर्वाणप्राप्ती' होते. परन्तु त्याचे अुपदेश त्याच्या जीवनकाळात 'अक्षरबद्ध' झाले नाहीत. त्याच्या शिष्यांनीही ते लिपिबद्ध करायचा प्रयत्न केला नाही. परन्तु बौद्ध पंडितांनी ते अुत्तम प्रकारे मुखोद्गत करून शिष्य-परंपरेने जतन केले. बुद्धाच्या देहत्यागानन्तर दोनशे बर्षांनी सम्राट अशोकाने बौद्ध पंडितांना पाचारण करून ते अुपदेश क्रमवार लिहवून घेतले. बुद्धाचे हे अुपदेश तीन भागात संकलित झालेले आहेत. म्हणूनच त्यांना 'त्रिपीटिका' अंसे म्हटले जाते. पीटिका म्हणजे पेटी किंवा टोपली.

विनयपीटिकेत आध्यात्मिक समाजाला आवश्यक असे नीतिनियम सांगितलेले आहेत. अर्थात त्यांचे अंतिम ध्येय 'निर्वाण' हेच आहे. यासाठी कोणत्या प्रकारची जीवन-पद्धति आचरणात आणावयास हवी याबद्दल सुत्तपीटक व अभिधम्मपीटक यात सर्व समजावून सांगितलेले आहे. या तिनात सुत्तपीटक हे प्रमुख आहे. यातून ग्रहण केलेली ४८३ सूत्रेच 'धम्मपद' नावाच्या ग्रन्थात संग्रहित केलेली आहेत. आणि हा ग्रन्थही सुप्रसिद्ध आहे.

त्रिपीटिके त्या काळात प्रचलित अशा पाली भाषेत लिहिलेली आहेत. सध्या मात्र ही भाषा काही मोजक्या पंडितांनाच अवगत आहे. त्रिपीटिकेतील सूत्रे लयबद्ध असून गंभीर अशा भावांनी गर्भित आहेत. अुदाहरणार्थ ही दोन सूत्रे पहा- ''द्वेषाचा अन्त कधी ही द्वेषाने होत नाही; अद्वेषानेच द्वेषाचा




अन्त होतो.'' ''फुलांचा सुगन्ध वहात्या हवेसमोर टिकू शकत नाही, परन्तु प्रामाणिक व्यक्तीचा सुंगध (प्रभाव) मात्र सुखदु:खे व अुतारचढाव यांना तोंड देतदेत दाही दिशा भरून टाकतो.''

त्रिपीटिका बौद्ध धर्माचे आधारभूत ग्रंथ आहेत. याशिवाय बौद्ध जातक कथा ही प्रमुख आहेत. या कथा बोधिसत्व बनलेल्या बुद्धाच्या विविध अशा पूर्वजन्मांचे विवरण देतात अन् त्याबरोबरच त्यांनी निरनिराळे प्राणी बनून घेतलेल्या जन्माचीही माहिती देतात. विविध प्रकारच्या जन्मांमुळे पृथ्वीवरील जीवनात त्यांना जे अनुभव आले, त्यांचे सार या ग्रंथांमधे आहे. बोधिसत्व हे नीती व प्रामाणिकता यांचे प्रतीक होते. त्यांनी मानवांना आदर्श अशा अुत्तम धर्माचे आचरण करायला शिकवले.



# तुम्हाला माहीत आहे का?

१. यहुदींच्या राज्याची स्थापना कोणी केली?
२. रेडक्रॉस आन्दोलनाची स्थापना कोणी केली?
३. दक्षिण अमेरिकेतील 'बोलिव्हिया' ला हे नाव कसे मिळाले?
४. महम्मद पैगंबरानन्तर झालेला पहिला खलिफा कोण होता?
५. क्विनाइन नावाचे औषध ज्यापासून बनते त्या झाडाचे नाव काय?
६. १९६४मधे साहित्याबद्दल मिळालेले नोबेल पारितोषिक नाकारणारा फ्रेंच तत्त्ववेत्ता कोण?
७. पृथ्वी गोल आहे, हा सिद्धान्त प्रथम कोणी प्रस्तुत केला?
८. इग्रजांची मदत घेअून आपल्या देशावर आक्रमण करणारा पहिला आक्रमक कोण?
९. 'चन्द्र स्वयंप्रकाशी नाही' हे प्रथम सांगणारा ग्रीक तत्त्ववेत्ता कोण?
१०. आफ्रिकेतील सर्वात मोठा प्रान्त कोणता?
११. बौद्ध मताच्या दोन प्रधान शाखा कोणत्या?
१२. अमेरिकेचे अध्यक्षपद केवळ एकच महिना भूषवणारा नेता कोण?
१३. युरोपमधील एका देशाची राजधानी वीस बेटांवर वसलेली आहे. त्या देशाचे व राजधानीचे नाव काय?
१४. पंधराव्या शतकात छपाई मशीनचा शोध कोणी लावला?
१५. जपानमधे 'लिखित राज्यघटना' अुपयोगात आणणारा सम्राट कोण होता?
१६. जगातील पहिली महिला प्रधानमन्त्री कोण?

## अुत्तरे

१. अब्राहम.
२. हेन्री ड्यूनाँट.
३. स्पेन देशाला १८२५ मधे सायम बोलीवस याने स्वातन्त्र्य मिळवून दिले. त्याच्या नावावरूनच हे नाव पडले.
४. अबू बकर.
५. सिंकोना.
६. जाँ पॉल सार्त.
७. पायथागोरस.
८. बाबर.
९. अॅनाक्सा गोरस.
१०. सुदान.
११. हीनयान व महायान.
१२. एकोणिसावा अध्यक्ष-विल्यम हेन्री हॅरिसन.
१३. स्वीडनची राजधानी स्टॉकहोम.
१४. जोहान गटेनबर्ग.
१५. मेजी सम्राट.
१६. श्रीलंकेची प्रधानमन्त्री सिरिमाओ बंदरनायके.



# शास्त्रीबुवांची सून

रायपुरमधे रामशास्त्री नावाचा एक संपन्न पुरोहित होता. त्याला कृष्णशास्त्री नावाचा एक विवाहयोग्य मुलगा होता. या मुलाने एक अुत्तम बुद्धिमान मुलगा म्हणून गावात चांगले नाव मिळवले होते. रामशास्त्रीला वाटे, की आपल्या या मुलाचा विवाह एकाद्या सुयोग्य बुद्धिमान मुलीशीच व्हावा. त्यांनी तीन-चार मुली पाहिल्याही होत्या. त्या सर्व दिसायला सुंदर होत्याच; पण रामशास्त्रीच्या मते त्यातली एकही आपल्या मुलायोग्य बुद्धिमान नव्हती. त्यांच्या दृष्टीने याहून सरस मुलगी आपल्या मुलाला मिळायला हवी.

शेजारच्या सीतारामपुरहून त्यांचा एक नातेवाईक एक स्थळ सांगून आला. तो म्हणाला की, त्याच्या गावच्या धर्मशास्त्री याची मुलगी आपल्या कृष्णशास्त्रीसाठी अगदी योग्य अशी आहे. अगदी निःसंकोचपणे रामशास्त्रीने तिला आपली सून करून घ्यावी.

मुलगी पहाण्यासाठी बायको व मुलाला बरोबर घेअून रामशास्त्री त्या गावी गेले. घरासमोर टांग्याचा आवाज ऐकून धर्मशास्त्री बाहेर आला. टांग्यातून अुतरणारा रामशास्त्री त्याने पाहिला व लगेच पुढे होअून त्याने त्या सर्वांचे स्वागत केले. तो म्हणाला, "तुमचे बंधु सीताराम शास्त्री यांनी तुम्ही येत असल्याबद्दल सांगितलं होतं." अन् तो त्यांना घरात घेअून गेला.

थोड्याच वेळात धर्मशास्त्रीची बायको आपली मुलगी राधा हिला जरा ठीकठाक सजवून बाहेर घेअून आली. पाहुण्यासमोर येअून राधाने त्यांना वाकून नमस्कार केला अन् समोर चटईवर खाली मान घालून बसली. मुलीचे सौंदर्य व तिची नम्रता पाहून रामशास्त्री प्रसन्न झाला. आजपर्यंत पाहिलेल्या मुलीत ही सर्वांहून

सरस्वती काळे



सरस होती निश्चितच! आता फक्त तिच्या बुद्धिमत्तेचा अंदाज घ्यायचा बाकी होता.

धर्मशास्त्री रामशास्त्रीला आपल्या कुटुंबाची माहिती देत म्हणाला, ''मला तीन मुली अन् एक मुलगा आहे. राधाच सर्वात मोठी. बाकीच्या दोघीजणी कालच सणानिमित्त आपल्या मामाकडे गेल्या आहेत. त्या एक अठवडा भर मामाकडेच राहतील. त्यांना मामाचा गाव फार आवडतो.

रामशास्त्री त्याला म्हणाला, ''धर्मशास्त्री, तुमची मुलगी तर अगदी सोन्याची पुतळीच दिसतेय. तिच्या बुद्धिमत्तेची परीक्षा माझा मुलगा कृष्णशास्त्रीच करील. त्यात ही अुत्तीर्ण झाली, तर हा संबंध पक्का झाला असंच समजा. माझ्या मुलाने तिला प्रश्न विचारायला आपली हरकत नाही ना?''

''होऽ, खुशाल घेअू देत परीक्षा. माझी राधा दिसायला फक्त रतीच नव्हे, तर विद्येतही सरस्वती आहे. आपणाला प्रत्यक्ष दिसेलच. हवे ते प्रश्न विचारू देत कृष्णशास्त्री.'' धर्मशास्त्री म्हणाला.

पित्याने इशारा करताच कृष्णशास्त्रीने राधाला पहिला प्रश्न विचारला, ''तुमच्या घरात मूलतःच आरशाचे शत्रु किती? अमळ विचार करून उत्तर दिले तरी चालेल.''

राधा हसून अुत्तरली, ''माझ्या बहिणी अन् माझा भाअू सर्वचजण आरशाचे अुत्तम मित्र आहेत. शत्रु कोणीच नाहीत आमच्या घरात.''

कृष्णशास्त्रीने पटकन विचारले, ''स्वतः बद्दल नाही सांगितलंत?''

''हातचं काकणही कोणी आरशात पहातं काय?'' राधाने प्रतिप्रश्न केला.

''ठीक आहे. आता असं सांगा की, अगोदर तुमच्या घरात आरशाचे मित्र किती होते? अन् आता त्यातले किती शत्रु बनलेत?'' कृष्णशास्त्रीने विचारले.

''माझ्या आजीतच फक्त असं परिवर्तन झालंय. पण ती ही नुकतीच वारली.'' राधाने अुत्तरादाखल सांगितले.

''तुमच्या गावातही महिन्यातून एकदा अमावास्या असते? की त्याही रात्री पौर्णिमाच असते?'' कृष्णशास्त्रीने राधाला निरुत्तर





करण्याच्या आवेशात पुढचा प्रश्न केला.

''आमच्या गावात अमावास्येच्या रात्रीही पौर्णिमाच फुललेली असते. खरं म्हणजे आजपर्यन्त आमच्या गावात कोणी अमावास्या कधी पाहिलीच नाही.'' राधाने आत्मविश्वासाने अुत्तर दिले.

''अुन्हाळ्यात ही तुमच्या गावच्या शेतात पक्षी येतात?'' कृष्णशास्त्रीने पुढील प्रश्न विचारला.

''आमच्या गावच्या सर्वच शेतात, सगळ्या ऋतूंत पक्षी येत रहातात.'' राधाने चतुराईने उत्तर दिले.

''हं! ठीक. तुमचे वडील आकाशासारखा विशाल मांडव अन् भूदेवी सारखं मोठं बोहोलं बनवून आपला विवाह करून देअू शकतील काय?'' कृष्णशास्त्रीने खोडसाळ प्रश्न विचारला.

''इतक्या मोठ्या प्रमाणावर लग्न करून दिलं, तर आमचं घर म्हणजे आकाशच बनेल. असं नाही का तुम्हाला वाटत?'' राधा धीटपणे अुत्तरली.

रामशास्त्री इतका वेळ सारी प्रश्नोत्तरे लक्षपूर्वक ऐकत होता. आता मधेच मुलाला थांबवत म्हणाला, ''आता आणखी प्रश्न विचारायची गरज नाही. मुलगी केवळ सुंदरच नव्हे, तर त्याही पेक्षा अधिक बुद्धिमानही आहे.'' अन् धर्मशास्त्रीला तो म्हणाला, ''आपली मुलगी आम्हाल एकदम पसंत! आता अुशीर नको. पंचांग पाहून मुहूर्त नक्की करा.''

प्रसन्न होत धर्मशास्त्री म्हणाला, ''वा! फारच छान!''

धर्मशास्त्री व त्याच्या पत्नीचा निरोप घेअून रामशास्त्री परिवारासह परत निघण्यासाठी टांग्यात बसला.

थोडे अंतर गेल्यावर रामशास्त्रीची पत्नी म्हणाली, ''कृष्णानं विचारलेले प्रश्न अन् मुलींची अुत्तरं मला मुळीच कळली नाहीत.''

यावर हसून रामशास्त्री म्हणाला, ''तुला कळलं नाही, हे माझ्या लक्षात आलंच. थांब, सांगतो समजावून. कृष्णानं प्रथम विचारलं की, मूलतः तुमच्या घरात आरशाचे शत्रू किती. याचा अर्थ असा की त्यांच्या घरात जन्मापासून

कुरुप माणसं किती? राधाचं अुत्तर आलं की आपली सारीच भावंडं आरशाची चांगली मित्र आहेत. तिचं अुत्तर चांगलंच चातुर्याचं होतं. अुत्तराचा अर्थ असा की ते सर्वजण दिसायला सुस्वरूप आहेत. दुसऱ्या प्रश्नाचं अुत्तर देताना अप्रत्यक्षपणे तिने सुचवले की हातच्या काकणासारख्या आपल्या सौन्दर्याला आरशाची गरजच नाही.''

प्रथम आरशाचे मित्र असून नंतर शत्रु बनले-याचा अर्थ असा की तारुण्यात चांगलं सौन्दर्य असूनही, आता वृद्धत्वामुळे आरशात रूप पहाण्याची गरज नसणारे लोक असतात. कृष्णाच्या प्रश्नाचा रोख घरातल्या वृद्धांकडे होता, अन् त्या चतुर मुलीनं सांगितलं की, अशी फक्त आजीच त्यांच्या घरी होती, पण आता ती स्वर्गवासी झालीय.''

नन्तर आपल्या मुलानं विचारलं की सीतारामपुरात महिन्यातून एकदा अमावस्या असते की त्याही दिवशी पौर्णिमाच असते. अन् ती म्हणाली की, अमावस्येचा प्रश्नच नाही. इथे तर नेहमी पौर्णिमाच असते. अर्थ असा की, गावात भरपूर अुजेडाची सोय असल्याने कोणी अमावास्या अनुभवलीच नाही.

पुढला प्रश्न होता की, अुन्हाळ्यात शेतात पक्षी येतात का. या गावात अुन्हाळ्यातही पिकं येतात, कारण गावातले तलाव आणि विहिरींना भरपूर पाणी असल्याने वर्षभर पिकं येतच असतात. लोकानां पावसावर अवलंबून रहावं लागत नाही. म्हणूनच राधा म्हणाली की, सर्वच ऋतूत इथे पक्षी येत असतात.

शेवटचा प्रश्न होता आकाशाएवढा मांडव अन् भूदेवी इतकं विस्तृत बोहोलं घालण्याचा. तिनं अुत्तर दिलं की इतका अधिक खर्च केला तर आकाशच आमचं घर होईल. म्हणजेच विवाहानंतर तिच्या मातापित्यांना घरदार विकून आकाशाखालीच रहावे लागेल. समजंल ना, आपली भावी सून किती अक्कलवान आहे?

यावर आश्चर्य प्रकट करत कृष्णशास्त्रीची आई म्हणाली ''ओहो! त्यांच्या प्रश्नोत्तरात इतका गूढार्थ लपलेला होता काय?''



# चान्दोबाच्या बातम्या




## श्वास रोखून ठेवण्याचे रेकॉर्ड

**ऑ**क्सिजन शिवाय अर्थात श्वास घेतल्याशिवाय माणूस किती वेळ राहू शकेल? याची परीक्षा गेल्या फेब्रुआरीत २५ तारखेला स्वीडनमधील एका जिओफिजिऑलॉजिकल लॅबोरेटरीत केली गेली. २७ वयाच्या पीटर हिर्वेल नावाच्या एका युवकाने या प्रयोगात भाग घेतला. आपल्या चेहऱ्यावर कोणतेही साधन न बसवता तो ६ मिनिटे व ३ सेकंदपर्यन्त पाण्यात पडून राहिला व त्याने नवे रेकॉर्ड प्रस्थापित केले.

## उत्तर ध्रुवावर एकट्याने पायी प्रवास






**इं**ग्लंडच्या रॉबर्ट हाडो याचे वय ३२ वर्षांचे आहे. हा साहसी युवक ६ मार्च रोजी एकटाच अुत्तरध्रुवाकडे पायी निघाला आहे. मार्गदर्शनासाठी त्याच्याजवळ कसलेही साधन नाही आणि कोणते वाहनही त्याच्याकडे नाही. इतकेच काय, पण त्याने ऑक्सिजनही बरोबर घेतलेला नाही. कॅनडाचे हार्ड हान्ट द्वीप अुत्तरध्रुवापासून ११०० कि.मी. अंतरावर आहे. तरीही त्याने हा प्रवास एकट्यानेच करायचा निश्चय केला. तो जर अुत्तरध्रुवावर पोचला, तर एकट्यानेच तेथे पोचणारा पहिला साहसी युवक ठरेल.

## पतंगांचा अुत्सव

**मा**र्चच्या शेवटच्या आठवड्यात थायलँडमध्ये 'आंतरराष्ट्रीय पतंगोत्सव' योजण्यात आला. या अुत्सवात बारा देशांनी भाग घेतला. राजधानी बँकॉकचे आकाश रंगीबेरंगी पतंगांनी भरून गेले. हे पतंग निरनिराळ्या आकारांचे व निरनिराळ्या रंगांनी सजवलेले होते. 'वॉरियर' नावाचा जपानचा, पाच मीटर लांबीचा इंडोनेशियाचा, सोनेरी रंगाचा मलेशियाचा, चंदेरी नेपाळचा व अमेरिकेचा 'नो विंड' नावाचा या पतंगांनी जनतेचे लक्ष आकर्षून घेतले, अनं त्यांची मने अुत्साहाने भरून टाकली.





# आजीचे प्रेम

खूप पूर्वीची गोष्ट आहे. श्रावस्ती नगरात सुमन्त नावाचा एक तरूण होता. पित्याच्या मृत्यूनंतर त्याने मोठ्या श्रद्धा व भक्तीने आपल्या आईची सेवा करायला सुरुवात केली. तिला तो कोठल्याही प्रकारचा त्रास होऊ देत नसे. त्याचा सगळा वेळ मातृसेवेतच व्यतीत होई, त्यामुळे तो काही नोकरीधन्दाही करत नसे. आई सुमन्तला म्हणे, ''अरे बेटा, पुरुष आहेस तू! अष्टौप्रहर माझीच सेवा करत बसून कसं चालेल? लग्न कर तू आता. माझी सेवा करायचं काम तुझी बायको करील.''

आईचे म्हणणे सुमन्तला ऐकावेच लागले. त्याने लग्न केले. त्याची बायको सुमती सुंदर होती. तो बायकोची मोठ्या प्रेमाने काळजी घेऊ लागला. सुमतीच्या लक्षात आले की सुमन्तचे आईवरही खूपच प्रेम आहे. तिच्या मनात आले, ''आई असतानाही हा माझी इतकी काळजी घेतोय, प्रेम करतोय; मग ती नसताना तर तो कित्ती प्रेम करील आपल्यावर!'' अन् तिने त्या मायलेकात वैमनस्य आणायचा, भांडणे लावून देण्याचा निश्चय केला. तिने आता सुमन्तजवळ सासूच्या कागाळ्या सांगायला सुरुवात केली, ''तुमच्या आईला मी केलेलं काहीच पसन्त पडत नाही. प्रत्येक कामात काही ना काही खोट काढतातच त्या! चांगलं गरम जेवण वाढलं, तर जास्त गरमच आहे; पाय नीट हळू-हळू दाबले, तरी कित्ती जोरात दाबतेस असं म्हणत असतात. खूप प्रयत्न करूनही त्यांना संतुष्ट ठेवणं जमत नाही मला.'' डोळ्यात अश्रु आणून सुमती हे सगळे सांगत राहिली.

सुमन्तचा तिच्या सांगण्यावर विश्वास बसला. त्याला वाटले की आपलं दांपत्य-जीवन सुखाचं पाहून ती सुनेचा दुस्वास करत आहे. एक दिवस तो आईला म्हणाला, ''आई, तुला इथं सुख लागत नाही असं दिसतंय. तुला आणखी कुठं जाऊन रहायचंय का? सुख लागेल तिथे रहा आपली तू!''

सुनेचा कट सासूच्या लक्षात आला. ती म्हणाली, ''बरं बाबा, जाईन मी!'' ती म्हातारी बिचारी गावातच आपल्या नातलगाकडे गेली. त्या घरातले काम करून, मिळेल ते खाऊन ती तेथे राहू लागली. तिचे सुखमय जीवन केंव्हाच मागे पडले.

सासू घरातून गेल्यावर सुमतीला दिवस गेले अन् एका गोंडस मुलाला तिने जन्म दिला. आसपासच्या बायकांजवळ ती बोलू लागली, ''पाहिलंत, सासूबाई कशा आहेत माझ्या? इथे होत्या तोवर काही मूल झालं नाही मला! दुस्वास करायच्या माझा?'' काहीजणींनी यावर विश्वासही ठेवला. त्यांच्यातल्या एकदोघीजणी म्हातारीकडे जाऊन म्हणाल्या, ''ऐकलंत तुमची सून काय म्हणते ते? ती म्हणते की, तुम्ही असेपर्यन्त काही मूल होऊ शकलं नाही, तुम्ही गेल्यावरच कूस उजवली तिची!''

हे ऐकल्यावर तर सुमन्तच्या आईचा राग अनावर झाला. ती म्हणाली, ''इतकं भयंकर बोलली ती? धर्मच नाहीसा झालेला दिसतोय तर! मी आता चांगलीच खबर घेते तिची!'' आणि तांदूळ, पाणी वगैरे घेऊन स्मशानात गेली. तिथे चूल पेटवून भात शिजवायला सुरुवात केली.

त्याच वेळी एक साधू तिथे उपस्थित झाला. त्याने म्हातारीला विचारले, ''आजीबाई, कोणी



मधुकर पाटील

मेलंय का तुमचं? इथे स्मशानात का शिजवत बसला आहात?''

''साधुमहाराज, तुम्हाला माहीत नाही. अहो, धर्म मेलाय धर्म! म्हणून त्याला पिंडदान करायच्या विचारात आहे.'' म्हातारी अुत्तरली.

''कोण म्हणतं धर्म मेलाय म्हणून?'' साधूने विचारले.

''दुसरं कोणी नाही. माझ्या सुनेच्या बोलण्यातच ते स्पष्ट झालंय. अधर्माची चलती आहे सध्या. सुनेनं घराबाहेर काढलंय मला. तिचं म्हणणं असं, की मी घराबाहेर गेल्यामुळेच ती माता होअू शकलीय. आता कबूल आहे नं, की धर्म मेलाय?'' तिच्या बोलण्यात राग अुसळत होता.

साधूने सारी हकिकत जाणून घेतली आणि म्हणाला, ''तुझ्या मुलानं अन् सुनेनं खरोखरच तुझ्यावर मोठा अन्याय केलाय. मी आपल्या तपोबलानं नाश करून टाकतो आता त्यांचा.'' अन् तो कमंडलूतील पाणी आपल्या हातावर घेअू लागला.

तितक्यात त्याला थांबवत म्हातारी म्हणाली, ''नको नको! असं नका करू साधूमहाराज! त्यांनी माझी निन्दा करून माझ्यावर अन्याय केला असेल, तर करू देत. पण ते दोघं मरून गेले, तर माझा नातू बिचारा अनाथ होईल.''

म्हातारीने तर अजून नातवाला पाहिलेही नव्हते; पण त्याच्यावरचे तिचे प्रेम पाहून साधु हसत हसत निघून गेला.

इतक्यात ही सारी गोष्ट गावभर पसरली. सुमन्त, सुमती अन् इतर लोक धावतपळत स्मशानात आले.

'आपला खेळ खतम् झाला' हे सून समजून चुकली. आपले कपट अुघडे पडेल हे जाणून ती म्हणाली, ''सासूबाई चुकलं माझं; तोंडाला येईल ते बोलले मी. क्षमा करा मला.'' अन् तिने सासूच्या पायांवर लोटांगण घातले.

म्हातारीही शान्त होअून त्यांच्याबरोबर आपल्या घरी गेली, नातवाला पाहून सार्‍या जुन्या गोष्टी ती विसरून गेली.





# वीर हनुमान

गंधमादन पर्वतावर हनुमान राम-नामाचा जप करीत ध्यानस्थ बसला होता, तेव्हा ब्रह्मदेव त्याच्यापाशी आले आणि म्हणाले- ''हनुमान, कलियुगाचा प्रादुर्भाव सुरू झालेला आहे. कलीचं नि तुझं जमणार नाही. या सर्व युगात क्षीरसागर सर्वात उत्तम होय. म्हणून तू ताबडतोब तिथे जा.''

क्षीरसागरात विष्णु शेष-शय्येवर पहुडले होते. तेथे तुंबर व नारद नित्य संगीत ऐकवीत बसत. नारद आपल्या महती वीणेच्या तारा छेडून आपले उत्तम कोटीचे भक्तिपूर्ण गायन करी. आपण ही नारदाप्रमाणे गाऊ शकतो हे सिद्ध करण्यासाठी तुंबर पण आपल्या हयग्रीव नावाच्या वीणे वर शास्त्रीय संगीत ऐकवीत असे. मधून मधून तो आपल्या वीणेवर अद्‌भुत मृदुंगाचे बोल ही काढी. या दोघांच्या अमृतोपम संगीताचा प्रवाह तेथे नित्य वहात असे.

तुंबर आणि नारद यांच्यात नेहमी संगीताची चढाओढ चाले. ते दोघे ही आपल्याला उत्तम संगीतज्ञ मानू लागले. दोघांमध्ये गर्वाची भावना निर्माण झाली. त्यांच्यातील गर्व, ईर्ष्या व द्वेष दिवसेंदिवस वाढू लागले. दोघे एकमेकांना पाण्यात पहात.

लहान-सहान गोष्टीवरून दोघे आपापसात निकराने भांडू लागले. संगीताची साधना करण्याऐवजी दोघे आपल्या वीणांचा शस्त्रासारखा उपयोग करू लागले. ते एकमेकांना शिव्या द्यायला ही मागे-पुढे पहात नसत. दोघे विष्णूकडे गेले आणि दोघात कोण अधिक श्रेष्ठ



संगीतज्ञ आहे याचा निर्णय विष्णूला करायला सांगितला. विष्णु योगनिद्रेत मग्न असल्यामुळे त्यांच्या या प्रश्नाचे उत्तर देऊ शकले नाहीत. तरी पण हे दोघे विष्णूच्या कानांपाशी जाऊन जोरजोरात गायन करून विचारू लागले-''आम्हा दोघात कोण श्रेष्ठ संगीतज्ञ आहे याचा निर्णय तुम्ही करणार की नाही? आम्ही दोघे मोठ्या आशेने आपणाकडे आलो आहोत. आपण आम्हाला शेवटी निराश करणार काय?'' अशा रीतीने दोघांनी विष्णूला महासंकटात टाकले.

एक दिवशी रागावून विष्णु म्हणाले-''तुम्हा दोघांच्या संगीताने मी शेवटी बेशुद्ध होऊन योगनिद्रेत जातो. त्यामुळे तुम्हा दोघांना श्रेष्ठ संगीतज्ञ कोण याबाबत मी निर्णय घेऊ शकत नाही. गंधमादन पर्वतावर एक वानर आहे. त्याला जाऊन सांगा की तुला रामाने बोलवले आहे. तो तुमच्या बरोबर येईल. त्या वानरा समोर तुम्ही दोघे तुमच्या संगीताचे प्रदर्शन करा. तुमच्या पैकी कोण श्रेष्ठ संगीतज्ञ याबाबत तोच योग्य निर्णय देईल.'' असे म्हणून विष्णूने त्या दोघांना हनुमानाकडे रवाना केले.

विष्णूचा हा सल्ला ऐकून तुंबर व नारद यांना आश्चर्य वाटले. पण करणार काय? दोघे ही गंधमादन पर्वतावर पोचले. हनुमानाचे रामनाम स्मरण त्यांनी दुरूनच ऐकले. दोघे ही हनुमाना जवळ गेले आणि नम्रपणे तेथे उभे राहिले.

हनुमान डोळे मिटून रामनाम-स्मरणात मग्न होता. हनुमान संगीताच्या लय-तालात रामनामाचा जप करीत आहे असे भासले. त्याच्या या जपात निरनिराळ्या मधुर रागांची छटा स्पष्ट दिसत होती. विभिन्न रागांचा मधुर संगम या रामनामांत भासमान होत होता. राम या दोन अक्षरातूनच ताल व गति यांबरोबर लयबद्ध मधुर संगीत निर्माण होत होते. तुंबर व नारद हे अपूर्व संगीत ऐकून स्तिमित झाले. ज्या कामासाठी ते येथे आले होते, ते ते विसरूनच गेले. हनुमान महान् संगीतज्ञ आहे हे त्यांना समजून चुकले. साहित्य व विज्ञान याहून गानमाधुरी श्रेष्ठ दर्जाची आहे हे त्यांच्या लक्षात आले. ते दोघे ही हनुमाना बरोबर रामनामाचा जप करू लागले. हनुमानाच्या गायनातील माधुरी पुढे त्यांना आपले गायन अगदीच शुष्क वाटले. दोघांच्या गायनात आकाश-पाताळाचे अंतर! आता हनुमान जपाच्या तंद्रीतून जागा झाला व त्याने डोळे उघडले. राम-स्मरणात आपली शुद्ध हरपलेले तुंबर व नारद यांना त्याने पाहिले.

हनुमान ताबडतोब उठला त्याने दोघांच्या चरणांना स्पर्श केला.

तुंबर व नारद शुद्धीवर आले व आपले पाय मागे घेत म्हणाले-''महाराज, आपण आम्हाला प्रणाम का करीत आहात? आम्ही दोघे तुंबर व नारद आहोत हे आपल्या लक्षात आले ना?''

हनुमान भक्तिभावाने म्हणाला-''आपण कोणी ही असा, जे राम-नामाचा जप करतात, ते माझे आराध्य देव आहेत. अशा उत्तम व्यक्तीची पद-धूलि मी आपल्या मस्तकावर धारण करतो. त्यामुळे मला फार आनंद होतो व परम संतोष मिळतो. मी याला आपले परमभाग्य समजतो!''

हनुमानाचे संगीत-ज्ञान आणि त्याची भक्ति-परायणता पाहून तुंबर व नारद मोठ्या आश्चर्याने एकमेकांकडे पाहू लागले.

आपण कशासाठी इथे आलो आहोत याचे आता त्यांना स्मरण झाले. नारदाने निवेदन केले-''रामाने आपल्याला बोलवले





आहे. ते क्षीरसागरात शेष-शय्येवर बसलेले आहेत.''

हनुमान अत्यंत आनंदाने त्यांच्या बरोबर क्षीरसागराकडे निघाला.

गरुडाने त्याचे स्वागत केले. हनुमानाच्या खांद्यावर हात ठेवीत त्याने कुशल-क्षेम विचारले आणि त्याला भगवान विष्णूकडे घेऊन गेला.

हनुमानाला विष्णु रामासारखेच दिसले. आता त्याच्या लक्षात आले की विष्णु नि राम हे एकच आहेत. हनुमानाने भक्तिपूर्वक त्यांना नमस्कार केला.

विष्णु हनुमानाला म्हणाले-''हनुमान, तुंबर व नारद हे गायनात एकमेकांचे प्रतिस्पर्धी आहेत. तू या दोघांच्या संगीत-ज्ञानाची परीक्षा करावी अशी माझी इच्छा आहे. कोण अधिक उत्तम दर्जाचा संगीतज्ञ आहे याचा तू निर्णय घे. यांची परीक्षा करण्यापूर्वी तू एकदा आपले मधुर संगीत यांना ऐकव.''

हनुमान म्हणाला-''राम, राम, आपण का उगाच माझ्या संगीताची प्रशंसा करीत आहात? मी कोणी मोठा संगीतज्ञ थोडाच आहे? सा रे ग म सुद्धा न जाणणारा मी वानर! मी वायु-पुत्र, माझ्या गायनात सम नसते. या दोन महान् व्यक्तींसमोर गाण्याची माझी योग्यता नाही.''

''हनुमान, तुला आपल्या योग्यतेची कल्पना नाही. तू सूर्याकडून सर्व शास्त्रे, कला व नवीन व्याकरण शिकून घेतले आहेस. मी अगोदरच सांगितले होते की जोपर्यंत अन्य कोणी तुला आपल्या योग्यतेची जाणीव करून देत नाही तोपर्यंत तुझ्या शक्तीशी तुझा परिचय होणार नाही. आता तू माझं म्हणणं ऐक आणि आपले संगीत यांना ऐकव.'' विष्णूने निवेदन केले.

हनुमानाने 'ह' मधून 'हा' चा उच्चार करीत गायला प्रारंभ केला. विष्णूच्या प्रिय राग हिन्दोलाचे आलाप त्याच्या कंठातून बाहेर येऊ लागले.

तुंबर व नारद हनुमानाच्या स्वर-माधुरीने



स्तिमित झाले. ते लक्ष लावून हनुमानाचे गायन ऐकण्यात मग्न झाले.

हनुमान हिंदोल रागातून वैजयंती रागात शिरला आणि राम-नाम स्मरण करू लागला. केवळ राम या दोन अक्षरातून हनुमान जेव्हा अनेक राग गाऊ लागला, तेव्हा क्षीरसागरावरील लाटा नाचू लागल्या. श्रोत्यांच्या हृदयात आनंदाचे तरंग निर्माण झाले. तुंबर व नारद यांच्या मनात हनुमानाबद्दल भक्तिभाव जागृत झाला. असे अद्‌भुत संगीत त्यांनी पूर्वी कधी ऐकले नव्हते. हनुमान चरम सीमेवर पोचला. क्षीरसागरातून उत्पन्न होणाऱ्या लाटा इतक्या उंच उडू लागल्या की त्यांनी सर्व नक्षत्रे झाकून टाकली. आपले सहस्र फणे पसरवून शेषनाग डोलू लागला. हनुमानाने खालच्या पट्टीत देवगांधार रागाचे आलाप सुरू केले.

शांति रसाने ओथंबलेल्या त्या रागाने समुद्र हळू हळू गोठू लागला. तुंबर व नारद यांच्या हयग्रीव व महती वीणा त्यांनाच आता तुच्छ वाटू लागल्या. क्षीरसागर गोठून संगमरवराप्रमाणे कठोर झाला. शेषनागाला यामुळे त्रास होऊ लागला.

विष्णूने हनुमानाला आता थांबायला सांगितलं. एकदम हनुमानाचे संगीत थांबल्यामुळे तुंबर व नारद यांना आश्चर्य वाटले. संगमरवरी समुद्रावर पडलेल्या आपल्या वीणांकडे त्यांचे लक्ष गेले.

विष्णूने त्यांना आज्ञा दिली-''तुम्ही





आपल्या गायनाने गोठलेला समुद्र द्रवरूप करा नि आपल्या वीणा उचला.''

नारदाचे भक्ति-गीत व तुंबरची रागदारी यांनी क्षीरसागर जरा ही पाघळला नाही. त्यांचा संगीत-ज्ञानाचा गर्व पूर्णपणे नाहीसा झाला. शरमेने त्यांनी आपल्या माना खाली घातल्या.

विष्णूच्या आज्ञेनुसार हनुमान पुन्हा गाऊ लागला. भूपाल, वसंत, झिंझोटी, दीपिका इत्यादि राग तो गायला.

या गायनामुळे राग-रागिण्यांनी मानवरूप धारण केले व त्या नाचू लागल्या. हनुमानाचं संगीत पराकाष्ठेला पोचलं तेव्हा प्रलयाचा भास झाला. साक्षात् शिव कैलासावरून डमरू वाजवीत आले आणि तांडव-नृत्य करू लागले. त्यांच्या बरोबर पार्वती व गणपति ही आले. ब्रह्मदेव आपले पद्मासन सोडून तेथे आले. त्यांच्या सह वीणेचा झंकार करीत सरस्वती आली. इंद्र इत्यादि देवतागण ही आले. क्षीरसागरात पुन्हा लाटा उसळू लागल्या.

क्षीरसागर विवाह-मंडपासारखा दिसू लागला. लक्ष्मी-नारायण नव वर-वधू प्रमाणे भासले. हनुमान तन्मय होऊन गात होता आणि तो कल्पना-सृष्टीत विहार करू लागला की राम व सीता यांचा विवाह असाच झाला असेल.

तुंबर व नारद यांनी आपल्या वीणा हाती घेतल्या. आदि शेषाने आपली शय्या ठीक-ठाक करून घेतली.

देवी सरस्वतीने आपला निर्णय दिला-''हनुमानाची गायनपद्धति हनुमद्‌गान नावाने ओळखली जाईल. ती पंडितांचे रंजन करील, तसेच सामान्य जनांना ही आनंद प्रदान करील. नारदाचे संगीत भाव-प्रधान आहे, तर तुंबराचे ताल-प्रधान. राग भाव व ताल यांचा समन्वय करतो. भाव, ताल आणि राग हे समान असले तरी सर्वांचा प्राण राग आहे, तो रसात्मक आहे. तो अंतःकरणाला अधिक प्रभावित करतो. हनुमद्‌गान राग-प्रधान असल्यामुळे ते नित्य रसिकांना संतोष देत राहील. हे संगीत शाश्वत आहे.''





ब्रह्मदेव पुढे येऊन म्हणाले-''हनुमान, फल-प्राप्तीची इच्छा न करता तू तपस्या केलीस. मी ब्रह्मा सुद्धा तुझ्या या साधनेचे मूल्यांकन करू शकणार नाही. याहून अधिक श्रेष्ठ उपलब्धि काय असू शकेल? भविष्य काळात तू ब्रह्मा होशील. रामनामाचा जप करीत तू जी कठोर तपश्चर्या करीत आहेस, त्यामुळेच ब्रह्मदेवाच्या कार्याची जबाबदारी तुझ्यावर येऊन पडणार आहे. भविष्यात तुझ्या मुळेच मानव-सृष्टि होईल.

शिवजी पुढे येत म्हणाले-''हनुमान, या ब्रह्माच्या सृष्टीत चांगले लोक कमी, वाईट लोकच खूप निर्माण झालेले आहेत, होत आहेत व होतील. असे होण्याचे एक कारण आहे- आपण परमेश्वर आहोत असा ब्रह्मदेवाला गर्व झाला व परिपूर्ण मानवते बाबत त्याला विश्वास राहिला नाही. तू वानर आहेस, परंतु तुझ्या ध्यानी-मनी नित्य राम रमतो आहे, म्हणून तू जी सृष्टि निर्माण करशील तीत रामासारखे परिपूर्ण मानव, सीते सारख्या पतिव्रता स्त्रिया व लक्ष्मणा सारखे आदर्श पुरुष खूप निर्माण होतील. तोपर्यंत तू विष्णू बरोबर इथेच थांब.''

तेव्हा ब्रह्माने निवेदन केले-''जगात काही सद्‌गुणी माणसे असली तर काही दुर्गुणी असणारच. त्यांच्यात सुधारणा घडवून आणणे शक्य आहे. हे काम फार अवघड नाही. तुझ्या सृष्टीत हे सहज शक्य होईल. भविष्य काळात विष्णूच्या नाभीतून एक अभिनव कमळ विकसित होईल. त्या पद्मासनावर तू ब्रह्मा बनून आसीन होशील. भविष्यात तू ब्रह्मा म्हणजे सृष्टिकर्ता होणार आहेस.''

आता हनुमानाने मंगलगान गावे अशी सर्वांनी प्रार्थना केली. हनुमानाने श्रीरागात मंगलगीत गायले.

नारद, तुंबर व गरूड यांच्यासह हनुमान लक्ष्मी नारायणाला सीता व राम मानून त्यांच्या सेवेत तत्पर राहिला.





# भांडखोर नवरा-बायको

कमलापुरमधे कमलनाथ अन् कमला यांचा विवाह जेंव्हा ठरला, तेंव्हा सर्वांना वाटले की नावात जसं साम्य आहे, तसं सामंजस्य त्यांच्या कौटुम्बिक जीवनातही नान्देल.

परतु लग्नाला अजून वर्षही झाले नाही, तोच दोघे रोज आपसात भांडू लागले. किरकोळ गोष्टीवरूनही त्यांचा आरडाओरडा सुरू होई. लोक त्यांच्या या दुर्व्यवहाराबद्दल आपसात टीका करत.

एका रात्री मांजरीच्या 'म्यांव-म्यांव' मुळे त्यांची झोपमोड झाली. कोणत्याशा खिडकीतून आत येऊन तिने पलंगाखाली 'म्यांव-म्यांव' सुरू केले.

कमलनाथ म्हणाला, ''ए कुंभकर्णाची बहीण, झोपण्यापूर्वी सगळ्या खिडक्या लावायला सांगितल्या होत्या, पण तुला माझ्या सांगण्याची काही पर्वाच नाही. आता हकल त्या मांजरीला.'' झोपलेल्या बायकोच्या तोंडावरचं पांघरूण त्याने ओढले.

यावर आळस देत कमला म्हणाली, ''अर्ध्या रात्री एकाद्या भुतासारखे ओरडताय कशाला? तिला हाकलून द्यायचं असेल, तर तुम्हाला कोणी नको म्हटलंय? झोप खराब होतेय ती तुमची नाही, माझी होतेय.'' चादर पुन्हा डोक्यावर घेत तिने बेधडक अुत्तर दिले.

कमला अुठणार नाही असे ओळखून कमलनाथने अर्धवट झोपेतच पलंगावरून अुतरून कोपऱ्यातली काठी अुचलली. पण मांजरी तशी हार मानणार नव्हती. ती झोपायच्या खोलीतून मधल्या खोलीत, अन् तेथून पुढच्या खोलीत अशी धावत राहिली आणि कमलनाथ तिचा पाठलाग करत राहिला. शेवटी पुढल्या खोलीत पोचल्यावर त्याने मधला दरवाजा बन्द केला. आता ती पुन्हा आत जाअू

दयार्णव सुपनेकर



शकणार नाही, असे पाहून त्याने बाहेरच्या गल्लीत अुघडणारा दरवाजा अुघडला अन् तो पुन्हा मांजरीला बाहेर घालवू लागला. ती अंधारात कुठेतरी नाहीशी झाली.

आपल्या यशाबद्दल हसून आता तो दरवाजा बन्द करणार इतक्यात दोन चांगले धट्टेकट्टे चोर दरवाजा अडवून अुभे राहिले. एकजण म्हणाला, ''आम्हीच मुद्दाम मांजर आत सोडलं. त्याला बाहेर घालवायला तू दरवाजा अुघडणार हे माहीतच होतं आम्हाला.'' अन् हातातल्या लाठीसह ते आत घुसले.

कमलनाथ भीतीने कापू लागला. काही बोलायचा धीरच होईना त्याला. इतक्यात एक चोर म्हणाला, ''तोंड बन्द ठेव. आवाज आला तर गळाच दाबू बघ!''

त्यांनी नंतर कमलनाथला दोरीने एका खांबाशी बांधून टाकले. इतका वेळपर्यन्त कमलनाथने धैर्य एकवटले आणि तो म्हणाला, ''इतकी सगळी दोरी मलाच बांधायला वापरू नका. त्या खोलीत माझी बायको आहे, अन् ती चांगली जाडजूडही आहे.''

''हं! मी बाईला नुसतं आपल्या लाल डोळ्यांनीच चुप करतो.'' त्यातला काळा चोर हसत म्हणाला.

नंतर तो कमलाच्या खोलीत गेला. पण चाहूल लागूनही कमला फक्त कूस बदलत म्हणाली, ''तुम्ही तरी कसे पुरुष आहात. एक मांजर घालवायला इतका वेळ लावलात? मला तर वाटलं, की तुम्ही एकाद्या वाघालाच घालवायला गेला आहात.'' तिला वाटले की कमलनाथच खोलीत आला आहे.

''आपल्या नवऱ्याचं वैभव स्वतःच येअून पहा जरा. चल माझ्या बरोबर!'' असे म्हणत चोराने हातातली लाठी तिच्या गळ्यावर टेकवली.

कमलाची झोप अुडून गेली. चोराबरोबर ती बाहेरच्या खोलीत आली. खांबाला बांधलेल्या आपल्या नवऱ्याची दुर्दशा पाहून मोठ्याने हसत ती म्हणाली, ''फार दिवस असं काहीतरी करावंसं वाटत होतं मला!''

ते ऐकून चोरांचा चेहराच पडला. नवराबायकोंचं एकमेकांवर प्रेम नाही हे त्यांच्या



लक्षात आले. आपले काम आता जास्तच सोपे झाल्याचे त्यांनी ओळखले.

काळा चोर तिला दरडावून म्हणाला, ''घरात ज्या काही मौल्यवान वस्तु असतील, त्या घेअून ये मुकाट्याने.''

''हुं:! मौल्यवान वस्तु? अन् माझ्या घरात? इथे तांब्याच्या भांडयांशिवाय आहे काय? पण माझ्या नवऱ्यानं कालच पगार आणून रक्कम आपल्या अुशाखाली दडवून ठेवलीय. लग्न होअून इतकी वर्षं झाली, पण अजून आपला पगार किती, हे काही या कंजूष प्राण्यानं सांगितलं नाहीय मला! काळे चोरसाहेब, ते पाकीट घेअून येअून त्यात किती रक्कम आहे, ते तरी सांगा हो मला!'' कमला म्हणाली.

कमलाकर यामुळे रागावून म्हणाला, ''अग राक्षसणी! पगाराची सगळीच्या सगळी रक्कम चोरांच्या हवाली करते आहेस? महिनाभर आता तुला अुपाशी ठेवलं म्हणजे कळेल कसं काय ते!''

काळा चोर पाकीट घेअून आला अन् अुघडून न बघताच म्हणाला, ''छोटी ताई! आता पैसे मोजायला वेळ नाही आमच्याजवळ. आमच्या गुहेत गेल्यावर ती मोजून पुढल्या अमावास्येला सांगेन हं तुला!''

''ठीक आहे दादा, जशी तुझी इच्छा! या अमावास्येला नाही तर नाही; पण पुढल्या अमावस्येला सांग हं नक्की! अरे, पण तुझा हात अंगठीविना बरा नाही वाटत. माझ्या



माहेरच्यांनी ह्यांना हिऱ्याची अंगठी दिलीय चांगली. पण काय अुपयोग! सदा न् कदा ओरडत असतात माझ्यावर! मग ती अंगठी वापरायचा हक्कच कसा पोचतो यांना? तू घेऊन टाकती!'' कमलाने सांगितल्या बरोबर काळ्या चोराने अंगठी कमलनाथच्या हातातून काढून घेतली.

आता रागाने कापत कमलनाथ म्हणाला, ''अरे चोरांनो, चोरांच्या भयानं हिनं आपले सगळे दागिने एका पेटीत बन्द करून घरामागच्या विहिरीत टाकून ठेवलेत. सणासुदीच्या दिवशी मलाच अुतरून ते काढून द्यावे लागतात तिला. काम झालं की दागिने पुन्हा आपले विहिरीत! तुम्हीच विचार करा,



इतका सारा खटाटोप करायला मला किती त्रास होत असेल! काय पण भाग्य माझं, असल्या बायकोशी गाठ पडलीय जन्माची.''

नवऱ्याचा शब्द खाली पडू दिला, तर कमला कसली ती! तिने लगेच भांडण अुकरायला सुरुवात केली. ''किती वर्षं झाली लग्नाला, पण उपयोग काय? तुम्ही तर मला कधी गुंजभर ही सोनं नाही घेऊन दिलं! माझं सोनं अुचलून न्यायला सांगणारे तुम्ही कोण?''

''ए, मुकाट्याने आमच्याबरोबर विहिरी-कडे चल!'' गोऱ्या चोराने काठी दाखवत कमलाला म्हटले.

कमलनाथ हसत म्हणाला, ''अशी नीट ताब्यावर आणा तिला!''

''आपण मागे गेलो, तर हे कदाचित् आरडाओरडा करतील अन् तुम्ही दोघं नाहक पकडले जाल! त्यापेक्षा यांच्या तोंडात बोळा कोंबून ठेवा.'' असे म्हणून कमलाने जवळचा एक कपडा चोराच्या हाती दिला.

कमलनाथ आता काही बोलणार, इतक्यात चोराने त्याच्या तोंडात बोळा कोंबला.

गोरा चोर विहिरीत अुतरला. आपले अुसळून येणारे दु:ख कसे तरी आवरत कमला म्हणाली, ''भारी दुष्ट आहे नवरा माझा. माझ्या माहेरून आलेल्या दागिन्यांची जागा त्यानं तुम्हाला सांगून टाकलीय. पण मी थोडीच कमी आहे त्याच्यापेक्षा! माझ्या सासूनं काशीला जाण्यापूर्वी बरेचसे दागिने दिलेत. ते त्यानं एका पेटीत ठेवून ती खोलीतल्या माळ्यावर ठेवलीय. ते दागिने तर नाही नेणार ना तुम्ही?''

इतक्यात कोंबड्याचे आरवणे कानी आले. काळा चोर घाईत म्हणाला, ''चल, मला ती खोली दाखव.'' अन् तो तिच्याबरोबर खोलीत गेला.''

चोर खोलीत शिरल्याबरोबर कमलाने क्षणभरही वेळ न दवडता खोलीचा दरवाजा बाहेरून बन्द केला.

नंतर कमलाने आरामात नवऱ्याला सोडवून त्याच्या तोंडातला बोळाही काढला. ती म्हणाली, ''दोन्ही चोर आता आपल्याच हातात आहेत. आपण आता सूर्योदयापर्यन्त निवान्त झोपू या.''

पण कमलनाथने अुतावीळपणे विचारले, ''अग ते दोघं आहेत कुठे?''

''एक येडप आहे पाताळात, तर दुसरं बावळं आहे स्वर्गात!'' कमला अुत्तरली.

कमलनाथ चिडून म्हणाला, ''तुला कधी धड बोलताच येत नाही का? बोल नं, काय झालंय?''

आता कमलाने सारी हकीकत स्पष्ट केली.

''तुझी अक्कल चुलीत गेली की काय? एव्हाना विहिरीतला चोर बाहेर आला सुद्धा असेल की!'' कमलनाथने शंका प्रकट केली.

''पण दुसऱ्याला सामानाच्या खोलीत नेण्यापूर्वी मी हळूच रहाटाची दोरीच कापून टाकली! वर येईलच कसा तो?''

सकाळीच कमलनाथने पाटलाकडे जाअून दोन चोरांना अडकवून ठेवल्याचे सांगून आला. पाटील आणखी काही माणसे घेअून आला अन् चोरांना त्याने पकडले. त्यांच्याकडून जी रक्कम अन् अंगठी काढून घेण्यात आली, ती कमलाने आपल्या हाती घेतली.

नंतर लवकरच पाटलाने दवंडी पिटवली की चोरांना पकडून देण्याबद्दल बक्षिस दिले जाणार आहे.

कमलनाथ आता कमलाशी वाद घालू लागला की, ''मीच खोटं सांगितलं की दागिने विहिरीत आहेत. माझ्यामुळेच तर चोर पकडले गेलेत, तेव्हा बक्षिस मी घेणार.''

''पण सासू तर आपल्या लग्नाआधीच मरून गेली होती ना? अशा सासूची कल्पित निर्मिती करून मीच तर एकाला विहीरीत अन् एकाला खोलीत बन्द केलं किनई?'' कमलाने आपला हेका धरला.

दोघात जोरजोरात भांडण सुरू झाले.

''आपसात भांडत का होईना, पण दोघांनी एक महान कार्य केलंय! हेच जर तुम्ही मिळूनमिसळून एक दिलानं रहाल, तर दोघांपुढे कधीही कोणाचा टिकाव लागणार नाही.'' पाटील व गावच्या प्रतिष्ठित लोकांनी मुक्त कंठाने त्यांची प्रशंसा करत म्हटले. गावात त्यांचा भव्य सत्कारही केला गेला.





# रघूचे श्रोते

रघुची गायक बनायची तीव्र इच्छा होती. त्याला असे वाटे की, आपण गात रहावे व लोकांनी ते ऐकत रहावे. परन्तु तो जेव्हा गाणे गाई, तेंव्हा लोक त्याला नावे ठेवत, लहान मुले रडू लागत, अन् त्याच्या वयाचे तरूण तेथून पळून जात.

रघूची आजी फारच चांगली गायिका होती. आपल्याला गाणे शिकवावे अशी त्याने आजीला विनन्ती केली. आजी म्हणाली, ''तू तसाही चांगलाच गातोस की!''

''चांगलंच गातो आजी! पण अुपयोग काय? माझं गाणं ऐकायला तर कोणीच तयार नसतं. तू गातेस तेव्हा कशी गर्दी होते श्रोत्यांची! माझी ही अशीच इच्छा आहे की माझं गाणं सर्वांनी ऐकावं.''

''अरे, लहानपणी माझंही गाणं कोणी ऐकत नसे. मोठी झाल्यावरच ते ऐकायला लागलेत, मला आदर देअू लागलेत! तूही अजून मोठा होण्याची प्रतीक्षा करत रहा. तुझंही गाणं ऐकतील लोक.'' आजीने समजूत घातली.

''आणखी वाट पहाणं नाही जमणार मला. तूच गाणं शिकव मला.'' रघू हट्टाला पेटला.

''मी स्वतः गाअू शकते, पण गाणं शिकवण्याची कला मला येत नाही. पण हां, शिकवायचंच काहीतरी, तर स्वयंपाक करणं शिकवेन हवं तर.'' आजी म्हणाली.

रघू नाराजीने बोलला, ''मी गाण्याच्या मागं लागलोय अन् तू स्वयंपाकाचं बोल. हे काय बोलणं झालं?''

''अरे, सर्वांनी तुझं गाणं ऐकाव असं वाटत असेल, तर श्रोत्यांना चांगली पक्वान्नं बनवून खायला घाल. खाण्यासाठी तरी तुझ्याकडे येअून गाणं ऐकतील ते.'' आजीने सुचवले.

''मग त्यासाठी एकादा आचारी ठेवीन मी.'' रघू म्हणाला.

आजी त्याला शिव्या देत म्हणाली, ''आचाऱ्याल खूप पैसे द्यावे लागतील. एक-दोन वेळची गोष्ट नव्हे ही! आयुष्यभर तुला लोकांना खायला घालावं लागणार आहे नं!'' आजी म्हणाली.

शेवटी आपल्या वयाच्या पंधराव्या वर्षीच रघूने आचाऱ्याचे काम शिकून घेतले. अन् लवकरच तो पाकशास्त्रात प्रवीण झाला.

एक दिवस रघूने आजीला विचारले, ''मी आता स्वयंपाक छान करू लागलोय. आता एकदा सगळ्यांना बोलावून गाणं ऐकवू?''

''असलं काही केलंस ना, तर तुझा बाप तुला अन् मलाही हाकलून देईल घरातनं! त्यापेक्षा तू स्वतः कमाअू लाग. खाद्यपदार्थ बनवून विकायला लाग. चांगले पैसे मिळवशील तू.'' आजीने सल्ला दिला.

''स्वयंपकाचं काम मी पैसा मिळवण्यासाठी नाही शिकलो. लोकांना आपलं गाणं ऐकवण्यासाठी शिकलोय.'' रघूने रागावून अुत्तर दिले.

''रागावू नको रे असा! माझं ऐक. चांगले रूचकर पदार्थ बनवून विकलेस तर चांगलं नांव मिळेल बघ तुला. मग सगळीजणं धावत येतील गाणं ऐकायला.'' आजीने सांगितले.

हे आजीचे बोलणे रघूला पटले. वर्षभरात रघूने खाद्यपदार्थांचे एक दुकानच सुरू केले.

रघू दररोज लोकांना घरी बोलावून त्यांना



रूचकर पदार्थ खायला घालून नंतर आपले गायन ऐकवू लागला. सुरुवातीला ते मोठ्या अुत्साहाने येत. पण नंतर ते अुशीरा येअून खाल्ल्या बरोबर निघून जात. काही लोक गाणे ऐकायच्या बहाण्याने येअून पक्वान्नांवर ताव मारत. अशा तऱ्हेने काही दिवसांनी रघूच्या संगीत-प्रिय लोकांचा एक गट तयार झाला. अन् त्यांनी आपसात ठरवून घेतले की एक-एक करून रोज कोणी न कोणी येत रहावे.

ज्या दिवशी अगदी एकाच माणसाला जावे लागे, त्या दिवशी त्याची परिस्थिति अगदी चक्रपुरमधल्या त्या माणसासारखी होई की ज्याची बकासुराकडे जायची पाळी येई. पण जाण्यासाठी आमिषही मोठे असे. रघूचे पदार्थच

स्नेहा कसबेकर



मोठे स्वादिष्ट असत.

काही दिवसातच आपल्या श्रोत्यांनी घेतलेल्या या निर्णयाचा रघूला पत्ता लागला. त्याची निराशा पाहून आजी म्हणाली, ''काहीही असलं, तरी त्यांना तुझं गाणं ऐकावंच लागेल. तू असं कर, संगीताचा कार्यक्रम आठवड्यातून एकदाच ठेव. रोज नको गाऊस. लोकांना सांग की मी भक्तिगीतं गाणार आहे. देवाचं नाव घेतलं की सर्वजण येतील. गाणं संपलं, की मग प्रसाद देत जा. अशा प्रकारे तू आपल्या मनातली इच्छा पुरी करू शकशील.''

काही दिवस रघूचा हा कार्यक्रम सफल झाला. पण नंतर पुन्हा 'ये रे माझ्या मागल्या!'

रघू बिचारा पुन्हा फार निराश झाला. आता आजीने त्याला सुचवले, ''रघू तू तर निष्णात आचारी आहेस. किती दिवस या लहान गावात खटत रहाशील? त्यापेक्षा शहरात जाऊन तिथे मिठाईचं दुकान उघड. खूप कमाई होईल बघ. तिथे बेकार माणसंही पुष्कळ आहेत. त्यांना खायला घालून गाणं ऐकवत जा.''

रघूने शहरात जाऊन मिठाईचे दुकान उघडले. आजी पण गेली त्याच्याबरोबर. दररोज कोणी न कोणी रात्री त्याच्या घरी येऊ लागला. पण नन्तर इथेही त्यांनी आळीपाळीने जायची सोय केली.

दुपारच्या वेळी दुकानात गर्दी नसे. एक भिकारी रोज त्यावेळी दुकानासमोर मिठायांकडे पहात उभा राही. रघूने एक दिवस त्याला बोलावून म्हटले की, ''माझं गाणं ऐकायला आलास तर मी तुला पोटभर मिठाई खायला घालीन.''

भिकाऱ्याने ते कबूल केले. रघूने त्याला गाणे ऐकवले आणि पोटभर खायला घातले.

आपल्याला एक चांगला श्रोता मिळाल्याबद्दल रघू खूश झाला. एक दिवस त्या भिकाऱ्याची वाट पहात असतानाच एक नवा भिकारी तेथे आला आणि म्हणाला, ''महाशय, आज त्यानंच पाठवलंय मला. ''तो सांगत होता की, तुमच्या दुकानांतली मिठाई फारच स्वादिष्ट असते. तुमचं गाणं ऐकेन मी.''

रघूने संशयाने विचारले, ''पण तो का



नाही आला?''

''महाराज, त्याला संगीताचं थोडंफार ज्ञान आहे, त्यामुळे आपलं गाणं ऐकताना त्याला त्रास होतो. मला संगीत कशाशी खातात, हेही माहीत नसल्यानं काहीच त्रास वगैरे होणार नाही.'' भिकारी उत्तरला.

तिथेच उभी असलेली सरस्वती मात्र जोरजोरात हसू लागली. रघू चिडून विचारू लागला, ''हसतेस का तू?''

सरस्वती म्हणाली, ''मला स्वयंपाक करायच्या कल्पनेनंच वैताग येतो. माझे बाबा सक्ती करू पहातात की ' तू मुलगी आहेस, स्वयंपाक तुला शिकायलाच हवा.' तेव्हा तुझ्यासारख्या कोणी मला जागेवर बसवून खायला घालील, तर मी तुझं गाणं न कंटाळता ऐकेन. म्हणूनच तर या भिकाऱ्याचं बोलणं ऐकून मला हसू आलं.''

''ओऽ! म्हणजे तुलाही संगीताचं काही ज्ञान नाहीये?'' रघूने विचारले.

''नसेल कसं? माझे बाबा तर चांगले संगीतज्ञ आहेत. कित्येक लोक गाणं ऐकायला येत असतात आमच्याकडे. पण त्यांना वाईट वाटतं की, पाहुण्यांना आपण काहीच खाऊपिऊ घालू शकत नाही. अन् मला तर काही बनवायला येतच नाही. यावरूनच आमच्या दोघांच्यात रोज भांडणं होत असतात.'' सरस्वतीने सांगितले.

''म्हणजे माझं गाणं तू ऐकणारही



नाहीस?'' रघू नाराज होत म्हणाला.

पण सरस्वती बोलली, ''अरे पण, स्वयंपाक टाळण्यासाठी तर मी कायम गरम पाण्यातही बसून राहीन, किंवा बर्फाच्या लादीवर बसायची अटही मान्य करीन. या दोन्ही पुढे तुझं गाणं ऐकणं म्हणजे अगदीच क्षुल्लक बाब नं? नाहीतरी आम्हा बायकांना तशी सहनशक्ती जास्तच असते. इच्छेविरुद्ध एकादं काम करण्यापेक्षा असली दहा अवघड कामं करायला तयार होऊ आम्ही.''

''तर मग, रोज रात्री मी तुझ्या घरी येऊन स्वयंपाक शिकवीन अन् बदल्यात तू माझं गाणं ऐकायचंस. कबूल?'' रघूने विचारले.

सरस्वतीने होकार दिला. पण रघूला संशय

आल्यामुळे त्याने विचारले, ''गाणं ऐकायला येणाऱ्यांना खायला घालायची काय गरज आहे? नाही खायला घातलं, तर ते काय येणार नाहीत?''

सरस्वती अुत्तरली, ''जे लोक येतात न, ते गाणं ऐकल्या नंतर बाबांना काही न काही भेट देतात. मग त्यांना थोडंसं का होईना, काही खायला दिलं पाहिजे ना?''

तिचे अुत्तर ऐकताच आपल्या व सरस्वतीच्या श्रोत्यांच्यात काय फरक आहे हे त्याला कळून आले. पण त्याला हे कळेना की फरक श्रोत्यांच्यात नसून दोन गवयांच्यातच आहे.

त्या दोघांचे बोलणे इतका वेळ आजी मुकाट्याने ऐकत होती. ती समोर आली, तेंव्हा सरस्वतीने 'ही कोण?' असे रघूला इशाऱ्यानेच विचारले. रघू म्हणाला, ''तुला नाही माहीत; ही आजी आहे माझी.''

सरस्वती हसत म्हणाली, ''पंचवीस वर्षांपूर्वी तुम्हाला मी रामपूरच्या बाजारात पाहिल्यासारखं वाटतंय.''

तिचा हात पकडत आजी म्हणाली, ''थांब जरा सुन्दर तर दिसत आहेसच, बुद्धिमानही वाटतेस. बोल बरं, घर कुठंय तुझं? तुझ्या वडिलांशी बोलायचंय मला.''

सरस्वती आजीला आपल्या घरी घेअून गेली. आजीने तिच्या बाबांना सर्व काही सांगितले, आणि म्हटले, ''तुमच्या मुली कडून तर होकार मिळालाय. तम्हीही कबूल असाल, तर सरस्वतीला सून करून घेईन मी. सर्वकाही ठीकठाक असूनही मुलीला स्वयंपाक येत नसणं, म्हणजे शरीरातला एकादा अवयव नसण्यासारखंच आहे.''

''बरोबरच आहे बोलणं तुमचं. या लग्नाला माझ्याकडून काही हरकत नाही. माझ्या मुलीचा स्वयंपाकाचा त्रास वाचेल अन् तुमच्या नातवाला त्याचं गाणं जन्मभर ऐकणारा श्रोता मिळेल.'' सरस्वतीचे वडील आनन्दाने म्हणाले.

अशा प्रकारे रघू आणि सरस्वती यांच्या वैयक्तिक अडचणींचा प्रश्न मिटला अनं दोघेही आनन्दाने राहू लागले.



# बहुरूपा वसुन्धरा



## मीठ

समुद्राचे पाणी खारट का असते? या बाबत अनेक लोककथा अस्तित्वात आहेत. वायु व मेघ हे समुद्रावर रागावून त्यांनी समुद्र घुसळून काढला. समुद्रात एकदा एक फार मोठे मिठाचे जहाज बुडाले अन् समुद्र खारा झाला, इ. परन्तु ही काही खरी कारणे नव्हेत. खरे तर समुद्रात येअून मिळणाऱ्या नद्यांचा अुगम दूर कुठे तरी झालेला असतो, अन् डोंगरातून वहात येताना त्यांच्या प्रवाहात अनेक प्रकारचे क्षार व खनिजे मिसळली जातात. हे सारे पाणी समुद्रात येअून पोचते. पाण्याचा एक ठरीव अंश वाफेच्या रूपात परिवर्तित होतो, परंतु पाण्यातले क्षार (लवण) मात्र घन होत जातात. यामुळे पाणी खारट होते. समुद्राचे पाणी लहान लहान वाफ्यात भरून, सुकवून आपले नेहमीचे मीठ बनवले जाते.



## पाण्याविना जगणारी झाडे

रोपे जगण्यासाठी, त्यांच्या वाढीसाठी पाण्याची अत्यन्त आवश्यकता असते, ही तर सर्वांनाच माहीत असणारी बाब आहे. परन्तु वाळवंटात पाणी नसते, अन् तरीही तेथे काही झाडे अुगवतातच. या झाडांना सेहुंड असे म्हणतात. हे कसे शक्य होते? इतर झाडांप्रमाणे यांनाही पाण्याची आवश्यकता असतेच. या झाडांना पाने नसतात. परंतु त्यांच्या खोडात पाणी साठवण्याची सोय असते. त्यामुळेच बराच काळपर्यन्त पाऊस न पडूनही ती जिवन्त राहू शकतात. यांची मुळे जमिनीत खोलवर जातात. अन् जेंव्हा पाअूस पडतो, तेंव्हा ती जास्तीत जास्त पाणी शोषून घेतात. यांना कुंडीतही वाढवता येते. रोजच यांना पाणी घालायची गरज नाही. परंतु अधून मधून पाणी घालत राहिले, तर खूपच लवकर ही वाढीस लागतात. अन् पहाता पहाता यांना फुलेही येअू लागतात.



## पानांच्या रेषा-नसा

पानांच्या रेषा किंवा नसा दिसायला खूपच सुन्दर दिसतात. झाडांच्या त्या आपल्या शरीरातल्या प्रमाणेच रक्तवाहिन्या होत. झाडांची मुळे जमिनीतून जे शोषून घेतात, ते क्षार खानिजे व इतर पोषक द्रव्ये झाडाच्या विविध भागात पोचवण्याचे कार्य या नसा, या रक्तवाहिन्याच करत असतात. या रेषा व नसांनी पोचवलेल्या आहारामुळेच पाने हिरवीगार दिसतात.

विश्व-समाचार

# दक्षिण आफ्रिका: एक नवा अध्याय



ता. १० मे रोजी दक्षिण-आफ्रिकेचे अध्यक्ष-पद स्वीकार करते वेळी श्री. नेल्सन मंडेला यांनी घोषणा केली- ''दक्षिण आफ्रिकेचे एक स्वतंत्र गणतंत्र राज्य निश्चित बनेल असे मी शपथपूर्वक सांगतो.'' याच्या आदल्या दिवशी नवीन घटना समितीची स्थापना करण्यात आली. अशा रीतीने श्री. मंडेला दक्षिण आफ्रिकेतील काळ्या जातीचे प्रथम अध्यक्ष बनले.

दक्षिण आफ्रिकेत मिळणारे सोने व अन्य खनिज पदार्थांच्या आकर्षणाने युरोपीय देशांनी आफ्रिकेत प्रवेश केला. प्रथम पासूनच त्यांनी स्थानिक काळ्या लोकांचे दमन सुरू केले. सन १६५२ मध्ये डच ईस्ट इंडिया कंपनीने केप टाउन मधे प्रवेश केला आणि हळू हळू पाय पसरायला सुरुवात केली. हिन्द महासागर, अरेबियन समुद्र व अटलांटिक महासागरातून जाणारी जहाजे आफ्रिकेच्या दक्षिणतम टोकावर वसलेल्या 'केप ऑफ गुड होप' ला आपला नांगर टाकू लागली. अशा प्रकारे ते एक व्यापारी केन्द्र बनले आणि जहाजे थांबवण्याचे एक प्रमुख केन्द्र झाले. शंभर वर्षांच्या काळात ब्रिटिशांनी इथे चांगलाच जम बसवला.

हे जे गोरे लोक जमले त्यांनी हळू हळू काळ्या लोकांना तेथून पळवून लावायला सुरुवात केली. त्यांनी काही निर्धारित ठिकाणी रहावे असे ही काळ्यांवर बंधन घातले. व्यापार, हॉस्पिटले व शाळांमधून त्यांचा बहिष्कार करण्यात आला. अशा रीतीने तेथील मूळ निवासियांचे अधिकार हिसकावून घेतले गेले. अल्पसंख्यक गोऱ्यांनी जाति-भेदाच्या सिद्धांताचे अवलंबन केले व काळ्यांना सर्वाधिकारांपासून वंचित केले.

आपल्या भारतीय रहिवाशांना ही या जाति-भेदाची झळ पोचली. अनेक गुजराती, महाराष्ट्रीय व दक्षिण भारतीय लोक आफ्रिकेत जाऊन स्थायिक झालेले होते. श्री. मोहनदास करमचंद गांधी बॅरिस्टर असले तरी रेल्वे-गाडीतून त्यांना उतरावे लागले, कारण ते काळ्या जातीचे होते. १८९० मध्ये घडलेली ही घटना सर्वांना माहीत आहे. महात्मा गांधींनी या जाति-भेदाच्या सिद्धांताचा घोर विरोध केला आणि त्यांनी 'नेटाळ इंडियन कॉंग्रेस' ची स्थापना केली. त्यांनी आपले अहिंसात्मक आंदोलन सुरू केले.

गांधीजींनी चालविलेल्या या सत्याग्रह चळवळी पासून नेल्सन मंडेला यांनी प्रेरणा ग्रहण केली. त्यांनी पण नॅशनल कॉंग्रेस (ए.एन्.सी.) मार्फत काळ्या

लोकांच्या अधिकारां साठी संघर्ष सुरू केला. सन १९४२ मध्ये सरकारने कायद्याने जातिभेद रद्द केला. काळ्या लोकांनी गोऱ्यांना आपल्या देशातून काढून टाकण्यासाठी जोराने प्रयत्न सुरू केले. 'ए.एन्.सी.'च्या नेतृत्वाखाली ही चळवळ चालली. गोऱ्या सरकारने सन १९५२ मध्ये मंडेलांना पकडले व आमरण कैदेची शिक्षा दिली. तरी पण 'ए.एन्.सी.' चे आंदोलन चालूच राहिले. सन १९८९ मध्ये डीक्लर्क या देशाचे अध्यक्ष बनले. त्यांनी गंभीरपणे सर्व परिस्थितीचा विचार केला. मानवी अधिकारांच्या स्थापनेसाठी जगातील अनेक देशांनी दक्षिण आफ्रिकेवर अनेक बंधने लादली. दक्षिण आफ्रिकेत होणाऱ्या क्रिकेट सामन्यांवर अनेक देशांनी बहिष्कार टाकला. ऑलेंपिक क्रीडास्पर्धेत ही दक्षिण आफ्रिकेला भाग घेता आला नाही. शेवटी डीक्लर्क यांनी कायदेशीरपणे जातिभेद रद्द केला आणि श्री. नेल्सन मंडेला यांना कैदेतून मुक्त केले. अल्पसंख्य गोऱ्या सरकारशी व काळ्या लोकांच्या नेत्यांशी चर्चा करायला मंडेला तयार झाले. काळ्या लोकांना ही निवडणुकीत भाग घेऊन संसदेचे सभासद होता येईल याबाबत चर्चेत विशेष जोर देण्यात आला. शेवटी आपल्या प्रयत्नात ते यशस्वी झाले. सर्वसाधारण निवडणुकीची तारीख निश्चित झाली. निवडणूक न्यायाने व्हावी, प्रत्येकाला स्वेच्छापूर्वक मत देता यावे-अशी पक्की व्यवस्था करण्यात आली. निवडणुकीवर देखरेख करण्यासाठी जगातील अनेक देशांनी आपले प्रतिनिधी दक्षिण आफ्रिकेत पाठवले. शांतिपूर्वक निवडणुकीचे काम संपन्न झाले.




आफ्रिकन नॅशनल कांग्रेसला ६२ टक्के मते मिळाली. अध्यक्षाची निवड करण्याचा अधिकार कांग्रेसला मिळाला. नेता नेल्सन मंडेला यांची अध्यक्ष म्हणून एकमताने निवड झाली. मंडेला यांनी आपल्या दलातील एक नेता व भूतपूर्व अध्यक्ष डीक्लर्क यांना उपाध्यक्ष बनविले. त्यांच्या मंत्री-मंडळात ३९ सभासद आहेत. त्यांमध्ये चार जण भारतीय सुद्धा आहेत. एक भारतीय महिला संसदेची अध्यक्षा म्हणून निवडली गेली ही विशेष गोष्ट आहे.

आपल्या प्रारंभिक भाषणात नेल्सन मंडेला म्हणाले- "आपल्याला कसले ही भय नाही. मानवता चिरस्थायी व्हावी, तिचा विकास व्हावा यासाठी मी प्रयत्न करीत राहीन. मला अशा दक्षिण आफ्रिकेचं स्वप्न साकार करायचंय जिथे काळे व गोरे गुण्या-गोविंदाने एकत्र नांदतील आणि गौरवपूर्वक जीवन जगतील."

महात्मा गांधींपासून प्रेरणा घेतलेला हा जगातील सुप्रसिद्ध आमरण राजनैतिक कैदी आपल्या सिद्धान्तांवर अटळ राहील व आपले आदर्श प्रत्यक्षात आणील असा आम्हाला संपूर्ण विश्वास वाटतो.



# खरा मित्र

सीताकर व्याज-बट्ट्याचा धंदा करीत असे. कर्ज मिळविण्यासाठी त्याच्याकडे जे लोक येत, त्या सर्वांशी तो प्रेमाने बोले. त्याच्या तोंडून कधी कटु शब्द बाहेर पडत नसे. त्यामुळे आवश्यकतेनुसार कर्ज-मागणीसाठी लोक त्याच्याकडे येत. वसुलीच्या वेळी ही तो कुणाचे मन दुखवीत नसे.

कर्ज घेण्यासाठी त्याच्याकडे पुष्कळ लोक येत. पण या सर्वांना कर्ज देण्यासाठी पुरेल एवढी संपत्ति त्याच्याकडे नव्हती. कर्जासाठी येणारांची संख्या दिवसें दिवस वाढतच चालली. कर्जदारांची नावे व त्यांना दिलेल्या रकमांची नोंद करणे व तसेच वसुलीचा हिशेब ठेवणे यासाठी सीताकरने पदरी चार कारकून बाळगले होते.

सीताकरकडे पाहून अनेकांना वाटे की आपण ही असा सावकारीचा धंदा करावा. अशा लोकात एक चंद्रपाल होता. तशी त्याला पैशांची फार हाव नव्हती, पण जवळच्या शिल्लक पैशांतून काही कमाई करावी असे त्याला वाटे.

चंद्रपालने खूप विचार केला. त्याला एक सुरेख युक्ति सुचली. सीताकर शेकडा पंधरा रुपये व्याज घेई. चंद्रपालने विचार केला की आपण साडे सात रुपयेच व्याज घेऊ. व्याजाचे पैसे वाचविण्यासाठी लोक त्याच्याचकडे येतील.

चंद्रपालने आपला विचार आपल्या बायकोला सांगितला. ती नवऱ्याहून अधिक हुशार होती. तिने थोडा विचार केला अन् नवऱ्याला सल्ला दिला- "फार घाई करू नका. आपण जर कर्जे देत गेलो, तर आपल्याजवळ असलेले पैसे लवकरच संपुष्टात येतील. आपण पहाता पहाता गरीब होऊन जाऊ. सीताकर अधिक व्याज घेतो, म्हणून वसुलीच्या वेळी त्याला अडचणी येतात. आपण कमी व्याज घेतले

अनुराधा गोवेकर



तर वसुली करताना आपल्याला अधिकच त्रास होईल. शिवाय सीताकरला दुःख होईल ते वेगळेच. तो आपला नातेवाईक आहे हे ही विसरून चालणार नाही. मला वाटते तुम्ही सीताकरकडे जाऊन त्यालाच सल्ला विचारावा.

चंद्रपालला आपल्या बायकोचे म्हणणे पटले. तो लगेच सीताकरकडे गेला आणि त्याला आपला विचार सांगितला. सर्व काही ऐकून सीताकर म्हणाला- ''बरं झालं, तू माझ्याकडे आलास. व्याज-बट्ट्या धंदा प्रत्येकाला जमेल असे नाही. हा धंदा तलवारीच्या धारेवर चालण्यासारखा आहे. या धंद्यातील सुख-दुःखे मला चांगली समजतात. म्हणून आपला हा व्यवसाय वाढवण्याचा माझा विचार आहे. त्यासाठी मला मिळतील तेवढे पैसे कमीच आहेत. तू आपले पैसे जर मला दिलेस तर मी तुला दहा टक्के व्याज देईन. तुझे पैसे मी इतरांना देईन आणि फायदा मिळवीन, पण माझी एक अट आहे. तू मला जी रक्कम, देशील ती निदान पाच वर्षे परत मागायची नाही.''

चंद्रपालला सीताकरचा सल्ला योग्यच वाटला. काही ही न करता आपल्या रकमेवर व्याज मिळाले, तर आणखी काय पाहिजे आपल्याला? आपण तर साडे सात रुपये व्याजावर संतुष्ट होतो, पण सीताकर दहा टक्के व्याज द्यायला तयार आहे. बाकी सगळं ठीक असलं, तरी पाच वर्षांची मुदत मात्र त्याला खटकली. इतक्या दीर्घ मुदतीसाठी पैसे कसे द्यायचे? मध्येच आपल्याला गरज पडली तर कुणाकडे मागायला जायचं?

चंद्रपालने सीताकरपुढे आपली शंका मांडली. त्याचे शंका-समाधान करीत सीताकर म्हणाला-''जर तशीच गरज पडली तर मी तुला कर्ज देईन. तुझी जेवढी रक्कम माझ्याकडे असेल तिच्या तीन-चतुर्थांश रक्कम मी तुला देईन. तुझे पैसे माझ्याकडे आहेत म्हणून मी तुझ्याकडून साडे बारा टक्केच व्याज घेईन. त्यातील दहा टक्के व्याज तुला मिळणारच आहे. म्हणजे केवळ अडीच टक्क्याने तुला कर्ज मिळेल. जर तू लवकर कर्ज परत केलंस तर तुझं कमी नुकसान होईल.''

सीताकरच्या या बोलण्याने चन्द्रपाल जरा





चकरावलाच. काही उत्तर न देताच तिथून निघाला आणि आपल्या बायकोला सर्व बोलणे ऐकवले.

आनंदाने ती म्हणाली- ''हा प्रस्ताव तर चांगलाच आहे. दर वर्षी आपल्याला शेतीचे उत्पन्न मिळतेच. त्यातून आपण आपला प्रापंचिक खर्च करीत राहतो. व्याजाच्या आशेने आपण थोडे पैसे वाचवायचा प्रयत्न करू. स्वतःला व्याज द्यावं लागलं म्हणजे आपण जरा विचार करू. फार जरूर वाटली तरच कर्ज घेऊ. अशा रीतीने पैसे शिल्लक राहिले व अनावश्यक खर्च केला नाही तर लवकरच आपली संपत्ति दुप्पट-तिप्पट होईल.''

जास्त काही विचार न करता चंद्रपालने सीताकरला काही रक्कम दिली.

चंद्रपालच्या जवळच वीरभद्र रहात असे. लहान असल्यापासून ते दोघे एकमेकांचे मित्र होते. दोघांची आर्थिक स्थिति सारखीच होती. वीरभद्र अधिक खर्चिक होता. जेवढे पैसे मिळत ते त्याला पुरेसे होत नसत. म्हणून तो कधी कधी चंद्रपालकडून काही रक्कम उसनवार घेई व हाती पैसे आले की परत ही करी. आता चन्द्रपालने व्याज घ्यायला सुरुवात केली, तेव्हा वीरभद्रला पैसे मिळेनासे झाले.

चन्द्रपालने वीरभद्रला उपदेश केला- ''अनावश्यक खर्च करू नकोस. पैसे थोडे शिल्लक ठेवीत चल. जे बचतीचे पैसे राहतील ते सीताकरला व्याजाने देत जा. तू सुखी होशील.''



वीरभद्रला हा सल्ला आवडला नाही. त्याने याबाबत आपल्या बायकोशी बोलणे केले, तेव्हा ती म्हणाली- ''आपापला दृष्टिकोण आहे. कोणी पैसे शिल्लक ठेवतो, कोणी पैसा खर्च करून सुख मिळवतो. आपण सुख मिळवण्याचा प्रयत्न करीत आहोत.''

यानंतर काही दिवसांनी वीरभद्रच्या शेतात मिरचीचे पीक चांगले आले. ते विकून त्याला चार हजार रुपये मिळाले. घर-खर्चासाठी एक हजार रुपये ठेवून आता त्याच्याजवळ तीन हजार रुपये शिल्लक राहिले. या पैशांतून एक हिऱ्यांचा हार बनविण्याची वीरभद्रच्या बायकोची इच्छा होती. ती सोनाराकडे गेली. सोनाराने सांगितले हिऱ्यांचा हार बनवण्यासाठी पाच हजार रुपये



तरी पाहिजेत.

वीरभद्रची बायको नवऱ्याला म्हणाली- ''आहो, कालच तुमच्या मित्राला नारळ विकून पाच हजार रुपये मिळालेत म्हणे! त्याने लगेचच काही ती रक्कम सीताकरला नेऊन दिली नसेल. त्याच्याकडे जाऊन रक्कम कर्जाऊ घेऊन या.''

वीरभद्र चंद्रपालकडे गेला नि बायकोचा विचार त्याला सांगितला. चंद्रपालने मित्राला उपदेश केला- ''कशाला उगाच हिऱ्यांच्या हाराच्या नादी लागतोस? जवळ आहे ती रक्कम सीताकरला नेऊन दे.''

तेव्हा वीरभद्र म्हणाला- ''काही गोष्टी तुला समजायच्याच नाहीत. मी जर हिऱ्यांचा हार बनवला नाही, तर माझी बायको रुसून बसेल. दुःखावेगाने ती एकाद्या वेळी मरून ही जाईल. माझ्या चुकीमुळे ती मेली तर दोष कोणाचा? थोड्याशा पैशांसाठी असला दुष्टपणा का करू?''

चंद्रपालने आपला विचार सांगितला- ''बरं, मग असं करू या. नारळ विकून मला जो फायदा मिळाला, ती रक्कम मी सीताकरला देतो. तुला जे पैसे पाहिजेत, ती रक्कम मी त्याच्याकडून कर्जाऊ घेतो. इतरांकडून तो पंधरा टक्के व्याज घेत असला, तरी ज्यांचे पैसे त्याच्याकडे आहेत त्यांच्याकडून तो साडे बारा टक्केच व्याज घेतो. म्हणजे अडीच टक्के व्याजात बचत होईल. आपल्या बायकोची इच्छा पूर्ण करणे तुझ्या दृष्टीने फार महत्त्वाचे असेल, तर मी तुला एक उपाय सांगितला. यावर तुझी मर्जी.''

वीरभद्र खर्चिक स्वभावाचा माणूस होता हे तर खरेच. आवश्यक किंवा अनावश्यक खर्चासाठी लोकांकडून तो पैसे घेत असे. पण कधी त्याने कुणाचे पैसे बुडविले नाहीत. त्याला वाटलं चंद्रपाल मैत्रीखातर आपल्यासाठी कर्जाची व्यवस्था करीत आहे. त्याने मुकाट्याने चंद्रपालचा प्रस्ताव मान्य केला.

चंद्रपाल स्वतः सीताकरकडे गेला. त्याला आपली रक्कम ठेव म्हणून दिली आणि कर्जाऊ काढलेली रक्कम वीरभद्रला आणून दिली. सर्व काही जाणून वीरभद्रच्या बायकोला फार वाईट वाटलं. ती म्हणाली- ''मला वाटलं, आपला मित्र भला माणूस आहे! पण पैशांची फार हाव सुटलेली दिसतेय. मित्र-धर्म विसरलेला दिसतोय!''

काही असो, वीरभद्राने आपल्या बायकोसाठी हिऱ्यांचा हार बनवून आणला. कर्जाऊ आणलेल्या पैशांचं व्याज द्यायचं आहे, म्हणून नवरा-बायकोंनी खूप काटकसर करून पैशांची जुळवाजुळव केली.

एके दिवशी दोन हजार एकशे रुपये घेऊन वीरभद्र चंद्रपालच्या घरी पोचला. चंद्रपालने पैसे मोजले आणि शंभर रुपये परत देत म्हणाला- ''मी तर तुला दोन हजार रुपयेच दिले होते. मग हे ज्यादा शंभर रुपये कशासाठी?''

''ते पाच महिन्यांचं व्याज आहे.'' वीरभद्र म्हणाला.

दुःखी अंतःकरणाने चंद्रपाल म्हणाला- ''शी-शी.... काय बोलतो आहेस? मी आपल्या मित्राकडून व्याज घेईन असं कसं वाटलं बरं तुला? आपण दोघे लंगोटीयार आहोत. माझ्याबद्दल असा गैरसमज कसा करून घेतलास?''

वीरभद्र म्हणाला- ''आता तुझा विचार बदलला असेल! तू मला पैसे दिलेस तेव्हा काय म्हणाला होतास? तू म्हणाला होतास की मी आपली रक्कम सीताकरला देतो, आणि त्याच्याकडून कर्ज घेऊन येतो.'' वीरभद्रच्या बोलण्यात कडवटपणा ओसंडत होता.

''तू पण काय मूर्ख आहेस रे! ते सगळं मी आपल्या हिशोबाबाबत म्हणालो होतो. सीताकरला पैसे देऊन फायदा माझाच होणार होता. त्याच्याकडून घेतलेल्या पैशांचं व्याज मीच देणार. किती व्याज द्यावं लागेल ते ही मी तुला सांगितलं होतं. पैशाची कशी किंमत आहे हे तुला समजावं एवढाच माझा उद्देश होता.''

आता वीरभद्रच्या लक्षात आलं की चन्द्रपाल त्याचा खरा मित्र आहे आणि पैशांची किंमत ही त्याला समजली. त्याने चंद्रपालची क्षमा मागितली.

यानंतर कोण जाणे वीरभद्रने खर्च कमी करण्याचा प्रयत्न केला की नाही, पण कुणाला पैसे मात्र मागितले नाहीत.



# पुरस्कार दिला वृद्धाला! का?

विकानेरचे जमीनदार भूपतिराय यांनी आपल्या जन्म-दिवशी एका साहित्य-गोष्ठीचे आयोजन केले. परमशिवावर जो लागोपाठ शंभर कविता ऐकवील, त्याला 'सरस्वती-पुत्र' ही पदवी व हजार अशर्फ्या दिल्या जातील अशी त्यांनी घोषणा केली.

या स्पर्धेत रजनीचन्द्र नावाचा एक पंचवीस वर्षांचा तरुण व नारायण शर्मा नावाचे एक ऐंशी वर्षांचे वृद्ध समान प्रतिभाशाली सिद्ध झाले. आता महाराज कोणाला विजयी ठरवणार याबाबत सभेतील सर्वांना उत्सुकता लागून राहिली.

जमीनदाराने विचारांती नारायण शर्माला विजेता ठरविले. त्यांना पदवी देण्यात आली आणि बरोबर एक हजार अशर्फ्या पण!

समारंभ संपल्यावर दिवाणाने जमीनदाराला विचारले- ''महाराज, आपण नारायण शर्मांना विजेता ठरवलंत याच्यामागे काही खास कारण?'' जमीनदाराने लगेच उत्तर दिले- ''होय तर! दिवाणजी, रजनीचन्द्र तरुण आहे. या वर्षी नाही तर पुढील वर्षी तो स्पर्धेत पुन्हा भाग घेईल आणि पदवी व पुरस्कार मिळवू शकेल. बिचारा नारायण शर्मा म्हणजे पिकलं पान! केव्हा गळून पडेल सांगता येत नाही. आम्ही नारायण शर्मांचा सत्कार नाही केला, तर त्यांचा सत्कार करण्याचं सद्भाग्य मिळवलं. अशा भाग्यापासून कदाचित् आम्ही वंचित राहिलो असतो!

-आर्. पट्टाभि





# कीर्तिसिंह-२

(कोसल राजा सुषेणचा जयसेन हा परममित्र आहे. जयसेनची कन्या कीर्तिसेना हिच्या शक्ति सामर्थ्याची परीक्षा घेषणेयासाठी राजा तिला, अरवली पर्वतप्रदेशात विद्याभ्यास पूर्ण करून राज्याकडे परत येणारा आपला पुत्र कीर्तिसेन याला वाटेतच अडवून व, अन्य प्रदेशात नेऊन, तेथे कैद करून ठेवायला सांगतो. कीर्तिसेना आपली तयारी असल्याचे सूचित करते. जयसेनला मात्र प्रथम या अटीबद्दल भीती वाटते, पण नन्तर तो स्वतःला सावरतो. राजाच्या अटीतला गूढार्थ अन् आपल्या पूर्वजांची पूर्वपीठिका तो कीर्तिसेनेला समजावून सांगतो. पूर्वज जयसेन याने तेव्हाचा राजा विचित्रवर्मा याला अद्भुत् शक्तींनी भारलेला एक रत्नहार अर्पण केला. नन्तर शिकारीसाठी गेलेल्या विचित्रवर्माला जमिनीखाली दडलेली देवी शक्तीची एक मूर्ती सापडली. त्या बाबतीत शास्त्रज्ञ व आगमवेत्यांचा सल्ला घेण्यासाठी तो राजधानीत पोचला.)

राजधानीत पोचल्या बरोबर राजा विचित्रवर्मा जयसेनला भेटला. त्याने सांगितलेली सर्व हकिकत ऐकून जयसेनला खूप आनन्द झाला, अन् त्याबरोबरच दुःखही वाटले.

दोघांच्यात सुदीर्घ चर्चा झाली, विचारांचे आपापसात खूप आदानप्रदान झाले अन् शेवटी जयसेन व अन्य लोकांनी निर्णय घेतला की शक्तिदेवीची ही मूर्ती राजधानीत न आणता, ती सापडल्या ठिकाणीच एक मन्दिर बांधून त्यात तिची प्रतिष्ठापना करावी. शास्त्रज्ञांनी असेही सांगितले की, ही मूर्ती मिळाल्यामुळे जो लाभ होणार आहे, तो वर्तमान राजा विचित्रवर्मा याला न होता, पुढल्या एकाद्या पिढीत त्याच्या वारसावर देवीची कृपा होऊन त्याला लाभ होईल. हा वारस देवीच्या कृपेने राज्याच्या मर्यादा वाढवेल अन् संपूर्ण दक्षिणापथाचा सम्राट



बनेल. त्याची कीर्ती दिगंत पसरेल आणि त्याच्या शासनकाळातच देवीला एक सुप्रसिद्ध नाव मिळून तिची दररोज पूजाअर्चा केली जाईल. इतकेच नव्हे, तर ही देवी महिमामयी मानली जाऊन तिचे अुत्सव खूप मोठ्या प्रमाणावर साजरे केले जातील.

हे सर्व ऐकल्यावर, आपल्याला त्या रात्री आनन्द व दु:ख दोन्ही एकाच वेळी का वाटले हे राजा विचित्रवर्माच्या लक्षात आले. आता त्याने आपले दु:ख विसरायचे ठरवले, काळजी सोडून दिली आणि आपल्याच एका वंशजाला चांगली प्रतिष्ठा प्राप्त होणार याबद्दल त्याला हर्ष वाटू लागला. त्याने जंगलातच एक मंदिर बांधवून त्यात मूर्तीची प्रतिष्ठापना केली. राजाने हे मंदिर बांधण्यासाठी अपरंपार संपत्ति खर्च केली. परन्तु तेथे जाअून रोज मूर्तीची पूजा करणारा कोणी नसल्याने, काही काळाने लोक ते मन्दिर व मूर्ती यांच्याबद्दल सर्व विसरून गेले.

राजा विचित्रवर्माने विचार केला की, ही सारी दैवलीलाच आहे, अन् मनातल्या मनात देवी शक्तीला प्रणाम करत तो गप्प राहिला.

अशीच काही वर्षे निघून गेली. हाराच्या मदतीने विचित्रवर्माने अुत्तम प्रकारे राजशकट हाकले अन् कीर्ती संपादन केली. आपल्या राज्यात एक दोन ठिकाणी जमीन खणली अन् त्यातून मिळालेल्या धनाचा प्रजेला अुपयुक्त कामांसाठी वापर केला. यामुळे सर्व प्रजाजनांचे सुख द्विगुणित झाले व त्याची ख्याती वाढली. हाराच्या महिम्याची माहिती त्याने गुप्तच राखली होती; परन्तु हळू-हळू ती प्रकट होत गेली. लोक म्हणू लागले की, राजा विचित्रवर्मा तर अुत्तम मानव आहेतच, परन्तु त्यांच्या मोठेपणाचे मूळ कारण तो हारच होय. आणि हाराच्या महिम्याच्या प्रसाराबरोबरच त्रासही सुरू झाला.

आतापर्यन्त दक्षिणापथात कोसल राज्यच सर्वात बलशाली व शस्यश्यामल होते. कोसल-नंतर कांभोज व नग या राज्यांचा क्रमांक होता. हे दोन्ही देश कोसलच्या पूर्वेला असून त्यांच्या सीमा कोसल राज्याशी या शक्ति देवीच्या मंदिराजवळच भिडत होत्या.

चक्रादित्य कांभोजचा राजा होता. तसा तो एक चांगला राजाच होता, परन्तु काहीसा असमर्थ होता. त्याच्या शासनकाळात जनतेला बरेच कष्ट सहन करावे लागले. तेथील दु:खी प्रजा कोसल राज्य अन् तेथील सुव्यवस्थित राज्यकारभाराबद्दल आपसात चर्चा करी, तेथील सुखमय जीवनाशी तुलना करी. शेवटी आपल्या कष्टांना कंटाळून काही प्रजाजन कोसलमधे जाअू लागले. दयाळू विचित्रवर्माने त्या सर्वांना आश्रय दिला व त्यांच्यासाठी सर्व सोयी अुपलब्ध करून देअून त्यांच्या पोषणाची जबाबदारीही स्वीकारली. त्यांना कसलीही कमतरता पडू दिली नाही.

अशा परिस्थितीतच विचित्रवर्मा व चक्रादित्यही वृद्ध होत गेले. विचित्रवर्माचा ज्येष्ठ पुत्र जयवर्मा कोसल सिंहासनाधिष्ठित झाला. इकडे चक्रादित्याच्या मुलालाही सिंहासन प्राप्ती व्हायला हवी होती; परन्तु तोही आपल्या पित्याप्रमाणेच असमर्थ होता. ही वास्तविकता लक्षात घेअून त्याचा दुसरा पुत्र वरुणदत्त याने आपला भाअू व पिता या दोघांना ही कैदेत टाकून सिंहासन हस्तगत केले. त्या दोघांच्या असमर्थतेला कंटाळलेल्या अधिकाऱ्यांनी व प्रजेनेही वरुणदत्तला आपला पाठिंबा दिला.

पण पिता असमर्थ असला, तर पुत्र वरुणदत्त अगदी महामूर्ख होता. कोसलराज्याच्या अुन्नतीबद्दलचे प्रजेचे बोलणे त्याला सहन होईना. आपल्या राज्याच्या नागरिकांचे



कोसलमधे जाअून आश्रय घेणे त्याला आवडेना. वरुणदत्तच्या मनाने घेतले की, कोसल राज्याच्या अुन्नत स्थितीचे कारण केवळ जयसेनने राजाला दिलेला तो अपूर्व हारच होय. म्हणून त्याने कोणत्या ही अुपयाने तो हार हस्तगत करायचे पक्के ठरवले. हार प्राप्त करून आपलेही राज्य कोसल प्रमाणेच संपन्न, सुखी व शस्यश्यामल बनवायचा त्याचा विचार होता. हार मिळवायची त्याने ताबडतोब एक योजना आखली. त्या योजनेचे कारण बनला कोसलचा सांप्रत राजा खुद्द जयवर्माच. खरे म्हणजे त्याच्या वागणुकीनेच वरुणदत्तला तो हार प्राप्त करून घ्यायला मदत केली.

जयवर्मा हा तसा चांगला माणूस होता, समर्थ



पार पाडली.

यानन्तर कनकलतेने आपल्या हावभावांनी, नाटकीपणाने व चातुर्याने राजा जयवर्माला आपला अगदी दास बनवून टाकला. तिच्यावर मोहित झालेल्या राजाने मस्तीत डोलत आपल्या गळ्यातला हार काढून तिच्या गळ्यात घातला. कामगिरी पार पाडून कनकलता त्याच रात्री कोसल राज्यातून नाहीशी झाली.

आपली चूक लक्षात आल्याबरोबर जयवर्मा घाबरून धावतच पित्यासमोर हजर झाला!

त्यावेळी विचित्रवर्मा जयसेन बरोबर बुद्धिबळे खेळण्यात मग्न झालेला होता. पित्याशिवाय केवळ जयसेनच तिथे असल्यामुळे जयवर्माने आपण केलेल्या चुकीबद्दल विचित्रवर्मालासांगितले. तो हार परत मिळवण्यासाठी अुपाय सुचवण्याची त्याने दोघांनाही विनंती केली.

त्याचे सर्व बोलणे ऐकून घेतल्यावर खोल निश्वास टाकत विचित्रवर्मा पुत्राला म्हणाला, "आपल्या घराण्यातल्या व्यक्तीला सोडून हार अन्य कोणाच्या हाती पडला तर त्याचा प्रभाव नष्ट होतो! तेव्हा आता हाराबद्दल सर्व काही विसरून जाणेच श्रेयस्कर!"

हे ऐकून जयवर्माबरोबरच जयसेनही फार आश्चर्यचकित झाला. पित्याच्या बोलण्यामुळे जयवर्माला जरा बरे वाटले, परंतु हार गेल्याच्या दुःखामुळे तो काही बोलू लागला.

पण आपल्या मुलाला मधेच अडवत विचित्रवर्मा म्हणाला, "रसिकवृत्तीच्या राजाने आपल्या कलाप्रियतेने कलाकारांना संतुष्ट करावेच, परंतु त्यांच्यामागे वेडे होणे हे मात्र बरोबर नाही. त्याने तर प्रजेच्या सुखदुःखांकडे आपले लक्ष केन्द्रित करायला हवे. कमलपत्रावरील पाण्याच्या थेंबाप्रमाणे जो अलिप्त राहून कलासुख अुपभोगू शकेल, तोच अुत्कृष्ट राजा म्हणवला जाईल."

जयवर्मा काहीसा लज्जित होअून दुःखी मनाने तेथून निघून गेला. तो गेल्यावर जयसेनकडे पहात विचित्रवर्मा म्हणाला, "मी खोटं का बोललो, असं वाटत असेल ना तुला? पण जयसेन, एक गोष्ट सांग मला. जयवर्मा कडून तो हार काढून घेण्याची गडबड का केली आपण?





त्याच्या गळ्यातच तो असता, तर त्यालाही नर्तकीचं नाटक कळून चुकलं असतं. ती त्याला फसवू शकली नसती, अन् तिला हार घेअून जाणं शक्यही झालं नसतं. हे रहस्य तर कांभोज राजालाही माहीत आहे. तरीही तो पळवायचं कारस्थान त्यानं रचलं. आपण वेळीच तो जयवर्माच्या गळ्यातून काढून घेतला. असं का केलं आपण? आपली बलहीन मनोवृत्ती अन् अुन्मत्त व्यवहार यामुळेच वरुणदत्त दुर्बळ आहे. अुन्मत्तपणात मग्न असणाऱ्या माणसाची परमेश्वरदत्त बौद्धिक शक्ती त्याला यश देअू शकत नाही. अतीन्द्रीय शक्ती मानवाच्या सहज मानसिक शक्तींना जास्त तीक्ष्ण बनवतात. पण माणसं आपल्या दुर्बळतेमुळे त्यांचा अुपयोग करू शकत नाहीत. वरुणदत्त मूर्ख असला, तरी त्याच्या हे लक्षात आलेलं आहे; म्हणूनच त्यानं कनकलतेद्वारा जयवर्माला अपंग बनवायाचा प्रयत्न केला अन् हार मिळवायचा प्रयत्न केला. बरोबर आहे ना माझं म्हणणं?"

आपले डोके नुसतेच हालवून जयसेन गप्प राहिला. विचित्रवर्मा हसत म्हणाला, "जयवर्मावर माझ्यापेक्षा तुझंच अधिक प्रेम आहे, हे ठाअूक आहे मला. जयसेन, तुला वाटत असेल, की एकदा धक्का खाल्लेला, अपमानित जयवर्मा पुढे सावधपणे वागेल, अन् मग त्याला हार परत देता येईल. पण अशा बाबतीत अभिमानापेक्षा जबाबदारीला अन् विश्वासापेक्षा अविश्वासालाच जास्त प्राधान्य द्यायला हवं. दुर्बळ जयवर्मात या घटनेनं परिवर्तन घडेल ही आणि नाहीही घडणार. वरुणदत्तला जर कळलं, की स्वतःला मिळालेला हार नकली असून, खरा हार आपल्याकडेच आहे; तर तो कोणत्याही प्रकारचं अघोरी काम करायला मागेपुढे पहाणार नाही. या सगळ्याचा विचार करूनच मी खोटं बोललोय. आता जयवर्मा अन् वरुणदत्तही अशाच भ्रमात रहातील की हाराची शक्तीच नाहीशी झालेली आहे. आता राहिली हाराची पुढची गोष्ट. मी आता त्यासाठी एक पक्का निर्णय घेतलाय. काहीही असो, माझ्या वंशात पुढे एका महोन्नत अशा व्यक्तीचा जन्म होणार आहे, हे निश्चित आहे. तू जो हार मला बक्षिस दिलास तो, अन् त्याद्वारे मला जी अपार

संपत्ती मिळाली ती-असे सर्व त्या माझ्या महोन्नत वंशजालाच मिळो.''

महाराज विचित्रवर्माच्या राजनीती व न्यायीपणाची मनातल्या मनात प्रशंसा करत जयसेनने मान तुकवून मूकपणेच संमती दिली.

विचित्रवर्माच्या कल्पनेप्रमाणेच, त्याने जयवर्माला हाराबद्दल सांगितलेले सारे काही वरुणदत्त पर्यन्त पोचले. हाराची शक्ती खरोखरच नाहीशी झालीय अशी त्याचीही खात्री पटली. यामुळे त्याला दुःखही वाटले.

जे काही घडले, त्यामुळे जयवर्मा फार चिंतित झाला अन् त्याच्यात आमूलाग्र परिवर्तन घडून आले. त्याने आपले विलासी जीवन सोडून दिले अन् तो एका जबाबदार राजाप्रमाणे शासन चालवू लागला. कोसलच्या प्रजेत राजाबद्दल प्रेम व विश्वास अुत्पन्न झाला.

आपल्या मुलात झालेल्या परिवर्तनामुळे विचित्रवर्माला फार आनन्द झाला. या घटनेनंतर थोड्याच दिवसात त्याचा मृत्यु झाला. त्यानंतर जयसेनही त्याच वाटेने गेला. त्यापूर्वी जयसेनने एकदा मुद्दाम जयवर्माला घडलेले सर्व खरेखरे सांगून म्हटले, ''पुत्रा, तुझ्यात घडलेलं परिवर्तन पाहून तो हार तुला परत द्यायची विनंती मी महाराजांना केली; परंतु त्यांनी ते मानले नाही. ते म्हणाले माझ्या मनात असा संकल्प का अुपजलाय कुणास ठाअूक, पण आता मी त्यात बदल करणार नाही. माझा विश्वास योग्यच आहे अशी मला खात्री वाटतेय. आपण हे सारं विसरून जाणंच योग्य होईल जयसेन! तो हार घालण्याचा हक्क जयवर्माच्या मुलाचा असू शकेल किंवा त्याच्या नातवचाही असू शकेल. पण हार तर माझ्या वंशातच राहील ना; अन्य कुणाच्या हाती तर नाही जाणार ना! पण त्यांनी तो कुठे लपवला हे मलाही नाही सांगितलं. एक पत्र त्यांनी माझ्याकडून तेव्हा लिहवून घेतलं अन् त्यांच्या मृत्यूनंतर ते तुला द्यायला सांगितलं. हे घे ते पत्र!'' असे म्हणत जयसेनने हस्तिदंताचा एक लहानसा डबा त्याच्या हातात ठेवला.

-क्रमशः





# अपराध आणि शिक्षा

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडावर चढला आणि झाडावरून प्रेत खाली उतरवले. ते खांद्यावर टाकून तो मुकाट्याने स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हा प्रेतातील वेताळ बोलू लागला-

''राजन्, मध्य रात्रीच्च वेळी या स्मशानाच्या आसपास किती भुते असतील कोण जाणे? एवढे कष्ट करण्यामागील तुझा उद्देश काही माझ्या लक्षात येत नाहीये. तुझी चिकाटी व हट्ट पाहून मला वाटते की आपल्या शक्तींचा दावा करणाऱ्या कोणी तरी तुला प्रेरणा दिलेली असावी. पण खरे म्हणजे ही शुद्ध आत्मवंचना आहे. उदाहरणादाखल मी तुला चंद्रसेनची गोष्ट सांगतो. नीट लक्षपूर्वक ऐक.'' आणि वेताळ आपली गोष्ट सांगू लागला.

द्विचक्रपुरचा राजा चंद्रसेन शिकारीसाठी जंगलात गेला. आणि त्याला पुढे वाट सापडेना. त्याला अतिशय तहान लागली. इकडे-तिकडे

## वेताळ कथा



भटकत असता त्याला एक आश्रम दिसला. तेथे प्रदीप नावाचा एक मुनी रहात होता. त्याने राजाचे स्वागत केले आणि त्याला प्यायला पाणी दिले. चन्द्रसेनने थोडा वेळ आश्रमात विश्रांति घेतली.

"माझं नाव चन्द्रसेन. मी या देशाचा राजा आहे. आपण कोण?" कुतुहलाने राजाने मुनीला प्रश्न केला.

प्रदीपने उत्तर दिले-"मी ही एक राजा होतो. माझं नाव प्रदीप. प्रजेला चोर-डाकूंचे भय नसावे म्हणून अपराध्यांना मी कठोर शिक्षा करीत असे. मी एकाएकी आजारी पडलो. अनेक वैद्यांनी मला औषधे दिली, पण कशाचाही काही उपयोग झाला नाही. एक दिवशी मला भेटायला एक महापुरुष आले. ते मला म्हणाले-"तू अपराध्यांना योग्य शिक्षा न देता फार कठोर शिक्षा देत आलास. त्या सर्व पापांचे फळ म्हणून तू असा आजारी आहेस. जंगलात जा, तपश्चर्या कर आणि आपल्या पापांचे पायाश्चित्त कर."

"काही दिवसांनी मी आपल्या भावाला राज्य-कारभार सोपवला आणि बायको सह इकडे निघून आलो. एक वर्षभर तपश्चर्या केल्यानंतर माझी प्रकृति थोडी सुधारली. पण पुन्हा राजधानीत जाऊन राज्य-कारभार करण्याची इच्छा राहिली नाही. राजसुखात मग्न असलेल्या माझ्या भावाच्या मनात माझ्या विषयी शंका उत्पन्न झाली आणि त्याने मला मारून टाकण्यासाठी दोन सैनिक पाठवले. ते आले, पण माझी हत्या करू शकले नाहीत. त्यांनी खरी गोष्ट मला सांगून टाकली. जंगलात भटकत भटकत एक वर्षापूर्वी मी इथे आलो. त्या सैनिकांनी माझ्या भावाला खोटंच सांगितलं की हींस्र श्वापदांनी मला मारून टाकले. आता काही दिवसांनी मी हिमालयात जाणार आहे.

हे सर्व ऐकून चन्द्रसेनला आश्चर्य वाटलं नि थोडं भय ही. आपली शंका प्रदर्शित करीत तो म्हणाला-"स्वामीजी, अपराध्यांवर सूड घेण्याची भावना माझ्या मनात कधी ही नव्हती. पण त्यांना जर कठोर शिक्षा दिली नाही तर प्रजेवर संकटे ओढवतील. मी काय करावं हे आपणच सांगा. माझं काय कर्तव्य आहे? मी पण राज्य-कारभार सोडून जंगलात जाऊ का?"

प्रदीपने मार्गदर्शन केले-"सर्व पापं, सर्वांना एक समान पीडा देत नाहीत. मी आयुष्यात आणखी ही अनेक पापे केली. त्यात हे आणखी एक मिळालं. आणि अशा रीतीने मी आपल्या पापांचं फळ भोगत आहे. तू मात्र भिऊ नकोस. मी तुला एक स्फटिक देतो. त्याच्या साह्याने तू निर्धास्तपणे पुढील जीवन जगशील!"

चंद्रसेनला स्फटिक पाहून आश्चर्य वाटलं. प्रदीप पुढे म्हणाला-"हा स्फटिक हातात ठेवून तू न्याय देत जा. तू अपराध्याला योग्य शिक्षा दिलीस तर हा पिवळ्या रंगाचा होऊन जाईल. जर अधिक कठोर शिक्षा दिलीस तर याचा रंग लाल होईल. आणि जर कमी प्रतीची शिक्षा दिलीस तर हा काळा पडेल. हा स्वतः मात्र निर्णय घेऊं शकत नाही."

"हा स्फटिक आपल्या तपश्चर्येच्या शक्तीने मी मिळवलेला आहे. हिमालयात जाण्यापूर्वी हा एकाद्या राजाला देण्याची माझी इच्छा होती. तुझे भाग्य म्हणून तू इथे येऊन पोचलास. अपराध्याला योग्य शिक्षा देण्यासाठी हा स्फटिक तुला उपयोगी पडेल. एकाद्या चांगल्या न्यायाधीशाची नेमणूक कर. तुला स्वतःला पाप लागणार नाही अशा रीतीने शासन कर."

चंद्रसेन तो स्फटिक घेऊन राजधानीला आला. आजपर्यंत अपराध्याना तो स्वतःच शिक्षा देत असे. आता त्याने सल्ला देण्यासाठी पाच न्यायाधीशांची नियुक्ति केली. अपराध्यांची चौकशी केल्यानंतर त्याने या न्यायाधीशांचा सल्ला घ्यायला सुरुवात केली.





स्फटिकाचा रंग काळा होईल अशीच शिक्षा तो अपराध्यांना देऊ लागला.

परंतु स्फटिक लाल व काळा रंगच धारण करी. तो पिवळ्या रंगाचा कधी झालाच नाही. त्यामुळे अपराध्याला योग्य अशी शिक्षा देणे चंद्रसेनला कधी शक्यच होईना.

राजाने आपल्या जवळील स्फटिकाबाबत कधी कोणाला काही सांगितले नाही. कोणाला ही कळणार नाही अशा रीतीने त्याने अनेकांची परीक्षा घेतली. त्यात न्यायशास्त्री होते, पंडित होते, अनेक क्षेत्रातील सुयोग्य विद्वान होते. परंतु कोणाचा ही निर्णय ऐकून स्फटिक कधी पिवळ्या रंगाचा झाला नाही. कुठल्या ही अपराधाला योग्य शिक्षा देणे फार कठिण काम आहे हे त्याच्या लक्षाच आले.

चन्द्रसेन स्फटिक नेहमी आपल्या जवळ ठेवीत असे. एकदा वेष पालटून तो शहरात हिंडत होता. एका ठिकाणी त्याने एक विचित्र झाड पाहिले. एक गरीब माणूस एका श्रीमंत माणसाला अशर्फ्यांनी भरलेली थैली देत होता. राजाला संशय आला की हा श्रीमंत माणूस मोठा लबाड असला पाहिजे.

राजा ताबडतोब त्या दोघांपाशी गेला आणि त्यांना विचारले-''तुम्ही दोघे जण इथं काय करीत आहात?''

गरीब माणूस म्हणाला-''हे गृहस्थ महाज्ञानी आहेत. यांनी मला खूप मदत करायचं आश्वासन दिलंय. म्हणून आपली सारी कमाई मी खुषीने यांना देत आहे!''

''तुला काय मदत पाहिजे आहे?'' राजाने प्रश्न केला.

गरीबाने निवेदन केले-''महाराज, मला चार मुलगे आहेत. एक दिवशी माझ्या घरी एक साधू आला. त्याने सांगितले-'तुझ्या चार मुलांपैकी एक महाज्ञानी बनेल. त्याला चांगले शिक्षण देण्यात काटकसर करू नकोस.' मी त्यांना विचारलं-'या चारां पैकी महाज्ञानी कोण बनणार?' 'अग्नि आणि ज्ञान यांची गोष्ट काय सांगायला लागते?' असं विचारून ते निघून गेले. चारी मुलांना शिकवणं तर मला केवळ अशक्य आहे. म्हणून माझ्या चार मुलात कोण महाज्ञानी बनेल हे शोधून काढण्याच्या बाबतीत हे मला मदत करणार आहेत.''

त्या कपटी माणसाला राजाने गरीबाचे धन परत देववले आणि म्हणाला-''माझ्या बरोबर चल. मी तुला मदत करीन.''

दोघे गरीबाच्या झोपडीपाशी गेले, तेव्हा तेथे खूप गडबड-गोंगाट चालला होता.

गरीबाच्या चारी मुलांनी मिळून मातीची एक मूर्ति बनवली होती. रंगवून झाल्यावर ती खूपच सुंदर दिसत होती. सर्व लोक म्हणाले-'बाजारात जाऊन ही मूर्ति विकली तर चांगली किंमत येईल.' इतक्यात शेजारचा चंद्र आला आणि त्याने ती मूर्ति तोडून-फोडून टाकली. चारी भावांनी त्याचा पाललाग केला आणि त्याचा चांगला समाचार घेतला. पकडून त्याला आपल्या घरी घेऊन आले. चंद्रला काय शिक्षा करावी याबाबत चौघात वाद-विवाद चालू होता.

राजाला वाटलं ही नामी संधी आहे. साधूने सांगितल्याप्रमाणे यांच्यापैकी एक जण महाज्ञानी निश्चित असणारच! चंद्रला काय शिक्षा करावी याबाबतचा प्रत्येकाचा निर्णय ऐकला की महाज्ञान्याचा पत्ता लागेल.

चन्द्रसेनने स्फटिक आपल्या मुठीत बंद केला आणि सर्वात मोठ्या मुलाला विचारले-''तू आपला निर्णय सांगशील?''

''चाबकाचे शंभर फटके मारायला हवेत याला!'' मोठा मुलगा म्हणाला. स्फटिकाचा रंग लाल झाल्याचे राजाने पाहिले. त्याने नंतर दुसऱ्या मुलाला आपल्या निर्णयाबद्दल विचारले.

तो म्हणाला-''याच्याजवळ जेवढ्या मूर्ति





आहेत, सगळ्या फोडून टाकल्या पाहिजेत!''

राजाने स्फटिक पाहिला, त्याचा रंग लालच होता. तिसऱ्याला विचारल्यावर तो म्हणाला-''याला एक अशीच मूर्ति बनवायला सांगून ती फोडून टाकली पाहिजे.'' राजाच्या हातातील स्फटिकाचा रंग काळा झाला.

''याला शिक्षा केली म्हणजे आपल्याला आपली मूर्ति परत थोडीच मिळणार आहे? माझ्यात काही योग्यता असेल तर मी असे करीन की त्याला आपण चूक केली असे वाटले पाहिजे. म्हणजे तो पुन्हा अशी चूक करणार नाही.'' चौथा म्हणाला.

राजाने आपल्या हातातील स्फटिक पाहिला. आश्चर्याची गोष्ट, त्याचा रंग पिवळा झाला होता. हा चौथा मुलगाच भविष्यात महाज्ञानी होणार हे राजाच्या लक्षात आले. तो त्यांना म्हणाला-''मी राजा आहे, तुमच्या कुटुंबाला आर्थिक मदत मी करीत जाईन.'' राजाला वाटले-चौथ्या मुलाच्या शिक्षणाची व्यवस्था करणे हे आपले कर्तव्य आहे. वडिलांच्या व भावांच्या संमतीने तो त्याला आपल्या बरोबर घेऊन गेला.

एवढी गोष्ट ऐकवून वेताळाने विक्रमादित्याला विचारले-''राजा, चौथ्या मुलाचा निर्णय ऐकल्यावर स्फटिकाचा रंग पिवळा होणे, हा मला एक योगायोग वाटतो. कारण अपराध्यांबाबत कुठला ही कायदा नित्य उपयुक्त ठरणार नाही. कुठल्याही कायद्याकडे संशयी दृष्टीने केव्हां ही पाहता येईल. वेळोवेळी सामाजिक परिस्थितीत बदल होत राहतो, आणि त्याचा परिणाम कायद्यांवर होणारच. शासन करणारा राजा व त्याचे अधिकारी आपल्या स्वार्थासाठी, आपल्या संरक्षणासाठी, आपल्या व्यक्तिगत फायद्यासाठी कायद्याचा निरनिराळा अर्थ लावतात असे आपण नेहमी पाहतो. म्हणून कोणता ही न्यायाधीश वा महाज्ञानी आपल्या आसपासच्या परिस्थितीकडे पाहूनच न्याय-निर्णय करतो. एका विशिष्ट काळी जो धर्म मानला गेला, न्याय मानला गेला, नीति मानली गेली, ती अन्य काळी अधर्म, अन्याय वा अनीति मानली जाते हे तर तुला माहीतच आहे. यावरून स्फटिकाने दिलेला न्याय-निर्णय निरर्थक आहे असे सिद्ध होत नाही का? माहीत असून ही माझ्या या शंकेचं उत्तर दिलं नाहीस तर तुझं मस्तक धडावर राहणार नाही हे लक्षात असू दे.''

वेताळाच्या प्रश्नाचे उत्तर देत विक्रमादित्य म्हणाला-''काळानुसार शिक्षेबाबतच्या कायद्यात बदल होणं आवश्यकच आहे. चंद्रसेन राजापुढे जो प्रश्न होता, तो कायद्यात बदल करण्याबाबत नव्हता. नवीन कायदा करण्याबाबतचा ही तो प्रश्न नव्हता. आपल्या शासन-काळात शिक्षेसंबंधी जो कायदा प्रचलित आहे, त्यानुसार आपण शिक्षा देत आहोत की नाही हे जाणण्याची त्याची इच्छा होती. आपल्या तपश्चर्येच्या बळाने मिळालेला स्फटिक साधूने राजाला दिलेला होता. हा स्फटिक कालातीत आहे. कोणत्याही सामाजिक परिस्थितीत घेतलेला निर्णय न्यायोचित आहे की नाही हे स्फटिक सांगू शकतो. तो स्वतः मात्र न्यायाबाबत निर्णय घेऊ शकत नाही, त्यासाठी त्याला एकाद्या ज्ञानी माणसाची आवश्यकता आहे. कोणी ही न्यायशास्त्रज्ञ हे काम करू शकणार नाही. कारण कोणी किती ही महान् असो, आपल्या व्यक्तिगत आशा-आकांक्षा त्याला असतातच. आपल्या मानसिक आर्थिक भावनांचा परिणाम त्याच्यावर होतोच. परंतु ज्ञानी माणसाची गोष्ट वेगळी आहे. तो माणसाचे स्वाभाविक वा विशेष गुण, त्याच्या प्रवृत्ति यांचे उत्तम परीक्षण करू शकतो. त्याच्या सामाजिक स्तराचे अध्ययन ही तो करतो. म्हणून अपराधा-संबंधी कायद्यांतील जे स्थायी नियम आहेत, त्यांचा तो पूर्णतः स्वीकार करीत नाही. अमुक अपराधाला अमुक शिक्षाच योग्य असे तो समजत नाही. मुनीने दिलेल्या स्फटिकाचा चन्द्रसेन सदुपयोग अवश्य करू शकतो. गरीब माणसाच्या चौथ्या मुलाने दिलेला निर्णय हा केवळ योगायोग आहे असे तू समजत असशील जर ती तुझी चूक आहे!''

विक्रमादित्याचे स्पष्टीकरण ऐकून वेताळ प्रेतासह अदृश्य झाला.

**-श्री. राजकमल यांच्या एका रचनेच्या आधारे**



# विसराळू

लक्ष्मणशेट सूर्योदयापूर्वीच स्नानासाठी निघाला. वाटेत त्याला त्याचा भाऊ वीरशेट भेटला. त्याने विचारले, ''तुझ्या घरी लागोपाठ तीनदा चोरी झाल्याचं ऐकलं? खरं का हे?''

लक्ष्मणशेट दु:ख प्रकट करत म्हणाला, ''होय, खरंच आहे ते!''

''तो पेटारा तोडत असताना तू जागा नाही झालास का त्या आवाजानं?'' वीरशेटने विचारले.

''कसा जागा होईन? त्यानी माझ्या अुशीखालच्या किल्ल्या हळूच काढून घेअून पेटारा अुघडला!'' लक्ष्मणशेट अुत्तरला.

''नेहमी आपल्या किल्ल्या अुशीखालीच ठेवतोस? दुसरीकडे कुठे नाही का ठेवता आल्या?'' वीरशेट ने विचारले.

लक्ष्मणशेटने दु:खाने सांगितले, ''हो, तसंही करून पाह्यलं!''

''मग कुठे ठेवल्या होत्यास किल्ल्या?'' वीरशेटने विचारले.

''नेह्मी प्रमाणे अुशीखाली न ठेवता वर फळीवर ठेवल्या होत्या.'' लक्ष्मणशेटने उत्तर दिले.

''मग कशा काय सापडल्या त्या चोरांना?'' वीरशेटने आश्चर्य प्रकट केले.

''माझा विसराळूपणानंच लुटलं मला; अगदी धुळीला मिळवलं! 'किल्ल्या फळीवर ठेवल्या आहेत' असं आठवणीसाठी एका कागदावर लिहून मी तो कागद अुशीखाली ठेवला होता.''

चोरी पुन्हा कशी झाली, हे आता कुठे वीरशेटच्या ध्यानी आले!

-श्रवणकुमार



चान्दोबा पुरवणी-६८



## फणस



फळात आकाराने सर्वात मोठे फळ म्हणजे फणस. याची लांबी जवळजवळ ९० सें. मी. व रुंदी ४० सें.मी. इतकी असू शकते. फणसाला मराठी, तेलगू व संस्कृतमधे फनास (फणस) असे म्हणतात. दक्षिणे कडील काही भाषात याला 'चक्का' असे ही म्हणतात. असेही मानले जाते की, या चक्का शद्बावरूनच इंग्रजीत याला 'जॅक' हे नाव मिळाले आहे.

सुप्रसिद्ध ग्रीक इतिहासकार थिओफ्रॅटस (ई.स.पू. ३००) याने फणसाबाबत असा अुल्लेख केला आहे की, 'हे एक खूप गोड असे फळ असून भारतातील साधूगण ते मोठ्या आवडीने खातात.' त्याने असेही म्हटले आहे की, 'या मोठ्या फळाचा वृक्षही चांगला मोठा असाच असतो.' इटलीचा प्रवासी मेरिगनोल्ली याने फणसाची तुलना बकरीच्या पिल्लाशी केली आहे.

फणसाचे झाड नेहमीच हिरवेगार असते. हे झाड १५ मीटरपर्यन्त अुंच वाढते. आपल्या देशाच्या पश्चिमघाटात हे वृक्ष अधिक प्रमाणात आहेत. अुत्तरप्रदेश, बिहार व आसाममधेही कुठे-कुठे ही झाडे आढळतात. मुख्यत: सावलीसाठी ही झाडे लावली जातात. रेताड मातीत मिळणारी फळे, खडकाळ जमिनीतील फळांपेक्षा आकाराने मोठी असतात.

या झाडाची मोठमोठी हिरवी पाने गोल व चकचकीत असतात. हिवाळ्याच्या शेवटी झाडांना फुलांचे गुच्छ लटकतात. फुलाची टोकदार जाड पाकळी त्याचे रक्षण करते. परंतु लवकरच ती गळून पडते. पानांपासून दूर फांद्यांच्या बेचक्यात व खोडांना फळे लटकू लागतात. फळे पिकू लागली की त्यांचा सुगंध दरवळू लागतो. फळे कच्ची असताना त्यांचा रंग हिरवा असून ती जसजशी पिकू लागतात तशी पिवळी दिसू लागतात. चांगल्या पिकलेल्या फळाचा रंग अुदी असतो. चांगल्या मोठ्या फणसांचे वजन २० ते ३० किलोग्रॅम इतके भरते. फळाचे साल जाड व काटेरी असते. फणसाच्या आतील गऱ्यांच्या पोटात पांढरी बी (आठळी) असते. फणस साधारण मार्च ते जून या काळात पिकत असतात. ऋतुमानात बदल झाल्यास कधीकधी सप्टेंबरपर्यन्त ही फळे अुपलब्ध होअू शकतात. कच्च्या फणसाची भाजीही होते.

फणसाच्या लाकडाचा अुपयोग खिडक्या, दरवाजे व कपाटे बनवण्यासाठी केला जातो. पिवळ्या रंगाचे याचे लाकूड हळूहळू काळे पडू लागते. चांगले व्यवस्थित तासल्यावर ते लाकूड चमकत्या देवदार लाकडासारखे दिसते.




# कुराण

मुस्लीम धर्माचे संस्थापक महम्मद पैगंबर यांचा जन्म इसवी सन ५७० मधे अरेबियातील मक्का येथे झाला. लहानपणी ते व्यापार करत असत. अुंटांवर विविध प्रकारचा माल लादून त्यांनी अनेक प्रदेशातून भ्रमण केले. त्या अल्प काळातच त्यांना कळून चुकले की प्रजेला संदेश पोचवण्याचे महत्तम कार्य परमेश्वराने आपणावर सोपवलेले आहे. त्यांना असेही समजले की भविष्यात आपल्याला अनेकानेक महत्वाची कार्ये करावयाची असून, भगवान त्यांचीच वाट पहात आहे. न्यायपूर्ण असे धार्मिक जीवन व्यतीत करण्यासाठीची आवश्यक सूत्रे त्यांना भगवंताकडूनच प्राप्त झाली. त्यांनी ती सूत्रे जनतेसमोर मांडली. कुराणात त्यांनी या सूत्रांचाच अुल्लेख केलेला आहे.

'इस्लाम' या शब्दाचा अर्थच '(भगवंताच्या) अल्लाच्या अधीन रहाणे' असा आहे. त्याचा अर्थ 'शांति' असाही आहे. इस्लाम धर्मावर श्रद्धा असणारांना मुस्लीम किंवा महम्मदीय असे म्हणतात.

मुस्लीमांचा पवित्र ग्रन्थ आहे 'कुराण'. त्यातील मुख्य सिद्धान्त असा आहे की, 'भगवान हा सर्वत्र एकच आहे.' 'परमेश्वर हा सर्वव्यापी आहे' असेही कुराण मानतो. पूर्व, पश्चिम सर्वच भगवंताचे स्वतःचे आहे. कोणत्याही मार्गाने गेलात तरी शेवटी तुम्ही त्याच्याकडेच पोचाल. तो सर्वव्यापी व सर्वज्ञ आहे! हेच कुराणाचे प्रबोधन होय.

कुराणाच्या पहिल्या सूक्तीतच असे सांगितलेले आहे की, 'भगवंताच्या अधीन रहाणे' हाच मुख्य आचार होय.

नितान्त करुणामय अशा अल्लाच्या नावावर अर्पण व्हा.
अल्लाचाच नेहमी विजय होईल. तोच सर्वांचा अधिपति आहे.
तो परमकरुणामय आणि दयामय आहे.
आम्ही केवळ तुझीच प्रार्थना करतो.
केवळ तुझ्याच मदतीची आम्ही अपेक्षा करतो.
आम्हाला योग्य मार्गावर चालवत ठेव.
जे तुझे विश्वासपात्र आहेत, तुझ्या दयेला पात्र आहेत, त्यांनी स्वीकारलेल्या मार्गावरूनच आम्हाला ने.
जे तुझ्या प्रेमाला पात्र नाहीत, त्यांच्या मार्गापासून आम्हाला दूर ठेव.

कुराण हा ग्रन्थ ज्ञानप्राप्ती व न्यायालाच प्रधानता देतो. जन्मापासून मृत्यूपर्यन्त ज्ञानप्राप्तीतच समय व्यतीत करण्याचा आदेश कुराणाने दिला आहे.

आपल्या समकालीन असलेले प्रसिद्ध भारतीय विद्वान असगर अली इंजिनियर असे म्हणतात की, ''द्वेष, लढाईझगडे, किंवा दुरभिमानाला पुष्टी जगातला कोणताच धर्म देत नाही. खरे तर अशा दुर्बलांचे निर्मूलन करण्यासाठी धर्माची अत्यन्त आवश्यकता असते. प्रत्येक धर्म हा आपापल्या विलक्षण पद्धतीने प्रेम, शान्ति व न्याय वाढवण्यासाठी प्रबळ प्रयत्न करत असतो. इस्लामही तेच करत आहे.''

मक्केवर आक्रमण करणारांचा व त्यांना या कामात मदत करणारांचा हिंसात्मक सूड घेण्यासंबंधीच्या काही सूक्ति कुराणात आहेत. परंतु त्या सूक्तींचा अुपयोग संदर्भानुसार व्हावयास हवा. या सूक्ती आपल्या दररोजच्या जीवनात अुपयोगात आणायच्या सूक्तीं पेक्षा अगदी भिन्न अशा आहेत. रोजच्या व्यवहारात त्यांचा अुपयोग करू नये.



# तुम्हाला माहीत आहे काय?

१. स्वतन्त्र केनिया देशाचे पहिले प्रधानमन्त्री व अध्यक्ष कोण आहेत?
२. आपल्या देशातील सर्वात मोठे शहर कोणते?
३. भूमध्य समुद्रात त्रिकोणी आकाराचे कोणते बेट स्थित आहे?
४. इंडोनेशियात 'हजार बेटांवाले बेट' या नावाने कोणते बेट प्रसिद्ध आहे?
५. जगात सर्वात उंचावर असणारा देश कोणता?
६. तीन हृदये असणाऱ्या प्राण्याचे नाव काय?
७. बर्लिनची निर्मिती व पतन केंव्हा झाले?
८. एका आशियाई देशाची राजधानी 'अयूध्या' होती. त्या देशाचे नाव काय?
९. अब्राहम लिंकनच्या पत्नीचे नाव काय?
१०. कोणत्या दाम्पत्याने मिळून इंग्लंडचे शासन चालवले? त्यांची नावे काय?
११. जगातील सर्वात अधिक जनसंख्या असलेले शहर कोणते?
१२. वॉशिंग्टन शहरापूर्वी अमेरिकेची राजधानी कोणती होती?
१३. दात नसलेले जनावर कोणते?
१४. बार्सिलोना हे स्पेनमधील एक शहर आहे. द. अमेरिकेत ही याच नावाचे एक शहर आहे. ते कोठे आहे?
१५. बटाट्याची पैदास सर्वात अगोदर कोठे होत असे?
१६. टांझानियाच्या मन्यारा नॅशनल पार्कमधे आफ्रिकेतील एक प्राणी अधिक संख्येने आढळतो. तो प्राणी कोणता?

## उत्तरे

१. जोमो केन्यारा.
२. कलकत्ता.
३. सिसिली.
४. बाली.
५. स्वित्झर्लण्ड.
६. 'कॅटलफिश' नावाचा जलचर.
७. १९६१ मधे, १९८९ मधे.
८. थायलंड.
९. मेरी टॉड.
१०. तिसरा विल्यम व दूसरी मेरी (१६८९-१६९४).
११. चीनमधील शांघाय.
१२. फिलाडेल्फिया.
१३. मुंग्या खाणारा 'अँन्ट ईटर'.
१४. वेनिन्झुएला.
१५. दक्षिण अमेरिका.
१६. हत्ती.



# दानवीर भूमिनाथ

वसंतपुर मध्ये भूमिनाथ नावाचा एक श्रीमंत माणूस रहात असे. त्याला लोक दानकर्ण म्हणत असत. आपले नाव सार्थ व्हावे म्हणून भूमिनाथने अनेक दाने दिली. अशा रीतीने त्याची संपत्ति संपत आली. शेती विषयक ज्ञान चांगले असल्यामुळे तो लोकांना ही मार्गदर्शन करी. त्याच्या शेतीत चांगली पिके येत, अन त्यामुळे त्याला उत्पन्न ही चांगलेच मिळे. तो चैन-आरामात जीवन जगत असे. परंतु दान-धर्म करण्याचा त्याचा स्वभाव बदलला नाही.

एक दिवशी तो आपल्या घराच्या चबुतऱ्यावर बसून गावच्या पुरोहिताशी गप्पा-गोष्टी करीत होता. त्याच वेळी एक ब्राह्मण तेथे आला. भूमिनाथने नम्रपणे त्याला नमस्कार केला नि विचारले-''इकडे कसं काय येणं झालं?''

ब्राह्मणाने उत्तर दिले-''महाराज, आपल्या गावातील रतन शेटजींच्या मुलीच्या लग्नासाठी मी या गावात आलो. लग्न-समारंभात रतन सेठ ब्राह्मण-पंडितांना पुरस्कार देत असतात. इथून दोन कोस अंतरावरील वनस्थली गावात मी राहतो. पुरस्कार मिळविण्याच्या आशेने मी इथे आलो. यावेळी ते सर्वांना ताटे देणार आहेत हे आपणास माहीतच असेल. तशी ताटे काही फार भारी किंमतीची नाहीत. मी अनाहूतपणे आलो आहे. कारण तसा रिवाजच आहे. निमंत्रितांनीच यावं असं काही नाही. इथल्या रिवाजाचा आदर करणं माझं कर्तव्य आहे. पण दुःखाची गोष्ट अशी आहे की यावेळी शेटजींनी फार मनापासून ताटे दिली नाहीत. देताना त्यांच्या चेहऱ्यावर प्रसन्नता दिसली नाही. म्हणून या प्रथेबाबत माझ्या मनात विरक्ति उत्पन्न झाली. आता पुन्हा मी इथे येणार नाही. इथे आलोच, तेव्हा मनात विचार आला, आपल्या सारख्या दानशूराला भेटून जावं.''

प्रकाश पवार



ब्राह्मणाचे बोलणे एकून भूमिनाथ फार प्रसन्न झाला. घरात जाऊन दक्षिणा देण्यासाठी काही पैसे घेऊन आला. ब्राह्मणाला दक्षिणा देऊन हात जोडून म्हणाला- ''लग्न-समारंभात ब्राह्मण-पंडितांना पुरस्कार देण्याची प्रथा आता कमी होत चालली आहे. केवळ रिवाज म्हणून अनिच्छेने हे पुरस्कार अलीकडे दिले जातात. आता नावापुरतीच ही प्रथा शिल्लक राहिली आहे. मी सुद्धा केवळ नाममात्र दानशूर राहिलो आहे. माझी आई वारली, तेव्हा मी भूदान करायला हवं होतं; पण मी ते करू शकलो नाही. भूदान करण्याऐवजी पुरोहिताला फक्त एक अशर्फी दिली आणि भविष्यात शक्य होईल तेव्हा भूदान करण्याचा वायदा केला. या परिस्थितीत मी आपणास काही विशेष दान देऊ शकलो नाही याचं मला वाईट वाटलं. पुरोहितजींना भूदान करण्याचं जे वचन मी दिलं आहे, ते मला पूर्ण करता येईल असा आशीर्वाद आपण कृपा करून मला द्यावा.

दक्षिणा आपल्या कनवटीला लावून ब्राह्मण भूमिनाथला म्हणाला- ''आपला हात दाखवा बरं!'' त्याने बारकाईने हातावरील रेषा पाहिल्या आणि मोठे डोळे करीत म्हणाला- ''महाराज, दानाच्या रेषा तर आपल्या हातावर स्पष्ट दिसत आहेत. जिवात जीव आहे, तोपर्यंत आपण दान-धर्म करीत राहणार. या रेषा सांगत आहेत की आपल्या जवळ जमीन आहे. आपण दिलेल्या वचनानुसार पुरोहितजींना निश्चित जमीन देणार.''

पुरोहितजी लगेच म्हणाले- ''भूमिनाथा-सारखे दानवीर आपल्या वचनाची पूर्ति करणार याबाबत शंका नाही. म्हणून त्यांनी मला जमीन दिली तर त्यात काही आश्चर्य नाही. पण मी जर ती जमीन स्वीकारली तर याचकवृत्तीला कलंक लागेल असे मला वाटते.''

असेच काही दिवस गेले. वसंतपुर जवळून वाहणाऱ्या नदीवर धरण बांधण्यात आले. नदीचं पाणी गावांतल्या शेतांपर्यंत पोचविण्यासाठी छोटे-छोटे कॅनॉल बांधले गेले, त्यातून पाणी वाहू लागले. यामुळे नदीचे पाणी कमी झाले. काठावर जिथे जमीन दिसायची तेथे टेकाडे दिसू लागली. कोणे एके काळी नदीला



पूर आल्यामुळे जमीन पाण्याखाली बुडून गेली होती.

एके दिवशी गावचा तलाठी भूमिनाथकडे आला आणि म्हणाला- ''भूमिनाथजी, आपण मोठे भाग्यवान आहात. भाग्याचं दुसरं नाव भूमिनाथ! नदीत जी टेकाडं उभी राहिली आहेत, आम्ही आमच्या पद्धतीनुसार त्यांची मोजणी केली. ही टेकाडं कोणा-कोणाची आहेत हे आमच्या लक्षात आलं. आमच्या जवळ जे कागदपत्र आहेत, त्यांनुसार पाण्याखाली गेलेल्या जमिनीपैकी दहा एकर जमीन आपली आहे.''

आपले भाग्य पुन्हा एकदा फळफळले आहे असे भूमिनाथला वाटले. त्याला खूप आनंद झाला. तलाठ्याला आदरपूर्वक घरात बसवलं नि पुरोहिताला बोलवून घेतलं.

पुरोहित आला. भूमिनाथ तलाठ्याला म्हणाला- ''साहेब माझी आई जेव्हा वारली, तेव्हा यांना जमीन देण्याचं वचन मी दिलेलं आहे. मरण्यापूर्वी मी आपली वचन-पूर्ति करू शकेन की नाही याबाबत मला शंकाच होती. म्हणून आता ही जमीन माझी नाही, आपण ती पुरोहितजींच्या नावे नोंद करावी.''

भूमिनाथाच्या या दानामुळे पुरोहित बुचकळ्यात पडला. शेजारच्या गावच्या ब्राह्मणासमक्ष तो जे काही बोलला होता, ते सर्व त्याला आठवले. जर भूमिनाथाचे हे दान स्वीकारले नाही, तर त्याला वाईट वाटेल. म्हणून नीट विचार करून पुरोहित म्हणाला- ''या दाना बरोबरच भूमिनाथने आणखी एक दान दिले



पाहिजे. तरच मी हे दान स्वीकार करीन.'' त्याचे हे बोलणे ऐकून तलाठी व भूमिनाथ दोघांना ही मोठे आश्चर्य वाटले. हसत हसत भूमिनाथने विचारले- ''तर मग आणखी काय दान पाहिजे सांगा तर खरं!''

तलाठ्याकडे पहात पहात पुरोहित म्हणाला- ''भूमिनाथ केवळ दानवीर म्हणूनच नाही, तर कृषिवीर म्हणून ही सुप्रसिद्ध आहे. शेतीविषयक त्याचे ज्ञान सर्वांना माहीत आहे. म्हणून यावेळी भूमिनाथने भूदाना बरोबरच श्रमदान ही करावे. निसर्गाचा प्रकोप झाला म्हणजे नद्यांना पूर येऊन टेकड्या ही जलमय होतात. जी जमीन आज पाण्याबाहेर आहे, ती उद्या पुन्हा पाण्यात बुडून जाण्याची शक्यता आहे.'' इतकं बोलून तो थांबला.

हे ऐकून भूमिनाथ आश्चर्याने पुरोहिताकडे पाहू लागला. तलाठ्याने पुरोहिताला विचारले- ''बरं आहे, मग हे तर सांगा की भूमिनाथने श्रमदान कसे करायचे?''

पुरोहिताने नम्रतापूर्वक भूमिनाथकडे पाहिले आणि तो तलाठ्याला म्हणाला- ''भूमिनाथ श्रेष्ठ दर्जाचे दानी आहेत, ज्याने जे मागितले ते त्यांनी मनापासून दिले. अशा दानशूरावर गणमातेची कृपादृष्टि अवश्य होणारच. म्हणून आपल्या वाडवडिलांनी दिलेली जमीन त्यांनी माझ्या नावे करू नये. त्यांनी स्वतः या जमिनीत लागवड करावी. जमिनीतून जे उत्पन्न येईल त्याचा फक्त चौथा हिस्सा त्यांनी मला द्यावा.

तलाठ्याने पुरोहिताची प्रशंसा केली नि भूमिनाथला विचारले - ''बोला, आता तुमचा काय निर्णय आहे?''

''आमच्या पुरोहितजींची इच्छा मी कशी टाळू शकेन? ते म्हणतात त्याप्रमाणे मी सर्व करीन!'' संतुष्ट होऊन भूमिनाथ म्हणाला.

नंतर त्याने परिश्रमपूर्वक काळ्या आईची सेवा केली. पुरोहिताला जास्तीत जास्त कसे देता येईल याचेच चिंतन तो करू लागला. शेतीत चांगले उत्पन्न काढून त्याने प्रसिद्धि ही मिळवली. आपल्या दान-धर्माच्या प्रवृत्तीला कलंक लागेल असे त्याने कधी काही केले नाही.



# चान्दोबाच्या बातम्या

## माश्या की मुंग्या?



टेक्सासच्या नागरिकांना नुकतीच मुंग्यांचा त्रास ही एक तीव्र समस्या बनून राहिली होती. त्यांच्या नाशाचे अनेक प्रयत्न निष्फळ ठरले. अन्य किड्यांसाठी उपयोगात आणायच्या औषधांचाही त्यांनी प्रयोग करून पाहिला, पण त्यांचा ही काही परिणाम या मुंग्यांवर दिसून आला नाही. अशी परीस्थिति आली की मुंग्यांच्या त्रासाला कंटाळून काही लोकांनी आपली जागा सोडून जाणे पसन्त केले. शेवटी टेक्सास विश्वविद्यालयाच्या काही शास्त्रज्ञांनी ब्राझीलमधून काही विशिष्ट जातीच्या माश्या मागवून घेतल्या व त्यांना या मुंग्यांवर सोडले. या माश्या मुंग्यांच्या डोक्यावर बसून अंडी घालत. अंड्यांपासून निघालेले लाळेसारखा चिकट पदार्थ मुंग्यांचा मेन्दू खाऊ लागल्या व मुंग्यांच्या त्रासापासून नागरिकांची काही अंशी सुटका झाली.



## वचनबद्ध

मोठी माणसे हल्ली नेहमी तक्रार करत असतात की टी.व्ही. मुळे मुलांचे अभ्यासाकडील लक्ष कमी होऊ लागले आहे. काही मर्यादेपर्यन्त त्यांची तक्रार योग्य अशीच आहे. परन्तु अमेरिकेतील मुलांची पठनशक्ती समृद्ध करण्यासाठी आर.ए.एफ. नावाची एक योजना कार्यान्वित केली जात आहे. कॅलिफोर्नियातील शेलिंडर नामक एक प्रधान अध्यापिकेने मुलांना चांगली पुस्तके वाचायची सवय लावण्यासाठी एक योजना कार्यान्वित केली. तिने आपल्या विद्यार्थ्यांना असे वचन दिले की त्यांनी दोन चांगली पुस्तके संपूर्णपणे वाचली, तर मी मातीचा एक सबंध साप गिळून दाखवीन. विद्यार्थ्यांनीही आर.ए.एफ.च्या योजनेच्या अन्तर्गत नियोजित दोन्ही पुस्तके पूर्ण वाचून काढली. दुसऱ्याच दिवशी त्या अध्यापिकेने सर्व विद्यार्थ्यांना एकत्र बोलावले अन् त्यांच्यासमोर ग्लासभर संत्र्याच्या रसाबरोबर तिने मातीचा सापही गिळून दाखवला.



# एकाच माळेचे मणी

रामपुरचा राम काही जरूरी कामासाठी सीतापुरच्या सीतारामकडे जायला निघाला. वाटेत लक्ष्मणपुरला पोचता पोचताच दुपार झाली. त्याला खूप भूक लागली. समोर दिसणाऱ्या घराशी तो थांबला.

त्या घरातले सर्वचजण ठार बहिरे होते. रामने बाहेर कट्ट्यावर बसलेल्या तरुणाला विचारले, ''बेटा, एक वाटसरू आहे मी. तुझ्या घरात काही खायला मिळेल का याची चौकशी कर ना आत जाऊन.''

तरुण घरात गेला अन् आपल्या बहिणीला शिव्या देत म्हणाला, ''तो माणूस म्हणतोय की, तू त्याच्याशी लग्न करायचं कबूल केलंयस. लोकांना याबद्दल काही कळलं तर आपलं नाकच कापलं जाईल.'' अन् तो बडबडत राहिला.

रागाने फणफणत ती आपल्या पित्याकडे जाऊन म्हणू लागली, ''बाबा, हा काय अन्याय? दादा मला म्हणतोय की, मला इस्टेटीतली एक फुटकी कवडीही नाही मिळणार! बापाच्या इस्टेटीत मुलीचाही हक्क असतो! त्या बहिरंभटाला हा कायदा माहीतच नसावा! जमीनदाराकडे जाऊन तक्रार करीन, चांगले फटके मारवीन मी त्याला.''

तिचे वडील हातचे काम सोडून देऊन तिरमिरत ते आडाचे पाणी काढत असलेल्या बायकोकडे वळले. ते ओरडले, ''अग कैदासणी, आपल्या लेकीला असं म्हणायची तुझी हिंमतच कशी झाली, की तुझ्या बाबांसाठी मी मुळीच स्वयंपाक न करता त्याला उपास घडवीन? अग, तुला तर धड स्वयंपाकच करता येत नाही. भाजीबिजी तर सोडच, पण तुझ्या घराण्यात कुणाला धड भात सुद्धा शिजवता येत नाही! तुझ्याशी लग्न कसलं केलं, गळ्यात फासच अडकवून घेतला आपल्या!'' तोही असाच रागानं खवळला होता.

आता त्याच्या बायकोने हातातली दोरी सोडून दिली अन् पाण्याचा घडा धडामकन् विहीरीत पडला. आपल्या नवऱ्याची काहीही पर्वा न करता संतापलेल्या कालीमातेसारखी ती सरळ आपल्या सासूजवळ जाऊन बडबडू लागली, ''तुम्हाला झालंय तरी काय? अक्कल काय अगदीच शेण खायला गेली का? मुलगा चांगला चाळीस वर्षांचा झाला, तरी त्याला दुसऱ्या लग्नाचा सल्ला देताय? माझा सूड अुगवायचा विचार दिसतोय तुमचा! पण मीही काही गप्प नाही बसणार. आपल्या पैशांच्या बळावर काहीही करू शकायला तो काय कोणी मोठा जमीनदार लागून गेलाय की काय? या गावच्याच काय, पण नदीपलिकडल्या गावच्या मोठमोठ्या लोकांनाही बोलावून आणायची हिंमत आहे माझ्यात. त्यांच्याच हातून तुम्हा लोकांना वेतानं फोडून काढीन!'' अंगात भूत संचारल्यासारखीच बोलत होती ती.

म्हातारी आपल्या हातातला कापूस खाली टाकत म्हणाली, ''हं, आता बरोबर पितळ अुघडं पडलं बघ तुझं! तूच शाबित केलंस, की तू रुद्राची मुलगी आहेस. मला घरातून जायला सांगणारी कोण ग तू? हे माझ्या नवऱ्याचं घर आहे, सध्या ते माझ्या मुलाचं असून, पुढे माझ्या नातवाचं होईल ते. नीट कान अुघडून ऐक. माझ्या सासऱ्याच्या पणज्यानं-सूरदासनं-बांधलेलं घर आहे हे. जिवात जीव असेपर्यन्त इथ्थच रहाणार मी! पहातेच काय करशील माझं

इन्दुमती शहा



ते!'' अन् लढायला अुठल्यासारखा आपला पदर तिनं कमरेला घट्ट आवळून खोचला. रागाने कापतच होती ती.

एकाचे बोलणे दुसऱ्याला समजत तर नव्हतेच. पण सर्वचजण जोरजोरात ओरडून एकमेकांना शिव्या देअू लागले. थोडया वेळात सगळे पाटलाकडे जाअून तक्रार करायला घराबाहेर आले.

मोठ्या सोशिकपणे कट्टयावर बसून वाट पहाणारा राम सर्वजणांना बाहेर आलेले पाहून आनन्दाने म्हणाला, ''अरे वा! तुम्ही सगळी कित्ती चांगली माणसं आहात! दारच्या वाटसरूबद्दल इतका आदरभाव मी कधीच पाहिला नाही अन् ऐकलाही नाही. अतिथीला जेवायला बोलवायला इतकी सगळीजणं एकदम बाहेर आलात! आपल्या गावचं काय नाव म्हणालात तुम्ही? मर्यादापुर ना? वा, अतिथि सत्काराला शोभेसंच नाव आहे.'' अन् मोठ्या आनन्दाने तो कट्टयावरून अुठला.

पण रागाने जळणारा त्या घरातला मोठा माणूस ओरडला, ''अरे तू कोण रे आमच्या घरच्या भानगडीत दखल देणारा? आमच्या आपसातल्या झगड्यात तू अुगीच आपलं नाक खुपसू नकोस हं. आम्ही थोडेच कोणा बाहेरच्या माणासांशी भांडलोय. आपसात आम्ही भांडू. नाहीतर प्रेमानं गळ्यात गळे घालू. न बोलावता अुगाच आमच्या घरात घुसायचा तुला काम रे अधिकार? जा इथुन; जा आपल्या वाटेनं!''

त्याचे बोलणे ऐकून राम आश्चर्यातच पडला. घाबरत तो म्हणाला, ''बापरे! हा काय अन्याय! एक वेळच्या जेवणाचे दहा रुपये? इतकी मोठी रक्कम माझ्याजवळ असती, तर मला भूकच नसती लागली, अन् तुमच्या घराच्या कट्टयावर बसायची वेळही नसती आली माझ्यावर!'' आता मुळिच वेळ न घालवता तो त्या गल्लीतून धावतच दूर जायला निघाला.

खरी गोष्ट अशी, की हा रामापुरचा राम ही अगदी ठार बहिरा होता! सगळे एकाच माळेचे मणी!





# महाभारत-१

नैमिषारण्य हे ऋषिगणांचे निवासस्थान. महामुनि शौनक हे त्यांचे कुलपती होते. एकदा त्यांनी बारा वर्षांचा सत्रयाग केला. अनेक महर्षी एकत्रपणे त्या यागात मग्न असताना रोमहर्षचा पुत्र अुग्रश्रवण हा सूत तेथे आला. त्याला माहीत नाही असा कोणताही पुराणग्रन्थ तेव्हा अस्तित्वात नव्हता.

या सूताला पाहिल्या बरोबर सर्वजण त्याच्याभोवती जमले. ते म्हणाले, ''तुझ्या येण्याने आम्हा सर्वांना फार आनन्द झालाय. सांग, आत्ता कोठून आलास तू? तुझ्या कडून अनेक अुत्तमोत्तम पुण्यकथा आम्हाला ऐकायला मिळणारसं वाटतंय.''

सूत त्यांना म्हणाला, ''महर्षीगण हो! परीक्षिताचा पुत्र जनमेजय याने एक मोठा सर्पसत्र यज्ञ केला. त्या अवधीत वैशंपायनाने जनमेजयाला भारताच्या अनेकोत्तम कथा ऐकवल्या. त्या कथांचा रचयिता म्हणजे वैशंपायनाचे गुरुवर वेदव्यास. मीही त्या कथा खूप लक्षपूर्वक ऐकून घेतल्या आहेत. शमंतक पंचक नामक पुण्यक्षेत्राचं दर्शनही मी घेतलंय. तेथेच युद्ध झाले होते. मी आत्ता तेथूनच सरळ इकडे आलोय.''

त्याचे बोलणे ऐकून ऋषिगणांना अपरिमित आनन्द झाला. त्यांनी मोठ्या अुत्साहाने वेदव्यासांनी रचलेल्या कथा सांगण्याची सूताला विनन्ती केली.

सूताने सुरुवात केली:-

''महाभारताची रचना कशी झाली माहीत आहे तुम्हाला? कृष्णवैशंपायन नामक व्यासांनी

शापग्रस्त परीक्षित



वेद चार भागात विभाजित केले. अन् त्यानन्तर त्यांनी हिमालय पर्वतात तपस्या केली. धृतराष्ट्राची पिढी समाप्त झाल्यावर त्यांनी 'भारत'ची रचना करायचे ठरवले. साऱ्या जगाने आवडीने वाचावे, अशा या 'भारता'ची रचना कोणत्या पद्धतीने करावी, याबद्दल ते गंभीरपणे विचार करू लागले. या विचारात मग्न असतानाच त्यांना भेटण्यासाठी ब्रह्मदेव आले. त्यांना विनयाने नमस्कार करून महर्षि व्यास म्हणाले. ''देवा, वेदवेदांगांचं सार मी 'भारत' नावाच्या इतिहासरूपात लिपिबद्ध करू इच्छितो. परन्तु ते लिपिबद्ध करील, असा कोणी मला तरी दिसत नाही. असा एकादा ग्रन्थ जनता किती अुत्कंठेनं वाचेल याची आपणाला कल्पना असेलच.''

ब्रह्मदेवाने व्यासांना सल्ला दिला की, ''विघ्नेश्वराची मनापासून प्रार्थना कर अन् त्याच्याकडून आपला हा इतिहास लिहून घे.''

व्यासांनी प्रार्थना केली अन् विघ्नेश्वर प्रकट झाला. व्यासांच्या इच्छेनुसार त्याने महाभारत लिहून काढले. व्यास सांगत गेले, अन् विघ्नेश्वर लिहीत गेला.

देवलोकात नारदाने, पितुलोकात देवलने व गंधर्वलोकात शुकाने या ग्रंथाचा प्रचार केला. जनमेजय सर्पसत्र यज्ञ करत असताना वैशंपायनाने त्या ग्रंथाचे पठन केले. अशाप्रकारे भूलोकातही त्या ग्रंथाचा प्रसार झाला.

शौनक आदि मुनि विवरण जाणून तृप्त झाले. त्यांनी सूताला विचारले की, शमंतकपंचक नावाच्या क्षेत्रावर कौरवपांडवात महासंग्राम झाला, या क्षेत्राला असे नाव का मिळाले?''

याबद्दल स्पष्टीकरण देताना सूत म्हणाला, - ''त्रेता व द्वापर या युगांच्या संधिकाळात राजे लोकांच्या अहंकाराने सीमा ओलांडल्या होत्या. दर्पाच्या नशेतच ते चूर असत. परशुरामाने त्यांना एकवीस वेळा, अगदी शोधून शोधून मारून टाकले. त्यांच्या रक्ताने पाच तलावांची निर्मिती करून त्याने पितरांचे तर्पण केले. या तर्पणाने पितर अत्यन्त संतुष्ट झाले व त्यांनी परशुरामाला असा वर दिला की- हे पाचही तलाव पुण्यक्षेत्र बनतील. याच प्रदेशात पुढे महाभारत-युद्ध झाले. त्यामुळे या क्षेत्राला



शमंतक कुरुक्षेत्र असे नाव प्राप्त झाले.''

परीक्षितपुत्र जनमेजय त्याच कुरुक्षेत्री आपले भाअू श्रुतसेन, अुग्रसेन आणि भीमसेन यांच्या मदतीने सुदीर्घ असा सर्पयज्ञ करीत आहे. त्यावेळी सरमा नामक देवता शुनकचा पुत्र सारमेय हा तेथे निरुद्देश्य फिरत होता. जनमेजयाच्या भावांनी त्याचा पाठलाग करून त्याला तेथून हाकलून दिले. तो आपली माता सरमा हिच्याकडे जाअून पोचला. तेव्हा सरमेने त्यांची निन्दा करून म्हटले, ''साधु व दरिद्री माणसांना अुगीचच सतावणाऱ्यांचे नक्कीच काही न काही नुकसान होते.''

सरमेची ही निन्दा 'शाप न ठरो' अशी जनमेजयाला भीती वाटली. ताबडतोब हस्तिनापुरी परत जाअून तो 'शांती'ची क्रिया करण्यासाठी पुरोहित शोधू लागला.

अशातच एकदा अरण्यात शिकार करत असताना जनमेजयाला तेथे श्रुतश्रवाचा आश्रम दिसला. श्रुतश्रवाला सोमेश्वर नावाचा एक पुत्र असल्याचेही त्याला कळले. जनमेजय श्रुतश्रवाला- तुमचा पुत्र शांती क्रिया करण्यासाठी पाठवा -अशी विनंती करू लागला.

''माझ्या पुत्राचा एक नियम आहे. तो ब्राह्मण आहे, कोणी काही मागितले तर ते ताबडतोब देण्याचा त्याचा नियम आहे. त्याच्या या नियमात काहीही व्यत्यय येणार नाही, असं वचन दिलंस तर तो पुरोहित बनून तुमच्याकडे नक्की येईल.'' श्रुतश्रवाने स्पष्ट सांगून टाकले.



याला आपली संमती देअून जनमेजय सोमेश्वरला आपल्या बरोबर आश्रमात घेअून गेला, व त्याच्या मदतीने त्याने बरेच यज्ञ पार पाडले.

अुदंक नावाचा एक महर्षि एक दिवस जनमेजयाकडे आला अन् म्हणाला, ''राजा, जे कार्य तू करायला हवे होते, ते न करता हातावर हात बांधून तू अुगीचच बसून राहिला आहेस. आपल्या कर्तव्याची अुपेक्षा करणं, हे अत्यन्त असंगत होय.''

''स्वामी, मी क्षत्रिय धर्माचं पालन करतोच आहे. असं कोणतं कार्य आहे, कि जे न करता मी गप्प बसलो आहे?'' जनमेजयाने अुदंकसमोर मोठ्या नम्रतेने आपली शंका प्रकट



केली.

''तक्षकाचा अंत कर. तुझा पिता परीक्षित याला डसून मारणारा दुष्ट तोच आहे. काश्यप जेंव्हा तुझ्या पित्याचे प्राण वाचवण्यासाठी धावतपळत येत होता, तेंव्हा या दुष्ट तक्षकानेच त्याला अपार धन दिले व अनेक प्रलोभनं दाखवून त्याला परत पाठवले. अशा या दुष्ट तक्षकाला 'मारून भस्म करून टाकणं' हे तुझं कर्तव्यच नव्हे काय? यापेक्षा श्रेष्ठ क्षत्रिय धर्म दुसरा कुठला? तेव्हा त्याला मारून आपल्या पितृकर्तव्याचे पालन कर.''

खरे पाहिले तर अुदंकही तक्षकाचा सूड घेअू इच्छित होता. त्याचे कारण असे होते-

या अुदंकने वेद नावाच्या ऋषीजवळ राहून विद्याभ्यास केला. तो पूर्ण करून गृहस्थाश्रमात प्रवेश करण्यापूर्वी गुरुला, त्याला देण्याच्या गुरुदक्षिणेबाबत विचारले असता, वेद म्हणाला, ''माझ्या पत्नीला काय हवंय ते विचारून तिलाच ते गुरुदक्षिणा म्हणून दे.''

अुदंकने गुरुपत्नीला तिची इच्छा विचारली. ती म्हणाली, ''आजपासून चौथ्या दिवसानन्तर मी एक पुण्यव्रत करणार आहे. त्यावेळी कानात कुंडलं घालावीत अशी माझी इच्छा आहे. राजाच्या पत्नीजवळ कुंडलं आहेत. तुला जमलं, तर ती मला आणून दे.''

अुदंकने पौष्यराजाकडे जाअून कुंडलांची मागणी केली. त्याने ती द्यायची तयारी दर्शवली. पण त्याबरोबरच त्याला सावधगिरीची सूचनाही दिली की, ''तक्षक ती कुंडले चोरून नेण्याची संधी शोधत आहे.''

राजाने सांगितल्या प्रमाणेच घडले. कुंडले घेअून जंगलातल्या वाटेने जात असताना अुदंकला एक तलाव दिसला. तलावाकाठी एके ठिकाणी कुंडले सुरक्षित ठेवून अुदंक पाण्याकडे निघताच तक्षक ती घेअून पळून जाअू लागला. कशाही प्रकारे कुंडले चोरून नेण्याचा विचार करत असलेला तक्षक अुदंकच्या मागावरच होता.

नग्न मानवाच्या रूपात धावत असलेल्या तक्षकाला अुदंकने पकडले. परंतु तत्क्षण साप बनून तक्षक एका बिळात घुसला. हातात एक काठी घेअून अुदंकने ते बीळ खोदायला सुरुवात केली. अन् खोदता खोदता तो त्या मार्गाने थेट पाताळात पोचला.

तेथील नागांजवळ अुदंकने मदत मागितली. परंतु त्यांच्यावर त्या विनवणीचा काहीच परिणाम झाला नाही. इतक्यात त्याला तेथे एक घोडेस्वार दिसला. तो घोडा होता खुद्द अग्नी अन् वरील स्वार होता इन्द्र! पण अुदंकला हे माहीत नव्हते. त्या स्वाराने जेव्हा अुदंकला, ''तुला काम हवे?'' असे विचारले, तेव्हा अुदंक म्हणाला की, ''हा संपूर्ण नागलोक माझ्या हवाली करा.'' त्याबरोबर त्या घोड्याच्या जागी भयानक अग्निज्वाळा निघू लागल्या. तक्षकाला अशी भीती वाटली की, या अग्नीमुळे सर्व नागलोकच भस्मसात होईल; म्हणून त्याने ती कुंडले अुदंकला दिली व ती आपल्या गुरुपत्नीकडे नेअून देण्याचे कर्तव्य त्याने पार पाडले.

अुदंकने जनमेजयाला, 'तुझ्या पित्याला तक्षकानेच मारले.' असे जेव्हा सांगितले, तेव्हा त्याने आपल्या मंत्र्यांना बोलावून तसे घडण्याचे कारण विचारले.

मन्त्र्यांनी जनमेजयाला त्याचा पिता परीक्षित याच्या मृत्युचे कारण सांगितले; ते असे-

महाभारत युद्धात अभिमन्यु कपटाने मारला गेला. परीक्षित हा अभिमन्यु व अुत्तरा यांचा पुत्र होय. कृपाचार्याजवळ तो धनुर्विद्या शिकला व पांडवां नंतर तो राज्यपालन करू लागला. त्याला शिकार करणे फार आवडे. असाच एकदा एका मृगाचा पाठलाग करत असताना ते जनावर





जंगलात कुठेसे नाहीसे झाले अन् राजा परीक्षित महामुनि शमीक यांच्याजवळ पोचला. त्याने मुनीला विचारले, ''माझ्या बाणाने जखमी झालेले एक हरीण आत्ता इकडूनच गेले काय?''

परंतु तपस्येत लीन असलेल्या मुनीने त्याच्या प्रश्नाला काहीच अुत्तर दिले नाही. रागावलेल्या परीक्षिताने जवळच मरून पडलेला एक साप आपल्या बाणाच्या टोकाने अुचलला व तो शमीकाच्या गळ्यात अडकवून तेथून निघून गेला.

शमीकपुत्र शृंगीच्या एका मित्राने जाअून त्याला परीक्षिताने केलेल्या या अपमानाबद्दल सांगितले. शृंगी मुळातच फार कोपिष्ट वृत्तीचा होता. त्याने तत्क्षण शापवाणी अुच्चारली की, ''आजपासून सातव्या दिवशी तक्षक परीक्षिताला डसेल व त्यामुळे त्याचा मृत्यु ओढवेल.''

परीक्षितासारख्या अुत्तम शासकाला आपल्या मुलाने असला शाप दिल्याचे कळल्यावर महामुनि शमीकाला फार दु:ख झाले. पण शाप मागे घेणे अशक्य असल्याने त्याने तावडतोब आपला शिष्य गौरवमुख याला पाठवून परीक्षिताला सावध करवले की, त्याने आपल्या संरक्षणाची काही व्यवस्था ता डतोब करावी.

परीक्षिताला हे ऐकून आपल्या कृत्याबद्दल फार पश्चात्ताप झाला. शृंगीच्या शापामुळे भयभीत होअून त्याने आपल्या मन्त्र्यांना



बोलावून आपल्या रक्षणाच्या अुपायासाठी विचार करायला सांगितले. मन्त्र्यांनी एकाच खांबावर एक भवन अुभे केले. त्यात वाऱ्याला ही प्रवेश नव्हता. भवनात सर्वत्र अशा औषधी विखरून ठेवल्या होत्या की विषाचा काहीही प्रभाव पडू शकणार नाही. विषवैद्य व मान्त्रिकांना तेथे अष्टौप्रहर सिद्ध ठेवले होते. सर्वच्या सर्व मन्त्री राजाबरोबर तिथेच त्याच्या अवतीभवती राहू लागले.

सहा दिवसपर्यन्त काहीही घडले नाही. राजावर ओढवलेल्या संकटाबद्दल काश्यप नावाच्या एका ब्राम्हणालाही समजले. तक्षकापासून आपल्या राजाचे रक्षण करण्यासाठी कटिबद्ध होअून तो निघाला.

राजाला डसण्यासाठी मार्ग शोधण्यात तक्षक मग्न होता. रस्त्यातच त्याची काश्यप ब्राह्मणाशी गाठ पडली. ब्राह्मणाचा राजाकडे जाण्याचा उद्देश त्याने मोठ्या चातुर्याने समजून घेतला.

काश्यप तक्षकाला म्हणाला, ''सर्पदंशानंतरही एकाद्याचे प्राण वाचवण्याचे सामर्थ्य माझ्यात आहे. विषारी साप चावून मृत्यु पावलेल्यांनाही मी मन्त्रशक्तीने जीवदान देऊ शकतो. महाराज परीक्षितांना तक्षक डसला तरी मी त्यांना पुन्हा जिवन्त करीन अन् मला त्यांच्याकडून अपार धन व मोठी कीर्ती मिळेल.''

''महाशय, मीच तो तक्षक! मी मनात आणीन, तर कशाचेही भस्म करू शकेन''.

काश्यप त्याचे सांगणे मनावर न घेता आपल्या निश्चयावर अटळ राहिला. तेव्हा तक्षकाने जवळच असलेल्या एका मोठ्या वटवृक्षाच्या खोडावर डंख मारला व पहाता पहाता वृक्ष भस्मीभूत झाला. काश्यपानेही मन्त्यशक्तीने त्या राखेच्या ढिगातून पुन्हा वटवृक्ष जसाच्या तसा उभा करून दाखवला.

''त्या मुनिकुमाराचा शाप निष्फळ करणं तुला जमणार नाही. राजा तुला जे धन देईल, त्यापेक्षा अधिक धन मीच देतो तुला! ते घे अन् परत फीर तू!'' असे म्हणून अपार धन देऊन तक्षक ब्राह्मणाला परत पाठवून कृतकृत्य झाला.

यानन्तर तक्षकाने काही नाग मुनिपुत्रांच्या रूपात परीक्षिताकडे पाठवले.

हातात फळे व फुले घेऊन ते कुमार परीक्षिताकडे गेले. एक फळ राजाने फोडले. त्यात त्याला एक लहानसा किडा आढळला.

सभोवती असलेल्या मन्त्र्यांना राजा म्हणाला, ''सापाच्या अवधीची वेळ समाप्त होत आलेली आहे. हा किडा मला कदाचित चावेलही, पण आता सर्पदंशाचं भय नाही मला!'' पण क्षणभरातच तो किडा वाढून त्याचा सर्प बनला. तक्षकच होता तो! राजाला तो तात्काळ डसला.

तक्षकाच्या दंशाने केवळ परीक्षिताचेच नव्हे, तर त्या एकखांबी महालाचेही भस्म झाले!





# घोरकचे औदार्य

त्रिरूप देशची राजकुमारी चन्द्रमती ही अनुपम सुंदर होती. ती एकदा वैचित्र्ये व वैशिष्ट्ये पहायला विरूप देशात गेली. त्या देशच्या युवराज वीरसेनने तिचे आगतस्वागत केले. स्वत:च बरोबर घेऊन जाऊन त्याने तिला आपल्या देशातील वैचित्र्यपूर्ण व आकर्षक स्थाने दाखवली. या अवधीत दोघांच्याही मनात प्रेमभाव अंकुरित झाला.

थोड्या दिवसांनी चन्द्रमती स्वदेशी परतली. त्यानन्तर काही दिवसांनीच तिच्या पित्याने कन्येच्या स्वयंवरासाठी वीरसेनकडे आमंत्रण पाठवले. तो स्वयंवरासाठी जाण्याची तयारी करीत असतानाच एक संकट उभे राहिले.

घोरक नावाचा एक बलशाली राक्षस होता. तो मांत्रिकही असून एका दाट जंगलात रहात असे. जंगलात प्रवेश करणाराची खैर नसे. तो जिवंत परतणे केवळ अशक्यच असे. या राक्षसाने चन्द्रमतीचे अपहरण करून तिला आपल्या जंगलात नेले. कन्येच्या अपहरणामुळे त्रिरूप राजा दु:खी झाला. त्याला आपल्या समर्थते बद्दलच जास्त वाईट वाटले.

घोरक सारख्या बलशाली राक्षसाशी लढण्याची हिंमत वीरसेनने एरव्ही कधीच केली नसती. परन्तु आता परिस्थिती भिन्न होती. चन्द्रमतीवर त्याचे अपरिमित प्रेम असल्याने, तिच्यावाचून जिणे त्याला आता निरर्थक वाटू लागले होते. त्यामुळे त्याने घोरकशी सामना द्यायचे ठरवले. आपल्या आईवडिलांची मनाई न जुमानता तो त्या दाट अरण्याकडे निघाला. तेथे त्याला काही अन्य राजकुमारही भेटले.

ते राजकुमारही चन्द्रमतीला राक्षसाच्या पंज्यातून सोडवण्यासाठीच तेथे आले होते. त्या साऱ्यांनी अरण्यात पाऊल ठेवताच घोरकने त्यांना आपल्या मन्त्रबळाने पाली, बेडूक अन्

नारायण सरपोतदार



बगळ्यांच्या रूपात बदलून टाकले, अन् त्यांना तो म्हणाला, ''तुम्ही सर्वजण ताबडतोब या जंगला बाहेर निघून जाल, तरच तुम्हाला तुमचं मूळ रूप प्राप्त होईल.''

ते सारेजण धावाधाव करून जंगलाबाहेर निघायचा प्रयत्न करू लागले. हे सारे राजकुमार वर्षभर जंगलाच्या प्रवेशद्वारीच राहिले; कारण त्यांना राक्षसाची आज्ञा होती की, त्यांनी अशा प्रकारे दुस्साहस करून जंगलात शिरू पहाणाऱ्यांना आपली हकिकत सांगून, तेथून परत पिटाळावे.

या राजकुमारांनी वीरसेनला सांगितले, ''या भूमीवरील कोणाही व्यक्तीत घोरकला सामना देण्याची शक्ती असणे केवळ अशक्य! त्याच्या तावडीतून जिवन्त सुटणं, हेच मोठं भाग्य. त्यापेक्षा चन्द्रमतीला विसरून परत फीर, हेच बरं!''

पण वीरसेन त्यांना म्हणाला, ''तुमच्यात अन् माझ्यात एकच मुख्य फरक आहे. तुम्हाला वाटतंय, की जिवन्त राहिलोय हेच खूप. पण चन्द्रमती वाचून मी जगू इच्छित नाही, अशक्य आहे मला ते. तेंव्हा तिच्यासाठी मी घोरककडे जाणारच.'' अन् पुढे जाऊन त्याने जंगलात प्रवेश केला.

ते जंगल आकाशाला स्पर्श करणाऱ्या उंच उंच वृक्षांनी अन् काटेरी झाडांनी भरलेले होते. परन्तु वीरसेनला फार आत शिरावे लागलेच नाही. कुणीतरी मागून येऊन आपले डोळे झाकल्यासारखे त्याला वाटले. त्याने खूप प्रयत्न केला. डोळ्यावरचे आवरण हटल्यावर त्याला आपल्यासमोर दृढ शरीराचा कोणीतरी उभा आहेसे दिसले. त्याचे डोळे जणू आग ओकत होते; केस काटेरी झुडुपांसारखे उभे दिसत होते.

तो दृढकाय म्हणाला, ''माझं नाव घोरक. अरण्याबाहेरच्या राजपुत्रांनी तुला सावधानीचा इशारा देऊनही तू आत येण्याचं साहस केलेलं दिसतंयस! तुझं धाडस स्तुत्यच आहे. मला मारून टाकायची हिम्मत आहे तुझ्यात?'' अन् तो हसू लागला.

त्याच्या या धमकीने जराही विचलित न होता वीरसेन म्हणाला, ''मी तुला मारण्यासाठी आलेलो नाही. चन्द्रमतीवर माझं प्रेम आहे. तिला वाचवायला आलोय मी.''

''हुं:! तुझं प्रेम प्राण घेईल तुझे, मुकाट्यानं निघून जा इथून. तुला काहीही करणार नाही मी.'' त्याला आश्वासन देत अघोर म्हणाला.

''मला चन्द्रमतीच हवी. तिच्यावाचून प्राण तरी कशाला हवेत?''

दृढस्वरात वीरसेन म्हणाला. त्याच्याकडे कौतुकभरल्या दृष्टीने पहात अघोर म्हणाला, ''इतकाच तुझा निश्चय असेल, तर एक उपाय सुचवतो मी. चन्द्रमती मिळेल तुला. त्यासाठी उकळत्या तेलात स्नान करावं लागेल तुला. तुझी तयारी आहे की नाही, याचा विचार कर. 'नाही' म्हणालास तर मी मंत्रानं तुझा बेडूक करीन. एखादा साप तुला गिळण्यापूर्वीच तुला जंगलाबाहेर पळून गेलं पाहिजे. नंतरच तुला पुन्हा स्वतःचं रूप मिळेल.''

''मी उकळत्या तेलात स्नान करीन.'' वीरसेन उत्तरला. त्याला आपल्या हातात उचलून घोरक चालू लागला. एका ठिकाणी एक खूप मोठा चुल्हयया जळत होता अन् त्यावर एका मोठ्या कढईत तापणाऱ्या तेलातून धूर निघत होता. चुल्याजवळ जाऊन घोरकने वीरसेनला ते उकळते तेल दाखवले.

''नीट विचार कर. हे धाडस करणार तू? का आपला बेडूक बनून संधी घ्यायची तयारी आहे तुझी?'' घोरकने विचारले.

''मी प्रथमच सांगितलंय. मी आपलं बोलणं फिरवणार नाही.'' दृढ स्वरात वीरसेन बेधडक उत्तरला.

घोरकने त्याला ताबडतोब कढईत टाकले.





बस, त्याचे शरीर एकदम भाजू लागले. खूप वेदनेने तो एकदम ओरडला.

निश्चिन्तपणे घोरकने कढईत वाकून पाहिले. तळायला टाकलेल्या भेंडीप्रमाणे वीरसेन तडफडत होता! लगेचच तो निर्जीव होअून वर तरंगू लागला. घोरकने ताबडतोब कसल्याशा मन्त्राचा अुच्चार केला आणि तेथला चुल्हा अन् ती कढई वगैरे सर्व अदृश्य होअून वीरसेन आपल्या नेहमीच्या रूपात तेथे अुभा राहिला.

संतुष्ट होअून घोरक डोके हलवत राहिला. नन्तर तो म्हणाला, ''तू अजूनही जिवन्त आहेस;पण तीन दिवस तुला पुन्हा असंच स्नान करावं लागेल. मगच चन्द्रमतीला मिळवायचा अुपाय मी सांगेन तुला. ही जोखिम पत्करायची तयारी असेल तर बोल. अजूनही वेळ आहे. नाहीतर आपला बेडूक बनून निघायला तयार हो.''

''कोणत्याही परिस्थितीत चंद्रमती मला हवीच. तू मला तो अुपाय सांग.'' जराही पर्वा न करता वीरसेन बोलला.

त्याची स्तुती करत घोरक म्हणाला, ''राजकुमार, आजपर्यन्त कोणत्या ही राजपुत्रानं असं धाडस केलेलं नाही. ज्याच्या साठी तू आपले प्राणही पणाला लावत आहेस, ते हे 'प्रेम' म्हणजे आहे तरी काय? मला तर काहीच समजत नाहीय. अर्थात् ती एक अुत्तम भावनाच असली पाहिजे. आता चन्द्रमती मिळवण्याचा अुपाय सांगतो मी तुला. जरा लक्षपूर्वक ऐक.''

''या जंगलाच्या दुसऱ्या बाजूला घोरकी नावाची एक राक्षसी आहे. बल-पराक्रम आणि शक्ती या सर्व बाबतीत ती माझ्या बरोबरीचीच आहे. तिच्याजवळ एक अद्‌भुत असे कुंकू आहे. ते तू मला आणून दिलेस, तर मी चन्द्रमतीला सोडून देईन.''

''त्या कुंकवाचं असं काय वैशिष्ट्य आहे? हे जे काम तुला शक्य झाले नाही, ते मला कसं जमू शकेल?'' वीरसेनने विचारले.

''ऐक तर,'' घोरक सांगू लागला, ''माझ्याजवळ एक अद्‌भुत डबी आहे. त्यात ते कुंकू भरून मी आपल्याजवळ ठेवलं, तर जगातली कोणतीही शक्ती माझ्या एका केसालाही धक्का लावू शकणार नाही. त्या घोरकीलाही माझ्यासमोर मान तुकवावी लागेल, माझी प्रत्येक आज्ञा पाळावी लागेल. घोरकीजवळचं ते कुंकू मिळवणं काही सोपं नव्हे. तिच्या निवासात प्रवेश मिळवणंच मुळात कठीण आहे. अुकळत्या तेलातलं दुःख जो सहन करू शकेल, त्यालाच तेथे प्रवेश मिळवणं शक्य आहे. ते साहस मी स्वतः करू धजत नाही. असा कोणी साहसी, शक्तिमान व्यक्ति चन्द्रमतीला सोडवायला येईल या आशेनंच मी तिचं अपहरण केलं. आता सांग, घोरकीच्या घरात प्रवेश करायचं धाडस करशील तू? देशील मला ते कुंकू आणून?''

वीरसेन अुत्तरला, ''मी स्वतःकडून पुरेपूर प्रयत्न करीन.''

''घोरकी रोज रात्री मानवरूपात आपल्या शय्यागारात झोपते. मी त्यावेळी तुला तिथे पोचवीन. मी जी मुळी तुला देईन, ती तू तिच्या डोक्यावर ठेव; म्हणजे ती मरून जाईल. तिच्या अुशीखाली तुला ते कुंकू मिळेल बघ.'' घोरकने माहिती दिली.

घोरकने दिलेली मुळी आपल्या वस्त्रात वीरसेनने लपवून ठेवली. नंतर त्याच्या सांगण्यानुसार त्याने आपले डोळेही बन्द करून घेतले. क्षणभरानन्तर त्याने जेव्हा डोळे अुघडले, तेंव्हा आपण एका विचित्रशा पलंगाजवळ आहोत असे वीरसेनला आढळले. त्या पलंगावर एक असाधारण सुन्दर अशी स्त्री गाढ झोपलेली त्याला दिसली. हीच घोरकी आहे - असे





वीरसेनने ओळखले. आपल्या वस्त्रात लपवलेल्या मुळीचीही त्याला आठवण झाली. पण अुगीचच तिला मारून टाकणे मात्र वीरसेनला रुचले नाही. जरा वेळ काहीसा विचार करून त्याने तिच्या पावलांना स्पर्श करून तिला जागे केले.

हुंकार भरतच घोरकीने अुठून वीरसेनला विचारले, "कोण आहेस रे तू? जिथे हवेला सुद्धा प्रवेश नाही, अशा माझ्या या घरात तू प्रवेश कसा केलास?"

आपली सारी हकिकत सांगून वीरसेन तिला म्हणाला, "मनात आणलं असतं, तर तुझा जीव घेअून मी आपलं काम साधलं असतं. पण मी तसं केलं नाही. तेंव्हा खरं पाहता, मी आता तुझा प्राणदाता आहे. तुला माझ्यावर काही अुपकार करावासा वाटत असेल, तर ते कुंकू तू मला देअून टाक."

त्याचा सद्गुण पाहून संतुष्ट झालेली घोरकी वीरसेनला म्हणाली, "राजकुमारा, तुला कुंकू दिलं, तर तू ते घोरकला देशील. मग तो मला नक्कीच आपली दासी बनवून ठेवील. त्यापेक्षा तूच मला एक मदत कर. मीही तुला एक मुळी देईन. रात्री तो जेंव्हा मानवरूपात झोपेल, तेंव्हा तू त्याला मारून टाक अन् ती डबी मला आणून दे. तुला चन्द्रमती मिळेल, अन् मला सर्व शक्ति प्राप्त होतील. अन् अशा या सर्वशक्तिमान् घोरकीची कसलीही मदत, तुला केंव्हाही मिळत राहील. तुझा दुहेरी फायदाच होईल."

पण आपले डोके नकारात्मक हलवून वीरसेन म्हणाला, "या जगात स्त्री अन् पुरुषाला एकमेकांची परस्पर संगत आवश्यक असते. तुम्ही दोघे लग्न करून दंपती बनाल, तर महाशक्तिमान बनाल. मी अुकळत्या तेलात स्नानाला तयार का झालो? चन्द्रमतीचं प्रेम मिळवण्यासाठीच ना? तू घोरकवर प्रेम कर अन् कुंकू त्याला देअून टाक. ज्या घोरकला तुझ्या शक्ति मिळवाव्याशा वाटत आहेत, ज्याला महाशक्तिमान बनायची इच्छा आहे, तो घोरक तुझं प्रेम मिळालं, तर तुझ्यासमोर झुकेल. मी अगदी पैजेवर सांगतो, की प्रेमात अशी शक्तीच आहे."

घोरकीला वीरसेनच्या या बोलण्यात तथ्य आहेसे वाटले. अुशीखालची कुंकवाची पुडी त्याला देत ती म्हणाली, "मी घोरकशी लग्नाला तयार आहे. त्यासाठी माझ्या वतीने ही भेट तू त्याला दे."

घोरककडे जाअून वीरसेनने त्याला घडलेली सारी हकिकत सांगून म्हटले, "घोरकीशी विवाह करून तू सुखी होशील. कितीही शक्ति मिळाल्या, तरी या सुखापुढे त्या सगळ्या तुच्छ आहेत, मूल्यहीन आहेत. त्या शक्तीमुळे तुझं जीवन अत्यंत सुखमय बनून राहील."

घोरकला जेंव्हा कळले, की घोरकीने ते अद्भुत् कुंकू आपल्याला भेट म्हणून बक्षिस दिलेय, तेंव्हा त्याला फार आनन्द वाटला. त्याने चन्द्रमतीला वीरसेनच्या सुपूर्त करून दोघांना सुरक्षित जंगलाबाहेर आणून सोडले.

जंगलाबाहेर अुभ्या असणाऱ्या राजकुमारांना सर्व हकिकत कळली. पण त्यांनी अुलट वीरसेनला दोष देत म्हटले, "घोरक अन् घोरकी अत्यन्त दुष्ट आहेत. आता तर कुंकू अन् डबी दोन्ही एकत्र आलंय. तेंव्हा आता साऱ्या जगाला त्रासच त्रास होईल. तुला त्यांना मारून टाकायची चांगली मिळालेली संधी वाया घालवलीस. तू फक्त आपला स्वार्थ तेवढा पाहिलास. तुला आपलीच तेवढी चिन्ता आहे, दुसऱ्यांची मुळीच पर्वा नाहीय."

यावर हसून वीरसेन म्हणाला, "प्रेमाला द्वेष कधीच ठाअूक नसतो. केवळ चन्द्रमतीचं अपहरण करण्यापलिकडे त्यानं कुणाचं काही नुकसानही केलं नाही. माझ्याबाबत तर घोरकनं कित्ती औदार्य दाखवलंय! त्यांच्यामुळे आपल्याला काही त्रास होईल, ते आपले शत्रू आहेत अशी कल्पनाच का करता तुम्ही? असल्या कल्पनेनं आपण अुलट आपल्याच पायावर धोंडा पाडून घेत आहोत."

त्याचे बोलणे ऐकून त्या राजकुमारांना स्वत:ची लाज वाटली. लवकरच वीरसेन व चन्द्रमती यांचा विवाह थाटामाटाने साजरा झाला. विवाहाला घोरक-घोरकीही आले होते. अन् 'विश्वशान्तीसाठी प्रयत्न करणारांना आपण नेहमीच मदत करू' असे आश्वासन त्यांनी दिले.





# परिपूर्ण मानवता

विक्रमपुरच्या राजाचा आकस्मिक देहांत झाला. म्हणून लहान असतानाच राजकुमाराचा राज्याभिषेक झाला. लोकांसंबंधी अनुभव व ज्ञान नसलेल्या राजकुमाराला राजगुरु म्हणाले- ''ज्याला आदर्श राजा व्हायचे असेल, त्याला कोणत्या माणसात किती मानवता आहे कळले पाहिजे. जसजशी आवश्यकता पडेल, आणि मला वेळ असेल, त्यानुसार मी तुला समजाऊन सांगेन.''

एक दिवशी एक योद्धा राजाजवळ येऊन म्हणाला- ''महाराज, मी जंगलातून जात होतो, तेव्हा माझ्या पायात एक काटा बोचला. मी जेव्हा लंगडत चालू लागलो तेव्हा एक माणूस धावत माझ्याकडे येऊन म्हणाला- ''वाघ येतोय, पटकन कुठे तरी लप.'' मला सावध करून तो स्वतः एका झाडावर चढून बसला. मी दुसऱ्या एका झाडावर चढलो. थोड्याच वेळात डरकाळ्या फोडत वाघ त्याच वाटेने आला आणि गेला. नंतर आम्ही दोघे ही झाडांवरून खाली उतरलो नि आपापल्या वाटेने चालू लागलो.''

या योध्द्याने ज्या माणसाची गोष्ट सांगितली, त्याच्यात एक चतुर्थांश मानवता आहे. त्याने दुसऱ्याला सावधान केलं की वाघ येत आहे. पण त्याच्या संरक्षणाबाबत काही विचार केला नाही. स्वतः स्वार्थी बनून झाडावर चढून बसला एकटाच!'' राजगुरूने सांगितले.

असाच एकदा एक दुसरा योद्धा आला आणि त्याने एक घटना ऐकवली.

एका अनाथ गरीबाला खायला मिळालं नाही. भुकेने व्याकुळ होऊन गेला. एका श्रीमंताच्या घरासमोर तो मूर्च्छित होऊन पडला. श्रीमंताने त्याला अन्न दिलं आणि आपल्याकडे नोकरी पण दिली. एक दिवशी हा श्रीमंत माणूस आपल्या नोकराला मारहाण करीत होता. रस्त्याने जाणाऱ्या एका माणसाने विचारले- ''का हो असं मारताय याला?''

''भुकेने व्याकुळ होऊन बेशुद्धावस्थेत जेव्हा हा माझ्या घरासमोर पडला होता, तेव्हा याला खायला मी अन्न दिलं. याच्याकडून मी पत्र ही लिहून घेतलंय की जिवंत असे पर्यंत हा माझी सेवा करील, एकनिष्ठ नोकर बनून राहील. ज्या माणसाला मी खरेदी केलंय, त्याला मी मारलं तर तुझं काय गेलं त्यात?'' रस्त्यावरुन जाणाऱ्या माणसाने ते पत्र मागवलं. वाचून त्याने ते फाडून टाकले. तो त्या गरीब माणसाला म्हणाला- ''आजपासून तू स्वतंत्र आहेस. तुझी गुलामगिरी संपली.'' असं सांगून तो आल्या वाटेने निघून गेला.

राजगुरूने राजकुमाराला समजावलं- ''रस्त्याने जाणाऱ्या या माणसात पन्नास टक्के मानवता आहे. थोडी अधिक मानवता असती तर त्याने त्याला नोकरी लावून दिली असती.''

''त्या श्रीमंत माणसाबद्दल आपलं काय म्हणणं आहे?'' राजकुमाराने विचारले.

राजगुरु म्हणाला- ''त्याच्यात तर जरा सुद्धा मानवता नाही. नररूपातील राक्षसच तो!''

एकदा राजसभेत दोन व्यापारी आले. त्यांची स्थिति फार केविलवाणी होती. काही मूल्यवान वस्तु घेऊन ते रस्त्याने चालले होते, तेव्हा त्यांना चोरांनी गाठलं. चोरांच्या सरदाराने त्यांना



थांबवीत म्हटले- ''अरे मूर्खांनो, जर अशा लोकांना आपण मारून टाकलं, तर मग लुटणार कोणाला? आपला धंदा कसा चालेल?'' चोरांच्या सरदाराने त्यांना वाट-खर्चासाठी प्रत्येकी दोन-दोन रुपये दिले.

आता राजगुरूने सांगितले- ''चोरांच्या सरदारात तीन चतुर्थांश मानवता आहे. संपूर्ण मानव बनण्यात त्यांचा धंदा आड येतो आहे.''

एक दिवशी एक अधिकारी दोन माणसांना राजकुमारासमोर घेऊन आला. एक श्रीमंत होता नि दुसरा गरीब.

अधिकाऱ्याने निवेदन केले- ''महाराज, या श्रीमंत माणसाने या गरीबाला पाण्यात ढकलून दिले आणि नंतर तो स्वतः ही पाण्यात पडला.

(पंचवीस वर्षांपूर्वी चांदोबात प्रकाशित झालेली गोष्ट)

मी जेव्हा जवळ गेलो, तेव्हा दोघे ही किनाऱ्यावर आलेले होते.''

राजाने श्रीमंत माणसाला विचारले- ''या बिचाऱ्याला तू पाण्यात का बरे ढकललंस?''

श्रीमंत म्हणाला- ''महाराज, मी या माणसाशी आणखी ही अनेक प्रकारे द्रोह केलेला आहे. सगळं सविस्तर सांगतो आपल्याला. हा माझा शेजारी आहे. गरीब आहे, असहाय्य आहे. मी याचं घर हडपलं. माझ्या धूर्तपणाची हा सर्वत्र जाहिरात करीत सुटला. जेव्हा मी पाहिलं की हा माझी खूपच नाचक्की करतो आहे, तेव्हा मी याच्या घराला आग लावून दिली. जेव्हा याबद्दल मला जाब विचारण्यात आला, तेव्हा मी साफ सांगितलं की याच्याच असावधानीमुळे घराला आग लागली. आज मला हा नदीच्या किनाऱ्यावर भेटला, तेव्हा म्हणाला- 'तुम्ही माझा सर्वनाश केला!' यावर मी रागावलो आणि याला पाण्यात ढकलून दिलं. पडताना याने मला ही पकडलं. त्यामुळे याच्या बरोबरच मी ही पाण्यात पडलो. मला पोहता येत नाही, त्यामुळे मी जेव्हा गटांगळ्या खाऊ लागलो, तेव्हा यानेच मला बचावले आणि किनाऱ्यापर्यंत आणले. माझ्या पोटात शिरलेलं पाणी याने काढून टाकलं नि माझे प्राण वाचवले.''

राजाने राजगुरूच्या सल्ल्याने श्रीमंत माणसा कडून गरीबाला नुकसान-भरपाई देववली. त्याला दुसरी कोणती ही शिक्षा दिली नाही.

आता राजगुरु राजाला म्हणाला- ''पाहिलं, हा गरीब माणूस एक परिपूर्ण मानव आहे. म्हणूनच त्याने श्रीमंताच्या स्वभावात योग्य तो बदल घडवून आणला. जो संपूर्ण माणूस नसतो तो दुसऱ्याच्या स्वभावात बदल घडवून आणून त्याच्यात मानवतेचा संचार करू शकत नाही.''

राजगुरूने प्रत्यक्ष घटनांच्या उदाहरणांनी राजाला दाखवून दिले की मानवता ही काय वस्तु असते. राजगुरूने राजाला अनेक प्रसंगातून नाना विषयांचे उपयुक्त ज्ञान दिले. त्यामुळे राजाला आपल्या देशाचे शासन उत्तम रीतीने करता आले.



# बहुरूपा वसुंधरा

## दुर्मिळ पोपट




पोपटांमध्ये 'हिरामण' जातीचा पोपट आता क्वचितच दिसतो. या पोपटाचा कंठ फार मधुर असतो. तो माणसाच्या बोलण्याचे सहज अनुकरण करतो. मोगल बादशहा हुमायूनने जेव्हा बहादुर शहाच्या गोग्रान किल्ल्यावर ताबा मिळवला तेव्हा त्याला सोन्याच्या पिंजऱ्यात ठेवलेला एक पोपट ही मिळाला. रूमीखान ही बहादूर शहाचा माणूस होता. त्याने हुमायूनला मदत केली. हुमायूनने जेव्हा किल्ला ताब्यात घेतला तेव्हा रूमीखान तेथून निघाला. त्याला पाहताच हा 'हिरामण' पोपट 'नंदखोर! नंदखोर!' म्हणून जोरजोराने ओरडू लागला. पक्षीशास्त्राचे सुप्रसिद्ध तज्ज्ञ डॉ. सलीम अली म्हणतात- 'हा पोपट थोड्या वेळाच मनुष्याच्या बोलण्याचे अनुकरण करतो.' परंतु आता या जातीचे पोपट दुर्मिळ होत चालले आहेत ही मोठ्या दुर्भाग्याची गोष्ट आहे. मध्य प्रदेशातील किल्ल्यांच्या आसपास राहणारे बेहाडिया जातीचे लोक या पोपटांना पाहताच त्यांच्यावर जाळे टाकतात व त्यांना पकडतात.

## सोनेरी रंगाचे माकड




वीस वर्षांनी पश्चिम बंगाल मधील अल्पायगुरीच्या जवळच्या एका गावात सोनेरी रंगाचे एक माकड दिसले. त्याला पाहताच 'टायगर प्रोजेक्ट'च्या लोकांनी त्याला पकडले. आसाम मधील मानस प्राणी-संग्रहालयात त्याची रवानगी करण्यात आली. लवकरच दुर्मिळ होणाऱ्या प्राण्यात हा ही एक आहे.

## भुकेने मृत्यु




ब्रिटिश बेटांतील सुमारे ७५,००० सागरी पक्षी भुकेने मेले असे समजले. ब्रिटिश बेटांच्या पूर्वी समुद्री किनाऱ्यावर हे पक्षी बहु-संख्येने मासे पकडून खात. आता या माशांची संख्या फारच कमी झाली. त्यामुळे यांना खायला मासे मिळेनासे झाले. केवळ पेटलँड्स बेटात ५०,००० पक्षी मेले असे सांगण्यात येते. यांतील स्थुलमोट, पान्स, रथाजेर बिल्स व पफिन्स नावाच्या पक्षांची संख्या तर आता फारच घटली आहे.

विश्व - समाचार

# उभरता देश

त्यांनी एकमेकांना दोन पत्रे लिहिली. आणि फक्त त्या दोन पत्रांनी ते मित्र झाले. दोन्ही नेत्यांनी हस्तांदोलन केले आणि भविष्य कालात ही मैत्री अधिक सुदृढ करू असा निश्चय केला.

आक्टोबर ९३ च्या 'चांदोबा' च्या अंकातील 'विश्व - समाचार' वाचून यासबंधी बरीच माहिती तुम्हाला मिळालेली आहे. त्यातून हे ही समजले असेल की पॅलेस्टाइनचा आविर्भाव कसा झाला? वॉशिंग्टन मध्ये उभय पक्षांनी ऐतिहासिक करार - नाम्यावर स्वाक्षऱ्या केल्या. त्यानुसार पॅलेस्टाइनच्या दक्षिण भागातील गाजा पट्टी इस्राइलला तीन महिन्यात सोडून जायचे होते. या भागावर इस्राइलने गेली २७ वर्षे सतत आपले शासन चालविले होते. यामुळे तेथे आता पॅलेस्टाइनची हुकुमत सुरू होणार होती. करारानुसार इस्राइलने १३ डिसेंबर पर्यंत हा भाग सोडून जायला हवं होतं. पण तसं घडलं नाही. तेथे एकाएकी हिंसात्मक घटना घडून आल्या. शांतीसाठी इस्राइल व पॅलेस्टाइन यांच्या चाललेल्या प्रयत्नात विघ्न उपस्थित झाले.



नार्वेची सहानुभूति आणि प्रयत्नामुळेच 'वाशिंग्टन करार' अस्तित्वात आला. पॅलेस्टाइन स्वातंत्र्य संघटनेने (पी. एल्.ओ.) इस्राइलचे अस्तित्व मानावे व आपली स्वीकृति द्यावी ही इस्राइलची मागणी पण पूर्ण झाली. पॅलेस्टाइन स्वातंत्र्य संघटनेची इच्छा होती की इस्राइलने आपले अस्तित्व स्वीकार करावे. आणि दोन्ही बाजूंची मागणी आता पूर्ण झाली. या यशात नार्वेचा मोठा वाटा होता.

यानंतरच दोन्ही पक्षांच्या प्रतिनिधींनी अमेरिकेचे अध्यक्ष बिल क्लिंटन यांच्या समोर करारावर स्वाक्षऱ्या केल्या. करारनाम्यातील अटींनुसार दोन्ही पक्षांनी सहकाराने वागणूक करायची होती.

तीन महिन्यात अधिकाराची अदला-बदल होईल व करार प्रत्यक्षात सफल होईल अशी सर्व जागाची अपेक्षा होती. पण तसं घडलं नाही. त्याचं कारण होतं डिसेंबर महिन्यात घडलेला 'हेब्रान मास्क' चा रक्तपात! यात ३०-४० पॅलेस्टिनी ठार मारले गेले. साऱ्या जगाला यामुळे धक्का बसला.

त्याच वेळी पी.एल्.ओ.ने चर्चेत भाग घ्यायचे नाकारले.

या प्रदेशातील ताण जेव्हा कमी झाला आणि शांति स्थापित झाली तेव्हा इजिप्तने प्रयत्नपूर्वक दोन्ही पक्षांना चर्चेसाठी एकत्र आणले. दोन्ही पक्षांनी गुण्या-गोविंदाने आपले प्रश्न सोडवावेत असे सर्वांनाच वाटत होते.




इजिप्तची राजधानी कैरो मध्ये ता.४ मे रोजी इस्राइलचे प्रधान मंत्री रॉबिन आणि पी.एल्.ओ.चे नेता यासर अराफत यांच्यात बोलणी झाली. खेळीमेळीच्या वातावरणात संधि-पत्रावर दोघांनी सह्या केल्या. आठ महिन्यात दोघांनी पुन्हा एकदा हस्तांदोलन केले.

१० मे रोजी पॅलेस्टाइनच्या पोलिस-दलाचे १५० लोक गाजा पट्टीवर पोचले. त्यांना तेथे पाहून पॅलेस्टाइनची जनता हरखून गेली. त्यांनी जणू आनंदोत्सवच साजरा केला. एक आठवड्या भरात इस्राइलने आपले प्रमुख सेना - कार्यालय पी.एल्.ओ. च्या ताब्यात दिले.

अशा रीतीने या भागात शासनाची अदला-बदल झाली. पश्चिम किनाऱ्यावरील जोरिको शहरात १३ मे रोजी पी.एल्.ओ. कार्यकर्त्यांनी पोलिस-स्टेशनवर ताबा मिळवला. तेथे आपला झेंडा फडकताना पाहून पॅलेस्टाइनच्या जनतेच्या आनंदाला उधाण आले.

अशी पॅलेस्टाइन एक स्वतंत्र अलग देश बनायला सुरुवात झाली. आक्टोबरच्या शेवटी येथे सार्वत्रिक निवडणूक होईल. तोपर्यंत पी.एल्.ओ. च्या नेतृत्वाखाली राज्य - कारभार चालेल.

दीर्घ कालानंतर पश्चिम आशियात जी शांति स्थापन झाली आहे, तिचे जतन व्हावे यासाठी पी.एल्.ओ. व इस्राइलने सर्व देशांच्या सहकार्याची अपेक्षा केली आहे.



# गर्विष्ठ व मूर्खांचे परिवर्तन

खूप जुनी गोष्ट. रणधीर हा कर्पूर देशचा राजा होता. त्याचा पुत्र करण हा चांगलाच बलवान व पराक्रमी होता. जणू धैर्य व साहस यांचे नावच करण! पण त्याच्यात एक अवगुण होता - अहंकार - गर्विष्टपणा!

करणला कवि व पंडित यांच्याबद्दल मुळीच आदर वाटत नसे. तो त्यांचे श्रेष्ठत्व मानायला कदापितयार नसे. साधु - संन्याशांबद्दल त्याच्या मनात चीड असे. पक्का नास्तिक होता तो. 'जगात आपल्यापेक्षा मोठा कोणी नाहीच' असा त्याला गर्व वाटे. आणि हा गर्व दिवसें-दिवस वाढत चालला.

एके दिवशी एक ऋषि त्याच्याकडे आला. तो मोठा ज्ञानी असून त्याला दिव्य दृष्टीही होती. त्याने राजाला विचारले, ''राजा,आता तुझ्या राज्यावर सहस्रवर्षीय संकटं कोसळणार आहेत, हे माहीत आहे का तुला?''

सहस्रवर्षीय विपत्ती बद्दल लोक चर्चा करू लागले. दुर्भरारण्याजवळ एक कुग्राम होते. त्याच्या प्रवेशद्वारी तांब्याची एक मोठी घंटा होती. हजार वर्षातून एकदा ती वाजू लागे. असा समज होता, की तिच्या त्या भयानक नादाने धरणी कंपित होऊन राज्यातली सर्वच्या सर्व घरे जमीनदोस्त होतात.

या गावातून दुर्भरारण्यात प्रवेश केला की तेथे एक पाताळकूप होते. त्यात प्रवेश करणाराला बाहेर निघणे अशक्य असे. सर्वांचे असे म्हणणे होते की या विहिरीतून पाताळात जाण्याचा एक मार्ग आहे. हजार वर्षातून एकदा त्यातून दहा फणांवाला एक सर्प बाहेर येऊन त्या राज्यातले सारे प्राणी गिळून टाकतो. हा विषसर्प आपल्या मुखांवाटे अग्निज्वाळा पसरतो आणि त्यामुळे राज्यातील शेते, झाडे आदि सर्वांचा विनाश होतो. राज्यात कुठेच हिरवळ

शोभा दिवेकर



रहात नाही. सर्व भूप्रदेश ओसाड होऊन जातो.

या दुर्भरारण्यात एक राक्षसही आहे. तो कुठल्याशा रहस्यमय मन्दिरात गाढ झोपलेला असतो. त्याची ही जागाही कुणाला नेमकी माहीत नाही. सहस्र वर्षातून तो ही एकदा झोपेतून जागा होतो अन् सर्व मानवप्राण्यांना खाऊन टाकून पुन्हा निद्रेच्या स्वाधीन होतो. मग पुन्हा हजार वर्षे झोप.

अशा प्रकारे हजार वर्षातून एकदा कर्पूर देशाचा पूर्ण विनाश होतो, अन् नन्तर त्याचे पुनरुत्थान होते. ऋषीचे हे सारे सांगणे ऐकून राजा घाबरून गेला. ''पुढल्या पौर्णिमेनन्तर बरोबर दोन महिन्यांनी राज्यावर ही सहस्रवर्षीय आपत्ति कोसळणार आहे. मी आपल्या दिव्य दृष्टीने ती पाहिली आहे, म्हणूनच तुला सावध करायला मी इथे आलो आहे.'' ऋषीच्या बोलण्याने रणधीर चिन्तामग्न झाला.

त्यावेळी राज्यसभेत बसलेल्या करणनेही ते बोलणे ऐकले व तो हसू लागला. त्याने आपली तलवार उपसून ऋषीच्या दिशेने फेकली. तलवार फिरत फिरत ऋषीच्या कमंडलूवर जाऊन आदळली व तो खाली ज़मिनीवर धाडकन् पडला.

''ज्याला आपल्या मस्तकावर तलवारीचा आघात केंव्हा होईल हे सांगता येत नाही, त्याने हजार वर्षांच्या गोष्टी काय कराव्या! असल्या कपोलकल्पित गोष्टींवर मूर्ख लोकच विश्वास ठेवतील, कर्पूर देशचा राजा नव्हे! समजलं?'' करण गरजला.

आपला कमंडलु ताबडतोब उचलून घेत ऋषी म्हणाला, ''गर्वाने भरलेल्या आंधळ्या राजामुळे देशाचे नेहमी नुकसानच होत असतं. कोणत्याही क्षणी देशाचा विनाश होऊ शकेल. सहस्रवर्षीय आपत्तीचं निराकरण अन् राजाला सुधारणं या दोन्ही माझ्या जबाबदाऱ्या आहेत. बरोबर चार दिवसांनी इथे एक महावीर येईल अन् तो राजाशी युद्ध करेल. तोच या राज्याचं रक्षण करू शकेल अन करीलही, याची मला खात्री आहे.''

ऋषीच्या या शापवाणीने राजा रणधीरला आनन्दही वाटला अन् मनातल्या मनात तो दुःखीही झाला. आपल्या पुत्राला तो काही बोलू





शकला नाही. तो मौन राहिला.

राजधानीतून निघून ऋषीने एका सामान्य खेडुताचे आतिथ्य ग्रहण केले. त्याला म्हणाला, ''तुझ्या आतिथ्याने मी प्रसन्न झालोय. तुला कसली अडचण असेल तर सांग.मी.ती दूर करीन.''

खेडूत म्हणाला, ''माझा एक वाया गेलेला मुलगा आहे.त्याचं नाव आहे विद्याधर. मी त्याला शिक्षण घेण्याबद्दल आग्रह करत असतो, तर तो म्हणतो की मला एक महावीर बनायचंय. पण महावीर बनायची लायकीही त्याच्यात नाहीय. तो तर मांजराला पाहून भितो. तलवार हाती घ्यायची म्हटलं, तर त्याचे हात कापतात! इतकंच काय, पण एकटा अंधारात जायलाही तो भितो. भुताच्या नुसत्या गोष्टी ऐकूनच तो भयाने थरथर कापू लागतो! अन् याची महावीर बनायची इच्छा आहे म्हणे! त्याला कसं सुधारावं हेच कळत नाहीय मला. त्याचं डोकं ताळ्यावर आणायला आपण मला मदत कराल काय?''

''तू आपल्या मुलाला माझ्याबरोबर पाठव. मी त्याला योग्य बनवून तुझ्याकडे परत पाठवीन.'' ऋषी म्हणाला.

खेडुताने ऋषीचा प्रस्ताव मोठ्या आनन्दाने मान्य केला. विद्याधरला घेऊन ऋषी राजधानीकडे निघाला. तो त्याला म्हणाला, ''मी सांगेन तसं ऐक. म्हणजे 'महावीर' म्हणून तुझी ख्याती दाही दिशांना पसरेल. पण हां! काही क्षणांसाठी तुला हातात तलवार



पकडायला लागेल, अन करणशी तुला युध्द करावं लागेल. पण नन्तर मात्र आयुष्यात कधीही तुला हातात तलवार पकडायची गरज पडणार नाही.''

''हं, एक वेळचीय बाब असेल, तर कशीतरी वेळ निभाऊन नेईन मी. पण नन्तर मात्र मी कधी नुसता हातही नाही लावणार हं तलवारीला''! कापत कापत विद्याधर म्हणाला.

ऋषी विद्याधरला घेऊन एका ठरीव वेळी राजसभेत पोचला. तो राजा रणधीरला म्हणाला, ''राजा, यापूर्वी जेव्हा देशाचा सर्वनाश झाला, त्यावेळी जगल्यावाचलेल्यांपैकी काही जणांनी घोर तपस्या करून हजार वर्षातून



येणाऱ्या विपदा काहीशा कमी करण्याल्या शक्ति प्राप्त केल्या. दुर्भरारण्याजवळच्या एका गावच्या शमीवृक्षावर त्यांनी त्या शक्ति शवांच्या आकारात सुरक्षित ठेवल्या आहेत. खरे म्हणजे तेच लोक पिशाच्चं बनून त्या शक्तींचं रक्षण करत आहेत. मला कधीतरी वाटत होतं, की त्या शक्ती मिळवण्याचा अधिकार करणलाच आहे. पण तो तर गर्वाच्या नशेत माझाच अपमान करायला टपला आहे. तेंव्हा त्याच्याकडून हे कार्य होणार नाही. मी देशभर भ्रमण करून एक असा वीर शोधून आणला आहे. विद्याधर नावाचा हा युवक अन् करण यांच्यात युध्द होईल. या युद्धात जो जिंकेल तो दुर्भरारण्यात जाऊन देशावर आलेल्या विपत्तीचा अन्त करील. तेंव्हा आता या दोघांच्यात युद्धाची व्यवस्था कर.''

युध्द सुरू होऊन काही क्षणातच संपलेही! त्यांच्यापैकी एकाने तलवार खाली टाकून जमिनीवर लोळण घेतली. सर्वांना वाटले की युवराज करणच जिंकला असेल. पण चेहऱ्यावरचा बुरखा दूर करताच असे दिसून आले की, विद्याधरच विजयी झाला आहे. सर्वांनी आश्चर्याने तोंडात बोटे घातली.

'विद्याधरचा विजय असो!' च्या घोषणांनी प्रदेश दुमदुमून गेला. नंतर ऋषी त्या दोघांनाही एकान्तात घेऊन गेला. आणि म्हणाला, ''माझ्या शक्तीमुळे तुम्हा दोघांच्या रूपात बदल झालेला आहे. करण हा विद्याधर बनलाय अन् विद्याधर करण! तुम्हीं मनात आणलंत तरी हे रहस्य इतरांना सांगू शकणार नाही. विद्याधर करण बनूनच राहू इच्छित असेल, तर करणला विद्याधर म्हणूनच जगावं लागेल. करण विद्याधरच्या रूपातच शमी वृक्षावरील शक्ति प्राप्त करून घेईल अन् तांब्याची घंटा, विषसर्प आणि राक्षस यांचा कायमचा नाश करून टाकेल.

करण रूपातला विद्याधर आता राजाच्या अंतःपुरात राहू लागला. राजाने त्याला बोलावून म्हटले, ''या जगात प्रत्येक वीराला कधी ना कधी पराजय सोसावाच लागतो. तेंव्हा आता त्याचं दुःख करत बसू नकोस. पुन्हा तलवार हाती घे. आपला धनुष्यबाण संभाळ अन् जगाला दाखवून दे, की किती मोठा वीर आहेस! आपले मन्त्री आणि सेनापतीचे तुझ्या हातून कधी न कधी हार खाल्लेले मुलगे तुझ्यावर डाव अुलटवायच्या तयारीतच बसलेले आहेत. ते संधी शोधत आहेत. त्या सर्वांना पुन्हा एकदा हरवून आपलं नाव पक्कं कर.'' राजाने अशा प्रकारे करणला प्रोत्साहन द्यायचा प्रयत्न केला. पण त्याला काय माहीत, की हा खरा करण नसून विद्याधर आहे!

विद्याधरने नकारात्मक मान हलवत अुत्तर दिले, ''बाबा, विजय अन् पराजय या परमेश्वराधीन गोष्टी आहेत. माझ्या या पराजयाचं कारण 'प्रतिस्पर्ध्याची शक्ती' हे नसून 'माझा अहंकार' हेच आहे. प्रथम मला या गर्वावर जय मिळवायचाय, नंतर इतरांवर! तेंव्हा काही काळपर्यन्त मी पंडितांकडून शास्त्रे शिकेन, पौराणिक गोष्टी ऐकेन अन् साधुसंतांचा सत्कार करीन. एक मित्र आपणाजवळ बाळगून नेहमी निरनिराळ्या अुत्साहगर्भित गाथा ऐकत राहीन.''

पुत्रातले हे परिवर्तन पाहून राजाला फार संतोष वाटला. विद्याधरने राजाला असे सांगण्याचे मुख्य कारण होते की तो तलवारीलाच भीत होता, एकटा राहू शकत नव्हता आणि अंधारालाही भीत होता. या सर्वापासून स्वतःला बाचवण्यासाठीच त्याने ही चलाखी केली होती.

भाट लोक रोज येऊन विद्याधरची स्तुतिगीते गाऊ लागले. त्याला महावीर संबोधू लागले.



पण आपली ही प्रशंसा ऐकून तो घाबरून जाई. त्याला हे असह्य होऊ लागले. पण जे घडले, ते पंडित, नागरिक व कलाकारांना माहीतच नव्हते. त्यांना तर करणचा बदललेला स्वभाव फारच आवडू लागला. त्याचा भलेपणा, मृदु स्वभाव अन् आदर-भावना पाहून ते खूश झाले. नागरिकांच्या अडचणी समजून घेऊन तो त्यांना दानधर्म करू लागला. अशा तऱ्हेने त्याची प्रसिध्दी दिवसें दिवस वाढत चालली.

अशा रीतीने दिवस, महिने व काही वर्षे निघून गेली. विद्याधर रूपी करणने शमीवृक्षाकडून त्या शक्ति मिळवल्या आणि हजार वर्षातून एकदा देशभर येणाऱ्या तीनही विपदा दूर केल्या. इतके करून तो जेंव्हा

राजधानीकडे परतला, तेंव्हा ऋषी विद्याधरला एकान्तात घेऊन जाऊन म्हणाला, "केवळ अहंकारामुळे करण केलेली महान् कार्य करण्यापासून वंचित राहिला. पण तोच या देशाचा युवराज आहे. विद्याधर केवळ साधनमात्र आहे. देशावरचं संकट निवारण हा आपला धर्म करणने अुत्तम प्रकारे निभावलाय."

हे ऐकून विद्याधर काहीसा नाराज झाला. आपण राजा व्हावे असे त्याला वाटू लागले होते. परंतु तो युवराज नसल्याने त्याचा तो हक्क नव्हता. तेंव्हा करण रूपातला विद्याधर म्हणाला, "स्वामीजी, आमची रूपं पहिल्यासारखी करून टाका कशी! कृपा करा एवढी."

चकित होअून ऋषी म्हणाला, "तू देशाचा राजा बनणार आहेस. ही संधीही सोडायला तयार झालास तू? देशभरात आता विद्याधरची प्रतिष्ठा होत आहे. तुला अजूनही प्रतिष्ठापात्र बनून रहायची इच्छा आहे?"

विद्याधर विनपूर्वक म्हणाला, "दररोज 'महावीर' म्हणून माझी वाहवा होत आहे. पण त्यानं माझी तृप्ति होत नाहीय. मला माहीत आहे, की मी त्या प्रशंसेला पात्र नव्हेच. पण करणच्या रूपात मी जमेल तितकं जनतेचं कल्याण केलंय. या पुण्यकर्मामुळे करणला जी प्रसिद्धी मिळालीय, तिच्यामुळे मी खूश आहे. पुढे मी तसे प्रयत्न चालू ठेवीन. म्हणूनच आमचं रूपपरिवर्तन करायची विनंती मी तुम्हाला केली."

त्याच्या बोलण्याने ऋषी संतुष्ट झाला. तो म्हणाला, "करणचा गर्व आता नाहीसा झालाय. तुझं रिकामटेकडेपणही आता दूर झालंय. पुढे कधी करणला तुझं नुकसान करावंसं वाटलं तर पुन्हा तुमचं रूपपरिवर्तन होईल; म्हणून सावध रहा. आपापली कर्तव्यं पार पाडत खऱ्या मित्रांसारखे जीवन जगा." त्यांना आपापली खरी रूपे देऊन ऋषी देथून निघून गेला.

धनसंपत्तीबरोबरच विद्याधरला सद्बुध्दी मिळाली अन् अंहकार त्यागून करणला विनय.





# कीर्ति सिंह - ३

(पंडित लोकांच्या सल्ल्याने विचित्रवमनि जंगलात एक मंदिर बांधले. यानंतर काही वर्षांनी त्याचा पुत्र जयवर्मा सिंहासनावर बसला. कांभोज राजा वरुणदत्त याने अद्भुत हार पळवून नेण्याचे कारस्थान रचले. त्यासाठी त्याने एक नर्तकी पाठवली. पण कारस्थान जाणून घेअून विचित्रवमनि प्रतिव्यूह रचला आणि खरा हार वरुणदत्तला मिळू शकला नाही. जयवर्माला हे माहीत नव्हते. विचित्रवर्माच्या देहावसानानंतर जयसेनने जयवर्माला त्याच्या पित्याने लिहून ठेवलेले एक पत्र दिले. हे सर्व सांगून पाच पिढ्यां नंतरचा जयसेन शक्तिसेनेला पुढे सांगत आहे.)

जयसेनचे सर्व बोलणे ऐकल्यावर जयवर्मा म्हणाला, "मी बाबांच्या विश्वासाला पात्र बनू शकलो नाही. हार त्याच्या कुणा वारसालाच मिळणार. त्यांचा तो वारस माझाही वारसच असेल ना?" असे म्हणत त्याने पेटीतले ते पत्र काढून वाचायला सुरुवात केली.

"पुत्र जय! जयसेनने तुला सर्व सांगितलेच असेल. मी जे काही केलं, त्याबद्दल तुला राग आला नसेल अशी माझी खात्री आहे.

हार कुठे लपवून ठेवलाय हे जयसेनलाही मी सांगितलेलं नाही. तो हार कुठे आहे, हे जाणण्याकाठी काही संकेत मात्र तुझ्यासाठी सोडून जात आहे.

"जय, सर्व लोकांची पूजनीय परमेश्वरी ही एक स्त्री आहे. ती कोणा समोर आपले मस्तक नमवते? त्या परमेश्वराचे निवास स्थान कोणत्या



दिशेला आहे? पंचमहाभूतातील एक, मनुष्याला जीवन-आधार प्रदान करणारा कोण? ज्याला हार प्राप्त होणार आहे, त्याला या प्रश्नांची उत्तरही मिळतील.- विचित्रवर्मा.''

जयवर्माने पत्र संपूर्ण वाचून मोठ्या श्रध्देने ते आपल्या डोळ्यांना लावले आणि पुन्हा त्या पेटीत ठेवून दिले. पाच पिढ्या निघून गेल्या, पण कोणालाही पत्राचा आशय नीट कळला नाही.

परन्तु अनेक तर्क वितर्क करून आपल्या सुषेण महाराजांचे पिता अशा निर्णयावर आले की तो हार पूर्वेकडील जंगलातल्या त्या शक्ति देवीच्या मन्दिराच्या प्रांगणातच कुठेतरी गाडून ठेवला असला पाहिजे. त्यांनी तिथली जमीन खोदून तो शोधायचे खूप प्रयत्न केले. पण दरवेळी अशा काही अडचणी आल्या की त्यांना आपले प्रयत्न सोडून द्यावे लागले. त्यांच्यानंतर आता आपले महाराज सिंहासनावर आले आहेत. पण त्यांनी मात्र त्या दिशेने प्रयत्न केले की नाहीत कुणास ठाऊक! आपल्या महाराजांची मनापासून इच्छा आहे की तो हार आपला पुत्र कीर्तिसिंह याला मिळावा. तुझ्या बुद्धिमत्तेवर त्यांचा खूप विश्वास आहे. कीर्तिसिंह सारख्या बुध्दिवान राजपुत्राला तुझ्यासारख्या कुशाग्र बुध्दिमतीची मदत मिळाली, तर हे कार्य सुलभ होईल असा कदाचित महाराजांचा विचार असावा. त्यांनी स्पष्टच सांगितलंय की कीर्तिसिंहला कैद करून पूर्वेकडील जंगलातल्या त्या शक्ति मंदिरातच ठेवले पाहिजे. त्यांच्या या सांगण्यात हाच संकेत असावा असं मला वाटतंय.''

पित्याचे बोलणे ऐकून शक्तिसेना म्हणाली की, ''हां, असेच असेल बाबा! पण ही सारी हकिकत लपवून ठेवून त्यांनी आपल्यासमोर नक्कीच समस्या निर्माण केलीय.''

यावर हसून जयसेन म्हणाला, ''पण समस्या तर तू सोडवलीच आहेस. तू मला धीर दिला नसतास, तर मी या गोष्टीचा विचारच करू शकलो नसतो.'' शक्तिसेना नुसतीच हसून गप्प झाली.

दुसऱ्या दिवशी जयसेन जेंव्हा राजवाड्यात पोचला, तेंव्हा त्याला निरोप मिळाला की महाराज सुषेण आपल्या खाजगी कक्षात त्याचीच वाट पहात आहेत. जयसेन ताबडतोब तिकडे गेला.

हसऱ्या चेहऱ्याच्या जयसेनला पहाताच महाराज त्याला म्हणाले, ''काय जयसेन, आपल्या मुलीला एकटीला पाठवायला तयार आहेस तू?''

महाराजांचा प्रश्न ऐकून लज्जित होत जयसेन म्हणाला, ''एक बाप असल्यामुळे काल माझी वागणूक काहीशी विचित्रच घडली. पण तुम्ही गेल्यानंतर शक्तिसेनानं मला तुमच्या बोलण्याचा आशय समजावून सांगितला. मी आणि माझा संपूर्ण परिवार तुमच्या सेवेला सदैव तयार आहे. माझी कन्या शक्तिसेना शुक्ल चतुर्दशीच्या दिवशीच निघेल अन् वाटेत राजकुमाराला गाठील. पुढे तिला जे करायचंय ते ती करीलच.''

सुषेण म्हणाला, ''जयसेन, तू अन् शक्तिसेनानं माझा आशय ओळखला याचा मला आनन्द आहे. पण मी इतकी घाई का करत आहे हेही समजून घे.



माझे पूर्वज जयवर्मा यांनी जरी हार हातचा घालवला, तरी त्यांनी राज्यपालन मोठ्या समर्थतेनं केलं. त्यामुळेच आपला कोसल या दक्षिणापथात अग्रगण्य बनून राहिला आहे. वरुणदत्तची ही आपले राज्य विस्तृत करायची महत्वाकांक्षा होती, पण तो फारच मूर्ख असल्यामुळे फारसा राज्यविस्तार करू शकला नाही. आपल्या अखेरच्या दिवसात त्याला हे ही कळून चुकलं की नर्तकीने आणलेला हार नकली आहे, अन् कोसलराजाने खरा हार कुठेतरी लपवून ठेवला आहे. तेंव्हापासून कांभोज राजे कोसलांचे कट्टर शत्रु बनले आहेत. दिवसेंदिवस हे शत्रुत्व वाढतच आहे. काहीही करून, संधी मिळताच तो हार लांबवण्याच्या प्रयत्नात ते आहेत. पण कोसलराजांनाच खुद्द हाराबद्दल काही माहिती नाही, तर कांभोजराजांना तरी त्याबद्दल काय कळणार? त्यांना तो सापडायची काही शक्यताच नाही.

सांप्रत कांभोजचा राजा त्या वरुणदत्तचा वंशज गरुडदत्त आहे, हे तू जाणतोसच. आपल्या गुप्तचरांकडून मला असं कळलंय की आपल्या



आज्यापणज्यांपेक्षाही त्याची हारावर जास्त नजर आहे. हार न मिळाला, तरी महाराज विचित्रवर्मांनी लिहून ठेवलेलं ते पत्र मिळवण्याच्या प्रयत्नात तो आहे. त्यासाठी तो अगदी आकाश- पाताळ एक करत आहे. याच प्रयत्नात त्याच्याकडून पाठवले गेलेले तीन- चार गुप्तचर आपल्या कैदेत आहेत. पण त्यामुळे गरुडदत्तला काही भयही वाटलेलं नाही, अन् त्यानं आपले प्रयत्नही थांबवलेले नाहीत. असं कळलंय की तो ते पत्र मिळवण्यासाठी नवनव्या योजना आखत आहे. पण त्याची योजना काय आहे, ते मात्र आपल्याला बराबर कळलेलं नाही. अशा परिस्थितीत शक्य तितक्या लवकर आपणच तो हार मिळवावा. यानन्तर आपण कांभोजवर हल्ला करू. महान् गुरु कृष्णचन्द्र यांनी राजकुमाराच्या आश्रम सोडण्याचा मुहूर्त निश्चित केला आहे. तेंव्हा या महत्त्वपूर्ण कामाची सुरुवातही आपण याच मुहूर्तावर करावी असं ठरवलंय मी. यासाठीच गुरुकुलातून निघालेल्या कीर्तिसिंहला पूर्वेकडे वळवायची योजना मी बनवली आहे. तुझ्या मुलीचं बुध्दिकौशल्य व तीक्ष्णता पाहिल्यापासून मला असं वाटतंय की हे दोघं एकत्र आले, तर काय छान होईल ! हा सर्व त्याचाच परिणाम आहे. बोल, आता तुझं काय म्हणणं आहे ? शंका दूर झाल्या तुझ्या ?''

मस्तक हलवत जयसेनने विचारले, ''पण महाराज, राजकुमाराला त्या हाराबद्दल काही माहिती आहे का ?''

''त्याला फक्त इतकंच माहीत आहे की आपल्या पूर्वजांचा तो अपूर्व हार कुठेतरी गुप्त जागी ठेवलेला आहे. यापेक्षा अधिक काहीही नाही.'' असे म्हणत आपल्या वस्त्रात लपवलेली पेटी काढून जयसेनला देत राजा सुषेण म्हणाला, ''ही पेटी आपल्या कन्येला दे. तिला नीट विवरण सांगून पेटी कीर्तिसिंहच्या हाती द्यायला सांग, अन् नीट काळजी घ्यायला सांग. यापुढचं सारं आपण त्यांच्यावरच सोडू या.''

पेटी घेऊन ती आपल्या वस्त्रात लपवून जयसेन तेथून बाहर पडला.

अर्धी रात्र उलटली तरी महाराज सुषेण झोपू शकले नाहीत. अशान्तपणे ते आपल्या





शयनगृहात येरझारा घालत राहिले. आपल्या पतीची ही स्थिती पाहून राणी वैष्णोदेवीने अुत्सुकतेने कारण विचारले.

काहीही न लपवता महाराजांनी तिला सारी हकीकत सांगितली व शक्तिसेनेच्या बाबतही सांगताना ते म्हणाले, ''तिला मी एकटीच पाठवत आहे, याबद्दल मला चिन्ता वाटत नाही. ती अत्यन्त समर्थ अशी तरुणी आहे. आपल्या कार्यात ती नक्कीच सफल होईल. पण बोलता बोलता मी म्हणून गेलो की, ती जिंकली तर मी तिला आपली सून बनवून घेईन. कीर्तिसिंहला तर हे काहीच माहीत नाही. शक्तिसेनाबद्दल त्याचे काय विचार आहेत, तो काय निर्णय घेईल कुणास ठाअूक! वचन देअून मी त्या बिचारीच्या हृदयात आशा जागवलीय. पण माझं वचन व्यर्थ गेलं, तर शक्तिसेनेवर काय गुदरेल ? माझ्या वचनाचं काय होईल? तिला मी नुसतंच 'एवढं काम कर' असं म्हटलं असतं तर बरं झालं असतं!''

पतीचे हे बोलणे ऐकून वैष्णोदेवीला हसू आले. ती म्हणाली, ''आकाशाचे राजा अन् राणी कोण हे तरी सांगा पाहू?''

राणीच्या या अर्थहीन प्रश्नावर आश्चर्य प्रकट करत राजा म्हणाला, ''हाही काय प्रश्न झाला?''

वैष्णोदेवी हसतच राहिली. ती म्हणाली, ''माझा प्रश्न समयानुकुल असाच आहे. माझ्या या प्रश्नाचं अुत्तर आपला पुत्र आणि होणारी सून यांनाच माहीत आहे.''

''होणारी सून? कुणाबद्दल बोलतेयस तू?'' सुषेण जास्तच आश्चर्य दाखवत विचारू लागला.

''दुसरी कोण ? शक्तिसेनाच की.'' मग क्षणभर थांबून राणी पुढे म्हणाली.

''तुम्ही विसरलात का काय की शक्तिसेना अन् कीर्तिसिंह यांची बाळपणापासूनच खूप मैत्री आहे? कीर्तिसिंह अजूनही ते विसरला नाहीय. मी जेंव्हा जेंव्हा त्याला गुरुकुलात भेटायला गेले, तेंव्हा तेंव्हा तिच्याबद्दल काही न काही विचारतच असे. तुम्ही सोपवलेल्या कामावर शक्तिसेनाही चुपचाप निघालीय, याचं कारणही कीर्तिसिंह होय. तुम्ही अगदी निश्चिंत रहा. तीच आपली भावी सून आहे म्हटलं!''



राणीच्या बोलण्याने राजा सुषेणचे समाधान झाले अन् त्याने विचारले, ''मग आता सांग बरं आकाशाचा राजा आणि राणी कोण ते?''

वैष्णवीदेवी हसत म्हणाली, ''मी का बरं सांगू? लग्नानन्तर आपल्या सुनेलाच विचारून माहीत करून घ्या ना.'' आता राजा सुषेण डोळे मिटून झोपेच्या अधीन होअू लागला.

कोसलदेशात हे सारे घडत असताना तिकडे कांभोज देशात गरुडदत्तने एक योजना आखली. यावेळी त्याच्या योजनेत आणखी दोन भागीदार सामिल झाले. त्यापैकी एक कोसलच्या अुत्तर भाग नग या देशाचा राजा नागकर्ण हा होता; तो गरुडदत्तचा मेहुणाही होता. दुसरा होता नग व कांभोज यांमधील चाक्यदेशचा राजा कुंदनवर्मा.

गरुडदत्तने दोन-तीन वेळा आपल्या गुप्तचरांद्वारा विचित्रवर्माचे पत्र हडपण्याचा प्रयत्न केलेला होता. पण त्याचा प्रत्येक प्रयत्न असफल झालेला होता. यावेळी इतरांची मदत घेअून कोसलवर हल्ला करून तो हार मिळवण्याचा त्याने चंग बांधला होता. हल्ला करण्यापूर्वी त्याने आपल्या मेहुण्याचा सल्ला विचारला. नागकर्ण म्हणाला की चाक्यराजाला ही हेच हवे आहे, तेंव्हा त्याचेही सहाय्य घेतले तर बरेच होईल. त्याने असेही म्हटले की, ''आपली स्वतःची भिल्ल सेना संख्येने कमी असल्याने चाक्य राजाचे सैन्यही आपल्या अुपयोगी पडेल. या सम्मिलित सैन्यामुळे



आपल्याला नक्कीच जय मिळेल.''

फलस्वरूप तिघांचीही बैठक होअून दीर्घ चर्चा केली गेली अन् एक सुदृढ योजना पक्की झाली.

असे ठरले की हार गरुडदत्तने घ्यावा अन् बाकीच्या दोघांनी कोसल राज्य अर्धे अर्धे वाटून घ्यावे. जरी हा तिघांचा सम्मिलित अुघड निर्णय होता, तरी प्रत्येकाचा गुप्त अुद्देश काही निराळाच होता. प्रत्येक जणाला हार ही हवा होता, अन् कोसलचे राज्य ही. गुप्त रूपाने त्यांनी यासाठी आपापल्या निराळ्या योजनाही बनवल्या होत्या. त्यांनी प्रथम कोसल हस्तगत करायचे ठरवले. ही योजना प्रस्तुत करत नागकर्ण म्हणाला, ''आपण हेही लक्षात ठेवायला हवे

की आपल्या तिघांच्या मिळून होणाऱ्या सेनेइतकेच एकट्या कोसलचे सैन्यबळ आहे."

"आणखीही एक गोष्ट आहे. उद्या पौर्णिमेच्या दिवशी कीर्तिसिंह आश्रम सोडून राजधानीकडे निघणार आहे. तो सेनापती बनला, तर आपण त्याला तोंड देऊ शकणार नाही. तो आपल्याला चिरडून टाकील." कुंदनवर्मा म्हणाला.

गरुडदत्त म्हणाला - "आपण प्रथम त्या कीर्तिसिंहलाच खतम करून टाकू, म्हणजे प्रश्नच रहाणार नाही!"

बाकी दोघांनी उत्सुकतेने विचारले, "ते कसं शक्य आहे?"

"आपण तीन-चार सुदृढ सैनिक पाठवून, लपूनछपून वाटेतच त्याची हत्या करवू. मग सारा कोसल देश जेंव्हा त्याच्या मृत्युशोकात मग्न असेल, तेंव्हा आपण अचानक हल्ला करू. बस, आपलं काम अगदी सहजपणे साध्य होईल." गरुडदत्त म्हणाला.

"याहीपेक्षा एक आणखी उत्तम उपाय आहे. कीर्तिसिंहला आपण वाटेतच कैद करू अन् त्याला ओलीस ठेवून त्याच्या पित्याकडून हाराची मागणी करू. त्याला धमकी देऊ की हार मिळाला नाही, तर त्याच्या पुत्राची हत्या केली जाईल." नागकर्णाने सुचवले.

"हां, हाच योग्य उपाय होईल. तो हार कुठे आहे, हे आपल्यालाही ठाऊक नाही. राजा सुषेणचं आपल्या पुत्रावर प्राणापलीकडे प्रेम आहे. आपण त्याला वाटेत मारून टाकला तर त्या हाराचं रहस्य सुषेण नाहीसं करील, अन् हाराबाबत पुन्हा आपण अंधारातच राहू. मुलाच्या प्राणासाठी तो हार तर देईलच, अन् तो हाती आला की आपण कीर्तिसिंहला मारूनही टाकू." कुंदनवर्माने आपली योजना प्रकट केली.

बाकीच्या दोघांनी या योजनेला संमती दिली अन् असे ठरवले की चार बलवान सैनिक पाठवून कीर्तिसिंहला कैद करायचे आणि कांभोज देशात घेऊन जायचे.

क्रमशः





# प्रभावशाली मणी

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडापाशी आला. झाडावरून प्रेत खाली उतरवलं तेंव्हा प्रेतातील वेताळ बोलू लागला "राजा, या स्मशानात तुझे प्राण सुरक्षित नाहीत. तू मोठा आशावादी दिसतो आहेस. कुठल्या कार्याच्या सिध्दीसाठी तू एवढे कष्ट उपसत आहेस? तुझ्या सारखे वीर व पराक्रमी राजे नित्य आपल्या बळावरच अवलंबून असतात! जे मिळवण्यासाठी तू हे सर्व परिश्रम करीत आहेस, ते कदाचित् एकाद्या सुंदरीच्या प्रेमपाशात अडकून तर करीत नसावास ना? मग मात्र समस्या मोठी बिकट आहे. जर अशा एकाद्या नाजुक संकटात सापडला असशील, नि त्यातून सुटका करून घेण्याची तुझी इच्छा असेल तर कल्याणी-नगरच्या युवराजासारखे शेवटी काही विवेकहीन काम करून बसशील. मी तुझा हितचिंतक आहे आणि तुला सावध करू इच्छितो. म्हणून त्या युवराजाची गोष्ट तुला

## वेताळ कथा



सांगतो. गोष्ट ऐकता ऐकता तुझा श्रमपरिहार ही होईल.'' असं म्हणून वेताळाने कल्याण-नगरीच्या युवराजाची गोष्ट सांगायला सुरुवात केली.

कल्याणीनगरचा राजा होता कनकदल. त्याचा एकुलता एक मुलगा मोहनगुप्त फार बुद्धिमान होता. त्याची दृष्टि मोठी तीक्ष्ण होती. कुठल्याही अवघड प्रश्नाचं तो संतोषजनक उत्तर देत असे. असल्या सुयोग्य युवराजाला आपला जावई बनवायची आसपासच्या अनेक राजांची स्वाभाविक इच्छा होती. त्यांनी आपल्या मुलींचे फोटो कल्याणीनरला पाठवले. पण कोणती ही राजकुमारी मोहनगुप्ताला आकर्षित करू शकली नाही. त्याने सर्व राजकुमारींना नापसंद केले.

दरबारी चित्रकार रविवर्मा मोहनगुप्तचा प्रिय मित्र होता. दोघे समवयस्क होते. कधी कधी मनरंजन करण्यासाठी युवराज रविवर्माच्या चित्रशाळेत जात असे. एक दिवशी युवराज तेथे गेला, तेव्हा रविवर्मा एका चित्रासमोर उभा होता आणि ते पुरे करण्यासाठी त्यात रंग भरत होता.

एका अद्‌भुत सुंदरीचं ते चित्र होतं. ते चित्र पाहून मोहनगुप्त मोहित झाला. त्याच्या डोळ्यांसमोरून ते चित्र दूर होईना. त्याने रविवर्म्याला विचारले - ''मित्रा, तू रंगवीत असलेली ही सुंदरी केवळ तुझ्या कल्पनेतील आहे, की तू तिला आपल्या डोळ्यांनी पाहिली आहेस?''

युवराजाच्या या प्रश्नावर रविवर्मा हसत म्हणाला - ''ज्या सुंदरीचं हे चित्र मी रेखाटलं आहे, ती याच नगरीत तर रहाते. तिचं नाव आहे स्वप्नरेखा. एका सामान्य शेलकऱ्याची मुलगी आहे. अजून लग्न व्हायचंय तिचं!''

हे ऐकून मोहनगुप्तला फारच आनंद झाला. तो म्हणाला - ''वा! या अद्‌भुत सुंदरीशी लग्न करू शकलो नाही, तर माझं जीवन व्यर्थच आहे.''

त्या रात्री त्याला झोप लागली नाही. पलंगावर चिंतन करीत राहिला. डोळे उघडे असोत, वा मिटलेले, स्वप्नरेखा त्याला सतत दिसत होती. मोठ्या कष्टाने कशी बशी रात्र त्याने घालवली. प्रातःकाळी त्याला झोप आली.



ते एक जंगल होतं. एक मांत्रिक वाघावर बसून जंगलातून चालला होता. स्वप्नरेखेसारखी एक सुंदरी ही त्याच्या जवळ बसलेली होती. मोहनगुप्त घोड्यावर बसून त्यांचा पाठलाग करू लागला. घोडा आणि वाघ यांच्यात खूप अंतर होतं. घोड्याला वेगाने पळवून ही तो वाघापर्यंत पोचू शकला नाही. त्या मांत्रिकाचं वय पंचवीस वर्षे असेल. चांगला धड-धाकट दिसत होता. त्याची दाढी काळ्या रंगाची होती. आणि डाव्या हाती मंत्र-दंड. गळ्यात रुद्राक्ष माळेबरोबर एक सोन्याची साखळी होती व तिच्यात एक लाल मणि चमकत होता.

काही अंतर चालून गेल्यावर मांत्रिकाने वाघाला एका झाडापाशी थांबवलं. जवळच डोंगरात एक लेणी होती. मांत्रिक त्या लेणीत प्रवेश करू लागला, तशी ती युवती व वाघ हे त्याच्यामागे जाऊ लागले.

इतक्यात मोहनगुप्त जागा झाला. आपण आपल्या अंतःपुरातील शय्येवर आहोत हे त्याच्या लक्षात आले. आपण पाहिलं ते स्वप्न होतं हे ही तो कळून चुकला. एवढ्यात सकाळ उजाडल्याची घंटा झाली.

दिवसभरात नगरीत वार्ता पसरली की व्याघ्रदीप नावाच्या एक मांत्रिकाने स्वप्नरेखेला पळवून नेली. याच स्वप्नरेखेला तर मोहनगुप्ता ने स्वप्नात पाहिलेले होते. आता मोहनगुप्तला फार दुःख झाले. व्याघ्रदीप मोठा शक्तिवान् मांत्रिक म्हणून प्रसिध्द होता. शिवाय त्याच्याजवळ संमोहन शक्तीने भरलेला एक मणी आहे असे ही लोक म्हणत. या मण्याच्या





प्रभावाने तो कोणाला ही आपण्याकडे आकर्षित करून घेत असे.

हे सर्व ऐकून मोहनगुप्ताला वाटले की काल रात्री त्याने जे स्वप्न पाहिलं ते स्वप्न नव्हतं, ती तर सर्व वस्तु-स्थिति होती. सगळा विचार करून त्याने एक निर्णय घेतला. कुणाला ही न सांगता तो घोड्यावर बसला आणि जंगलाकडे निघाला.

स्वप्नात त्याने जी जागा पाहिली होती, ती दुपार पर्यंत तो शोधत राहिला. एका ठिकाणी त्याला एक वडाचं मोठं झाड दिसलं. शेजारीच एक गुंफा ही होती. मोहनगुप्त घोड्यावरून खाली उतरला आणि त्या गुंफेच्या दिशेने निघाला.

गुंफेच्या समोर वाघ अर्धसुप्त अवस्थेत पडला होता. व्याघ्रदीप जवळ जो मणी होता तो आता त्या वाघाच्या गळ्यात लटकत होता. मोहनगुप्ताची चाहूल लागून वाघ जागा होण्यापूर्वीच त्याने आपल्या तलवारीने वाघाचे शिर धडापासून वेगळे केले.

मोहनगुप्तने लगेच तो प्रभावशाली मणी वाघाच्या गळ्यातून काढून घेतला. जरा पुढे गेल्यावर व्याघ्राजिनावर बसलेला व्याघ्रदीप व थोड्या अंतरावर बसलेली स्वप्नरेखा यांना त्याने पाहिले.

आता आपण काम करावं याबाबत मोहनगुप्त विचार करू लागला. एवढ्यात व्याघ्रदीप त्या सुंदरीशी बोलू लागला - "स्वप्नरेखा, मण्याच्या प्रभावाने मी आतापर्यन्त अनेक अद्भुत कामे केली. त्याच्याच साह्याने मी तुला तुझ्या घरापासून इथपर्यंत आणू शकलो. पण मण्याच्या प्रभावाने मी तुला आपली बनवू इच्छित नाही. म्हणून मी तो मणी वाघाच्या गळ्यात लटकवला आहे. जर तो मणी माझ्या गळ्यात नसेल तर मी एक सामान्य माणूस आहे. तू मानलेस, तर शास्त्रीय पद्धतीने अग्नीला साक्ष ठेवून मी तुझ्याशी लग्न करीन. जर माझ्याशी लग्न करण्याची तुझी इच्छा नसेल तर मी तुला सुरक्षितपणे तुझ्या घरी पोंचवीन."

मांत्रिकाच्या तोंडचे हे सारे शब्द ऐकून मोहनगुप्तला मोठं आश्चर्य वाटलं. स्वप्नरेखा यावर काम उत्तर देते हे पाहण्यासाठी तो मोठ्या उत्सुकतेने दोन पावले पुढे सरकला.



स्वप्नरेखाने एकदा टक लावून व्याघ्रदीपकडे पाहिले नि मान खाली घालून म्हणाली - "आपल्याजवळ असलेली ही मंत्र-शक्ति सोडून देऊन एकाद्या साधारण माणसाप्रमाणे आपण समाजात रहायला तयार असाल तर तुमच्याशी लग्न करायला माझी काही हरकत नाही."

मांत्रिकाने तिची ही अट मान्य करण्याचा आविर्भाव केला नि तो तिचा हात आपल्या हाती घेऊ लागला. इतक्यात मोहनगुप्त चपळाईने पुढे आला. मोहनगुप्त त्या युवतीला उद्देशून म्हणाला- "स्वप्नरेखा, थांब. हा मांत्रिक मोठा दुष्ट व नीच माणूस आहे. त्याच्याशी विवाह करू नकोस. मी या देशाचा राजकुमार आहे. माझ्याशी लग्न केलंस तर कल्याणीनगरची महाराणी होशील."

मण्याच्या प्रभावामुळे स्वप्नरेखा मंत्रमुग्ध होऊन मोहनगुप्तच्या शेजारी येऊन उभी राहिली.

हे पाहून मांत्रिक खदखदा हसू लागला. राजकुमाराने नाराज होत विचारले - "हे कसलं विकृत हास्य? एका अबलेला आपल्या जवळील मण्याच्या साह्याने तू आकर्षित केलंस. तू दुष्ट आणि नीच आहेस. कायद्यानुसार मी तुला फाशीची शिक्षा देऊ शकतो. पण मी तसे करणार नाही. तुझ्यावर दया करून तुला सोडून देतो."

पुन्हा जोरजोरात हसत मांत्रिक म्हणाला - "काय म्हणालात? तुमचा आरोप एवढाच ना कि मी एका अबलेला मण्याच्या प्रभावाने वश केलं आणि मी दुष्ट व नीच आहे!"



मांत्रिकाच्या बोलण्याने मोहनगुप्त बुचकळ्यात पडला. जो विचार करु लागला. विचार करता करता त्याच्या चेहऱ्यावरील भाव बदलू लागले.

आपल्या गळ्यातील मणी त्याने जोरात खाली टाकला. त्याचे तुकडे-तुकडे झाले.

एवढ्यात मोहनगुप्त जवळ उभी असलेली स्वप्नरेखा आश्चर्यचकित होऊन म्हणाली - "अय्या, मी ज्यांच्या शेजारी उभी आहे, ते हे कोण?" असे काही बडबडत ती मांत्रिकाजवळ गेली. आता मोहनगुप्तने क्षणाचा ही विलंब लावला नाही. तो तेथून निघाला आणि आपल्या घोड्यावर स्वार होऊन राजधानीला

परत आला.

एवढी गोष्ट ऐकवून आता वेताळ म्हणाला- ''राज, मोहनगुप्ताचं स्वप्नरेखेवर प्रेम बसलं आहे. तिच्याशी लग्न करण्याचा निर्णय ही त्याने घेतलेला आहे. म्हणून त्याने वाघाची हत्या करून मणी मिळवला. आता स्वप्नरेखाशी विवाह करायला त्याच्या मार्गात काही ही अडचण नाही. या परिस्थितीत त्याने केलं ते अगदी विपरीतच! धाडसाने मिळवलेला मणी त्याने फेकून दिला. त्याचे तुकडे तुकडे झाले. आणि बिचाऱ्या स्वप्नरेखाला त्या दुष्ट मांत्रिकाच्या हवाली केलं. हा सर्व त्याचा अविवेकच नाही का? प्रभावशाली मणी फेकून टाकणं केवळ मूर्खपणाचं नाही का? माझ्या या प्रश्नाचं संतोषजनक उत्तर दे. माहीत असून ही जर उत्तर दिलं नाहीस, तर तुझ्या डोक्याची छकलं-छकलं होऊन जातील.

राजा विक्रमादित्य म्हणाला - ''मांत्रिक दुष्ट होता अवश्य. पण स्वप्नरेखेशी त्याने जो व्यवहार केला तो एकाद्या सभ्य नागरिकासारखा होता. मंत्र-तंत्राच्या साह्याने कोणाचे प्रेम संपादन करणे योग्य नाही यावर त्याचा विश्वास होता. म्हणून त्याने आपल्या जवळचा मणी वाघाच्या गळ्यात बांधला.

मणी धारण करणाऱ्या मोहनगुप्तला जेव्हा त्याने पाहिले आणि मण्याच्या प्रभावाने ती त्याच्याकडे आकर्षित झाल्याचे त्याच्या लक्षात आले जेव्हा तो मोठमोठ्याने हसला. आपली चूक मोहनगुप्तच्या लक्षात आली. म्हणून त्याने मणी खाली टाकून फोडून टाकला. कारण तो एकाद्या नीच माणसाच्या हाती रहावा अशी त्याची इच्छा नव्हती. राजकुमाराने अविचाराने काही केलं असं म्हणणं तर्कसंगत होणार नाही. मी तर असं म्हणेन की हे सर्व राजकुमाराच्या औदार्यचे लक्षण आहे. त्याचा निर्णय न्यायसंगत आहे. त्याचे प्रसंगावधान प्रशंसनीय आहे.''

अशा रीतीने राजाचा मौन - भंग झाल्याबरोबर वेताळ अदृश्य झाला नि झाडावर जाऊन बसला.

**(आधार - स्वर्णलतेची एक गोष्ट)**





# इच्छापूर्ती

**ना**गपूरच्या राजा समीरने आपल्या शासनकाळात प्रजेचा फार छळ केला. मृत्युशय्येवर असताना फार पश्चात्ताप झाला.

आपल्या मुलाला बोलावून तो म्हणाला, ''बेटा, माझ्या शासनकाळात प्रजेनं फार त्रास भोगला. पण प्रजा मला 'चांगलं' म्हणेल यासाठी तू काहीतरी करच. तसं झालं तर माझ्या आत्म्याला शांती लाभेल.'' आणि त्याने प्राण सोडला.

राजकुमार महेन्द्र फार दयाळू होता. पित्याच्या इच्छापूर्तीसाठी त्याने खूप विचार करून त्याच्या नावावर राजधानीत एक चांगले भोजनालय व विद्यालय सुरू केले.

काही दिवसांनी वेष बदलून राजा महेन्द्र प्रथम त्या भोजनालयाकडे गेला. लोक मोठ्या आवडीने जेवत होते, पण त्यांच्या चेहऱ्यावर मुळीच तेज नव्हते. ते पाहून महेन्द्रने एका माणसाला कारण विचारले. तो म्हणाला, ''काय सांगायचं! भोजनालय तर प्रजेच्या शत्रूच्या नावावर चालवलं जात आहे नं! खाताना असं वाटतं की खाल्लेलं जेवण पचणार नाहीय.''

त्याच्या या उत्तराने राजा महेन्द्रला वाईट वाटले. तो तेथून सरळ विद्यालयात गेला. तेथे त्याला सर्वत्र केवळ अध्यापकच दिसले, शिकणारा कोणी विद्यार्थीच तेथे नव्हता!

आश्चर्याने महेन्द्रने एका अध्यापकाकडे चौकशी केली. तेंव्हा तो म्हणाला, ''मुलांच्या पालकांच्या मनात येतं की, राजा समीरच्या या शाळेत पाठवल्यानं त्यांची मुलं बिघडतील; त्यामुळे ते मुलांना इथे शिकवायला तयार नाहीत.''

या उत्तराने महेन्द्र जास्तच चिन्तित झाला. त्याने त्याच दिवशी भोजनालय व विद्यालय बन्द

शंकर खेडकर

करून टाकले. अन् नंतर राज्यव्यवस्थेच्या कामात गुंतल्यामुळे पित्याची इच्छा तो विसरूनच गेला.

काही दिवसांनी राजा महेन्द्रला स्वप्नात आपला पिता अश्रू ढाळत असलेला दिसला.

सकाळीच आपल्या मन्त्र्याशी तो याबद्दल बोलला. मन्त्री म्हणाला, ''याचा अर्थ असा की, आपली इच्छा पूर्ण करण्यासाठी ते आपणाला विनवत आहेत. काही असो, त्यांची इच्छा पूर्ण करणं हे आपलं कर्तव्य आहे.''

त्या दिवसापासून महेन्द्र जनोपयोगी अनेक नवनव्या योजना राबवू लागला. राज्यातले कर त्याने कमी केले; वसुलीत कडकपणा ठेवला नाही. कित्येक विद्यालये व अन्नछत्रे अुघडली. गावागावातून नवीन चांगले रस्ते बनवले.

यामुळे थोड्याच अवधीत राजा महेन्द्रची खूप ख्याती झाली. लोक त्याची प्रशंसा करू लागले. नंतर मन्त्र्याने राजा समीरचे कांस्यपुतळे बनवून नगरात व अन्यत्र ठिकठिकाणी त्यांची प्रतिष्ठापना केली. इतके सारे केल्यानंतर राजा व मंत्री वेष पालटून लोकांची प्रतिक्रिया आजमावण्यासाठी फिरू लागले.

फिरता फिरता ते एका लहानशा शहराच्या केन्द्रस्थानी पोचले. तेथे शेजारच्या देशचा एकजण मूर्तीकडे बोट दाखवून एका नागरिकाला विचारत होता, ''ही मूर्ती कोणाची?'' मोठ्या खुशीने तो नागरिक अुत्तरला, ''ही तर आमच्या परमेश्वररूप राजाचे पिता समीर यांची मूर्ती आहे. त्यांच्या आशिर्वादामुळेच आम्हाला असा अुत्तम राजा लाभला आहे.''

हे संभाषण ऐकून राजा महेन्द्रच्या आनन्दाला पारावार राहिला नाही. इतक्या दिवसांनंतर जनतेच्या तोंडून आपल्या पित्याची प्रशंसा ऐकून त्याला हर्ष झाला. आपल्या पित्याची अंतिम इच्छा पुरी झाल्याचे समाधान त्याला वाटत होते. मोठ्या प्रेमाने मंत्र्याचा हात आपल्या हाती घेऊन तो राजधानीकडे परत फिरला.



# चान्दोबा पुरवणी-६९

## आमच्या देशाची वृक्ष संपदा



### नारळाचे झाड

**ना**रळाच्या झाडाला 'कल्पवृक्ष' असे म्हणतात. श्री विष्णूच्या दशावतारांपैकी सहावा अवतार म्हणजे परशुराम. दुष्टांचे योग्य प्रकारे निर्दलन केल्यानन्तर त्यांनी आपला परशु गोकर्ण नावाच्या पर्वतशिखरावरून समुद्रात फेकून दिला. असे म्हणतात की, हा परशु जिथे पडला, त्या जागी समुद्रातून एक भूभाग वर आला. तेंव्हा परशुरामांनी स्वर्गातून एक नारळाचे रोप आणून त्या जमिनीत लावले. हा प्रान्त गोकर्णपासून कन्याकुमारीपर्यन्त पसरलेला असून तो पुढे नारळांनी भरलेला 'केरळ' देश म्हणून प्रसिध्द झाला. एका पुराणकथेत असाही अुल्लेख आहे की 'केरळ' या शब्दाचा अर्थच 'नारळांची भूमी' असा आहे.

हिन्दु लोक नारळ हा अत्यन्त पवित्र मानतात. नारळाविना पूजा, विवाह आदि धार्मिक कृत्ये पुरी होतच नाहीत.

समुद्रतटावरील प्रदेशात नारळाची झाडे विपुल असतात, त्यामुळे समुद्रकिनारी रहाणाऱ्या लोकांच्या जीवनात नारळाचे महत्त्व फार असते. अुदा, महाराष्ट्रात वर्षाऋतु समाप्त झाल्यावर येणारी पौर्णिमा (श्रावण) 'नारळी पौर्णिमा' म्हणून साजरी केली जाते. त्यावेळी वरुणदेवासमोर नारळ फोडून कृतज्ञता व्यक्त केली जाते.

नारळाची झाडे अठरा ते पंचवीस मीटर अुंचीपर्यन्त वाढतात. झाडांना फांद्या नसतात. झाडाच्या शेंड्याला पानांच्या लांबलांब झावळ्या असतात. झावळ्यांच्या दोन्ही बाजूंना पाने असतात. एक एक झावळी चांगली २.५ मीटरपर्यन्त लांबीची असते. सुरुवातीला पाने नाजुक व पिवळसर रंगाची असून झावळी दुमडल्यासारखी दिसते. पुढे जेंव्हा त्या वाढतात व नीट पसरतात तेंव्हा त्यांचा रंग चमकदार, गर्द हिरवा बनतो. झावळ्यांच्या बुंध्याशी प्रथम पिवळी फुले विकसित होतात आणि नन्तर तेथे नारळ लटकू लागतात.

नारळाच्या अुपयोगासंबंधी अधिक काही लिहिण्याची आवश्यकता नाहीच. त्यातील खोबरे प्रथम कोवळे व मऊ असून, तो जसजसा पक्का होतो, तसतसे खोबरेही टणक होत जाते. या खोबऱ्यापासून तेल काढले जाते. नारळाची पाने, त्याची शेंडी व वरील रेशा, करवंटी आदि सर्व भागांचा अुपयोग केला जातो. त्यामुळेच या झाडाला व्यापारी दृष्टीने खूपच महत्त्व आहे. त्याला 'कल्पवृक्ष' म्हणण्याचे कारणही हेच आहे.




# सुप्रसिध्द धर्मग्रंथ

## पवित्र बायबल

**बायबल** हा ख्रिश्चन लोकांचा धर्मग्रन्थ. त्याचे दोन भाग आहेत :- पूर्व विधान (ओल्ड टेस्टामेंट) आणि नवविधान (न्यू टेस्टामेंट). पूर्वविधानात मानव जातीच्या प्राचीन इतिहासाची वर्णने आहेत. हिब्रू भाषा बोलणाऱ्या यहुदी (ज्यू) लोकांचा या इतिहासावर विश्वास आहे. ज्युडाइझम नावाचा प्राचीन धर्म यांनी स्वीकारलेला आहे. तसे ख्रिश्चनही या इतिहासावर विश्वास ठेवतात. या पूर्वविधानातल्या कथा व सूक्ति ते पवित्र मानतात.

नवविधानात येशूचे अुपदेश आहेत. त्याबरोबर अपॉजल्स आणि इतर शिष्यांच्या महत्वपूर्ण कार्यांचा व सेवांचा अुल्लेख असलेला हा संग्रह आहे.

सृष्टीच्या आरंभाबद्दल पूर्वविधानाचे म्हणणे असे - परमेश्वराने स्वर्ग व भूमीच्या सृजनाला आरंभ केला, तेंव्हा भूमीला निश्चित असा काही आकार नव्हता. ते एक अस्ताव्यस्त असे टेकाड होते. त्यातून काळ्या रंगाची वाफ बाहेर पडत होती. दैवी शक्तीचा प्रभाव त्याच्यावर होता.

पूर्वविधानात राजे व महात्मा लोकांच्या बाबत काही अपूर्व कहाण्या आहेत. इजिप्तमध्ये यहुदी लोकांना नाना प्रकारच्या यातना सहन कराव्या लागल्या. तेथून निघून इस्राइलकडे जाताना ही त्यांचे अतिशय हाल झाले. त्यांच्या हालअपेष्टा वर्णनातीत होत्या. शेवटी मोझेस हा त्यांना सुरक्षित घेअून जाण्यात सफल झाला. या सर्व घटनांचे वर्णनही पूर्वविधानमध्ये सविस्तर केलेले आढळते.

पूर्वविधानात अनुभवावर आधारित अशा कित्येक कथा आहेत; सदाचाराच्या कथा आहेत. अुदाहरणार्थ एका उधळ्या मुलाची (प्रॉडिगल सन) कथाही यात आहे. व्यर्थ पैसे अुधळणाऱ्या एका मुलाने पित्याशी भांडून आपला हिस्सा निराळा करून घेतला. आपल्या द्रव्याचा त्याने ठिकठिकाणी अपव्यय केला व त्याची सारी संपत्ती नाहीशी झाली. पुढे त्याला खूपच हाल सोसावे लागले. कोणताही अुपाय न अुरल्याने तो नोकरीसाठी आपल्या पित्याकडे परत आला. पण पित्याने मोठ्या प्रेमाने त्याचा स्वीकार केला. पित्याच्या या वागणुकीमुळे आपला पुनर्जन्मच झाल्यासारखे मुलाला वाटले.

नवविधानात येशूचे अुपदेश आहेत. येशूने आपल्या अनुयायांना सांगितले की आपसात प्रेम करावे, विनयाने वागावे, सहनशक्ती हा जीवनाचा अभिन्न असा भाग असावा. त्याचे म्हणणे असे की, एकाद्याने आपल्या गालावर मारले, तर दुसरा गालही पुढल्या चापटीसाठी पुढे करावा. अशा तऱ्हेने क्षमा करण्याचा गुण हीच मनुष्याची शोभा आहे, हे मारणाराला दाखवून द्यावे. येशूने असेही म्हटले आहे की, आपण सारेच अज्ञानी आहोत, त्यामुळे दुसऱ्यांच्या वागणुकीबाबत बोलण्याचा आपल्याला काहीच अधिकार नाही, कोणताही न्याय-निर्णय करायचा अधिकार आपल्याला नाही. आपण मोठे सर्वज्ञानी आहोत, असा गर्व कुणीही बाळगू नये.

'काही चमत्कार करून दाखवतो' असे म्हणाऱ्यांपासून सावध रहाण्याचा इशाराही येशूने दिला आहे. कपटी लोकांपासून आपण दूर रहावे. परमेश्वरावर आपला जो दृढ विश्वास आहे तो सुखी जीवनाचा पाया आहे. अशा लोकांचे जीवन पहाडी पत्थरांच्या पायावर बांधलेल्या घराप्रमाणे सुरक्षित असते. विश्वासहीन मानवांचे घर रेतीच्या पायावर बांधलेल्या घराप्रमाणे असते. असे घर केव्हाही मोडू शकते. ते वादळाला तोंड देअू शकत नाही अन् लहानशा कंपनानेही कोसळू शकते.

जगात सर्वात अधिक प्रख्यात असणाऱ्या ग्रंथापैकीच 'बायबल' हा ही एक आहे. विशेष म्हणजे, केवळ ख्रिश्चनच नव्हे, तर अन्य धर्मीय लोकही हा ग्रंथ वाचतात.



# तुम्हाला माहीत आहे काय?

१. श्री हरिकोटा कोणत्या प्रान्तात आहे? अलिकडेच त्याची प्रसिद्धी का झाली?
२. ऑलिम्पिक चिन्हातल्या वर्तुळरेषांचे रंग कोणकोणते आहेत?
३. आपल्या देशातील पहिले सिनेमा-थिएटर कोणते? ते कोठे व केव्हा बांधले गेले?
४. न्यूयॉर्क शहर एका नदीच्या मुखाशी वसलेले आहे. त्या नदीचे नाव काय?
५. आर्यसमाजाच्या संस्थापकाचे नाव काय?
६. जगातला सर्वात मोठा समुद्र कोणता? सर्वात मोठा महासागर कोणता?
७. संयुक्त राष्ट्र संघाची पहिली महिला अध्यक्ष कोण होती? तिची निवड केव्हा झाली?
८. शिलाई मशीनचा शोध कोणी लावला?
९. जंतर-मंतर हे काय आहे? ते का प्रसिध्द आहे?
१०. एका सामान्य मुलीशी विवाह करण्यासाठी कोणत्या ब्रिटिश राजाने सिंहासनाचा त्याग केला?
११. साहित्य अॅकेडेमी, संगीत नाटक अॅकेडेमी व ललितकला अॅकेडेमी या तीन्हींची कार्यालये एकाच इमारतीत आहेत. त्या इमारतीचे नाव काय व ती कोठे आहे हे सांगा?
१२. आफ्रिकेतील सर्वात मोठे शहर कोणते?
१३. 'विझार्ड ऑफ हॉकी' म्हणून कोण प्रसिध्द आहे?
१४. आपल्या देशात प्रकाशित झालेले पहिले वर्तमानपत्र कोणते? ते कोठे प्रकाशित झाले?
१५. दादासाहेब फाळके अॅवार्ड सर्वप्रथम कोणाला प्राप्त झाले?
१६. मार्क ट्वेनचे खरे नाव काय?
१७. 'रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया' ची स्थापना केव्हा झाली?

## उत्तरे

१. आंध्र प्रदेशच्या समुद्रतटावर आहे. रोहिणी एस्.एल्.व्ही.या प्रक्षेपास्त्राचा प्रयोग इथेच झाला.
२. निळा, काळा, लाल, पिवळा व हिरवा.
३. एल्फिन्स्टन पिक्चर पॅलेस, मुंबई. १९०७ मध्ये.
४. हडसन.
५. दयानन्द सरस्वती.
६. चिनी समुद्र, पॅसिफिक महासागर.
७. विजयालक्ष्मी पंडित, १९५३ मध्ये.
८. आधुनिक आकारात १८६७ मध्ये एलियासने. आधारसूत्राचे संशोधक थॉमस सेंट (१७९०).
९. जयपुर राजा जयसिंहने जयपुर व दिल्ली येथे निर्माण केलेल्या दोन नक्षत्रगणित-शाळा. यांचा उपयोग अंतरिक्षातील नक्षत्रे व ग्रह यांच्या अभ्यासासाठी केला जात असे.
१०. किंग एड्वर्ड आठवा.
११. रवीन्द्रभवन, नवी दिल्ली.
१२. इजिप्तची राजधानी कैरो.
१३. आपल्याच देशाचा ध्यानचन्द.
१४. हिकीस गॅझेट. कलकत्यात १७७९ मध्ये प्रकाशित झाले.
१५. देविकाराणी.
१६. सॅम्यूल क्लेमेन्स.
१७. १९३५ मध्ये.



# पाहुणा - चोर

विराटपुरचा विठ्ठल आणि सावित्री यांचे नुकतेच लग्न झाले होते. सावित्रीच्या माहेरी मोठा एकत्र परिवार होता. सर्वजण खेळीमेळीने रहात असत. सावित्रीवर सर्वांचेच खूप प्रेम होते, तिची आई तिला लहानपणी खूप खाऊ घाली. त्यामुळे सावित्रीला चांगले भरपूर खायची सवय होती.

लग्नापूर्वी विठ्ठल स्वतःच स्वतःपुरता स्वयंपाक करून जेवत असे. सावित्रीला स्वयंपाकघरात नेऊन तांब्याचा एक लोटा दाखवून नवऱ्याने म्हटले, ''एवढ्या लोटाभर तांदुळाचा भात मला पुरेसा होतो. तू आता दोन लोटे तांदूळ शिजवत जा, म्हणजे आपल्या दोघांना पुरेसा होईल.''

एक आठवडा झाला. सावित्रीला भुकेमुळे झोप येत नाहीशी झाली. आठव्या दिवशी नवरा झोपल्यावर ती स्वयंपाकघरात गेली आणि दोन नारळ फोडून त्यांच्या दुधात तांदूळ घालून तिने छानशी खीर बनवून खाल्ली.

त्या दिवसापासून ती रोजच रात्री काही ना काही चांगला पदार्थ बनवून खाऊ लागली.

एके दिवशी रात्री तिने तांदुळाचा असाच काही पदार्थ बनवला अन् ताटात वाढून घेतला. तिला वाटले की 'जरा गार झाल्यावर खाऊ'; म्हणून भांडी घासून ठेवण्यासाठी ती विहिरीवर गेली. पण परत येऊन पहाते, तर कोणी परका माणूस घरात येऊन काही खुडबुड करतो आहे! तो दिसल्याबरोबर ती घाबरून ओरडली.

''पुन्हा ओरडलीस, तर गळा दाबून टाकीन बघ.'' चोराने तिला धमकी दिली.

त्यांच्या आवाजाने जागा होऊन विठ्ठलने आतूनच ओरडून विचारले, ''काय चाललंय सावित्री? आवाज कसला हा? कोणाशी बोलतेयस?''

दिलीप सपकाळ



नवरा अुठून आला, तर आपलंच बेंड फुटेल म्हणून धैर्य एकवटून सावित्रीने चोराला हळूच म्हटले, "पहा, नवरा येतोय आत. दिसायला ते काडीपहिलवान असले, तरी तुला आपल्या नखांनी चांगला ओरबाडून काढतील. चांगले काटक आहेत ते! जास्त गडबड नाही चालायची, मुकाट्याने खाली बस, अन् ताटातलं खाअून टाक सगळं!" सावित्रीचा आवाज हळू असला तरी त्यात चांगली हुकुमत होती अन् तिचे डोळेही लाल झालेले होते!

तिचे कालीरूप पाहून चोर दचकलाच! खाली बसून तो ताटातला पदार्थ भराभर खाअू लागला. इतक्यात विठ्ठल अुठून तेथे आला. सावित्री त्याला म्हणाली, "हा आमचा नातेवाईकच आहे. दूरचा भाअू लागतो माझा. काही कामासाठी शहराकडे निघालाय तो."

सावित्रीच्या बोलण्याने चोराला ही आता धीर आला. तो म्हणाला, "नमस्कार मेहुणे ! लग्नाच्या वेळी पूर आला होता म्हणून येअू शकलो नव्हतो, रात्र बरीच झालीय. 'नको' म्हटलं तरी ताईनं वाढलं म्हणून जबरदस्तीनं खावं लागतंय."

इतक्यात कोणीतरी घराचा दरवाजा खटखटवला. विठ्ठलने दरवाजा अुघडला, तर समोर दोन पोलीस! ते म्हणाले, "आम्ही एका चोराच्या पाठलागावर आलोय. तुमच्या घरात अुजेड दिसला म्हणून दार ठोठावलं."

विठ्ठल त्यांना म्हणाला, "इथे कोणी चोर बीर नाही आला. माझा मेहुणा आलाय म्हणून बायको त्याच्याशी गप्पा मारतेय."

पोलीस तेथून मुकाट्याने निघून गेले. त्यांना घालवून घरात आलेल्या विठ्ठलला सावित्री म्हणाली, "माझा भाअू म्हणतोय की, मेहुण्यांना तर भेटून झालंय. आताच निघालो, तर अुजाडताच शहरात पोचेन."

विठ्ठलने याला मुळीच मान्यता दिली नाही. तो म्हणाला, "अरे वा! हे काय येणं झालं? तुझे कोणी भाअू वगैरे तसे येत नाहीत आपल्या घरी. आता आलाच आहे, तर अशा मध्यरात्री थोडाच जाअू देईन मी त्याला! तुझ्या भावासाठी पलिकडल्या खोलीत अंथरूण घाल. जायचं अुद्या पहाता येईल."



नाइलाजाने सावित्रीने अंथरूण घातले; अन् ती त्याला म्हणाली, "कर्जदार अन् चोर यांच्यावर माझ्या नवऱ्याचा फार राग आहे. त्यांना पाहिलं, तर चाकूच काढतात ते. मी तुला त्यांच्यापासून वाचवलंय आणि त्यांनी तुला पोलिसांच्या तावडीतून वाचवलंय. आमच्या-बद्दल कृतज्ञता बाळग. पुढे कधी ही या घरात चोरी करायचा प्रयत्न करू नकोस. आम्ही झोपलो की लगेच दरवाजा अुघडून मुकाट्याने निघून जा. सकाळी ह्यांनी तुझ्याबद्दल काही विचारलं, तर मी वेळ मारून नेईन कशीतरी." आणि ती आपल्या खोलीत निघून गेली.

परन्तु तिला झोप लागलीच नाही. सकाळ पर्यन्त जागीच होती सावित्री. विठ्ठल अजून झोपेतच आहे असे पाहून ती हळूच अुठली. चोराचे अंथरूण रिकामे पाहून तिने सुटकेचा श्वास टाकला. तरीही तिचे मन अजून शांत झाले नव्हते, म्हणून ती आतल्या खोलीत गेली. तेथील दृश्य पाहून ती जोराने ओरडली.

खोलीतले सारे सामान अस्ताव्यस्त पडलेले होते. पेटीतल्या तिच्या रेशमी साड्या अन् दागिने नाहीसे झालेले होते! तिच्या ओरडण्याने जागा झालेला विठ्ठल ही तेथे येअून पोचला.

"त्या चोरानं आपलं घर लुटलं हो !" सावित्री रडतच म्हणाली.

"चोर? कुठला?" विठ्ठलने विचारले.

"रात्री जो आला होता नं, तो माझा नातेवाईक नव्हता. चोर होता तो." अश्रू ढाळत सावित्री म्हणाली, "तुम्हाला कळू न देता मी जे काही कारभार केले, त्याची चांगली शिक्षा मिळाली मला !" आणि तिने सर्व हकिकत विठ्ठलला सविस्तर सांगितली.



ती ऐकून विठ्ठल हसू लागला आणि म्हणाला, "डोळे पूस आधी. तुझ्या साड्या अन् दागिने सुरक्षित आहेत. चोरानं लिहिलेलं हे पत्र वाच अगोदर."

त्या पत्रात चोराने लिहिले होते, "मी सुशिक्षित माणूस आहे. मला नोकरी मिळत नव्हती चांगलीशी. पण लहानमोठी कामं करणं मला अपमानास्पद वाटत होतं. चोरी करायचं ठरवून प्रथम मी तुमच्याच घरी आलो. पोलिसांना पाहून मला खूप भीती वाटली.

अपराधाची भावना माझ्या मनात डसू लागली. मी तोपर्यन्त कुठला अपराध तर केलाच नव्हता, पण भीतीमुळे मी स्वत:ला अपराधी समजू लागलो अन् पोलिसांच्या नजरेतून निसटण्यासाठी तुमच्या घरात घुसलो. ताई, मला क्षमा कर. चोरून खाण्याची सवय अुघड होअू नये म्हणून तू मला आपला 'पाहुणा' बनवलंस. नवऱ्याशी खोटं बोलून तू मला पोलिसांपासूनही वाचवलंस. तू स्वत:च्याच घरात एक चोरी केलीस, अन् त्यातून वाचण्यासाठी तुला किती त्रास सहन करावा लागला! मी जर खराखुराच चोर बनलो, तर कुणास ठाअूक मला कशाकशाला तोंड द्यावे लागेल! कल्पनेनंच मी थरथर कापू लागलो. 'चोराचं जीवन काही सुखाचं नव्हे' हे मला कळून चुकलं. लहानमोठी कामं करण्यानं मला जी काही थोडीशीच प्राप्ती होईल, तिच्यातच शांती अन् समाधान आहे. माझी मनापासून इच्छा आहे की माझं जसं हृदयपरिवर्तन झालं, तसं माझ्या ताईचंही व्हावं; म्हणूनच हे पत्र लिहीत आहे.''

पत्र वाचून आपले डोळे पुसत सावित्री विठ्ठलला म्हणाली, ''तुम्हाला नकळत इतके दिवस मी मूर्खपणा करत होते. मला क्षमा कराल ना?''

''क्षमा कशाला मागायची? आपल्या माहेरची सवय इथेही चालू ठेव ना! तुझे कपडे अन् दागिनेही मी आपल्या खोलीत नीट ठेवले आहेत. तुला माहीत नाही. मी तुझ्या आधीच इथे आलो होतो. ते पत्र माझ्या हातीच आलं होतं अगोदर. तू इथे आलीस, तेंव्हाच माझ्या लक्षात आलं होतं की तुला चांगलंचुंगलं खायची आवड आहे. रात्री अुठून स्वयंपाकघरातली तुझी रोजची खुडबूडही मला माहीत होती. आता लपवायची काही ही गरज नाही. पण हां, बनवशील त्या पदार्थाची चव पहायची संधी मलाही देत जा बरं का!''

नवरा आपल्यावर रागावलेला नाही, त्याने आपल्याला माफ केलंय; इतकेच नव्हे तर आपले पदार्थ खायचीही त्याची इच्छा आहे, हे जाणून सावित्रीला खूप आनन्द झाला.





# सुखी कुटुंब

विश्रान्तपुरमध सोमनाथ नावाचा एक शेतकरी होता. त्याची बरीचशी जमीन होती. त्याचा मुलगा भूषण हाही शेतीच्या कामात त्याला मदत करत असे. तशी तर गावात सोमनाथ पेक्षा धनवान माणसे बरीच होती. परन्तु गावचे लोक सोमनाथलाच खूप मान देत. कारण तो एक परोपकारी, निस्वार्थी आणि भला माणूस होता. लोक त्याच्याकडे सल्ला विचारायलाही जात असत.

एकदा सोमनाथ काही कामासाठी शहरात गेला. शहरात जायचे, तर नावेतून नदी पार करावी लागे. नदीला कधी पूर आला, तर मात्र नावा किनाऱ्यावरच बांधून ठेवल्या जात व पूर ओसरेपर्यन्त माणसे अडकून पडत. त्या दिवशीही आपले काम संपवून सोमनाथ परत फिरतोय, तो नदीला चांगलाच पूर आला होता. हे पाणी ओसरायला चांगले दहा दिवस तरी लागतील असे त्याला समजले. गावात पोचायला दुसरा एक लांबचा रस्ताही होता. सोमनाथ बैलगाडी भाड्याने घेण्यासाठी गिरिनाथ नावाच्या माणसाकडे गेला.

गिरिनाथ आपली गाडी जोडू लागला. इतक्यात पन्नास वर्षांचा एक माणूस येअून त्याला म्हणू लागला, ''गिरिनाथ, तुझ्या गाडीसाठी मी आपला नोकर पाठवला होता. आपल्या मुलीच्या विवाहसंबंधात मला विश्रांतपुरला जायचं आहे. पुरोहितानंही आजचाच मुहूर्त काढून दिलाय. चल, निघू या आपण.''

अलिकडे बैलागाडीला गिऱ्हाईक नव्हते. आता एकाच वेळी दोन प्रवासी मिळाल्यामुळे गिरिनाथ खूश झाला. तो म्हणाला, ''चला रामनाथपंत.'' अन् सोमनाथकडे अंगुलीनिर्देश करत त्याने सांगितले, ''यांनाही विश्रांतपुरलाच जायचं आहे. तुम्हाला ज्यांच्याकडे जायचं आहे,

कावेरी गुंजवणे

त्यांचं घर दाखवून द्यायला यांचा अुपयोगही होईल तुम्हाला.''

बैलगाडी निघाली. बोलताबोलता सोमनाथला रामनाथबद्दल बरेच काही समजले. रामनाथ हा शहरातला एक मोठा व्यापारी असून त्याला एकुलती एक मुलगी आहे. विश्रान्तपुरच्या अतिसंपन्न अशा राजनाथच्या मुलाशी तिचा विवाह ठरवण्याच्या संबंधात तो तिकडे जात असल्याचे सोमनाथने जाणले.''

रामनाथने राजनाथच्या परिवाराबद्दल सोमनाथकडे चौकशी केली, तेव्हा तो म्हणाला, ''आपण खाअून पहायलाच जात आहात, तर त्या पदार्थाची चव कशाला विचारताय? विवाहसंबंधात खरं तर स्वतःच समक्ष पाहून सर्व ठरवणं बरं असतं. मी याबाबत आपलं तोंड बंदच ठेवू इच्छितो. कारण लग्नाच्या वयाचा माझाही एक मुलगा आहे. जर काही कारणानं हा विवाह जमू शकला नाही, तर राजनाथला वाटेल नं, की मी मुद्दामच तो जुळू दिला नाही?''

सोमनाथचा साधेपणा, त्याचे खरे बोलणे, प्रामाणिकपणा आणि स्पष्टवक्तेपणाबद्दल रामनाथ विचार करत होता; इतक्यात गाडी गावच्या सीमेवर पोचली.

त्यावेळी एक माणूस एका म्हाताऱ्या बैलाला जबरदस्तीने डोंगराळ भागाकडे हाकून नेत असलेला त्यांना दिसला.

सोमनाथने गाडी थांबवली. त्याने ओळखले की तो माणूस राजनाथचाच नोकर आहे. त्याने विचारले, ''अरे हा तर राजनाथचाच बैल ना? त्याला डोंगराकडे का नेतो आहेस?''



नोकर सांगू लागला, ''दादा, बैल आता म्हातारा झालाय, शेतीचं काम करू शकत नाही तो. त्याला आता अुगीच खायला घालत बसणं व्यर्थ आहे. डोंगरात सोडला, तर जगेल तितका जगेल. तसा तर तिथे फार जगू शकणारच नाही असं मालकांचं म्हणणं आहे.''

त्याचे अुत्तर ऐकून कळवळून रामनाथ म्हणाला, ''अरे, अुमेदीच्या वयात यानं आपलं किती काम केलं असेल, ते विसरून कसं चालेल? अुद्या सकाळपर्यन्त एकादा वाघ किंवा चित्ता याला खाअूनही टाकेल. ऐक, तू याला परत गावात घेअून चल. आपल्या बाकी जनावरां बरोबर मी यालाही चारापाणी देईन. तुला आपल्या मालकाचं भय वाटत असलं, तर मी त्यांच्याशीही जाअून बोलेन.'' नोकराला आपल्या मालकाची भीती तर होतीच, पण सोमनाथचं म्हणणंही तो टाळू शकेना. तो बैलासह गावात परतला अन् सोमनाथच्या गोठ्यात त्याने बैल बांधून टाकला.

सोमनाथ आपल्या घरापाशी गाडीतून अुतरणार, इतक्यात घराच्या कट्ट्यावर त्याची वाट पहात बसलेला एक म्हातारा पुढे येअून म्हणाला, ''सोमनाथ, माझी मुलं कशी नालायक आहेत, ते माहीतच आहे तुला. काल त्या दोघांनी एक होअून मलाच घराबाहेर काढलंय. मी तुझ्याकडे आलोय. ठेवशील का मला आपल्याकडे?''

सोमनाथने पट्कन म्हाताऱ्याचे हात धरले अन् तो म्हणाला, ''असं का विचारता? तुम्ही मला माझ्या बाबांसारखेच नाहीत का? माझे



बाबाच जिवन्त होअून परत आल्याइतका आनन्द वाटेल मला!''

नंतर बैलगाडीत बसलेल्या रामनाथला तो म्हणाला, ''अरे, तुम्हीही अुतरा न! माझ्या घरी जरा थंड पाणी वगैरे पिअून थोडा आराम करा अन् मग जा राजनाथकडे.''

रामनाथ गाडीतून अुतरतोय तोच शेताकडून आलेला भूषण आपले वडील परत आलेले पाहून खूश होत म्हणाला, ''कळलं होतं की पुरामुळे नावा बंद झाल्यात. मला भीती पडली होती की शहरात अडकल्यानं तुम्हाला खूप त्रास होईल. बरं झालं सहीसलामत बैलगाडीतून येअून पोचलात. दुसरं म्हणजे, हे आपले आजोबा म्हणत होते, की तुम्ही आल्यावाचून आपल्या घरात पाय नाही ठेवणार. बाहेरच बसून राहिले आपले! याच्या मुलांचं वर्तन पाहिलं, की असं वाटतं - माणसं आहेत की राक्षस ते!''

रामनाथ बाजूला अुभा राहून सर्व काही लक्षपूर्वक पहात होता; अन् त्यांचे बोलणेही ऐकत होता. नंतर त्याने थंड पाणी पिअून घेतले अन् कट्टयावर थोडा आराम करून गाडीवाल्याला म्हणाला, ''गिरिनाथ, शहरात मी ऐकलं होतं की, त्या राजनाथचं घर म्हणजे एक मोठा महालच आहे. पण आता मला तिकडे नाही जायचं. असाच परत चल शहराकडे.'' अन् तो गाडीकडे चालू लागला.

गिरिनाथ धावतच त्याच्या जवळ येअून विचारू लागला, ''हे काय? परत का जायचं असंच? मुलगा पहाणार नाही?''

''पाहिला मुलगा मी.'' असे म्हणत रामनाथ गाडीत चढला. वाटेत तो म्हणू लागला, ''जिथे दया, ममता यांचं नावही नाही, अशा जागी माझी मुलगी कशी जगेल? म्हातारपण आलं की मग तो माणूस किंवा जनावर तुच्छ वाटू लागतं. श्रीमन्तीत सोमनाथ माझ्या बरोबरचा नसेलही, पण त्याच्या घरची सर्वजणं दया, ममता, सहानुभूती, कृतज्ञता इत्यादि अुत्तम भावनांची खाणच आहेत. माझी मुलगी अशा माणसांच्यातच सुखात राहील.''





# महाभारत

आपला पिता परीक्षित याचा मृत्यु कसा ओढवला हे जनमेजयला आताच कळले. मन्त्र्यांनी अगदी लहानपणीच त्याला राज्याभिषेक केला होता. अन् सज्ञान झाल्यावर त्याचा विवाहही त्यांनी काशीराजाची कन्या वपुष्टा हिच्याशी करून दिला होता.

''आपल्या पित्याचा मृत्यु सर्पदंशामुळे झाल्याने आता अुदंकमुनींच्या म्हणण्याप्रमाणे आपण सर्पसत्र यज्ञ करावा हे अुचित होय.'' असा सल्ला साऱ्या मंत्र्यांनी मिळून जनमेजयला दिला.

जनमेजयने सर्पयाग करण्याचा निश्चय केला अन् त्यात तक्षकादि सर्पांची आहुती द्यायचे ठरवले. त्याने पंडित, राजपुरोहित व ऋत्विज यांना बोलावून घेअून यज्ञाची पद्धत विचारली. ऋत्विज म्हणाले की, ''अशा प्रकारचा यज्ञ फक्त जनमेजयसाठीच केला जाईल. असा यज्ञ एरव्ही कोणी करत नाही.''

यज्ञाची सारी सामग्री जुळवण्यात आली, यज्ञशाळा बांधल्या गेल्या, आवश्यक ती सारी व्यवस्था मोठ्या वेगाने सुरू झाली. त्याचवेळी भविष्य जाणारा लोहिताक्ष नावाचा एक सूत सांगू लागला की, एक ब्राह्मण येअून या यज्ञात बाधा आणणार आहे. पण जनमेजयाने त्याच्या या चेतावणीकडे लक्ष न देता, अुलट आदेश दिला की, यज्ञ पुरा होईपर्यन्त या लोहिताक्षला यागशाळेत प्रवेश करू देअू नये. यानंतर आपली पत्नी वपुष्टा हिच्यासह जनमेजय यज्ञ सुरू करण्यासाठी यज्ञमंडपात आला. या यज्ञाचे 'होता' चन्द्रभार्गव, 'अध्वर्यु' पिंगल व 'अुद्गाता' कोत्सु असे होते. यांनी यज्ञ सुरू केले. हजारोंच्या संख्येने सर्प तेथे आकृष्ट होअून यज्ञकुंडात भस्मसात होअू लागले. सर्प-ज्ञाति नष्ट होण्याची वेळ येऊन ठेपली.

## २. राजा ययाती कथा



तक्षक भयभीत होऊन इन्द्राच्या आश्रयाला गेला. त्याला आश्वासन देत इन्द्र म्हणाला, ''ब्रह्माने अगोदरच सांगून ठेवलेलं आहे की, अुच्च स्तराच्या काही सर्पांना या यज्ञापासून भय नाही. तेंव्हा तू मुळीच भिअू नकोस. इथे माझ्याजवळच रहा. तुझ्या संरक्षणाची जबाबदारी माझी!''

इकडे सर्पांचा हा विनाश पाहून वासुकीला फार वाईट वाटले. तो आपली बहीण जरत्कारू हिला म्हणाला, ''अशी काही दुर्घटना घडू नये म्हणूनच आम्ही तुझा विवाह जरत्कारू ब्राह्मणाशी करून दिला. तू ताबडतोब आपला पुत्र आस्तिक याला पाठवून यज्ञ थांबव. नाही तर अनर्थ होईल.''

मातेच्या कथनानुसार आस्तिक सर्पसत्र यज्ञाच्या मांडवात पोचला. प्रथम स्वस्तिवचन वगैरे केल्यानन्तर त्याने राजा, ऋत्विज व अग्नि यांची पूजा केली. त्यांची प्रशंसा करणारे श्लोक म्हटले. आस्तिकाची ती बालमूर्ती पाहून जनमेजय फार प्रसन्न झाला, ''हा दिसायला लहान बालक असला, तरी मोठा ज्ञानी दिसतोय. त्याला हवा तो वर देण्याचा मी निश्चय केला आहे.'' असे जनमेजयाने सर्व सदस्यांना सांगितले.

आस्तिकने 'हा यज्ञ ताबडतोब इथेच थांबवा' असा वर मागितला. 'सर्पयज्ञ थांबवण्याऐवजी दुसरे काहीही माग' असे जनमेजयाने म्हणूनही अस्तिकवर त्याचा काहीही परिणाम झाला नाही. त्याने यज्ञ थांबवण्याचाच आग्रह धरला. तेंव्हा अन्य सदस्यांनीही राजाला 'आपले वचन निभावण्या' चा सल्ला दिला; अन् अशा प्रकारे सर्पसत्र यज्ञ बन्द पडला.

जनमेजयाने सर्वांना दक्षिणा देऊन त्यांचा सत्कार केला. वेदव्यास इतक्यात आपल्या शिष्यांसह तेथे आले. वैशंपायनाने जनमेजयाला त्याचे पूर्वज पांडव यांची कथा सविस्तर सांगितली.

भरतवंशाचे मूळ पुरुष होते वैवस्वत. ते अदितीचे नातू होत. वैवस्वताची कन्या इला हिचा पुरुरवा हा पुत्र होता. पुरुरवा व अुर्वशी यांना सहा पुत्र झाले. आयु हा त्यांच्यापैकीच एक. त्याचा पुत्र होता नहुष. या नहुषालाही सहा पुत्र झाले. त्यातला ययाती हा दुसरा. अग्रज यति हा तपस्येसाठी अरण्यात निघून गेल्यामुळे पुढे ययातीने राज्यभार वाहिला.

ययातीच्या शासनकालात दानवांचा गुरु शुक्र हा होता. देव व दानव यांच्यात जी युध्दे चालत, त्यात काही दानव मारले जात. परंतु आपल्या संजीवनी मन्त्राच्या साह्याने शुक्राचार्य त्यांना पुन्हा जिवन्त करीत. देवांचे गुरु बृहस्पती यांच्याजवळ मात्र ती विद्या नव्हती. म्हणून देवांनी बृहस्पती-पुत्र कच याला संजीवनी मन्त्र शिकून घेण्यासाठी शुक्राचार्यांकडे पाठवले.

कचाने शिष्य म्हणून शुक्राचार्यांची खूप सेवा केली. आणि त्यांची कन्या देवयानी हिला आपल्या मृदुभाषणाने आनन्दित करत तो आपले दिवस घालवूलागला. कच हा बृहस्पती-पुत्र असल्याचे कळल्यावरून दानवांनी कच गुरूच्या गायी चरावयास घेऊन गेला असता त्याला मारून टाकले, अन् त्याच्या शरीराचे तुकडे तुकडे करून टाकले. ते कळल्याबरोबर शुक्राचार्यांनी संजीवन मन्त्राने त्याला पुन्हा जिवन्त केले. पुन्हा एकदा तो असाच देवयानीसाठी फुले आणायला गेला असता, संधी साधून दानवांनी त्याला मारून समुद्रात फेकून दिले. देवयानीला ते कळल्यावर ती विलाप करू लागली, व पुन्हा एकदा शुक्राचार्यांनी त्याला जिवन्त केले.



दानवांनी संधी साधून त्याला पुन्हा एकदा मारून टाकले व जाळून त्याचे भस्म केले. ते भस्म त्यांनी मदिरेत मिसळले व ती शुक्राचार्यांनाच प्यायला दिली. यावेळी त्यांनी कचाला जिवन्त केले, तेंव्हा तो त्यांच्या पोटात होता. नाइलाजाने शुक्राचार्यांना संजीवनीमन्त्र कचाला शिकवावा लागला. नंतर त्यांनी त्याला आपले पोट चिरून बाहेर यायला सांगितले व नंतर मंत्राने स्वतःला जिवन्त करावला सांगितले. कचाने शुक्राचार्यांनी सांगितल्या-प्रमाणे सर्व केले.

आता कचाचा अुद्देश सफल झाला होता. योग्य संधी पाहून त्याने आपल्या गुरूजवळ परत जाण्याची परवानगी मागितली.



देवयानी म्हणाली, ''माझं तुझ्यावर प्रेम असल्यामुळेच मी तुला दर वेळी जिवन्त करवलं. तू माझ्याशी विवाह कर.''

कच म्हणाला, ''तू माझ्या गुरूची कन्या, माझी भगिनी आहेस. तुझ्याशी विवाह कसा करू शकेन?''

तेव्हां रागावून, ''असं आहे होय? मग तुला मिळालेला संजीवनी मन्त्रही तुझ्या अुपयोगी पडणार नाही.'' असा देवयानीने त्याला शाप दिला.

आता कचानेही तिच्यावर रागावून शाप दिला की, ''कोणीही ब्राह्मण तुझ्याशी विवाह करणार नाही.''

वृषपर्वा हा दानवांचा राजा होता. त्याला शर्मिष्ठा नावाची एक कन्या होती. एके दिवशी देवयानी अन्य सख्यांना बरोबर घेअून वनविहाराला गेली. त्यांना एके ठिकाणी एक सरोवर दिसले. तेंव्हा त्या सर्वजणी आपापली वस्त्रे अुतरवून ठेवून जलक्रीडा करू लागल्या. इतक्यात जोराचा वारा येअून किनाऱ्यावरील वस्त्रे अुडू लागली. ते पाहून त्या भराभरा पाण्याबाहेर येअून इकडे तिकडे अुडालेली वस्त्रे गोळा करून नेसू लागल्या. त्या गडबडीत शर्मिष्ठाने चुकून देवयानीची साडी नेसून घेतली. ते पाहून देवयानी रागाने तिला म्हणाली, ''अग राक्षसी, मी ब्राह्मण कन्या आहे. मी नाही तुझी साडी नेसणार. माझी साडी तू का नेसलीस?''



''भिकारडी कुठची ! मलाच रागावतेस काय? तुझा बाप तर माझ्या बाबांच्या जिवावर जगतो. आमच्याच आश्रयाने तर रहातेस तू. माझी साडी नेसल्याने तुझा अपमान होतो काय?'' असे म्हणत रागाने खदखदणाऱ्या शर्मिष्ठेने देवयानीला जवळच्या विहिरीत ढकलून दिले अन् आपल्या सख्यांसह ती तेथून निघून गेली.

थोड्या वेळाने राजा ययाती तेथे आला. शिकार करता करता दमून तो पाणी पिण्यासाठी विहिरीजवळ आला. आत डोकावून पहाता त्याला देवयानी दिसली. ययातीने तिला, ''तू कोण आहेस? विहिरीत कशी पडलीस?'' विचारले.



''मी दानवांचे गुरु शुक्राचार्य यांची कन्या असून माझं नाव देवयानी आहे. चुकून मी विहिरीत पडले. बाहेर काढा ना मला.'' असे म्हणत तिने आपला हात पुढे केला.

ययातीने ही आपला उजवा हात पुढे करून तिचा पुढे आलेला उजवा हात पकडला व तिला बाहेर काढले, व तो निघून गेला.

इतक्यात घूर्णिका नावाची एक दासी तिला शोधत तेथे आली. पण देवयानी तिला म्हणाली, ''मी आता वृषपर्वाच्या राज्यात मुळीच पाय ठेवणार नाही. शर्मिष्ठेने माझा घोर अपमान केलाय. तू जाऊन हे माझ्या बाबांना सांग.''

वार्ता कळताच शुक्राचार्य तातडीने तेथे आले. त्यांनी विचारले, ''शर्मिष्ठेनं तुला विहिरीत ढकलावं असा तू काय अपराध केलास तिचा?''

देवयानीने सारी हकीकत व शर्मिष्ठेचे बोलणेही पित्याला सांगितले. शुक्राचार्य म्हणाले, ''या जगात तुझाशिवाय माझं आहे तरी कोण? मीही नाही जाणार वृषपर्वाच्या नगरात.''

सर्व वृत्तान्त कळल्यावर राजा वृषपर्वा स्वतः शुक्राचार्यांकडे येऊन म्हणाला, ''तुम्ही दोघं इथे काय करत आहात? चला न नगरात.''

''तुम्हा लोकांची वर्तणुक मला पसंत नाहीय. तुमच्या माणसांनी माझा शिष्य कच याला अनेकदा मारून टाकलंय. आता तुमच्या कन्येनं माझ्या देवयानीला विहिरीत ढकलून मारायचा प्रयत्न के लाय. मला मुळीच तुमच्याकडे रहायचं नाही.'' शुक्राचार्य क्रोधाने म्हणाले.

वृषपर्वाने खूपदा याचना केली, त्यांचे पाय धरले; तेंव्हा शुक्राचार्य म्हणाले, ''माझ्या मुलीने कबूल केलं, तरच मी यायला तयार आहे.'' तेंव्हा देवयानीने एक अट घातली. त्या अटीनुसार शर्मिष्ठा व तिच्या सख्या यांनी देवयानीच्या दासी बनायचे कबूल करायला हवे. वृषपर्वाने ती अट मान्य केली अन् दासी बनून शर्मिष्ठा देवयानीचे कडू बोल सहन करू लागली. शुक्राचार्यांमुळे दानवलोकांचा खूप मोठा लाभ होत असल्याने हे सारे सहन करणे त्यांना भागच होते.



एकदा देवयानी शर्मिष्ठा व सर्व सख्यांना पूर्वी घडलेल्या प्रसंगाच्या ठिकाणीच घेऊन गेली. त्याही वेळी ययाती तेथे शिकारीला आला होता. त्या सर्वजणींना पाहून त्याने विचारले, ''तुम्ही कोण?''

देवयानीने त्याला त्याचे नाव व जात विचारली. अन् म्हटले, ''ज्यानं मला आपल्या हाताचा आधार देऊन विहिरीबाहेर काढले, ते आपणच ना? त्याच दिवशी आपला विवाह ठरलेला आहे. आपण तेंव्हाच माझे पाणिग्रहण केले ना? त्या क्षणापासूनच मी आपणाला पति मानत आले आहे.''

एका ब्राह्मण कन्येशी विवाह करायला ययातीला संकोच वाटत होता. परन्तु शुक्राचार्यांनी या विवाहाला संमती दिली. विवाह मोठ्या वैभवाने साजरा झाला. शुक्राचार्य व दानवांनी दोघांनाही बहुमूल्य भेटी दिल्या. देवयानी शर्मिष्ठा व अन्य दोन हजार दासी बरोबर घेऊन आपल्या पतिगृही-ययातीकडे-गेली. शर्मिष्ठा व दासींची रहाण्याची सोय ययातीने अशोकवनात केली.

देवयानी व ययाती यांना यदु व तुर्वस नावाचे दोन पुत्र झाले.

काही काळानन्तर शर्मिष्ठेला आपल्या दीन स्थितीबद्दल फार दुःख वाटू लागले. परंतु अजून तिचा विवाहही झाला नव्हता. अन् इकडे देवयानी तर दोन पुत्रांची माताही झाली होती. तिने विचार केला की, ''देवयानी जर ययातीशी



विवाह करू शकते, तर मीही त्याच्याशीच विवाह का करू शकत नाही?''

एके दिवशी ययाती अशोकवनात आला असता त्याला आपली दैन्यावस्था सांगून शर्मिष्ठा म्हणाली, ''महाराज, आपण माझ्या मालकिणीचे पति आहात, तसे माझेही आहात. पत्नी म्हणून आपण माझा स्वीकार करावा.''

शुक्राचार्य क्रोधित होतील अशी भीती मनात असूनही ययाती शर्मिष्ठेचा अस्वीकार करू शकला नाही. लपून-छपून तो तिला भेटत राहिला अन् त्यांना द्रुह्यु, अनु व पुरु नावाचे तीन पुत्र झाले.

शर्मिष्ठा माता बनल्याचे देवयानीला कळले अन् तिने येऊन शर्मिष्ठाला विचारले, ''सर्वजण

म्हणतात की तू मोठी शीलवती अन् पतिव्रता वगैरे आहेस; तुझा जन्म मोठ्या घराण्यात झालेला आहे. पण विवाह न करताच तू आई कशी झालीस हे तर सांग. मुलं कशी झाली तुला?''

लज्जेने आपले मस्तक झुकवून शर्मिष्ठा उत्तरली, ''मी ऋतुस्नान करत असताना एका महामुनीने मला पुत्रदान दिलं.''

''तो मुनि कोण? काय नाव आहे त्याचं? कोणत्या जातीचा आहे तो?'' देवयानी प्रश्न विचारत सुटली.

''त्या महानुभावांचं तेज पाहून त्यांना काही विचारावंसं मला वाटलंच नाही.'' शर्मिष्ठाने सांगितलं.

देवयानीचे एवढ्याने समाधान झाले.

नंतर एकदा देवयानी व ययाती दोघे मिळून शर्मिष्ठेच्या निवासस्थानी आले. त्यावेळी खरी गोष्ट देवयानीच्या लक्षात आली. शर्मिष्ठाची मुले व ययातीच्या रूपात खूपच साम्य आढळले तिला. तिने कडक स्वरात मुलांना त्यांच्या पित्याबद्दल विचारले, तेंव्हा त्यांनी ययातीकडे बोट दाखवले.

त्याक्षणी शर्मिष्ठाला अपशब्द बोलत देवयानी म्हणाली, ''अग राक्षसिणी, माझाच नाश करायला उठलीस होय?''

जराही संकोच न करता शर्मिष्ठा म्हणाली, ''मी कोणताही अपराध केलेला नाही. तुला महाराज जसे आवडले, तसे मलाही आवडले. तू माझ्यापेक्षा मोठी आहेस, ब्राह्मण आहेस, म्हणून मी तुझा आदर करते. पण हे तर राजर्षि आहेत. म्हणूनच मी म्हटलं की, ही एका ऋषीची मुलं आहेत.''

आता देवयानी रागावून ययातीला म्हणाली, ''तुम्ही माझ्याशी कपट केलंत, फसवलंत मला. मी आता तुमच्याजवळ रहाणार नाही.'' तिने सरळ आपल्या पित्याकडे जाऊन घडलेले सारे सांगितले.

शुक्राचार्यांनी क्रोधित होऊन ययातीला, ''तू ताबडतोब वृध्द होशील'' असा शाप दिला.

**क्रमशः**



# चान्दोबाच्या बातम्या



## भाग्यदेवता

**अ**रबमधील एका दरिद्री दाम्पत्याच्या पोटी जन्मलेली मुलगी कोट्यवधींची मालकीण झाली! हे कसे काय घडले? मरिअम अलामोरने इस्राइलमधील टेलआविव नगरातील एका इस्पितळात बलील नावाच्या मुलीला जन्म दिला. त्याच वेळी इस्राइलमधे 'भाग्यनक्षत्र' नावाची नवी लॉटरी सुरू झाली. पिता अलामोरने आपल्या नूतन अर्भकाच्या नावे एक तिकिट खरीदले. लॉटरी होती १,०००,००० सेकेलची - म्हणजेच ३,३०,००० अमेरिकन डॉलर्स इतक्या किंमतीची. बलीलच्या मातापित्यांना बेकारीमुळे आतापर्यन्त फक्त बेकारीभत्ताच मिळत असे. पण या नूतन 'भाग्यदेवी' ने एकाच दिवसात आपल्या आईबापांना धनवान बनवून टाकले. त्या दोघांनी ठरवले आहे की प्रथम 'भाग्यदेवी' ला घेऊन मक्केची यात्रा करायची अन् नंतर तिच्यासाठी एक नवीन घर खरेदी करायचे.



## पहिला घोडा

इतिहासपूर्व काळातील डायनोसोर्स नावाच्या राक्षसी पालींची अश्मरूपात परिवर्तित झालेली अंडी काही ठिकाणी सापडत असल्याबद्दल आपण वाचले आहेच. अमेरिकेच्या पेरु या प्रान्तात गेल्या एप्रिलमधे २,००,००० वर्षांपूर्वीच्या घोड्याचा असाच एक सापळा सापडलेला आहे. शास्त्रज्ञांचा दावा खरा ठरला तर घोड्याच्या हाडांचा हा सापळा सर्वात प्राचीन असा सापळा असेल.

## दहा लाख चित्रे

**चि**न्मयानन्द हे एक भारतीय आध्यात्मिक गुरु होत. ते आता न्यूयॉर्कचे रहिवासी बनले आहेत. त्यांनी शांतीचे प्रतीक असे मानले गेलेल्या. दहा लाख कबुतरांचे चित्र रेखाटले आहे. फिजी दीपात असताना रेखाटलेले हे चित्र त्यांनी रशियाचे पूर्वीचे अध्यक्ष गोर्बाचेव्ह यांची पत्नी रैजा हिला समर्पित केले. चिन्मयांचे असे म्हणणे आहे की, 'हे चित्र म्हणजे माझ्या हृदयाची प्रार्थना आहे.'



# जादूचा सोटा

राघव हा एक शेतकऱ्याचा मुलगा होता. शेतऱ्याचे आपल्या मुलावर काडीइतकेही प्रेम नव्हते. तो त्याला फार वाईट वागणूक देई. सक्तीने तो राघवकडून शेतीचे खूप काम करून घेई; घरचे कामही बरेचसे त्याच्याकडूनच करवले जाई. राघव सारी कामे खूप नीटनेटकेपणाने भराभर अुरकी. पण अुपयोग काय? त्याने कितीही काम केले, अन् ते कितीही छान केले, तरी त्याची कधी प्रशंसा होत नसे. अुलट तो जितके भराभर काम करी, तितके अधिकाधिक काम त्याच्यावर लादले जाई, व तो बिचारा ती सर्व कामे करी.

राघवच्या गावातच रामी नावाची एक गरीब मुलगी रहात असे. ती मोठी तरतरीत अन् बुध्दिमान होती. दोघांचे एकमेकावर प्रेम होते. तिच्याशी विवाह करायचा आपला विचार राघवने पित्याजवळ प्रकट केला.

“तुला खायलाप्यायला घालणंच जड जातंय मला, अन् मग लग्न करायचंय होय तुला? हे तर अशक्यच आहे. तू स्वावलंबी होशील, स्वतःच्या पायांवर उभा राहशील तेंव्हा पाहू. सध्या मुकाट्यानं काम कर आपलं!” पित्याने स्पष्टपणे बजावले राघवला.

‘बापाबरोबर राहून फुकटची बेगारी करत रहाण्यापेक्षा दुसरीकडे कुठे काम करणं बरं! थोडेफार पैसे वाचवून आपला निराळा स्वतन्त्र संसार चालवता येईल.’ असा विचार करून घरात न सांगताच राघव गाव सोडून निघून गेला. तो कामाच्या शोधात बाहेरगावी जात आहे, ही गोष्ट फक्त रामीलाच ठाऊक होती.

गाव सोडून जंगलातून जात असताना राघवला डोक्यावर लाकडांची मोळी घेऊन जात असलेली एक म्हातारी दिसली.

“आजीबाई, म्हाताऱ्या आहात तुम्ही! ओझं कसं न्याल इतक्या दूर? द्या ती मोळी माझ्या डोक्यावर. मी घेऊन येतो तुमच्याबरोबर.” राघव झटकन पुढे येत तिला म्हणाला.

“कुठून आलास बेटा तू? नाव काय तुझं? कुठं निघालायस?” राघवच्या डोक्यावर ओझे लादत म्हातारीने चौकशी केली.

आपली सारी हकिकत आडपडदा न ठेवता तिला सांगून राघव म्हणाला, “कुठे काम शोधावं म्हणून बाहेर पडलोय. थोडे पैसे जमले की गावी जाऊन रामीशी लग्न करणार आहे मी.”

“मग आणखी कुठे जायची काय जरूर? माझ्याच घरी कर ना काम! राहशील तितके दिवस खायलाप्यायालाही घालीन मी. तू गावी जायला निघशील तेंव्हा जमेल तितकं धन देईन मी तुला!” म्हातारीने सुचवले.

“हां, हे बरंच आजी! तुझ्यासारख्या म्हातारीची सेवा करून काही पुण्यही पदरात पडेल माझ्या!” राघवने कबुली दिली.

राघव म्हातारीकडे राहिला. तो तिच्या जनावरांना चारा घाली, त्यांना पाणी पाजून आणी अन् धाराही काढी. जरूर तेंव्हा तो जंगलात जाऊन म्हातारीसाठी लाकूडफाटा जमा करून आणी. एक वर्ष आनन्दाने म्हातारीची सेवा करत घालवले त्याने. काम करताना त्याने कधीही आळस केला नाही. सारी कामे तो मोठ्या श्रध्देने करी. म्हातारीही त्याला तीन वेळा प्रेमाने भरपूर खाऊ घाली. एक वर्ष



झाल्यावर म्हातारी राघवला म्हणाली, “वर्षभर तू छानच आपलं वचन पाळलंस, झकास काम केलंस. मीही तुला म्हटलं होते की तू परत जाशील, तेंव्हा थोडंफार तुला नक्की देईन. माझ्याजवळ जे गाढव आहे, ते तू घेऊन जा अन् आरामात आपलं आयुष्य घालव.”

हे ऐकून राघवचा चेहरा पडला. ‘गाढव घेऊन काय करायचं? त्याला आपण खायला तरी काय घालणार? एखाद्या परटाला विकलं, तर आपल्याला तीन-चार रुपये मिळतील. पण ते घेऊन जाऊन बायकोला कसा सुखी ठेवू शकेन मी?’ त्याला असे वाटले की म्हातारीने फसवले आपल्याला!

त्याचा निराळा चेहरा पाहून म्हातारीला हसू

**(पंचवीस वर्षांपूर्वी चान्दोबात प्रकाशित झालेली गोष्ट)**



आले. ती म्हणाली, ''वेडा कुठला! इतके दिवस मी तुझ्याकडून काम करवून घेतलं. मग काय एक साधं गाढव देऊन रवानगी करीन तुझी मी? त्याचे दोन्ही कान धरून खेच, अन् बघ काय होतंय ते!''

कान ओढल्याबरोबर गाढव 'हीऽ हीऽ' करू लागले, अन् जोपर्यंत ते असे ओरडत राहिले, तोपर्यन्त त्याच्या तोंडातून हिरे अन् मोती बाहेर पडत राहिले. राघवला ते पाहून फारच हर्ष झाला, अन् म्हातारीला प्रणाम करून गाढवासह तो आपल्या गावची वाट चालू लागला.

चालता चालता संध्याकाळ झाली. तो ज्या गावापर्यन्त गेला होता तेथेच रात्र काढायची असे ठरवून त्याने एका म्हातारीच्या घराचे दार ठोठावले. ''आजी, आज रात्रीचं भोजन तुझ्याकडे करून, रात्र इथेच घालवून उद्या सकाळी आपल्या घरी निघून जाऊ म्हणतो.'' राघवने विनंती केली.

म्हातारीच्या मुलाने गाढव एका झाडाला बांधले. जेवण झाल्यावर राघव झोपणार, इतक्यात म्हातारी म्हणाली, ''बाळा, तू कदाचित् पहाटेच निघशील, तेंव्हा जेवणाची किंमत एक अशर्फी आत्ताच देऊन टाक ना!''

''थांब आजी, आत्ता देतो आणून.'' असे म्हणून राघव बाहेर गेला अन् गाढवाचे कान त्याने चांगले जोराने ओढले. त्याबरोबर 'ही ही' करत गाढवाने बरेच हिरे-मोती बाहेर काढले.

राघवने आत येऊन म्हातारीच्या हातावर दोन हिरे ठेवत म्हटले, ''हे ठेव आजी; तुझ्या अुपयोगी पडतील छान.''

म्हातारीच्या मुलाने हा सारा प्रकार पाहिला होता. राघव झोपल्याबरोबर तो झाडाला बांधलेले गाढव दूर घेऊन गेला अन् त्या जागी तेवढ्याच आकाराचे एक दुसरे गाढव त्याने बांधून ठेवले. नन्तर राघवजवळ असलेले हिरे-मोतीही त्याने चोरून घेतले.

पहाटेच गाढवावर चढून बसून राघव आपल्या गावी पोचला. पित्याला सारी हकिकत सांगून तो म्हणाला, ''बाबा, तुम्हीच त्याचे कान ओढून पहा. म्हणजे समक्षच काय ते कळेल.''

मुलाने सांगितल्याप्रमाणे शेतकऱ्याने करून पाहिले. गाढवाने 'ही ही' केले, पण हिरे-मोती



ओकायचाया ऐवजी त्याने आपल्या मागल्या पायाने शेतकऱ्याच्या तोंडावर एक सणसणीत लाथ मारली.

''शी: गाढव कुठचा! तुला कुणीतरी चांगलं बनवलंय. चल, चालता हो माझ्या पुढून.'' असे म्हणून खूप शिव्या देत त्याने राघवला हाकलून दिले.

आपल्याला कोणी कधी फसवले, हेच बिचाऱ्या राघवला कळेना! तो पुन्हा कामाच्या शोधात निघाला. रस्त्यात जंगल लागले. तेथे त्याला एक सुतार लाकडे कापून नेत असलेला त्याला दिसला. ''काका, तुम्ही वयानं मोठे आहात. कुठवर ही लाकडं डोक्यावरून न्याल? मी चांगला तरणा, धडधाकट आहे. द्या माझ्याकडे ती. मी तुमच्या घरापर्यंत घेऊन पोचवून देईन.'' राघव सुताराला म्हणाला.

सुताराने ही त्याची सारी हकिकत विचारून घेऊन, वर्षभर माझ्याचकडे काम केलंस, तर योग्य असं काही देईनं असे म्हणून राघवला आपल्या घरी नेले. राघवने एक वर्षभर सुताराला त्याच्या कामात खूप मदत केली. तो जेंव्हा परत जायला निघाला, तेंव्हा त्याच्या हाती तांब्याची एक थाळी देत सुतार म्हणाला, ''ही सामान्य थाळी नव्हे. तिला 'थाळी, मला जेवण दे,' असं म्हणालास, की ती तुला पंचपक्वान्नांनी भरलेलं जेवण देईल.''

राघव लगेच थाळीसमोर बसून, 'थाळी, मला जेवण दे,' असे म्हणाला अन् ताबडतोब थाळी भरून सुग्रास भोजन त्याच्यासमोर हजर झाले! पोटभर खाऊन, सुताराला नमस्कार





करून राघव आपल्या घराकडे निघाला.

मागच्या वेळेप्रमाणेच वाटेत तो त्या म्हातारीकडे गेला अन् म्हणाला, ''आजी, रात्र झालीय; आज रात्री मी तुझ्याकडे झोपेन.''

''जेवण नाही बाबा, संपून गेलं सगळं.'' म्हातारी म्हणाली.

''आजी, जेवण नकोच आहे मला! ते देणारी थाळी आहे माझ्याकडे!'' असे म्हणत राघवने झोळीतून थाळी काढली अन् म्हणाला, ''थाळी, जेवण दे मला.'' थाळी पंचपक्वान्नांसुद्धा सर्व पदार्थांनी इतकी भरून गेली, की म्हातारी, तिचा मुलगा वगैरे सर्वांनी पोटभर खाऊनही पदार्थ उरलेच!

राघव रात्री जेंव्हा डाराडूर झोपला, तेंव्हा म्हातारीच्या मुलाने ती थाळीही चोरली अन् तिच्या जागी तसलीच दुसरी थाळी ठेवली.

दुसऱ्या दिवशी राघव घरी पोचल्यावर म्हणाला, ''बाबा, यावेळी पहा मी काय आणलंय!'' अन् थाळी बाहेर काढून तो म्हणाला, ''जेवण दे थाळी.'' पण थाळी रिकामीच राहिली! तो पुन्हा पुन्हा 'जेवण दे' असे ओरडला तरीही ती रिकामीच राहिली.

आता राघव पुन्हा काम शोधायला निघाला. वाटेत त्याला एक नाला दिसला. त्याच्या किनाऱ्यावरील झाड एक म्हातारा आपल्या कुऱ्हाडीने तोडत होता.

''का बरं ते झाड तोडताय आजोबा?'' राघवने त्याला विचारल्यावर त्याला कळले की झाडाच्या खोडाचा पुलासारखा उपयोग करून म्हाताऱ्याला पलीकडे जायचंय.

''माझ्या हाती द्या ती कुऱ्हाड आजोबा!'' असे म्हणून राघवने ते झाड पाडून त्याचे खोड पुलासारखे त्या नाल्यावर आडवे टाकून दिले.

म्हातारा राघवला म्हणाला, ''अरे वा! खूप मदत झाली बाबा तुझी! आता मीही तुला त्याबद्दल एक बक्षिस देतो.'' अन् म्हाताऱ्याने झाडाच्या फांदीपासून एक सुरेख सोटा बनवून राघवच्या हाती दिला.

त्याची काही जरूर नसूनही राघवला म्हाताऱ्याला नकार देववेना. म्हातारा म्हणाला, ''हे बघ बेटा, हा साधा सोटा नव्हे ; जादूचा आहे तो! तुला कुणाला पिटून काढायचं असेल, तर त्याला सांग; म्हणजे तू 'पुरे' म्हणेपर्यन्त त्या माणसालाहा बदडत राहील. छान उपयोग होईल तुला याचा.''

आश्चर्य वाटून राघव सोट्याला म्हणाला, ''सोट्या, हवेला बडव.'' त्या बरोबर सोटा त्याच्या हातातून सुटून हवेतच आडवेतिडवे प्रहार करू लागला. त्याला 'पुरे' म्हणून सोटा हातात घेऊन राघव आपली वाट चालू लागला. आता पर्यन्त त्याने ओळखले होते की आपले गाढव आणि थाळी यांची अदलाबदल त्या म्हातारीच्या घरीच झाली आहे. काही निश्चय करून राघव सरळ त्या म्हातारीच्याच घरी गेला.

''काय आजी, बरी आहेस ना? अन् तुझा मुलगा कसा आहे? तोही मजेत असेल ना?'' राघवने विचारले.

म्हातारी ओळख न दाखवता म्हणाली, ''तुला कधी पाहिल्याचं मला तर काही आठवत नाहीय?'' तिचा मुलगाही तिला साथ देत म्हणाला, ''हो, कधीच पाहिलं नाहीं आम्ही तुला!''

''माझं गाढव अन् थाळी तुम्हीच चोरलीत. आता पटतेय का ओळख?'' राघवने पुन्हा विचारले.

म्हातारीचा मुलगा वेड पांघरत म्हणाला, ''कुठलं गाढव अन् थाळी?''

आता मात्र राघव आपल्या सोट्याला म्हणाला, ''याला बडव सोट्या!''

तावडतोब सोटा हवेतून गरगरत येऊन म्हातारीच्या मुलाला चांगला बडवू लागला. बरोबरच आहे, 'चांभाराच्या देवाला खेटराचीच पूजा हवी!'

''क्षमा कर बेटा, याच्या हातून चूक झाली. आम्ही तुझ्या वस्तु चोरल्या. आपल्या वस्तु परत घे अन् माझ्या मुलाला वाचव.'' असे म्हणत म्हातारी गयावया करू लागली. तिची दया येऊन राघवने ही आपला सोटा मागे घेतला.

गाढव व थाळी घेऊन राघव तावडतोब आपल्या गावी परत फिरला. त्याने रामीशी विवाह केला, अन् आरामात राहू लागला. त्याचा बापही आता त्याच्यावर प्रसन्न झाला.





# नवरा - बायको

रंगापुरचा रंगा मोठा रागिट होता. एवढ्या-तेवढ्यासाठी बायकोला शिव्या देई. त्याची बायको सीता विसराळू होती. त्यामुळे तिच्या हातून चुका होतच. रंगा आपला राग आवरू शकत नसे. दुसऱ्या काही लोकांनी ही त्याला उपदेश करून पाहिला, पण कुणाला ही रंगाला सुधारण्यात यश आले नाही.

रंगा जेव्हा बायकोवर रागावून तिला शिव्यांची लाखोली वाहे, तेव्हा शेजार-पाजारचे लोक ऐकत नि हसून गप्प बसत. बायको बिचारी निमूटपणे नवऱ्याच्या शिव्या ऐकून घेई. करून करून करणार काय? सर्वासमोर आपला अपमान तिला असह्य होई. पण नवऱ्याच्या रागाला प्रतिबंध घालण्याचा काही उपाय तिला सुचत नसे.

एक दिवशी संध्याकाळी तो शेताकडून घरी आला नि त्याने बायकोला विचारले - ''सकाळी जाता जाता दोन - तीन वेळा मी कपडे धुवायला सांगितले होते. तू ते धुतलेस का?''

''विसरले!'' म्हणून ती स्वतःलाच दूषण देऊ लागली. रंगाचा राग अनावर झाला. ''विसरायची तर तुला सवयच आहे. मी सकाळीच तुला सांगितलं होतं की मला संध्याकाळी लग्नाला जायचंय. स्वच्छ धुतलेले कपडे मला लागतील. बाईसाहेब विसरून गेल्या! हे मळके कपडे घालून गेलो तर लोक काय म्हणतील? माझी किती नालस्ती होईल तिथे? तुझ्याशी लग्न केलं त्याची शिक्षा भोगतोय झालं! केवढा अपमान सहन करावा लागेल मला! तू म्हणजे मला एक शाप आहेस!'' जोरजोरात रंगा ओरडू लागला.

रंगाचं हे ओरडणं ऐकून आसपासचे लोक आपल्या घराबाहेर पडले आणि हा तमाशा पाहून गेले. सीता नवऱ्याच्या या बडबडीमुळे कष्टी झाली. सर्वासमक्ष आपला अपमान तिला असह्य झाला. नकळत तिच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले.

त्या अवस्थेत ही तिने नवऱ्याला शांत करायचा प्रयत्न केला. ती म्हणाली - ''लग्न तर उद्या आहे ना? तोपर्यंत धुऊन टाकीन मी. सकाळ पर्यंत वाळून जातील. धुतलेले कपडे घालून तुम्ही लग्नाला जाऊं शकाल.''

बायकोच्या या बोलण्यावर रंगाचा राग शांत झाला नाही. तो म्हणाला - ''तुझ्याशी आणखी काही बोलण्याची सोय नाही. काही नकोत ते कपडे धुवायला. हे मळके कपडे घालूनच जाईन लग्नाला. पाहू काय तमाशा होईल तो. मग तुला मोठा आनंद होईल नाही?'' असे बोलून तो घरातून बाहेर पडला.

रंगा बाहेर गेल्यावर शेजार-पाजारच्या दोन-तीन घरातल्या बायका तिच्यापाशी आल्या नि म्हणाल्या - ''सीता, तुझी कीव करावीशी वाटते. तुझी परिस्थिति पाहून वाईट वाटते. जगात कुठल्याही बाईला इतके कष्ट होत नसतील. एवढा अपमान सहन करून तू जगतेस कशी कोण जाणे! तुझा नवरा म्हणजे अगदी दुर्वासाचा अवतार आहे. असल्या रागिष्ट नवऱ्याबरोबर तू आपला संसार कसा चालवतेस? तुझ्या जागी आम्ही असतो तर अत्महत्या करून मोकळ्या झालो असतो.'' सहानुभूति दाखवीत या बायकांनी सीतेला भडकावलं !



सीतेला वाटलं या शेजारणी सांगताहेत ते ठीकच आहे. आता आपण या नवऱ्याबरोबर रहायचं नाही असा तिने निर्णय घेतला. तिला वाटलं की आपल्याला आत्महत्त्येवाचून अन्य मार्ग नाही. तिने आपल्या नवऱ्याला एक पत्र लिहून ते पलंगावर ठेवले आणि घराबाहेर पडली.

संध्याकाळी रंगा लग्न - घरून परत आल्यावर बायकोचे पत्र त्याने वाचून पाहिले. त्याच्या सर्व अंगाला घाम फुटला. गाव भर तो बायकोला शोधत राहिला. ती त्याला कुठेही दिसली नाही. तिचे प्रेत ही कुठे आढळले नाही.

शेवटी घाबरत तो तिच्या माहेरी गेला. सासरा परंधाम बाहेरच बसलेला होता. रंगाने

अशोक पवार

बायकोचे पत्र त्याच्या हाती दिले नि ओक्सा-बोक्षी रडू लागला.

परंधामने संपूर्ण पत्र वाचले नि म्हणाला - "जावईबापू, तुम्ही लग्नाला गेल्यानंतर बहुतेक हे पत्र तिने लिहिले असेल. याचा अर्थ असा की आत्महत्त्या केली असली तर तिने कालच केली असेल. पण घरात तर सीतेसारखी दिसणारी एक मुलगी आता दिसत आहे. ती सीता आहे की तिचं प्रेत?"

एवढ्यात सीता घरातून बाहेर आली. तिने वडिलांच्या हातात आपलं पत्र आणि जवळच बसलेल्या नवऱ्याला पाहिलं. काहीसं आठवत ती म्हणाली - "मी पण कशी विसराळू आहे! आत्महत्त्या करण्यासाठी घराबाहेर पडले आणि येऊन बसले माहेरी! असल्या रागीट नवऱ्या बरोबर संसार करणं आपल्याला मुळिच जमणार नाही." असं म्हणून ती विहिरीकडे धावत सुटली.

रंगाने ताबडतोब तिला धरलं नि म्हणाला- "थांब सीता, थांब! माझ्या रागीटपणामुळे तू जीव द्यायला निघालीस याचं मला फार वाईट वाटतं. जर मला याची कल्पना असती तर मी कधी तुझ्यावर रागावलो नसतो. माझ्यात बदल झाला असता. इथून पुढे मी कधी तुझ्यावर रागावणार नाही. आजपासून शांत राहण्याचा प्रयत्न करीन.

सीताने नवऱ्याचे दोन्ही हात धरले नि म्हणाली - "असं नका बोलूं. चूक तर माझी सुध्दा आहे. विसराळूपणाचा दोष माझ्यात नाही का? मी सुध्दा आपला दोष घालविण्याचा प्रयत्न करीन."

परंधाम नवरा-बायकोची सारी बोलणी ऐकत होता. जवळ येऊन म्हणाला - "संसार करताना नवरा-बायकोंनी एकमेकांना समजून घेतलं पाहिजे. आणखी एक गोष्ट लक्षात ठेवा. पति-पत्नी यांनी कधी एकमेकांची क्षमा मागायची नाही. त्यांच्यात नित्य असावं - प्रेम, अनुराग!" परंधामचा उपदेश ऐकून रंगा व सीता दोघांनी माना खाली घातल्या. केवढं मोठं सुखाचं रहस्य भरलं होतं त्या उपदेशात!



# बहुरूपा वसुन्धरा

## अुडते कोल्हे?



अुडत्या कोल्ह्यांबद्दल कधी अैकलं आहे तुम्ही? तुम्हाला वाटत असेल की हे कसं शक्य आहे? शक्य आहेच. पण हां, हे कोल्हे नव्हेत, तर वटवाघुळं आहेत. त्यांचं तोंड कोल्ह्यांसारखं दिसतं ना? म्हणून कुठे कुठे त्यांना 'अुडणारे कोल्हे' असं म्हणतात. मलेशियाच्या जंगलात वटवाघुळं सर्वात जास्त संख्येने आढळतात. मधू फळं ती मोठ्या आवडीने खातात. आपल्या पंखांच्या साह्याने ती झाडाच्या फांद्यांना अुलटी लटकतात. त्यामुळे ते दृश्य मोठं विचित्र दिसतं. मोठ्या वटवाघुळांचे पसरलेले पंख चार फुट लांबीचे असतात.

## कुत्र्यांच्या छत्र्या



साधारणतः कोणत्याही रोपाच्या वाढीसाठी प्रकाश आवश्यक असतो. परंतु कुत्र्यांच्या छत्र्यांच्या (यांनाच भूछत्र असेही म्हणतात) वाढीसाठी प्रकाशाची जरूर नसते. पावसाळ्यात सकाळी फिरायला निघालं, तर जिथे काल काहीही चिन्ह नव्हते अशा जागी या छत्र्या अुगवलेल्या आढळतात. मुलं मोठ्या गमतीने त्या तोडून हातात घेतात अन् चुरगळूनही टाकतात. परंतु कधीकधी असे करणे मोठे धोक्याचे असते. कारण काही प्रकारच्या छत्र्या विषारी असतात. त्यांना हात लावल्यामुळे ते खाजू लागतात. अनुभवी व्यक्तींनाच विषारी व बिनविषारी छत्र्यांतला फरक माहीत असतो. त्यामुळे मुलांनी त्यांपासून दूरच रहावे हे बरे.

## सूर्याचा मृत्यु



सूर्यमंडळाच्या केन्द्रस्थानीचा हायड्रोजनच संपून जाईल, अशा दिवसाची तुम्ही कल्पना तरी करू शकता का? त्या वेळी जो अणुविस्फोट होईल त्यामुळे सूर्यमंडळ विस्तृत होअून भयानक लाल रंगात परिवर्तित होईल. त्यामुळे सारे भूमंडळ भस्मीभूत होईल. यानन्तर सूर्यमंडळ आजच्या आकारापेक्षा शंभरपट मोठे होअून अंतरिक्षात वलयाकार बनून राहील. हे सर्व केंव्हा घडेल याचा काही अंदाज आहे तुम्हाला? शास्त्रज्ञ असे म्हणतात की करोडो वर्षांनंतर असे घडणार आहे.

आंतर्देशीय बातम्या

# 'सुंदोपसुंदी'




आतापर्यन्त 'सुंदोपसुंदी' किंवा 'भावाभावातील युद्ध' अशा मथळ्याखाली वर्तमानपत्रांनी 'येमेन' मधील आंतरिक युद्धाबद्दल अनेक बातम्या प्रकाशित केल्या आहेत. अल्जेरियाचे माजी परराष्ट्रमन्त्री लखदर इब्राहीम हे संयुक्त राष्ट्रसंघाचे 'विशेष दूत' बनून तेथे गेले व त्यांनी ही आपापसातली हत्या ताबडतोब थांबवण्याबद्दल विनंती केली.

या वर्तमानपत्रांच्या दृष्टीने उत्तर व दक्षिण येमेन मधील प्रजा यांच्यात भावाभावांचे नाते आहे. चार वर्षांपूर्वी उत्तर व दक्षिण येमेन एक झालेही. परन्तु पुन्हा त्यांनी वारंवार आपसात झगडे केले. दक्षिण येमेन निराळा होऊन त्याने स्वतःला 'स्वतन्त्र देश' म्हणून घोषित केले, अन् या घोषणे बरोबरच युद्धालाही सुरुवात झाली. परिणामतः खूपशी प्राणहानी झाली.

जेव्हा संयुक्त येमेनाची स्थापना झाली, तेंव्हा उत्तर येमेन च्या 'पीपल्स जनरल कॉंग्रेस' चे नेता अली याले यांना युनियनचे अध्यक्ष बनवले गेले अन् दक्षिण येमेनच्या 'सोशलिस्ट पार्टी' चे नेता अली सलीम अलबीद उपाध्यक्ष. ही युनियन बनण्यापूर्वी उ. येमेन सांप्रदायिक इस्लाम धर्माच्या अधिपतींच्या अधीन होता, तर द. येमेनला त्यावेळच्या सोव्हिएट युनियनची मदत व सहयोग मिळत असल्याने तो सोशलिस्ट देश बनलेला होता. पण दोहोंचा मिळून जेंव्हा एक संयुक्त देश बनला, तेंव्हाच राजनैतिक परिशीलकांनी आपला संदेह प्रकट केला की, गाठ जास्त दिवस टिकू शकणार नाही. पण त्यांना अशी आशाही वाटत होती की देशाच्या एकुण आर्थिक प्रगतीसाठी ते आपसातले भेदभाव विसरूनही जातील, अन् मिळून-मिसळून प्रयत्न करत रहातील.

१९९३ मध्ये पहिल्या सार्वत्रिक निवडणुका झाल्या. विधानसभेसाठी सदस्यांची संख्या ३०१ आहे. त्यातील १२१ जागा

'पीपल्स जनरल काँग्रेस' ला मिळाल्या अन् ५६ जागा 'सोशॅलिस्ट दल' ला मिळाल्या. 'एलेन गॅदरिंग फॉर रिफॉर्म' नावाच्या दलाला तर सोशॅलिस्ट दलापेक्षाही अधिक जागा मिळाल्या. 'पीपल्स जनरल काँग्रेसशी हातमिळवणी करून साले अध्यक्ष बनला, व त्याने आपले सरकार बनवले. परन्तु हे सरकार येमेन युनियनच्या एकतेचे संरक्षण करू शकले नाही. अध्यक्ष सालेने द. येमेनच्या तेलखाणींवर आपला अधिकार जमवायचा प्रयत्न केला, परंतु त्याला विरोध झाला. अन् दोन्ही सैन्यात लढाई सुरू झाली.

५ मे रोजी उ. येमेनने द. येमेनचे एक लढाऊ विमान पाडले. उ. येमेनने तेव्हा आरोप केला की द. येमेनने त्यांच्या विमान-दलावर आक्रमण केले आहे. अध्यक्ष सालेने तातडतोब आणीबाणी जाहीर केली. अली सलीम अलबीदला उपाध्यक्ष पदावरून पदच्युत केले आणि सुरक्षा व तेलशाळेच्या मन्त्र्यांची ही उचलबांगडी केली; द. येमेनचा गव्हर्नरही बदलण्यात आला.

उत्तर येमेनचे सैनिकी संख्याबळ अधिक होते. हे सैन्य द. येमेनशी युद्ध करण्यासाठी निघाले. द. येमेनने त्यांच्यावर 'स्कड' सारख्या आधुनिक हत्याराचा प्रयोग केला. द. येमेन युनियनमधून फुटून निराळा झाला व त्याने स्वातंत्र्याची घोषणा केली. उ. येमेनने अट घातली की, त्यांनी जर सालेच्या सरकारला मान्यता दिली, तर आपण युद्ध थांबवायला तयार आहोत. याला उत्तर म्हणून द. येमेनने संयुक्त सरकार चालू ठेवण्यासाठी सात अटी घातल्या; पण सालेने त्या अमान्य केल्या.

तीन महिने हे आंतरिक युद्ध चालू राहिले. या अवधीत दोन्ही पक्षांनी एकूण सहा वेळा युद्ध समाप्तीसाठी आपली स्वीकृती जाहीर केली. परंतु दरवेळी लगेच थोड्याच तासात हे दोन्ही पक्ष एकमेकांवर आरोप करत अन् 'अटींचे उल्लंघन झाले' असे म्हणत युद्ध करू लागले.

द. येमेनच्या पराभवानन्तर, त्या देशाचे नेता सलीम अलबीद अन अन्य नेते शेजारच्या देश ओमान इथे पळून गेले. राजनैतिक संशोधकांचे असे म्हणणे आहे की शेजारच्या देशात आश्रयार्थ रहात असतानाही दक्षिण येमेनचे हे नेते फार दिवस, हात चोळत गप्प रहाणार नाहीत. इकडे उ. येमेनने घोषित केले आहे की, 'आम्ही युद्ध स्थगित केले आहे आणि आता आम्ही जनतन्त्र राज्यस्थापनेच्या दृष्टीने क्रियाशील आहोत. देशात लवकरच निवडणुका होतील, अन् त्यात कोणताही राजनैतिक पक्ष भाग घेवू शकेल.' सध्याची परिस्थिती लक्षात घेता, भविष्यात तेथे काय घडणार आहे, याबद्दल सांगणे कठीण आहे.

### येमेनचा इतिहास

येमेन हा आपल्या सुगंधी द्रव्यांसाठी जगप्रसिद्ध असा प्राचीन देश आहे. सोळाव्या शतकात हा ओटोमान टर्की साम्राज्याचाच एक भाग होता. ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीने १८३९ मधे हा देश तेथील सुलतानाकडून आपल्या ताब्यात घेतला. एडन हे केन्द्रस्थान असल्यामुळे तेथे येणाऱ्या-जाणाऱ्या जहाजांवर ब्रिटिशांचे अधिक आधिपत्य होते. पहिल्या जागतिक महायुद्धात टर्कीचा पराभव झाला, तेव्हा अन्य देशांप्रमाणेच येमेनने ही आपला देश 'अरब रिपब्लिक ऑफ येमेन' नावाने 'स्वतन्त्र' म्हणून घोषित केला. एक वर्षानिन्तर एडन व काही अन्य प्रान्तांनी मिळून एकत्रपणे ब्रिटिशांना विनंती केली की, 'त्यानी आपले सैन्य तेथून हटवावे'. १९६७ मधे ब्रिटिश सैन्य तेथून निघून गेले. त्यानन्तर 'पीपल्स फेडरेशन ऑफ सदर्न येमेन' ची स्थापना झाली. १९७० मधे सत्तारूढ मार्क्सिस्ट पक्षाने त्याला 'पीपल्स डेमॉक्रेटिक रिपब्लिक ऑफ येमेन' असे नाव दिले. नन्तर दुसऱ्याच वर्षी दोन्ही येमेनमधे लढाई सुरू झाली. हे युद्ध एक वर्षभर चालू राहिले. १९७९ मधे त्यांच्यात तह झाला. संयुक्त येमेनच्या स्थापनेबद्दल चर्चा होऊन 'येमेन कौन्सिल' रूपाने त्याची स्थापना झाली. सना ही राजधानी बनली व 'रिपब्लिक ऑफ येमेन' तयार झाले.



# हिकमती भुतं

कनकपुरचा कमलाकर शहरातील कचेरीत नोकरी करत असे. त्यासाठी त्याला रोज एका जंगलातल्या वाटेनं जावं-यावं लागे. बाप लहानपणीच मरून गेल्यामुळे खूप अडचणी सोसून त्याच्या आईनं त्याला वाढवलं.

कमलाकरचा आवाज मोठा गोड होता. आईच्या सांगण्यावरून एक दिवस रात्रीच्या वेळी तो गाणं गाऊ लागला. त्या सुस्वर गाण्याच्या आनंदात आईने डोळे मिटून घेतले. पण ते डोळे पुन्हा उघडलेच नाहीत!

स्वतःचा स्वयंपाक त्याला स्वतःच करून घ्यावा लागे. त्याचे कष्ट पाहून एकदा त्याचा मित्र त्याला म्हणाला. "कमलाकर, अरे किती दिवस असे कष्ट उपसत बसशील? एकादी मुलगी पसंत करून लग्न करून घे ना!"

लग्नाची गोष्ट निघाल्या बरोबर त्याला शेजारच्या पार्वतीची आठवण आली. पार्वतीच्या बापाचा लहानसा व्यापार होता. ती त्याची एकुलती एक मुलगी होती. रोज संध्याकाळी ती गावाबाहेरच्या देवळात देवदर्शनाला जात असे. देव-पूजेसाठी ती रोज कमलाकरच्या घरासमोरच्या बागेतून फुलं तोडून नेत असे. पण आतापर्यन्त तो कधीच तिच्याशी काही बोलला नव्हता.

एक दिवशी तो कचेरीतून परत आला तेंव्हा पार्वती, फुलं तोडत असलेली त्याला दिसली. तेंव्हा त्याने तिच्याशी बोलायचं धाडस केलं. "पार्वती, तू मला फार आवडतेस. तुझ्याशी लग्न करायची इच्छा आहे माझी, तू आहेस कबूल लग्नाला?" त्यानं बेधडक तिला विचारलंच.

कमलाकरचं बोलणं ऐकून पार्वती थोडा वेळ स्तब्धच राहिली. नंतर तिनं विचारलं, "तू खूप छान गातोस हे माहीत आहे मला. पण तुला तलवार येते चालवता? आहेस इतका साहसी तू? खाली मुंडी घालून गल्लीतून चालतोस म्हणून लोक तुला मोठा विनयशील समजत असतील.

कु. शालिनी पाटील



पण काय रे, डोकं ताठ ठेवून चालण्याइतकं आर्थिक बळ आहे तुझ्या पाठीशी? इतर माणसांसारखे नाकडोळे आहेत तुला; पण कधी आरशात आपला चेहरा पाह्यलायस? तुझे डोळे बारीक आहेत अनं नाक बसकं आहे, ते दिसलं नाही कधी तुला? पुन्हा कधी माझ्यापुढे असला प्रस्ताव मांडायचं धाडस करू नको.''

कमलाकर यावर काही बोलणार, इतक्यात हातची फुलं खाली टाकून त्याचं ऐकायलाही न थांबता रागाने फणफणत पार्वती तिथून निघूनही गेली.

कमलाकरला हा अपमान जिव्हारी लागला. अन् अंधारातच तो जंगलाकडे चालू लागला.

ती चांदणी रात्र होती. कमलाकर जंगलातल्या एका मोठ्याशा खडकावर जाऊन बसला. त्याला आईची आठवण आली, अन् तिला प्रिय असणारं एक गाणं तो गाऊ लागला.

त्यानं गाणं संपवलं, तेंव्हा एका झाडाच्या मागून आवाज आला, ''काय अद्भुत् गाणं हे! किती मधुर! कोणता राग वगैरे आम्हाला काही कळत नाही, पण ते ऐकता ऐकता आमचं भानच हरपलं. संगीत प्रवाहात आम्ही जणू वहात होतो!'' टाळी वाजवत तीन भुतं त्याच्या जवळ येऊन उभी राहिली.

जीवनाला कंटाळलेल्या कमलाकरला भुतं पाहून भीती वगैरे मुळीच वाटली नाही. भुतं म्हणू लागली, ''गाणं तर छानच होतं, पण दुःखाचं होतं ते. एकादं उल्हासभरलं गीत गा न! खूप आनन्द वाटेल आम्हाला.''

''माझ्या जीवनातला आनन्दच जर संपलाय, तर उल्हासभरं गाणं कुठून आणू मी? माझ्या तोंडून रडकं गाणंच निघणार.''

''तू तर चांगला तरणाताठा आहेस. वय तरी कितीसं असेल तुझं? इतकं कसलं दुःख झालंय तुला, सांग तरी! नीट सांग सगळं!'' भुतांनी सहानुभूतीनं कमलाकरची चौकशी केली. कमलाकरनं आपलं दुःख त्यांच्यासमोर प्रकट केलं. अन् पार्वतीनं आपला तिरस्कार कसा केला, ते सांगितलं.

भुतांनी यावर आपसात चर्चा करून कमलाकरला म्हटलं, ''हं! बरीच गर्विष्ठ दिसतेय ही पार्वती. पण आता दुःख करू नको. या लग्नाची सारी जबाबदारी आमच्यावर सोपव. तू इथून सरळ शहरात निघून जा. पुढल्या पौर्णिमेला इथेच येऊन भेट आम्हाला.''

भुतांच्या बोलण्यावर कमलाकरचा मुळीच विश्वास बसला नाही, पण पुन्हा घराकडे जाणं त्याला आवडण्यासारखं नसल्यानं तो शहराकडेच वळला.

दुसऱ्या दिवशी पार्वती देवळाकडून परत फिरली तेंव्हा अंधार पडू लागला होता. झाडांझुडुपांनी वेढलेल्या पाऊलवाटेनं चालत असताना एक वाघ एका सशाचा पाठलाग करत असलेला तिला दिसला. वाघ अगदी तिच्या समोर आला, अनं तेवढ्यात ससा झुडुपात दिसेनासा झाला. पार्वतीला अचानक समोर पाहून जोरानं डरकाळी फोडून वाघाने तिच्यावरच झडप घालण्याचा पवित्रा घेतला. भयानं ओरडून पार्वतीने एकदम आपले डोळे मिटून घेतले. वाघाची उडी अंगावर पडायला उशीर झाल्याने तिने डोळे उघडून पाहिलं. समोरचं दृश्य पाहून ती आश्चर्यचकितच झाली. तिला कमलाकर एक चमकती तलवार म्यानात खोचत असलेला दिसला! त्याच्या पुढ्यातच मान अर्धी कापली गेलेल्या अवस्थेतला, तडफडत जमिनीवर पडलेला वाघ होता!

'हा कमलाकर तर मोठाच महावीर आहे!' असे पार्वतीला वाटले. प्राण वाचवल्याबद्दल आपली कृतज्ञता प्रकट करण्यासाठी तिनं आपलं पाऊल उचललं. पण तिला मुळीच अवसर न देता कमलाकर अंधारात अदृश्यही झाला. कदाचित् तिचे धन्यवाद स्वीकारायची त्याची





इच्छाही नसावी!

मन काहीसं दुखावलेली पार्वती घराकडे चालू लागली अन् इकडे ससा, वाघ अन् कमलाकरची रूपं धारण केलेली भुतं आपापल्या खऱ्या रूपात प्रकट झाली! आपल्या पहिल्या प्रयत्नात मिळालेल्या यशाबद्दल ती खूपच खुश होती!

दुसऱ्या दिवशी अशीच पार्वती देवळातून परत येताना वाटेपासून थोडं दूर एक नवंनवंच भवन  तिला दिसलं. ते पाहून तिला आश्चर्य वाटलं. त्याकडे थबकून पहाताना तिला दिसलं की आतून कमलाकरने बाहेर येऊन नोकरांना काही आज्ञा दिली अन् तो आत निघून गेला! पार्वतीचा तर आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. खात्री करून घेण्यासाठी नोकरांजवळ जाऊन तिनं विचारलं, ''कुणाचं भवन आहे हे?''

ते उत्तरले, ''हे श्रीमान् कमलाकर यांचं भवन आहे. जुन्या घरात रहाणं त्यांना आवडत नसल्यानं त्यांनी हे नवं भवन बांधवून घेतलंय.''

तोंडात बोट घालत पार्वतीनं विचारलं, ''एकाच दिवसात कसं काय बांधता आलं हे?''

''कमलाकरना सर्व शक्ति अन् युक्ति अवगत आहेत नं! असले प्रश्न ऐकायला आवडत नाही त्यांना.'' असं चिडून म्हणत ते नोकर आत निघून गेले.

हे सर्व कसं घडलं असावं, ते पार्वतीला कळेना! ती तशीच आपली वाट चालू लागली, अन् इकडे ते भवनही अदृश्य झालं. आपल्या दुसऱ्या सफलतेचंही भुतांना खूप समाधान वाटलं.

पार्वती रात्रभर जागीच राहिली. कमलाकरचं साहस अन् त्याच्या संपत्ती बद्दलचे विचारच राहून राहून तिला सतावत राहिले.

तऱ्हेतऱ्हेच्या विचारांमुळे थकलेली पार्वती दुसऱ्या दिवशी देवळातही गेली नाही. पण अंधार पडू लागल्यावर ती कमलाकरच्या घरासमोरील फूलबागेकडे गेली. तिथे तिला अनुपम सुन्दर अशा तीन तरुणी दिसल्या.

पार्वतीने चकित होऊन त्यांना विचारलं, ''तुम्ही कोण आहात? मी तर कधी या गावात पाहिलं नाही तुम्हाला?''



''आम्ही तिघी मैत्रिणी आहोत. शहरातल्या कचेरीत काम करणारा कमलाकर फार आवडतो आम्हाला; आमचं खूप प्रेम आहे त्याच्यावर! आमच्यातली जी आवडेल तिच्याशी लग्न करावं असा प्रस्ताव घेऊन आलो आहोत आम्ही. कमलाकरचं घर हेच समोरचं ना?'' तिघी सुंदरींनी विचारलं.

''होय, घर तर त्याचंच आहे; पण हल्ली तो इथं नाही रहात. पण मला वाटलेलं आश्चर्य दूर करा बरं! डोळे दिपवणारं सौन्दर्य आहे तुम्हा तिघींचं. मग तुम्ही त्या अगदी सामान्य अशा कमलाकरवर कशा भाळलात?'' पार्वतीनं त्यांना विचारलं.

तिच्या या प्रश्नावर एक सुंदरी हसून म्हणाली, ''किती मूर्ख तू तरी? तुझं फक्त बाह्य सौन्दर्यावरच लक्ष आहेसं दिसतंय. अशाच सौन्दर्याच्या मागे लागून माझ्या ताईनं लग्न केलं. पण काय झालं? गाडी उलटली अन् तिचा नवरा...''

पण तिला मधेच थांबवत दुसरी सुंदरी म्हणाली, ''आता इतकं सारं सांगत बसायची काय गरज? आपली मैत्रीण सुकुमारी हिला विसरलीस? मोठा मदनाचा पुतळा समजून जमीनदाराच्या मुलाशी लग्न केलं तिनं, अन् काय? तो तर मेला अगदीच लंपट निघाला! कोणता दुर्गुण त्याच्यात नव्हता सांग बरं? तो तर तुझ्या मैत्रिणीला छळत राहिला, अन्...''

तिच्या तोंडावर हात ठेवत तिसरी म्हणाली, ''या अंधारात त्या दुष्टाबद्दल कशाला बोलत राहिलीस? नावसुद्धा काढू नकोस त्याचं! मा-



ह्या मावशीच्या नातीचंच माहीत नाही का? चांगला सहा फूट अुंच, तगडा, सुरेख लांब नाक अनं तिरक्या मिशांच्या त्या महाबलेश्वराच्या साठी वेडी होअून लग्न केलंन् तिनं त्याच्याशी. पण त्याचं वागणं तर बघ! तो तर तिला एकाद्या बटकीपेक्षाही वाईट वागवतोय. तिचं बिचारीचं आयुष्य म्हणजे नरक बनलाय नुसता!''

त्या तिघींच्या वक्तव्यावर चिडत पार्वती म्हणाली, ''शेवटी म्हणायचंय तरी काय तुम्हा तिघींना? हेच ना, की कमलाकर दिसायला सुंदर नसला तरी मोठा गुणी आहे? तुम्हाला इथं यायला जरा अुशीरच झाला बरंका. तुम्हाला कदाचित ठाअूक नसेल की कमलाकरचं लग्न ठरूनही गेलंय.''

तिघींनी एकदम विचारलं. ''कुणाशी?''

''माझ्याशीच. आता जाअू शकता तुम्ही तिघी.'' असं म्हणत पार्वती वेगानं तिथून निघून गेली.

आता सांगायची गरजच नाही की त्या तरुणी म्हणजे आपली तीन भुतंच होती! त्यांच्या अपेक्षेप्रमाणेच पार्वतीच्या मनात बदल घडवण्यात ती यशस्वी झाली! खूप आनन्दाने वटवाघुळांचं रूप घेअून ती तिथून अुडून गेली.

पौर्णिमेच्या दिवशी तीन्ही भुतं ठरल्याप्रमाणे त्या खडकापाशी आली. पण कमलाकरबरोबर पार्वतीलाही तिथं पाहून ती घाबरून गेली.

त्यांचं भिणं पाहून पार्वती हसतच म्हणाली, ''तुम्ही तिघांनी माझा गर्व नाहीसा केलात, माझा अविवेक दूर केलात. मी ज्याला गारगोटी समजत होते, तो तर अस्सल हिरा निघाला हिरा! तुम्हा तिघांबद्दल कृतज्ञता व्यक्त करायलाच आलेय मी इथं! अगदी मनापासून आभारी आहे मी तुमची.''

भुतांचं भय दूर झालं अन् ती म्हणाली, ''इतकं चांगलं काम इतक्या थोड्या काळात आम्ही पुरं करू शकलो, याचाच आनन्द वाटतोय आम्हाला. आता तुम्ही दोघं मिळून एकादं आनन्दी गाणं म्हणा अनं आमचा आनन्द द्विगुणित करा.''

पार्वती अन् कमलाकर गाअू लागले अनं भुतं आनन्दाने टाळ्या देत नाचत राहिली!





# कीर्तिसिंह ४

(जयसेनने दिलेले आपल्या पित्याचे पत्र जयवर्माने वाचले. त्या पत्रात अद्भुत हाराबद्दलचे विवरण होते, परन्तु ते सारे गूढार्थाने भरलेले होते. जयवर्मा त्यातला गूढार्थ जाणू शकला नाही. अशा पाच पिढ्या निघून गेल्यानन्तर वर्तमान राजा सुषेणला असे वाटले, की तो हार आपला पुत्र कीर्तिसिंह याला मिळावा. यासाठी त्याने शक्तिसेनाच्या बुद्धिमत्तेचा अुपयोग करायचे ठरवले. त्याच वेळी इकडे कांभोजराजा गरुडदत्त, नगदेशचा राजा नागकर्ण अन् चानयचा राजा कुंडिनवर्मा यांनी मिळून एक कारस्थान रचले. त्या कारस्थानाप्रमाणे त्यांना हारही मिळणार होता आणि कोसलराज्यही. तिघांनी मिळून अशी योजना बनवली, की गुरुकुलातून परतणाऱ्या कीर्तिसिंहलाच वाटेत पकडून कैद करायचे!)

तसा तर कीर्तिसिंह वद्य प्रतिपदेला गुरुकुलातून बाहेर पडून कोसल देशात येणार होता. पण शक्तिसेना शुक्ल चतुर्दशीलाच बाहेर पडणार होती.

त्या दिवशी लवकर अुठून तिने पुरुषवेष धारण केला. ओठावर बारीकशी मिशी चिकटवली. आपल्या केसांचा बुचडा तिने डोक्याच्या वरील भागावर घट्ट बांधला व त्यावरून एटदार फेटा बांधला. घातलेल्या अंगरख्या वरून आतून चिलखत असलेले एक जाकीट घातले. तंग सुरवार घातली. एका कपडयाची घडी करून अंगरख्याभोवती कमरेवरून ती लपेटून तिने एका बाजूला घट्टशी गाठ मारली. कपड्याच्या घडीत तिने राजाने दिलेल्या पत्राची पेटी सुरक्षित ठेवली होती. यानन्तर तिने कमरेला तलवार लटकावली अन्



खांद्यावर धनुष्य लटकावून बाणांचा भाताही पाठीवर बांधला.

इतकी सगळी तयारी झाल्यावर घरातील देवाला व आपल्या पित्याला नमस्कार करून तिने आपल्या घोड्यावर ऊडी मारली.

शत्रूंच्या कारस्थानाची तिला काहीच कल्पना नव्हती. तरीही सावधगिरीम्हणून तिने ही सारी तयारी केली होती.

शक्तिसेना कोसलदेशातून बाहेर पडली अन् तिकडे गरुडदत्त अन् त्याचे मित्र आपले तीन सैनिक बरोबर घेऊन जंगलाकडे निघाले. आपल्याला पकडायला निघालेल्या या लोकांबद्दल कीर्तिसेनला काहीच कल्पना नव्हती. उलट, विद्याभ्यास संपवून आपण आपल्या देशाकडे परत निघालो आहोत, या आनन्दातच होता तो. कृष्णप्रतिपदेला सकाळीच आपले गुरु कृष्णचन्द्र यांचा आशिर्वाद घेऊन त्याने आपल्या सहपाठी मित्रांचाही निरोप घेतला. आपली घोडी भानुमती हिच्यावर स्वार होऊन तो निघाला.

दुपारपर्यन्त तो आरवली पर्वत-प्रान्ताच्या हद्दीत पोचला. तो ज्या ठिकाणी पोचला होता, तेथून उत्तर दिशेकडची वाट थेट कोसलराज्यात पोचत होती. पूर्वेकडली वाट कोसलच्या पूर्वसीमेवरील जंगलात जात होती. याच जंगलात शक्तिदेवीचे मंदिर असून त्या पलिकडील जंगलभाग थेट कांभोज सीमेपर्यन्त पोचत होता.

भानुमती कीर्तिसिंहला पाठीवर घेऊन खूप वेगाने इथवर येऊन पोचली होती, अन् इथे ती अचानक थांबली, अगदी अडूनच राहिली.

तशी तर भरवेगाने दिवसभर दौडूनही भानुमती कधी दमत नसे. पण तिला अशी अचानक अडलेली पाहून कीर्तिसिंहला आश्चर्य वाटले. कितीही चुचकारली तरी ती एक पाऊलही पुढे टाकायला तयार नव्हती. तिच्या या वागणुकीमुळे कीर्तिसिंहला काही संशय येऊन तो घोड्यावरून खाली उतरला. अन् त्याने चहूकडे बारकाईने नजर फिरवली. कुठे एखाद्या क्रूर श्वापदाची चाहूलही नव्हती. मग भानुमती अशी अडून का राहिली ? थोडा वेळ तो असाच विचार करत राहिला. त्याला असे वाटले की, आपणावर अचानक काही संकट कोसळणार असावे.

"घाबरू नको भानुमती. माझ्या केसालाही कोणी धक्का लावू शकणार नाही. संकट आलंच तर मी दूर करीन ते." असे म्हणत कीर्तिसिंहने घोडीच्या मानेवर, पाठीवर थोपटले अन् पुन्हा तिच्यावर स्वार होण्याचा प्रयत्न केला. पण पुन्हा बावचळून भानुमती दूर झाली. कीर्तिसिंहने ठरवले की - ठीक आहे, आपण थोडे चालतच जाऊया. पाहू काय होतंय! त्याने तलवार म्यानातून काढून हातात धरली, अन् हळूहळू तो पुढे चालू लागला. घोडीही त्याच्या मागे-मागे चालू लागली. सावधगिरी बाळगत दोघेही जरा दूर गेले.

एका झाडाखालून पुढे सरकत असताना काहीशा आवाजाने कीर्तिसिंहला वाटले की एखादी पातळशी वस्तु वरून आपल्या डोक्यावर कोसळणार आहे. वर नजर जाताच त्याला दिसले की लोखंडाची एक पातळशी जाळी मोठ्या वेगाने आपल्याकडे येत आहे!

कीर्तिसिंहने जाळी आपल्या डोक्यावर पडण्यापूर्वीच मोठ्या चपळाईने हाताने पुन्हा वर उडवली अन् तो स्वतः झेप घेऊन पुढे सटकला. मागे येणाऱ्या भानुमतीवर मात्र जाळी पडून ती त्यात अडकली.

कीर्तिसिंहने ताबडतोब स्वतःला सावरले. कमरेला लटकलेला खंजीर काढून तो वर फेकणार, इतक्यात दुसऱ्या बाजूने झाडावर बाणांचा वर्षाव झाला, अन् झाडावरून फळे टपकावीत, तसे तीन सैनिक घायाळ होऊन



MR-F3



किंचाळत खाली कोसळले, अन् टाचा घासत मरूनही गेले. हे सारे काही क्षणातच घडले!

या आकस्मित हल्ल्याने कीर्तिसिंह विस्मित झाला. तलवार हातात घेऊन बाण आलेल्या दिशेकडे पहात तो ओरडला, "कोण आहे तिथे?"

त्याच्या प्रश्नाच्या अुत्तरादाखल बशिकशा मिशीवाला एक तरूण झाडामागून पुढे आला अन् त्याने कीर्तिसिंहला नमस्कार केला.

आश्चर्याने त्या तरुणाला कीर्तिसिंहने विचारले, "कोण आहेस तू? हे मेलेले सैनिक कुणाचे?"

"कोण आहेत, ते मलाही माहीत नाही. त्यांच्या अंगावर ओळख पटवणारी काही वस्तु सापडू शकेल." युवक नम्रपणे अुत्तरला.

काहीही न बोलता पुढे होअून भानुमतीला जाळ्यातून मुक्त केले अन् नन्तर तो मेलेल्या शत्रुसैनिकांकडे वळला. तो शोधाशोधीत मग्न असेपर्यन्त त्याच्या रक्षणासाठी युवक हातात तलवार घेअून उभा होता. शत्रु कदाचित दुसरा हल्ला करील अशी शंका त्याच्या मनात होती.

तिघांचे कपडे वगैरे तपासल्यानन्तर कीर्तिसिंहच्या लक्षात आले की, ते तीन राज्यांचे तीन सैनिक मारेकरी आहेत! एक कांभोजचा, एक चालुक्यचा, अन् तिसरा नगदेशचा! कोसल व कांभोजच्या पिढीजात वैराची कीर्तिसिंहला काहीशी कल्पना होती. पण त्याला हे समजायला उशीर लागला नाही की, आता ही तीन राज्ये एक होअून त्याला मारून टाकायचे कारस्थान रचत आहेत!

युवकाकडे पाहून कीर्तिसिंहन विचारले, "हं, आता सांग बरं, कोण आहेस तू?" गंभीर होत युवक म्हणाला, "तुमच्या प्रश्नाचं मी अुत्तर देण्यापूर्वी माझ्या एका छोट्याशा प्रश्नाचं तुम्ही अुत्तर द्यायला हवं."

"मला प्रश्न? ठीक आहे, विचार." त्याला नीट निरखायचा प्रयत्न करत कीर्तिसिंह म्हणाला.

युवकाने विचारले, "आकाशाचा राजा अन् राणी कोण?"

हा प्रश्न ऐकताच कीर्तिसिंह तरुणाला ओळखत हसत म्हणाला, "शक्तिसेना!"



युवक वेषधारी शक्तिसेना आपले मस्तक झुकवत म्हणाली, "हे काही माझ्या प्रश्नाचं अुत्तर नव्हे!"

कीर्तिसिंह हसला. एका कार्तिक पौर्णिमेच्या दिवशी, तो कार्तिक दीपोत्सवासाठी आपल्या माते बरोबर गेला होता. अगणित नक्षत्रांमधे आपल्या तेजाने चमकणारा चन्द्र पाहून शक्तिसेना टाळ्या पिटत ओरडली होती, "अरे वा! आकाश काय पण सुन्दर दिसतंय! नदीत पसरलेल्या दिव्यांपेक्षा ही आकाशातली नक्षत्रच मनोहर आहेत. इथल्या भूमीवरील राजा बनण्यापेक्षा आकाशातला राजा बनणं किती छान होईल! कीर्तिसिंह, तू होशील आकाशाचा राजा?" अबोध बालिका शक्तिसेनाने त्या दिवशी हा प्रश्न विचारला अन् आपण तिला अुत्तरही दिले. तो सारा प्रसंग आत्ता कीर्तिसिंहला आठवला. त्याने शक्तिसेनाला अुत्तर दिले होते, "हो, मी नक्कीच बनेन आकाशाचा राजा! पण तुला राणी बनावं लागेल."

त्यांच्यातले हे संभाषण ऐकून दोन्ही मुलांच्या माता खळखळून हसल्या होत्या.

बाल्यकालातले ते प्रेम अजूनही आपल्या मनात जागे आहे की नाही, हे जाणण्यासाठीच शक्तिसेनाने आत्ता हा प्रश्न विचारल्याचे कीर्तिसिंहच्या लक्षात आले. हसतच तो शक्तिसेनाच्या जवळ गेला अन् म्हणाला, "कीर्तिसिंह आकाशचा राजा अन् शक्तिसेना



त्याची राणी आहे. माझं अुत्तर बरोबर आहे न महाराणी?"

शक्तिसेनाने लाजून मान खाली घातली.

"शक्ति! सांग बरं, या वेषात तू इथे का आलीस?" कीर्तिसिंहने विचारले.

"महाराजांनी स्वतःच मला पाठवलंय." असे म्हणत शक्तिसेनाने त्याला सर्व हकीकत सांगितली. आपल्या वस्त्रात लपवलेले पत्र तिने बाहेर काढले, त्याचा डोळ्यांना स्पर्श केला अन् ते कीर्तिसिंहच्या हाती दिले.

"तू हे पत्र मला देण्यासाठी येत आहेस, हे माहीत असल्यामुळेच हे लोक इथे आले असावेत." मेलेल्या सैनिकांकडे निर्देश करत कीर्तिसिंहने आपला अंदाज व्यक्त केला.



''पण माझ्या येण्याची खबर यांना मिळायची शक्यताच कुठे आहे? मला पाठवायचा निर्णय तर महाराजांनी अगदी अचानक, घाईघाईत घेतला. त्यापूर्वीच या लोकांनी तुला मारायचं कारस्थान रचलं असावं.'' त्याच्या शंकेचे निरसन करत शक्तिसेना म्हणाली.

''हां, असंही असू शकेल की मला पकडून अन् जीव घ्यायची धमकी देऊन हार मिळवायची योजना यांनी आखली असावी. काहीही असो, हे तर स्पष्टच आहे की, तीन्ही राज्य एक झालीयत, अन् तिघांनी मिळून कारस्थान रचलंय. आपल्या जवळ आता वेळ फार थोडा आहे. हे तिघं ठरल्या वेळेत परत आले नाहीत, तर ते दुष्ट मला शोधायच्या अुद्योगाला लागतील. म्हणून आपण आपलं काम लवकरात लवकर अुरकून राजधानीकडे कूच करावं हे बरं.'' असे म्हणत कीर्तिसिंहने पत्र अुघडले व पूर्ण वाचून शक्तिसेनाला विचारले, ''परमेश्वरी कोणासमोर आपलं मस्तक झुकवते?''

शक्तिसेना हसतच अुत्तरली, ''एकदा पुन्हा नीट वाच. परमेश्वरी ही तर स्त्रीच आहे ना? मग स्त्री कोणासमोर मस्तक झुकवेल? स्पष्टच आहे की, ती आपलं मस्तक परमेश्वरासमोर झुकवेल.''

''अगदी बरोबर बोललीस. बाकी सगळं तर सरळच आहे. परमेश्वराचा निवास आहे अुत्तर दिशेकडे. मनुष्याचा जीवनाधार आहे आहार. हा आहार पंचमहाभूतांपैकी एक असणारी भूमी देते. संपूर्ण भूमी एकाच पावलात पादाक्रान्त करतो वामन. त्याने विचारली होती - तीन पावले.'' कीर्तिसिंहने समस्या सोडवली.

''इथपावेतो तर तुला ठीकच समजलं कीर्तिसिंह. पण या इतक्याच आधारांनी तो हार कुठे आहे, ते कसं समजेल?'' शक्तिसेनाने विचारले.

याचे अुत्तर कीर्तिसिंह ताबडतोब देऊ शकला नाही. थोडा वेळ तो गंभीर होअून विचार करू लागला. नंतर म्हणाला, '' शक्ति, या साऱ्या आधारांच्या मदतीनं मला असं वाटतंय की तो हार शक्तिमंदिराच्या अुत्तरेकडे असला पाहिजे. भूमीच्या आत तीन पावले खोल गाडून तो



सुरक्षित ठेवला आहे."

हे ऐकून शक्तिसेना आनन्दित झाली. तेथून निघता निघता कीर्तिसिंह म्हणाला, "चल शक्ति, संध्याकाळ होता होता आपल्याला शक्तिमंदिरात पोचायला हवं."

दोघेही आपापल्या घोड्यांवर स्वार होऊन झाडांखालील वाटेने वेगाने निघाले.

शक्तिमंदिरात पोचता पोचता संध्याकाळ झाली. दोघेही घोड्यां वरून अुतरले. मंदिराच्या देखरेखीसाठी तेथे कोणी नसल्यामुळे सारे आवार निरुपयोगी झाडोऱ्याने भरून गेले होते. पुऱ्या मंदिरावर धुळीचा थर साचला होता. अन् सर्वत्र कोळ्यांची जाळी लटकलेली होती.

मंदिराची ही दुर्दशा पाहून दोघांनाही वाईट वाटले.

शक्तिसेना मन्दिराच्या प्रमुख द्वाराची किल्ली बरोबर घेअून आली होती. कीर्तिसिंहाने तिच्या साह्याने दरवाजा अुघडला अन् आत प्रवेश केला. गर्भागारात चमकत्या हिऱ्याची चमकी घातलेल्या देवीचे दर्शन झाले.

कीर्तिसिंह व शक्तिसेनाने गुडघे टेकून भक्तिभावाने देवीला नमस्कार केला.

"आई महाशक्ती, जी वस्तु वस्तुत: माझीच आहे, ती मिळवण्यासाठी मी इथे आलो आहे. त्या वस्तुचं फळ मी साऱ्या जनतेला वाटून देईन अशी मी प्रतिज्ञा करतो. तुझ्या करुणेला पात्र व्हावं इतकीच माझी स्वत:ची अपेक्षा आहे. यापेक्षा अधिक व्यक्तिश: मला काहीही नको. तूच माझी सर्वस्व आहेस, योग्य वाटेल ते कर. माझी पूजा स्वीकार." अशी प्रार्थना करून दोघांनीही हृदयपूर्वक नमस्कार केला.

आवारात पसरलेल्या झाडोऱ्यापासून स्वत:चे रक्षण करत दोघेही अुत्तरेकडे चालू लागले. तऱ्हेतऱ्हेच्या वृक्षांच्या मधेच एक बिल्ववृक्ष अुभा होता. कीर्तिसिंह वृक्षाकडे पहातच राहिला. नंतर म्हणाला, "शक्ति, हा वृक्ष पहा. हा तर शिवशंकराचा अत्यन्त प्रिय वृक्ष. हार इथेच कुठेतरी पुरला असावा."

"तुझं म्हणणं बहुधा बरोबर असावं. पण खोदायचं कसं?" शक्तिसेनाने निराश होत विचारले.

**क्रमश:**





# दोन स्वार्थी

**रा**जा विक्रमादित्य निराश होणारा नव्हता. जो दृढनिश्चयी होता. तो पुन्हा झाडाजवळ गेला, प्रेत खाली उतरवलं नि आपल्या खांद्यावर टाकलं. नेहमी प्रमाणे तो श्मशानाची वाट चालू लागला. तेव्हा प्रेतांत वसत असलेला वेताल बोलू लागला - "तू तर मोठा राजा आहेस. सगळी सुखं तुझ्या पायाशी लोळण घेत आहेत. मग तू आपल्यावर हे संकट का ओढवून घेतलं आहेस कोण जाणे ? स्वार्थी मनुष्य नीतीचा मार्ग सोडून अनीतीच्या वाटे सहज वाटचाल करतो हे विसरू नकोस. त्याला यापासून परावृत्त करणं कुणालाही शक्य नाही. वैशालीच्या दोन स्वार्थी माणसांची गोष्ट तुला सावध करण्यासाठी सांगतो. आणि वेताळ सांगू लागला."

विशाल देशचा राजा महादत्त याला वैशाली नावाची एकुलती एक मुलगी होती. ती सर्व विद्या शिकली. ऐन तारुण्यात तिचे रूप व गुण

## वेताळ कथा



यांची सर्वत्र प्रशंसा होऊ लागली. तिच्याशी लग्न करायला अनेक राजकुमार उत्सुक झाले. त्यांना वाटे - अशी सुंदरी आपल्याला पत्नी म्हणून मिळाली तर केवढे भाग्य! महादत्त पण योग्य वराचा शोध करू लागला. एकदा त्याने चार राजकुमारांची चित्रे वैशालीकडे पाठवली. या चारांपैकी कोणाला तरी तिने पतीच्या रूपात पसंत करावे अशी त्याची इच्छा होती.

वैशालीला त्यांच्यापैकी कोणीच आवडला नाही. ती राजाला म्हणाली - ''पिताजी, विशाल देशाचा राजा होऊं इच्छिणारा मूलतः गुणी, सुंदर, सुयोग्य व धैर्यवान असला पाहिजे. यांच्यापैकी कोणीच मला तसा दिसत नाही. यांच्यात कृत्रिमता अधिक आहे, नि स्वाभाविकता फार कमी.''

महादत्ताला मुलीची ही टीका ऐकून आश्चर्य वाटलं. कारण हे सर्व राजकुमार चांगले गुणवान, वीर नि ख्यातिप्राप्त होते.

विशाल देशाच्या उत्तर दिशेला केसर पर्वतावरील अरण्यात एक राक्षसी रहात असे. ती त्या भागातील माणसांना मारून खाऊन टाकी. त्यामुळे तेथील लोकात हाहाकार माजला होता. लोक भयभीत झाले होते.

गिरिजनांचा पुढारी राजाकडे आला नि म्हणाला - ''महाराज, आमची दुर्दशा बर्णन करावी तेवढी थोडीच. ही राक्षसी केव्हा येईल आणि आमच्या पैकी कोणाला खाऊन टाकील सांगता येत नाही. खाण्यापूर्वी दोन विचित्र प्रश्न विचारते आणि तिला पाहिजे ते उत्तर न मिळाले की त्या माणसाला खाऊन टाकते.''

''राक्षसीचे दोन प्रश्न तू मला सांगशील?'' महादत्तने विचारले.

''त्या राक्षसीचे प्रश्न आम्हा खेडुतांना तर काही समजत नाहीत. पण ती मात्र स्पष्टपणे सांगते की माझ्या दोन प्रश्नांची बरोबर उत्तरे दिली, तर मी सोडून देईन; नाहीतर खाऊन टाकीन!'' पुढारी सांगत राहिला.

आश्वासन देत राजा म्हणाला - ''तुम्ही काळजी करू नका. जा. त्या राक्षसीला मारून टाकण्याची व्यवस्था मी करतो. तुम्ही लोक सावध रहात चला.'' असे सांगून राजाने पुढाऱ्याला रवाना केले.



राजाने मंत्र्याशी विचार-विनिमय केला. एक योजना बनवून घोषणा करण्यात आली की जो कोणी राक्षसीच्या प्रश्नांची बरोबर उत्तरे देईल व तिला मारून टाकील त्याला राज्याचा एक भाग बक्षिस दिला जाईल. दिवस जात राहिले, पण हे आव्हान स्वीकारणारा कोणी पुढे येईना. राजाला काळजी वाटू लागली. पर्वत प्रदेशातील लोकांना संकटातून कसे वाचवावे हा विचार नित्य त्याच्या मनात थैमान घालू लागला. तेव्हा शिवचन्द्र नावाचा एक तरूण राजाकडे आला नि म्हणाला - ''महाराज, मी हे साहस करायला तयार आहे. मी या कार्यात यशस्वी होईनसा मला विश्वास आहे.''

''ती राक्षसी कसले प्रश्न विचारते हे आम्हाला ठाऊक नाही. ती फार क्रूर व पराक्रमी आहे हे आम्ही जाणतो. तू कोणकोणत्या विद्यांचं अध्ययन केलं आहेस?'' राजाने शिवचन्द्रला विचारले.

शिवचन्द्र म्हणाला - ''महाराज, मी कुठली ही विद्या शिकलेलो नाही. शेतात रात्रंदिवस राबणारा मी सामान्य शेतकरी आहे.''

संशय प्रकट करीत राजाने विचारले - ''तसा तू अशिक्षित आहेस. वीर पराक्रमी नाहीस. तरी पण राक्षसीला मारून टाकीन म्हणतोस! राज्य मिळविण्याच्या लोभाने आलेला दिसतो आहेस! मी काय सांगतो ऐक. मुकाट्याने परत जा. उगाच आपला प्राण गमावू नकोस.''



शिवचन्द्र नम्रतापूर्वक म्हणाला - ''मला या साहसात यश मिळाले तरी राज्यशासन माझ्याच्याने होणार नाही. मी काही इतका बुध्दिमान नाही. राजन्, कशाच्या लालचेने मी आपणापाशी आलेलो नाही. गिरिजनांचे संरक्षण करावे एवढाच माझा उद्देश्य आहे. माझ्याच गावचे प्रसिध्द विद्वान पंडित चन्द्रस्वामी हे ही माझ्या बरोबर येणार आहेत. आपण माझ्यावर विश्वास ठेवा आणि राक्षसिणीशी दोन हात करण्याची मला परवानगी द्या.''

राजाला वाटलं - हा शिवचन्द्र चांगला प्रामाणिक, नीतिमान आणि ध्येयासक्त दिसतो आहे. त्याने त्याला अनुमति दिली. शिवचन्द्र राजभवनातून बाहेर पडला आणि पंडित



चन्द्रस्वामींना भेटला. राजाशी झालेले सगळे बोलणे त्याने पंडितजींना सांगित्तले.

राजाने परवानगी दिल्याचे समजताच चन्द्रस्वामीचा चेहरा पडला. तो शिवचन्द्राला म्हणाला - ''हे बघ, मी आपला जंगलाच्या सरहद्दीवर बसून राहीन. मी आत प्रवेश करणार नाही.''

शिवचन्द्र म्हणाला - ''ठीक आहे. जशी तुमची इच्छा! चला, आपण चलू या.'' दोघे जंगलाकडे जायला निघाले. दुपार पर्यंत ते केसर राज्यात पोचले.

उंचच उंच जंगली वृक्षांकडे पहात चन्द्रस्वामी म्हणाला - ''शिवचन्द्र, आता मी एक पाऊल पुढे टाकणार नाही. इथेच जंगलाच्या या किनाऱ्यावर मी बसून राहणार!'' आणि तो तिथंच जमिनीवर बसला. एवढ्यात एक युवक तेथे आला आणि आपला परिचय देत सांगू लागला - ''माझं नाव विशालदत्त! तू येथील राक्षसीचा वध कसा करतोस हे पहायला मी आलो आहे. तुझ्या या मित्रा बरोबर मी ही इथेच बसतो.''

शिवचन्द्र आनंदाने म्हणाला - ''हा माझा मित्र चंद्रस्वामी. फार विद्वान् आहे हा! राक्षसीच्या प्रश्नांची उत्तरे देण्यासाठी हा मला मदत करणार आहे. ठीक आहे, आता मी जंगलात प्रवेश करतो.''

शिवचन्द्र जंगलात एक कोसभर चालत राहिला. एका झाडाच्या मागून त्याने एक चमत्कारिक हंसण्याचा ध्वनि ऐकला. मागे वळून तो पाहणार एवढ्यात त्या काळ्या - कभिन्न राक्षसिणीने त्याला आपल्या मुठीत घट्ट आवळले. शिवचन्द्र जरा सुद्धा घाबरला नाही. आपले सर्व धैर्य एकवटून त्याने एकदा राक्षसिणीकडे निरखून पाहिले. राक्षसिणीला वाटलं की आपल्याला पाहताच हा माणूस घाबरून जाईल, आरडाओरडा करील नि प्राणांची भीक मागेल. पण तसं काही घडलं नाही. शिवचन्द्र निर्भयपणे राक्षसीकडे पाहू लागला.

क्षण भर थांबून राक्षसी म्हणाली - ''माझे आक्राळ-विक्राळ रूप पाहून ही तुला भय वाटले नाही. तू मूर्ख तर नाहीस? आपली असहाय्यावस्था जाणून तर मुकाट्याने बसला नाहीस? तुझी बुद्धिमत्ता नि शौर्य यांबाबत मला शंका येत आहे. तू कोणी ही असलास तरी मला काय करायचंय त्याच्याशी! माझ्या प्रश्नांची तू बरोबर उत्तरे दे म्हणजे झालं.''

निर्भयपणे शिवचन्द्रने विचारले - ''विचार बरं तुझे प्रश्न!''

''पृथ्वीवर प्रत्यक्ष दिसणारा देव कोणता?'' राक्षसीने विचारले.

शिवचन्द्राने विचारले - ''बस, हा एकच प्रश्न? का आणखी ही काही प्रश्न आहेत तुझे?''

''आणखी एक प्रश्न आहे. अपराध्याला शिक्षा देणाऱ्याला नाइलाजाने पश्चात्ताप होत आहे. त्याला वाईट वाटत आहे. तो कोण बरं?'' राक्षसीने आपला दुसरा प्रश्न विचारला.

शिवचन्द्र म्हणाला - ''उत्तर देण्यापूर्वी माझी एक इच्छा आहे.''

''बोल, काय इच्छा आहे तुझी?'' आश्चर्याने राक्षसीने विचारले.

शिवचन्द्राने इच्छा व्यक्त केली - ''माझे दोन प्रिय मित्र जंगलाच्या सरहद्दीवर बसले आहेत. त्यांना भेटून एकदा त्यांचा निरोप घेऊन येतो. तुझ्या प्रश्नांची मी बरोबर उत्तरं दिली, तरच मी त्यांना पुन्हा भेटू शकेन! हो की नाही?''

हाती आलेल्या शिवचन्द्राचा निर्भयपणा पाहून राक्षसीला वाटलं - याची इच्छा पूर्ण करावी. ती म्हणाली - ''प्रामाणिक माणसं हिम्मतवान असतात. धोका देणारे भ्याड! मी



तुझ्यावर विश्वास ठेवते. जा, तू आपल्या मित्रांना भेटून ये.''

धावत - पळत जाऊन शिवचन्द्र चन्द्रस्वामी व विशालदत्त यांना भेटला. राक्षसीचे प्रश्न सांगून त्याने चन्द्रस्वामीला विचारले - ''झटपट दोन्ही प्रश्नांची उत्तरं सांग पाहूं.''

चंद्रस्वामीने सांगितले - ''पृथ्वी वर प्रत्यक्ष दिसणारा देव म्हणजे जन्मदात्री माता!''

शिवचन्द्राने आतुरतेने विचारले - ''बरं, आणि दुसऱ्या प्रश्नाचं उत्तर काय?''

''अपराध्याला शिक्षा देत असताना आपल्या लाचारीवर ज्याला पश्चात्ताप होतो तो राजाशिवाय दुसरा कोण बरे असणार?'' चन्द्रस्वामीचे उत्तर स्पष्ट नव्हते नि त्याला थोडी



शंका ही होती असे दिसले.

विशालदत्त मधेच तोंड घालत म्हणाला - "नाही, नाही! ती पण जन्मदात्री आईच! मुलाच्या कल्याणासाठी ती शिक्षा देते. आपला मुलगा अपराधी असल्याबद्दल तिला दुःख ही वाटते. अपराध केल्याबद्दल बिचारीला नाइलाजाने मुलाला शिक्षा करावी लागते!"

शिवचन्द्र ताबडतोब तेथून निघाला नि राक्षसीकडे आला. प्रशंसायुक्त नजरेने त्याच्याकडे पहात राक्षसी म्हणाली - "आलास तू? नक्की येणार हे मला माहीतच होतं." शिवचन्द्राने राक्षसीला तिच्या प्रश्नांची उत्तरे सांगितली. राक्षसीला ती उत्तरे ऐकून फार आनन्द झाला. त्याचं बोलणं संपलं आणि राक्षसी एकाएकी अदृश्य झाली आणि तिच्या जागी एक देवता साकार झाली.

शिवचन्द्राला मोठे आश्चर्य वाटले. त्याच्याकडे पहात मंद-स्मित करीत ती म्हणाली - 'शिवचन्द्र,मी एक यक्षिणी आहे. माझं नाव विद्युत्प्रभा. शापग्रस्त होऊन मी राक्षसी बनले. शंभर वर्षांपूर्वी या भागात पुंडरीक नावाचे एक महर्षि रहात असत. पत्नीच्या निधनानंतर तीन वर्षांच्या आपल्या मुलीचे त्यांनी प्रेमाने लालन-पालन केले. ते एकदा जेव्हा येथे आले तेव्हा त्यांच्या सौंदर्याने मी मंत्र-मुग्ध होऊन गेले. मी त्यांना माझ्याशी लग्न करायाची विनंती केली. पण त्यांनी ती मानली नाही. त्यांच्या मुलीला धाक दपटशा दाखवून आपली इच्छा पुरी करण्यासाठी मी काळ्या राक्षसीचे रूप धारण केले. आपल्या बागेत खेळत असलेल्या त्या मुलीला मी उचललं. मला पाहताच ती मुलगी खूप घाबरली आणि आरडा- ओरडा करू लागली. एवढ्यात ती माझ्या हातातून निसटली व जमिनीवर पडली.

मुलीचं ओरडणं ऐकून पुंडरीक ऋषि धावत आले. ते खूप रागावले आणि त्यांनी मला शाप दिला - जे रूप धारण करून तू माझ्या मुलीला भिववलेस, तेच तुझे रूप कायम राहील. मी महर्षींच्या पाया पडले आणि मला शापमुक्त करण्याची प्रार्थना केली.

माझी प्रार्थना ऐकून महर्षींना दया आली. ते मला म्हणाले - "विद्युत्प्रभा, स्त्रीचं सहज लालित्य तुझ्या ठिकाणी नाही. आपलं मूल जेव्हा अपराध करतं, तेव्हा आई त्याला शिक्षा करते. ही शिक्षा देत असताना तिच्या हृदयाला वेदना होतात. आईचं हृदय असं निर्मल, स्निग्ध नि कोमल असतं. आई म्हणजे या पृथ्वीवर प्रत्यक्ष दिसणारा परमेश्वर! तुला शापमुक्त होण्याचा एक मार्ग आहे. ऐक. शंभर वर्षे तू असेच जीवन व्यतीत करशील. त्यानंतर मी तुला आता जी मातृ-महती सांगितली, ती दोन प्रश्नांच्या रूपात कुणाला तरी विचार. जो योग्य उत्तर देईल, त्याच्या दर्शनाने तुझे पाप धुवून निघेल, आणि तू माझ्या शापातून मुक्त होशील." एवढं सांगून त्यांनी ते दोन प्रश्न व त्यांची उत्तरे ही मला सांगितली.

आश्चर्यचकित होऊन शिवचन्द्रने यक्षिणीला नमस्कार केला व निवेदन केले - "पण माते, मी दिलेली उत्तरं माझी नाहीत. मी तर अगदी अशिक्षित अडाणी माणूस आहे."

त्याच्या या बोलण्यावर विद्युत्प्रभा हसत म्हणाली - "मी यक्षिणी आहे! मला काय एवढं ही माहीत नाही असं वाटलं तुला?"

आपला उजवा हात शिवचन्द्राच्या डोक्यावर ठेवीत तिने पुढे सांगितले - "पुत्र शिवचन्द्र, तू सर्व शस्त्र-विद्या व शास्त्रात पारंगत होशील. तुझी बरोबरी कोणी ही करू शकणार नाही. अणिमा, महिमा इत्यादि यक्षांच्या सहज विद्या आहेत. या विद्या ही तुला प्राप्त होतील." असा



आशीर्वाद देऊन यक्षिणी अंतर्धान पावली.

आनंदित होऊन शिवचन्द्र परतला आणि सर्व वृत्तान्त चन्द्रस्वामी व विशालदत्त यांना निवेदन केला.

चन्द्रस्वामी म्हणाला - "यक्षांकडून वरदान प्राप्त करणारा वीर आहेस तर तू! ठीक आहे. मी आता चाललो." निराश होऊन तो तिथून आपल्या घराकडे निघाला.

शिवचन्द्र पहातच उभा राहिला. तेव्हा विशालदत्त त्याला म्हणाला - "हा चन्द्रस्वामी स्वार्थी आणि ईर्ष्यालु आहे. तू वाईट वाटून घेऊ नकोस." आणि विशालदत्तने आपल्या कपड्यात लपवलेला एक हार काढून शिवचन्द्राच्या गळ्यात घातला. तो पुढे म्हणाला

- ''हा चंदनाचा हार आहे. दिसायला साधा असला तरी आपला सुगंध सर्व दिशांना पसरवतो. तू आणि हा हार यांच्यात समानता आहे. तुम्हा दोघांच्यात एकच गुण आहे. या हाराने तुला माझे स्मरण होत राहील.''

शिवचन्द्र क्षण भर गप्प बसला आणि मग त्याने विचारले - ''चन्द्रस्वामीला माझा हेवा वाटणे स्वाभाविक आहे. पण तू एवढे प्रेम का करतोस हे काही मला समजत नाही.''

विशालदत्तच्या वेषात आलेली वैशाली लाजून म्हणाली - ''फार उशीर झाला. आता मी जाते.'' शिवचन्द्राचा निरोप घेऊन ती निघून गेली. शिवचन्द्र पण राजधानीत पोचला. राजाला भेटून आपला सर्व वृत्तांत सांगितला. राजाने त्याचा सन्मान केला आणि वैशालीशी त्याचा विवाह करून दिला.

एवढी गोष्ट सांगून वेताळाने विक्रमादित्याला विचारले - ''राजा, वैशालीने अनेक प्रसिद्ध राजकुमारांना नाकारले. शिवचन्द्राला यक्षिणीकडून वरदान मिळताच मात्र त्याच्याशी विवाह केला. हा तिचा स्वार्थच नाही का? चन्द्रस्वामी स्वार्थी व ईर्ष्यालु असल्याचा तिने आरोप केला. आपल्याला प्राप्त झालेल्या वरदानासुळे वैशालीचा स्वार्थ त्याच्या लक्षात ही आला असेल. तरी ही त्याने तिच्याशी विवाह केला, कारण तिच्याशी लग्न करून तो राजा बनू शकणार होता. माझ्या या शंकेचे समाधान माहीत असून ही जर तू केले नाहीस, तर तुझे शिर धडावर राहणार नाही.''

राजा विक्रमादित्याने आपला विचार सांगितला. ''वैशालीच्या बोलण्यावरून असं दिसतं की ती माणसाचे बाह्य सौंदर्य नाही, तर आंतरिक सौंदर्य पाहते. शिवचन्द्राने सामान्य माणसांच्या संरक्षणासाठी आपले प्राण पणाला लावले. इतकेच नव्हे तर यक्षिणीकडून वर ही मिळवले. अशा आदर्श माणसावर कोण प्रेम करणार नाही? म्हणून अशा व्यक्तीला स्वार्थी म्हणणे हे तुझे अज्ञान आहे.''

अशा रीतीने राजाचा मौन-भंग झाल्यावर वेताळ तेथून अदृश्य झाला व झाडाच्या फांदीवर जाऊन बसला.

**(आधार-तुलसी व सुचित्रा यांची एक कथा)**



# चान्दोबा पुरवणी - ७०

## भारताची वृक्षसंपदा




### सागवान

घराचा मुख्य दरवाजा, खिडक्या, बाके, खुर्च्या वगैरे ज्या लाकडापासून बनवले जाते , ते किंमती लाकूड म्हणजेच सागवान-लाकूड. हे केवळ किंमतीने जास्त म्हणून नव्हे, तह गृहोपयोगी सामान बनवण्यासाठी अुपयुक्त असे सर्वश्रेष्ठ लाकूड आहे. लॅटिन भाषेत याला 'टेक्टोना ग्रंडीस' असे म्हणतात. 'टेक्टान' नावाच्या ग्रीक शब्दाचे हे रूपान्तर होय. 'टेक्टान' म्हणजे सुतार. 'ग्रंडीस' चा अर्थ आहे, मोठे व जाड. एकूण वृक्षामधे हा सर्वात अुंच व जाड बुंध्याचा वृक्ष असल्यामुळेच त्याला हे नाव प्राप्त झाले. इंग्रजीत याला 'टीक' म्हणतात. सागवान वृक्ष ३० ते ६० फूट अुंच वाढतो.

या झाडाला चारही बाजूंना फांद्या फुटलेल्या असतात. याची पाने समोरासमोर असतात. पाने चांगलीच मोठी असून छत्रीसारखी वाटतात. पानाचा वरचा भाग खडबडीत असून आतला भाग लाल-वैंगणी रंगाचा असून मअू असतो. विशेष ऋतूत डहाळ्यांच्या कोपऱ्यात लहान-लहान पांढऱ्या फुलांचे गुच्छ दिसू लागतात. नोव्हेंबर-डिसेंबरमधे या झाडाची पाने गळून पडतात अन् झाड नुसतेच काष्ठवत् अुघडे-बोडके दिसते.

सागवान लाकूड खूप मजबूत असते. त्यामुळेच रेल्वे-लाईन अन् जहाजबांधणीसाठी याचा अुपयोग केला जातो. पूल बांधण्यासाठी व वाहनांची चाके बनवण्यासाठी ही याचा खूप वापर होतो. महाराष्ट्रातील कार्ला लेण्यातील मुख्य गुहा आतल्या बाजूने सागवान लाकडानेच आच्छादलेली आहे. दोन हजार वर्षे झाली, तरीही ते लाकूड अजून जसेच्या तसेच सुरक्षित आहे. सागवानाच्या श्रेष्ठत्वाचा हा एक पुरावाच होय.

अुत्तर भारतातील सागवान लाकडापेक्षा केरळ व कर्नाटकातील लाकूड श्रेष्ठ मानले जाते. पण त्याहूनही अुत्तम म्हणजे ब्रह्मदेशातील सागवान लाकूड.

## सुप्रसिध्द धर्मग्रन्थ



# झेंद् अवेस्ता

सातव्या शतकात काही पार्शी लोक पर्शिया व इराणमधून भारतात आले अन् तेव्हापासून येथेच स्थायिक झाले. भारतालाच ते आपली मातृभूमि मानू लागले. आपल्या देशाच्या अुन्नती व विकासांत त्यांनी महत्त्वाची कामगिरी बजावलेली आहे. अल्पसंख्यांक असले, तरी हे पार्शी लोक देशात सर्वत्र विखरून स्थायिक झालेले आहेत.

झोरॅस्टर (झरतुष्ट्र) हा एक बुध्दिमान वक्ता होता. पारशी हे त्याचाच अुपदेश घेतलेले झोरॅस्ट्रियन धर्माचे अनुयायी होत. इतिहासकारांचे असे म्हणणे आहे की झरतुष्ट्रचा जन्म ख्रिस्तजन्माच्या एक हजार वर्षांपूर्वीच झाला होता. एका डोंगरावर ध्यानमग्न राहून ते आपले जीवन व्यतीत करत असतानाच एकदा त्या डोंगराला वणवा लागला अन् ते आपले स्थान सोडून खाली आले. नंतर जनतेला सन्मार्ग दाखवीत त्यांनी आपले आयुष्य खर्ची केले. जनतेला त्यांनी जीवनाचे ध्येय दाखवून दिले.

झोरॅस्टरचे सारे अुपदेश 'जेन्द अवेस्ता' मधे लिहून सुरक्षित केलेले आहेत. सुरुवातीला एकूण एकवीस 'अवेस्ता' होते. पण कालक्रमानुसार संख्या घटत गेली.

असे मानले जाते की, झोरॅस्टर जन्मले, तेंव्हा त्यांच्या शरीराभोवती एका दिव्य कान्तीचे वलय निर्माण झाले. जन्मल्याबरोबर रुदन ऐकू येण्याऐवजी हास्य ध्वनि ऐकू आला! शैशवावस्थेतही ते नेहमी हसतच असत. त्यांना याबद्दल कोणी विचारले तर ते सांगत, "नेहमी भले विचार मनात आणा आणि भलेपणानेच आचरण करा. भलेपणा हा भगवान प्रदत्त गुण आहे. तुम्हीही भलेपणा जनतेत वाटत रहाल, तर माझ्या सारखेच हसत संतुष्ट जीवन जगू शकाल.

संपूर्ण देशात जेंव्हा घोर दुष्काळ पडला, तेंव्हा झरतुष्ट्राच्या मातापित्यांनी आपली सारी संपत्ती लोकांना वाटून टाकली. झरतुष्ट्रांना याबद्दल आनंदच वाटला. त्यांनी असा विचार केला की, अशा सद्भाग्याची क्वचितच प्राप्ति होत असते. झोरॅस्टर जेंव्हा सत्यशोधनासाठी बाहेर पडले, पित्याने आपली संपत्ती त्यांना देअू केली, ती घेण्याबद्दल आग्रहही केला; परन्तु त्यांनी नकार दिला. त्यांनी केवळ आपल्या पित्याच्या कमरेचा पट्टा स्वीकारला. ते म्हणाले की हे माझ्या घराचे स्मृतिचिन्ह आहे. एका डोंगरावर ते दहा वर्षे राहिले. तेथे त्यांनी अनेक संकटांना तोंड दिले. ते सत्यशोधनाच्या कार्यात ध्यानमग्न झाले. शेवटी 'अहुरा मज्दा' (दिव्य कान्ती) शी त्यांचे बोलणे झाले, व त्यांनी आपले शंकानिरसन करून घेतले. या 'दिव्य कान्ती' ने संक्षेपात जे श्रेष्ठ विचार, कार्य व मार्ग सुचवले, तोच त्यांनी आपला सिध्दान्त मानला अन् त्याचाच प्रचार जनतेत केला, त्यांना सन्मार्गाने जाण्याचा मार्ग दाखवला.

पाण्याच्या प्रवाहात वाहून गेल्यामुळे आता पूर्ण असा फक्त एकच ग्रन्थ, आणि अन्य ग्रन्थांचे काही भागच फक्त अस्तित्वात आहेत. 'जेन्द अवेस्ता' आणि आपल्या वेदांची सूक्ते यात असणारे साम्य हे वैशिष्ट्यपूर्णच मानायला हवे.



'अहुरा मज्दा' हे कान्ति आणि सत्याचे अधिपती मानले जाते. अुलट अन्हिमान हे अंध:कार व दुष्टतेचे प्रतीक असल्याने या दोहोत नेहमीच झगडे होत रहातात. 'अवेस्ता' चे असे आव्हान आहे की, 'शेवटी दुष्ट शक्तींचा नाश होअून शिष्ट शक्तीच विजयी होतील.'

"जरी 'अर्माज्द' मानवांचा सृष्टिकर्ता असला तरी त्याच्यावरही दुष्ट शक्तीचा प्रभाव पडतोच. सत्यासाठी जो मानव पवित्र जीवन जगायला कटिबध्द होईल, त्याचा नक्कीच जय होईल. हा जय सत्य व प्रकाशाचा असेल." झोरॅस्टरने आपल्या सूक्तीत या गोष्टीवर जोर दिलेला आहे.

त्यांच्या आणखी काही सूक्ति अशा आहेत - "मानव अुत्तम कामे करील, तर त्याला दिव्यत्व मिळेल. मानवाला जन्मभर सत्यासाठी झगडत रहावे लागेल अन् त्यासाठी त्याचे चालणारे प्रयत्नच अन्तत: त्याला परमेश्वराप्रत घेअून जातील."

"मनुष्य विश्वासपात्र राहून सत्यमार्गापासून कधी ढळला नाही, तर त्याला अुपलब्ध होणारे फळ महत्तर असेल"

"दैवप्रणाली अन् प्रयोजन नेहमी ध्यानात ठेवायला हवे. सदा त्याचेच मनन करणे आवश्यक आहे."

# तुम्हाला माहीत आहे काय ?

१. गल्फ देशांपैकी सर्वात लहान देश कोणता ?
२. आपल्या राष्ट्रीय चिन्हात तीन प्राणी अंकित आहेत. ते प्राणी कोणते ?
३. लहान मुलांच्या मनोरंजनासाठी खास कार्य करणाऱ्यांना [illegible]लंडमधील मुलांकडून पुरस्कार मिळतो. या पुरस्काराचे नाव काय ? हा पुरस्कार एकाच भारतीयाला प्राप्त झाला. त्याचे नाव काय ?
४. 'मेसापोटेमिया' चा अर्थ आहे - दोन नद्यांमधला प्रदेश. तो कोणत्या नद्यांमध्ये वसला आहे. त्याचे सध्याचे नाव काय ?
५. भारतातला पहिला अंतरिक्षयात्री कोण ?
६. बासरीला किती छेद असतात ?
७. चर्नोबिल अपघात केव्हा घडला ?
८. लहानपणी झाशीच्या राणीचे एक दुसरेच नाव होते. ते कोणते ?
९. 'प्रेशर कुकर' चा संशोधक कोण ?
१०. जगभरातल्या देशांच्या रुंदीच्या तुलनेत आपल्या देशाचे स्थान कितवे ?
११. एकाच कुटुंबातल्या चार लोकांना 'नोबल पारितोषिक' मिळाले. ते कुटुंब कोणते ?
१२. आपल्या राष्ट्रीय झेंड्याचे तीन रंग कोणी सुचवलेले आहेत ?
१३. आपल्या शरीरातील रक्ताचा एक थेंब शरीरभर फिरून यायला किती वेळ लागतो ?
१४. 'अंटार्टिका' मधे आपल्या देशाचे जे स्थान प्रथम निश्चित झाले, त्याचे नाव काय ?
१५. काजूत जास्त प्रमाणात मिळणारे व्हिटॅमिन कोणते ?
१६. बालकांसाठी इंग्रजीत प्रथम प्रकाशित झालेल्या मासिकाचे नाव काय ?

## उत्तरे

१. बहारेन.
२. सिंह, घोडा आणि बैल.
३. ऑर्डर ऑफ स्पेल. कार्टूनिस्ट शंकर (के. शंकर पिळे. 'चिल्ड्रेन्स वर्ल्ड' चे संपादक) यांना हा पुरस्कार मिळाला.
४. टायग्रेस व युफ्रेटिस, इराक.
५. राकेश शर्मा.
६. आठ.
७. २५ एप्रिल १९८६.
८. मनकर्णिका (मनू).
९. रॉबर्ट बोएल.
१०. सातवा.
११. क्यूरीज, मेरी क्यूरी, पिअरी क्यूरी व कन्या आयरिन क्यूरी.
१२. पिंगली वेंकय्या.
१३. तीस मिनिटे.
१४. दक्षिण गंगोत्री.
१५. सी व्हिटॅमिन.
१६. दि लिलिपुटियन्स.



# चोरी

सुहास अगदीच गरीब होता. तसे त्याचे आजोबा, पणजोबा वगैरे पूर्वज चांगले धनवान होते. परन्तु त्याच्या पित्याला व्यापारात जबरदस्त खोट आली; अन् त्या धक्क्याने हृदयक्रिया बन्द पडून त्यांचा मृत्यु ओढवला. यावेळी सुहासला चार लहान लहान मुले होती.

आपल्याच गावात काही कामधन्दा करून अपमानित जिणे जगणे त्याला आवडण्यासारखे नसल्याने पत्नी व मुलांसह सुहास एका दूरच्या गावी निघून गेला, तेथे त्याने खूप कष्ट केले. पण रात्रंदिवस काम करत राहूनही आपलं कुटुंब पोसण्याइतकी प्राप्ती त्याला होत नसे. अत्यन्त आवश्यक जिनसा खरीदणेही त्याला अवघड होऊ लागले.

गावात अनेकांकडून त्याने थोडे-बहुत कर्जही घेतले होते. तेच परत करू न शकल्यामुळे आता आणखी कोणाकडून पैसे मिळणेही अशक्य झाले होते. मुले बिचारी भुकेने तळमळताना पाहून त्याला फार दुःख होई. त्यांची भूक भागवण्यासाठी केलेले त्याचे सारे प्रयत्न निष्फळ झाले. एके दिवशी तो एका संपन्न माणसाच्या घरासमोरून चालला होता. घर कसले, एक महालच म्हणावा इतके मोठे होते ते. अुत्तमोत्तम कपडे व अलंकार घातलेल्या स्त्री-पुरुषांची तेथे ये-जा चालू होती.

या धनवान माणसाकडे काही शुभ-कार्य चालू होते. स्वयंपाकी तऱ्हेतऱ्हेची पक्वान्ने बनवत होते. त्या पदार्थाच्या सुगंधाने सुहासला आकृष्ट केले.

तेथे समोर अुभा राहून सुहास लक्षपूर्वक आत पाहू लागला. सर्व पाहुणेमंडळी मेजवानी झोडण्यात मग्न होती. त्याने एकवार आपले मळके धोतर अन् फाटका सदरा न्याहाळला. या अवस्थेत कोणाच्या न कळत पंक्तीत बसून जेवणेही अशक्य होते. आता काय करावे, असा

अनिरुद्ध तांबे



त्याला प्रश्न पडला. संधी साधून तो झटकन पाकशाळेत घुसला. समोरच दिसलेला पदार्थ हातात घेऊन तोंडात टाकणार, इतक्यात कोणी व्यक्ती आत येत असल्याची चाहूल लागून तो एका मोठ्याशा हंड्यामागे लपला.

पाकशाळेत येणारी व्यक्ती म्हणजे एक तीस पस्तिशीची बाई होती. ती चांगली गोरीगोमटी लठ्ठ होती. तिचा चेहरा पाहून सुहासने ओळखले की ती काहीशी घाबरलेली आहे. इतक्यात दुसरीकडून आवाज आला, ''कान्ता! येता येता वांग्याची भाजी आण ग वाढायला.''

''आणते.'' कापऱ्या आवाजात उत्तर देऊन आपल्या कपड्यात दडवलेले एक सोन्याचे नेकलेस काढून ती जळत्या चुलीवरच्या एका पदार्थाकडे वळली. सुहासला प्रथम ते नेकलेस दिसलेच नव्हते. त्याला वाटले की पदार्थात ही एकादे विष वगैरे मिसळून टाकायला तर नाही आली ?

पण कान्ताने एकवार चोहोकडे नजर टाकून, आपणाकडे कोणी पहात नाहीसे पाहून हातातले नेकलेस त्या पदार्थाच्या भांड्यात टाकले. त्याच वेळी सुहासला तो दागिना बरोबर दिसला.

कान्ताने दागिना पदार्थाच्या भांड्यात का टाकला, ते काही सुहासला समजेना. भुके-मुळे फार विचार करणेही त्याला शक्य झाले नाही.

सुहासने परातीतल्या काही पुऱ्या अुचलल्या अन् तो खाऊ लागला. तितक्यात कोणीसे त्याला पाहिले, अन् तो 'चोर चोर' म्हणत मोठ्याने ओरडू लागला.

भीतीमुळे पुऱ्याही सुहासच्या हातून गळून पडल्या. त्याने पळायचा प्रयत्न केला, पण इतक्यात दोघा चौघांनी येऊन त्याला पकडले. अन् त्याला घेऊन ते सर्वजण यजमानांकडे गेले.

ते यजमानाला म्हणू लागले, ''हूं! रात्री चोर पकडणं एक वेळ सोपं, पण दिवसा? चोराला काय पळून जायला दहा वाटा! तरीही दिवसा ढवळ्या चोरी करणारा चोर आम्ही मोठ्या कौशल्याने पकडलाय. अशा लग्न समारंभांच्या वेळी निरनिराळ्या प्रकारचे चोर संधी पहात असतात. पण हा तर मोठाच लुटारू दिसतोय!''





सुहासला पकडल्यामुळे, आपण जणू काही आकाशातले तारेच तोडून आणल्याच्या आविर्भावात ते बकबक करत राहिले. यजमान आपल्याला शाबासकी देईल अशी त्यांची अपेक्षा.

व्यंगाने हसत यजमान म्हणाला, ''बरंबरं, समजलं, जास्त सांगायची काही जरूर नाही, याला आपण 'लग्नाचा चोर' म्हणणं ठीक होईल.''

यजमान सुहासला 'चोर' म्हणाला, तेंव्हा त्याला वाईट वाटले. तो म्हणाला, ''महाराज, मी कोणी चोर डाकू नाहीय. चार मुलं आहेत मला. बेकार आहे, भुकेनं तडफडणारा एक दरिद्री जीव आहे मी. आजपर्यन्त खूप नियन्त्रण ठेवलं भुकेवर, पण आज तिनं माझ्यावर मात केली, अन् मला तुमच्या पाकशाळेत लोटलं. खरा चोर तर ही 'भूक' आहे.''

सुहासची चेष्टा करत यजमान म्हणाला, ''पण चोर तो चोरच ना ? तो तू असशील, नाहीतर तुझी भूक असेल. चोरीच्या अपराधा-बद्दल तुला शिक्षा तर व्हायलाच हवी.''

त्याने नोकरांना आज्ञा दिला की, 'चोराला आपल्या खोलीत घेऊन यावे.' खोलीत आल्यावर यजमानाने सुहासला बसायला सांगितले व नोकरांकरवी तऱ्हेतऱ्हेचे पदार्थ मागवून घेतले. अन् सुहासला ते खायला फर्मावले. सुहासने पोटभर खाऊन घेतले. पण खाताखाता तो रडत ही होता. नंतर यजमानाने त्याला विचारले, ''तुला मी का खाऊ घातलं माहीत आहे?''

सुहासने नकारात्मक मान हलवली. ''तू तर ऐकलंच असशील की भोजन हे परब्रह्मस्वरूप असतं. मनुष्याच्या जीवनात अशी दीन परिस्थिति कधीच येऊ नये, की त्याला चोरून खावं लागावं! तुला पाहून वाटत पण नाहीय की तू पक्का चोर असशील. बोल, अशी चोरी का करू धजलास?''

सुहासने आपली सगळी रामकहाणी यजमानाला सांगितली. आपल्या वडिलांचे व्यापारात कसे नुकसान झाले, तो स्वतः कसा कर्जबाजारी झाला, अन् शेवटी अन्नाची चोरी का करू धजला, इत्यादि.

सुहासला सहानुभूती दाखवत खोल श्वास ओढून यजमान म्हणाला, "व्यापारात नेहमी लाभच होतो असं नाही; एकाद्याचं नुकसानही होतं. तुला चोर बनायला कोणत्या परिस्थितीनं भाग पाडलं, हे मला छान कळलंय. तुझी मुलंही अशी चोर बनायची शक्यता आहे. मी आत्ता तुझी भूक भागवलीच. जाताना आपल्या बायकामुलांसाठीही खाणं बांधून घेऊन जा. तुला नोकरीही द्यायचं ठरलंय मी. उद्या येऊन भेट."

यजमानाच्या पावलांना स्पर्श करून नमस्कार करत सुहास म्हणाला, "जन्मभर ऋणी राहीन मी तुमचा. तुमच्या कृपेनं मी पोटभर खाल्लंय, पण लग्नघरचे हे पदार्थ रुचकर आहेत की नाहीत, हे नाही विचारलं तुम्ही मला?"

सुहासच्या बोलण्याने यजमानाच्या मनात संशय अुत्पन्न झाला, अन् भुवया अुंचावत त्याने विचारले, "हो खरंच, विचारायला तर विसरूनच गेलो मी. बोल, कसे लागले पदार्थ तुला?"

"वा, पदार्थ तर अुत्तम आहेतच; पण सोन्याची खीर तर फारच स्वादिष्ट आहे." सुहास अुत्तरला.

"अं? सोन्याची खीर? जे सांगायचंय ते स्पष्ट सांग पाहू!" यजमानाने आतुरतेने म्हटले.

स्वयंपाकघरात आपल्या डोळ्यांनी पाहिलेला सारा चमत्कार सुहासने सांगून टाकला. यजमानाने भांड्यातले नेकलेस बाहेर काढवले. ते तर नवऱ्यामुलीचे होते! कान्ताला बोलावून तिची चांगली हजेरी घेतल्यावर तिने आपला गुन्हा कबूल केला.

भुकेमुळे चोरी करणाऱ्या सुहासबद्दल यजमानाच्या मनात सहानुभूती अुत्पन्न झाली. त्याच्यामुळेच आपला दागिनाही परत मिळाला. खऱ्या चोराला पकडून देअून त्याने मोठेच लाभदायक काम केले.

दिल्या वचनाला जागून यजमानाने सुहासला चांगली नोकरी देअून त्याच्या कुटुंबाचा अुध्दार केला. आता सुहासची पत्नी अन् मुलांना भुकेने तळमळायची गरज राहिली नाही.





# पित्याचा सल्ला

गोविन्दवर एकाच वेळी अनेक जबाबदाऱ्या येऊन पडल्या. वडिलांची तब्येत सुधारण्यासाठी त्यांच्या औषधपाण्याची व्यवस्था करायला हवी होती. आईची रेशमी साड्या घेण्याची कित्ती दिवसांची हौस पूरी करायला हवी होती. दोन बहिणींचे विवाह करायचे होते. घराची दुरुस्ती आवश्यक होती.

इतक्या जबाबदाऱ्या पार पाडायच्या, तर काही इस्टेटही त्याच्याकडे नव्हती. गोविन्द बुद्धिमान होता. पण जगरहाटी जाणत नव्हता. तो स्वतः फारच चांगला होता. पण चांगल्या माणसांच्या हुशारीचा अुपयोग नेहमी दुसरे लोक करून घेतात. त्याला स्वतःला त्याचा काहीच अुपयोग होत नाही.

अनेकांनी त्याला सुचवले की, 'धन कमव, चांगला धनवान बन.' पण त्याचे बाबा मात्र त्याला म्हणत, "बेटा, काहीही झालं तरी आपला भलेपणा सोडू नकोस, खरा आनन्द तर चांगुलपणाने वागण्यातच मिळतो."

गावातल्या अुत्पन्नावर घर चालवणं कठीण झाल्यामुळे कामाच्या शोधात तो शहराकडे निघाला. वाटेत एक जंगल होतं. बरेच चालल्यानन्तर दमून तो एका झाडाखाली विश्रान्तीसाठी बसला.

खूप पूर्वीपासून त्या झाडावर एक भूत रहात असे. साथीला कोणी नसल्यामुळे त्या भुताला फार एकटे एकटे वाटे. गोविन्दला पहाताच त्याने खाली अुडी मारली. त्याला अचानक पाहून घाबरलेल्या गोविन्दला त्याने धीर दिला. अन् त्याला त्याने सर्व हकिकत विचारली. नंतर गोविन्दला ते म्हणाले, "हे बघ, तू आपला माझ्याशी काहीतरी बोलत रहा, माझं मनरंजन कर. म्हणजे झालं. शहरात जायची तुला काही आवश्यकता नाही. तुला हवं तितकं धन देईन मी."

गोविन्दने धीर एकवटला अन् एक

कोकिळ जाधव

महाचोराची गोष्ट त्याने भुताला सांगितली. ती ऐकून भुताला फार आनन्द झाला अन् ते म्हणाले, ''तूही माझा मित्र बनून इथेच रहा नं! तुझी बोलायची, गोष्ट सांगायची पद्धत मला फार आवडली बघ.''

गोविन्द त्याला म्हणाला, ''मी नक्की राहिलो असतो तुझ्याबरोबर. पण घरातल्या माझ्या जबाबदाऱ्यांचं काय करू मी?''

थैलीभर सोन्याची नाणी गोविन्दच्या हाती देत भूत म्हणाले, ''लवकर जा अन् आपल्या जबाबदाऱ्या पार पाडून ताबडतोब परत ये.''

गोविन्द घरी गेला. त्याने पित्याची चिकित्सा करवली, आईसाठी रेशमी साड्या खरीदल्या, घराची डागडुजी केली, अन् तीन एकर जमीनही घेतली. इतके सगळे केल्यावर त्याला भुताची आठवण आली अन् तो पुन्हा जंगलाकडे परतला.

तिथे भुताबरोबर एक आठवडा राहून गोविन्दने त्याला राजाराणीच्या गोष्टी सांगितल्या. गोविन्द बरोबर असला, की भूत फारच खुशीत असे. त्याने पुन्हा घरी जाण्याची गोष्ट केली, तेंव्हा भुताला वाईट वाटले. अुदास आवाजात त्याने विचारले, ''तू कायम माझ्याजवळच नाही का राहू शकणार?''

गोविन्द म्हणाला, ''मला अजून बहिणींचे विवाह करायचे आहेत. आईबाप कायम सुखात राहतील अशी सोयही करून घ्यायची आहे. तूच सांग बरं, या जबाबदाऱ्या सोडून तुझ्याच बरोबर कसा राहू?''

भुताने या खेपेला गोविन्दला दुप्पट सोने देअून म्हटले, ''ठीक आहे. आपल्या सर्व जबाबदाऱ्या पार पाडून ये तू.''

गोविन्द घरी गेला. त्याने आणखी शेत जमीन खरेदी केली. बहिणींचे विवाह करून दिले, अन् जेंव्हा त्याची खात्री झाली, की त्या आपल्या आईबापांची नीट काळजी वहातील, तेंव्हा त्याला खूप आनन्द झाला. आता फक्त भुताची इच्छापूर्ती करणे शिल्लक राहिले.

भुताबद्दल गोविन्दने खूप विचार केला. 'आपण जोपर्यन्त मनुष्यरूपात आहोत, तोपर्यन्त आपणाला आपल्या माणसांचे आकर्षण राहील. तेंव्हा आपण स्वतःही भूत बनलो, तर कायम त्याच्याबरोबर राहू शकू. आपल्या कुटुंबालाही आता आपली काही जरूर नाहीय.' तो आता अशा निर्णयावर आला की, 'ज्या भुताने आपल्याला मदत केलीय, त्याच्याबरोबर कायम रहायचे असेल तर त्याला एकच अुपाय आहे. अन् तो म्हणजे आत्महत्त्या!'

गोविन्दने असेही ठरवले की गावातल्या डोंगरावरून अुडी मारून आत्महत्त्या करायची. तो ताबडतोब घरातून बाहेर पडला. तो जेंव्हा डोंगरशिखरावर पोचला, तेंव्हा त्याला तेथे एक सुंदर तरुणी दिसली. तो तिच्याकडे पहातच राहिला.

त्या तरुणीचे नाव होते सरला. तिची आई लहानपणीच वारली अन् पित्याने दुसरे लग्न केले. सावत्र आई तिला फार छळत असे. तिला खूप कामही पडे, सदान् कदा बोलणी ऐकून घ्यावी लागत. तिने सारे काही सहन केले. पण आता तिची आई तिचे लग्न एका रोगी म्हाताऱ्याशी करून देअू पहात होती. त्यामुळे तीही



